

# श्री वाल्मीकिरामायण

या ग्रंथाचें

# मराठी सुरस भाषांतर

भाग दुसरा

४ किष्किंधाकांड

५ सुंदरकांड

प्रकाशक :

ग. वि. चिपळूणकर आणि मंडळी, पुणें.

श्रीरामायण संपूर्ण सेट भाग १ ते ५ किं. रु. पंधरा फक्त



श्रीरामप्रसन्न

# श्रीवाल्मीकिरामायण

या ग्रंथाचें

# मराठी सुरस भाषांतर.

## भाग दुसरा.

४ किष्किंधाकांड. ५ सुंदरकांड.

लेखक

कै. काशिनाथशास्त्री लेले वाईकर.

प्रकाशक

बाळकृष्ण पांडुरंग ठकार

मालक व व्यवस्थापक गणेश विष्णु चिपळूणकर आणि मंडळी, पुणें.

मुद्रक

त्र्यंबक हरी आवटे मालक इंदिरा प्रेस, पुणें.

आवृत्ति दुसरी.

शके १८५० सन १९२९.

हा ग्रंथ गणेश विष्णु चिपळूणकर आणि मंडळीचे व्यवस्थापक व मालक
**बाळकृष्ण पांडुरंग ठकार** यांनीं पुणें पेठ सदाशिव घर
नंबर २७० येथील रा. रा. **त्र्यंबक हरी आवटे**
यांच्या ' **इंदिरा** ' छापखान्यांत छापवून
घर नंबर १७२ पुणें पेठ बुधवार
येथें प्रसिद्ध केला





# अर्पण पत्रिका.

ॐ

नमो भगवते सशक्तिक श्री रामचंद्राय.

ज्या अखिल ब्रह्मांडनायकाच्या कृपेनें सृष्टींतील यच्चयावत् कार्यें घडतात, ज्याच्या कृपेनें या अनिवार्य मायामोहाचें निरसन-करितां येतें व जो अज्ञान जीवांना परमपद प्राप्त करून घेण्याकरितां बुद्धिसामर्थ्य देतो, त्या परम कारु-णिक श्रीरामचंद्राच्या कृपेनें तयार झालेला आणि त्याच्याच प्रेरणेनें

श्री. सरकार राजे

**शामराव राजा रायरायान, दक्षिण हैद्राबाद**

यांच्या कुटुंबिनी

**श्री. सौ. जान्हवीबाई राणीसाहेब उर्फ ताईसाहेब**

यानीं आपल्या कै. सौ. मातोश्रींच्या

**स्मारकार्थ**

म्हणून उदार चित्तानें आश्रय दिल्यामुळें तयार झालेला हा

**रामायणाचा द्वितीय भाग**

आरंभीं सशक्तिक श्रीरामचंद्राचे चरणीं महापूजेदाखल अर्पण करून त्या भगवंताचा प्रसाद म्हणून तोच राणीसाहेबांच्या मातोश्री कै. श्री. वज्रचुडे मंडित

**सौ. पार्वतीबाई उर्फ बाईसाहेब विंचुरकर**

यांच्या श्रीरामचंद्र चरणीं स्थिर झालेल्या आत्म्यास अर्पण केला आहे.

शुभं भूयात्.

श्रीसशक्तिक राजा रामचंद्र प्रसन्न.

# प्रकाशकांचे चार शब्द.

आपदामपहर्तारं दातारं सर्वसंपदाम् ।
लोकाभिरामं श्रीरामं भूयो भूयो नमाम्यहम् ॥ १ ॥
यत्कृतं यत्करिष्यामि तत्सर्वं न मया कृतम् ।
त्वयाकृतं तु फलभुक्त्वमेव मधुसूदन ॥ २ ॥

श्रीसशक्तिक, षड्गुणैश्वर्यसंपन्न, प्रभु श्रीरामचंद्राच्या कृपेनें महाराष्ट्र बंधु-भगिनींच्या सेवेस आज '**श्रीवाल्मिकीरामायणाच्या मराठी सुरस भाषांतराचा दुसरा भाग**,' सादर करितांना आम्हांस परम समाधान वाटत आहे. हा दुसऱ्या आवृत्तीचा दुसरा भाग होय.

सद्यःस्थितींत हें काम हातीं घेण्याचें कारण पहिल्या भागाच्या प्रकाशकांच्या शब्दांत निवेदन केलेंच आहे. पंचवीस वर्षांनंतर हा योग आला असून ता. १।१।२९ व १२।२।२९ च्या केसरींत '**चिपळूणकर मंडळींची जाहीर विनंति**' या मथळ्याखालीं विस्तृत जाहिरात देऊन आमचा अखेरचा हेतु स्पष्टपणें कळविला असतांहि आणि उपसंहारासहित नव्या रामायणाकरितां मागणी यावी म्हणून कल्पनातीत स्वार्थत्याग केला असूनहि कोट्यावधीच्या संख्येनें मोजिल्या जाणाऱ्या बृहन्महाराष्ट्रांतील आबालवृद्ध बंधुभगिनींना अत्यंत नम्रतापूर्वक प्रार्थना केली. तथापि बोटानें मोजण्या इतकीहि मागणी येऊं नये, हें खरोखरच **विचित्रकालचरित** होय असें मोठ्या कष्टानें उद्गार काढून, हताश स्थितींत सर्वांचा निरोप घेऊन इहलोक सोडण्याचा प्रसंग येतो कीं काय, अशी आम्हांस निराशाजनक भीति प्रत्येक दिवशीं वाढत्या प्रमाणांत वाटत आहे.

बंधुभगिनींनो, सतत २५ वर्षें ज्या चिपळूणकर मंडळीनें अनेक अपरिहार्य संकटांस तोंड देऊन वाङ्मयदेवतेबरोबर जनताजनार्दनाची एकनिष्ठ सेवा केली, त्या चिपळूणकर मंडळींच्या एका अवशिष्ट चालकाची वर नमूद केलेली अखेरची आशा तुम्हां सर्वांकडून सफल होऊं नये, हें कशाचें लक्षण मानावयाचें ? सर्वांच्या निष्ठुरतेचें किंवा आमच्या विचित्र दैवगतीचें !

प्रस्तुत महाराष्ट्रांत एक, तीन, चार, अशा आण्यावारी चालणाऱ्या मालांना व अत्यंत गलिच्छ गोष्टींचे चित्रपट दाखविणाऱ्या सिनेमासंस्थांना सह-कुटुंब सहपरिवार जाऊन आश्रय देण्याची कल्पनातीत प्रवृत्ति,—मुंबई पुण्या-सारख्या मोठमोठ्या शहरापासून तो अगदीं खेड्यापाड्यापर्यंत—प्रकृतीला व नीतीला अपायकारक अशी वाढत आहे, त्या नागरिक म्हणविणाऱ्या महा-राष्ट्रीय बंधुभगिनींना—ज्याच्या परिशीलनानें ऐहिक व पारमार्थिक सुखाची समृद्धी वाढेल—अशा अनुकरणीय ऋषिप्रणीत वाङ्मयाबद्दल बेफिकीरी वाटावी, हें खरो-खरीच **विचारवंताना** खेदजनक वाटेल यांत बिलकुल शंका नाहीं.

असो. या अप्रासंगिक विषयाशीं संलग्न होण्याची आम्हांस तिळमात्र इच्छा नव्हती; पण प्रसंगतः महाराष्ट्रीयांची सद्यःप्रवृत्ति ओघानें पुढें आल्यामुळेंच आम्ही येथें थोडें तिचें दिग्दर्शन केलें आहे.

गेल्या श्रीरामनवमीच्या सुमुहूर्तावर आम्हीं श्रीरामायणाच्या कामास आरंभ करून आतांपर्यंत दोन भागांत सुंदरकांड अखेर पांच कांडांचें भाषांतर प्रसिद्ध केलें आहे. तिसऱ्या भागांत युद्ध व उत्तर कांड यांचें भाषांतर प्रसिद्ध होऊन ग्रंथ पूर्ण होईल. हें काम शके १८५१ च्या श्रीरामजन्मापर्यंत संपविण्याचा आमचा संकल्प ता. १।१।२९ व १२।२।२९ च्या केसरींतील जाहीर विनंतीनें सर्वांना कळविलाच आहे. त्यांत कल्पनेपेक्षां जास्त सवलत दिली आहे. तिचा सर्वांनींच उपयोग करून घेऊन, आम्हांस उपकृत करावें येवढीच सर्वांस फिरून फिरून प्रार्थना आहे.

आजपर्यंत मिळविलेल्या व पुढें मिळविण्याची आशा असलेल्या संस्थानिकां-च्या मदतीवर विश्वासूनच व पोस्टखर्चाची जबाबदारीहि ग्राहकांवर न टाकितां ती संस्थेवर ठेवून चैत्र शु. ९ शके १८५१ या दिवसापर्यंत—श्रीरामजन्मा-पर्यंत—अवघ्या बारा रुपयांत उपसंहारासहित सर्व रामायण देण्याचें आम्हीं ठरविलें आहे. म्हणून आणखी एकवार हस्तें परहस्तें साहाय्य करून कृतार्थ करण्याबद्दल सर्वांना प्रार्थना करून आम्ही अन्य विषयाकडे वळतों.

रामायणाच्या पहिल्या भागास ज्याप्रमाणें श्री. पुण्यशील डॉवेजर रमाबाई राणीसाहेब पटवर्धन, संस्थान जमखंडी, यांनीं मदत देऊन आम्हांस कृतार्थ केलें, त्याप्रमाणेंच प्रस्तुत प्रसंगींहि श्री. सरकार राजे **शामराव राजा रायरायान बहादुर साहेब, डेक्कन हैद्राबाद** यांनीं आपल्या कुटुंबाच्या

—श्री. सौ. **जान्हवीबाई राणीसाहेब ऊर्फ ताईसाहेब** यांच्या—इच्छेनुरूप त्यांच्या मातोश्रींच्या कै. श्री. **अखंड वज्रचुडेमंडित सौभाग्यवती पार्वतीबाई ऊर्फ बाईसाहेब विंचूरकर यांच्या** स्मारकार्थ म्हणून मदत केल्यामुळें तयार झालेला हा रामायणाचा दुसरा भाग प्रथम श्रीसशक्तिक राजा रामचंद्रास अर्पण करून त्या भगवंताचा महाप्रसाद म्हणून तोच भाग श्री. कै. बाईसाहेब यांच्या **श्रीरामचरणीं विलीन झालेल्या** दिवंगत आत्म्यांस अर्पण केला आहे. भागारंभीं बाईसाहेबांचें छायाचित्र व अल्पचरित्रहि दिलें आहे. या देणगीबद्दल उभयतां सरकारांचें जेवढें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच होईल.

या भागांत प्रसंगतः आलेल्या चित्रांबद्दलचा उल्लेख पहिल्या भागांतील **प्रकाशकांच्या शब्दांत** केलाच आहे. तेव्हां त्याची पुनरुक्ति येथें करण्याचें कारण नाहीं. श्रीमंत सरकार बाळासाहेब पंतप्रतिनिधी बी. ए. संस्थान औंध, यांनीं चित्ररूपानें बहुमोल साहाय्य करून श्रीरामायणाच्या बाह्य सौंदर्यांत अभिनंदनीय भर टाकिली आहे. या त्यांच्या औदार्याबद्दल त्यांचें जेवढें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच आहे.

अखेर रामायणाचा तिसरा भाग ठरीव मुदतींत प्रसिद्ध व्हावा म्हणून सर्वांतर्यामीं वास करणाऱ्या श्रीसशक्तिक रामचंद्राची पुनश्च साष्टांग प्रणिपातपूर्वक प्रार्थना करून त्या भागाच्या तयारीकरितां सर्वांची रजा घेतों.

मु. पुणें. माघ शुद्ध ५
गुरुवार शके १८५०
ता. १४।२।२९ इ.

सर्वांचा नम्र सेवक,
**बाळकृष्ण पांडुरंग ठकार.**
प्रकाशक.

# कै० श्री० सौ० पार्वतीबाई ऊर्फ बाईसाहेब विंचुरकर.



जन्म—मिति पौष वद्य ३० गुरुवार शके १८०७.

मृत्यु—वैशाख वद्य ५ रविवार शके १८२५.

—[ चित्रशाळा प्रेस, पुणें. ]—

# कै. श्री. सौ. पार्वतीबाई ऊर्फ बाईसाहेब विंचूरकर यांचें अल्प जीवनचरित्र.

## पितृकुल.

कै. श्री. सौ. बाईसाहेब या इतिहासप्रसिद्ध अशा भोर संस्थानचे माजी अधिपति कै. श्री. हिज हायनेस शंकरराव रावसाहेब पंतसचीव संस्थान भोर, यांच्या कन्या होत.

## मातृकुल.

कै. सौ. बाईसाहेब यांच्या मातोश्री, कै. श्री. सौ. जिजीसाहेब याहि इतिहासप्रसिद्ध अशा सरदार बापुसाहेब विंचूरकर यांच्या कन्या होत. भोरच्या राजघराण्यांत यांचा शरीरसंबंध श्री. शंकरराव रावसाहेब यांच्याशीं झाला होता. हें दंपत्य धार्मिक आचरणांत अत्यंत विख्यात होतें. सुमारें ५० वर्षांच्या आपल्या दीर्घ कारकिर्दींत कै. रावसाहेब यांनीं भारतवर्षांतील सर्व यात्रा आपल्या सर्व परिवारासह केल्या होत्या. अर्थात्, कै. सौ. बाईसाहेब या जन्मादारभ्य अशा प्रकारच्या मातापित्यांच्या सान्निध्यांत बालपणापासून अखेरपर्यंत राहिल्यामुळें सहजच त्यांची प्रवृत्तिहि बालपणापासून धर्ममार्गांत अखेरपर्यंत कायम टिकून राहिली होती.

## जनन.

श्रीमंत बाईसाहेब या कै. श्री. रावसाहेब पंतसचीव भोरकर यांचें चवथें अपत्य होय. बाईसाहेबांचा जन्म ता. ४–२–१८८६ (पौष वद्य ३० गुरुवार शके १८०७) या दिवशीं झाला. या प्रसंगीं उभयतां मातापितरांना कल्पनातीत आनंद झाल्यामुळें यांच्या बारशाचा समारंभ फारच मोठा खर्च करून रावसाहेबांनीं केला. पुढें वाढत्या वयाबरोबर त्यांच्या गुणांचाहि विकास होत असलेला पाहून त्यांच्या मातापित्यांच्या त्या एक परमानंद स्थान मात्र होऊन राहिल्या होत्या. इतकेंच नव्हे, तर सर्व निकटवर्ती आश्रितवर्ग आणि सर्व नोकरचाकर यांनाहि त्यांच्या सद्गुणांचें कौतुक वाटत असे.

## शिक्षण.

याप्रमाणें बाईसाहेबांच्या वयाला पांच वर्षे पूर्ण झाल्यानंतर आजच्याप्रमाणें त्या वेळीं स्त्रीशिक्षणाचा प्रश्न फारसा पुढें गेला नव्हता, तरी श्रीमंत रावसाहेबांनीं बाईसाहेबांच्या शिक्षणाची तरतुद घरीं व शाळेंत योग्य करून दिली होती. त्यामुळें बाईसाहेबांचें शिक्षण लग्नाच्या समयापर्यंत चांगल्या प्रकारें लेखन-वाचन, गणित इत्यादि फारच व्यवस्थित चाललें होतें. त्यांच्याबरोबर आश्रितवर्गांतील लोकांच्या ४।५ मुली शिकत होत्या. त्यांत बाईसाहेब या बुद्धिमत्तेनें सर्वांत अग्रेसर होत्या. कै. श्री. सौ. जिजीसाहेब यांचा पुष्कळसा काळ देवतार्चन व प्राकृत ग्रंथपठण यांत जात होता. तीच संवय बाईसाहेबांनाहि लागल्यामुळें रुक्मिणीस्वयंवरासारखे प्राकृत धार्मिक ग्रंथ व गोष्टींचीं पुस्तकें वाचणें यांत त्यांचा बराच काळ जात असे. भोर येथील मुलींच्या शाळेंत त्या जात असत. शाळेंतील सर्व मुलींबरोबर त्या मोठ्या प्रेमानें वागत असत. त्यामुळें शाळेंतील मुलीहि त्यांच्याबरोबर मोठ्या आदरयुक्त प्रेमानें वागत.

## विवाहयोग.

याप्रमाणें कार्यक्रम चालला असतां बाईसाहेबांचें वय बारा वर्षांपर्यंत आल्यामुळें त्यांच्या मातापितरांना आपल्या कन्येस योग्यतेनुरूप स्थळ कसें मिळेल, ही चिंता लागली होती; पण फारसे आयास न पडतां त्या चिंतेचा परिहार घरबसल्याच झाला. रावसाहेबांनीं आपली कन्या श्री. सरदार बाळासाहेब विंचूरकर यांचे प्रथम चिरंजीव 'श्री. **शिवदेवराव ऊर्फ भाऊसाहेब विंचूरकर**' यांनाच देण्याचें ठरविलें. कारण, कै. श्री. अण्णासाहेब विंचूरकर यानीं भाऊसाहेबांना दत्तक घेऊन आपल्या जहागिरीचे वारस केले होते. त्यामुळेंच श्री. रावसाहेबांनीं वरील योजना कायम केली. विंचूरकरांकडील मुलगी आपल्या मुलांस करून घेण्यांत व स्वतःची मुलगी विंचूरकरांकडे देण्यांत रावसाहेब व जिजीसाहेब या उभयतांनीं पूर्वीचा संबंध आणखी पुढें वाढविण्यांत फारच व्यवहारकुशलता दाखविली. श्रीरामकृपेनें श्री. विंचूरकर व श्री. सचींव या घराण्यांचे परस्पर शरीरसंबंध अव्याहत आतांपर्यंत सारखे तीन पिढ्या चालले आहेत.

हा लग्नसमारंभ संस्थान भोर येथें ता. ३ मे सन १८९६ ( वैशाख वद्य. ६ रविवार शके १८१८ ) या दिवशीं फारच थाटानें झाला. या समारंभानिमित्त श्री. रावसाहेबांनीं ३१००० रुपये खर्च करून शिवाय आपल्या

लाडक्या कन्येस ५०००० रु. चे जडजवाहीर दिलें. याशिवाय संस्थान-च्या सुधागड तालुक्यापैकीं ६०० रुपये उत्पन्नाचीं २ गांवें व इंग्रजी हद्दींतील ६०० रुपये उत्पन्नाचीं २ गांवें अशीं ४ गांवें खरेदी करून तीं बाईसाहेबांचे नांवें कायमचीं करून दिलीं.

श्री. सौ. बाईसाहेबांचें सासरचें नांव **पार्वतीबाई** असें ठेविलें होतें, तरी त्यांना सासरींहि बाईसाहेबच म्हणत असत. सासरच्या मंडळींशीं कसें वागावें, याचें योग्य शिक्षण त्यांना त्यांच्या मातोश्रींकडून मिळाल्यामुळें व जात्याच त्या अत्यंत प्रेमळ होत्या म्हणून थोड्याच कालांत त्यांनीं माहेराप्रमाणें सासरींहि सर्वांचें प्रेम संपादन केलें व हें बालपणापासूनच्या संस्काराला योग्य असेंच झालें. बाईसाहेबांचे पति श्रीमंत सरदार भाऊसाहेबहि अत्यंत सुशील, सुशिक्षित निगर्वी, बुद्धिवान व दिलदार स्वभावाचे, तसेंच जनक बापाप्रमाणें रुबाबदार सरदार असल्यामुळें थोड्याच कालांत उभयतांचे प्रेमवर्धन होऊन तें फलोन्मुख होण्याचा समय प्राप्त झाला.

## संततीयोग.

याप्रमाणें श्री. सौ. बाईसाहेब व श्री. सरदार भाऊसाहेब या दंपत्याची कालक्रमणा व्यवस्थित चालली असतांना बाईसाहेबांना लग्नानंतर पांच वर्षांनीं पहिलें अपत्य 'कन्या' ता. ३१ जानेवारी सन १९०२ (पौष वद्य. ८ शुक्रवार शके १८२३) या दिवशीं झालें. मुलीचें नांव **जान्हवीबाई ऊर्फ ताईसाहेब** असें ठेविलें. श्रीमंत सचिवांचे घराण्यांत रावसाहेबांच्या कारकीर्दींत जन्मास आलेल्या मुलींचीं नांवें जान्हवी, भागीरथी, काशी अशा प्रकार-चींच ठेविलीं जात असत. कारण वर्ष दोन वर्षांनीं श्रीमंत सहकुटुंब सहपरिवार काशीस जात असत व त्यामुळेंच हा परिपाठ चालू असे. या नातीचें मुख पाहून दोन्ही घराण्यांतील स्त्रीपुरुषांना—मुख्यतः श्री. रावसाहेबांना व श्री. सौ. जिजीसाहेबांना—परम हर्ष झाला. कन्यापुत्रांची संतती अवलोकन करण्याचा योग येणें हें खरोखरीच भूलोकांत स्वर्गसुख अनुभविल्याचें सर्वांनाच वाटतें. मग योग्य ठिकाणीं तसले योग आल्यावर त्याचें कौतुक वाटल्याशिवाय कसें राहील?

## दिनचर्या.

श्री. सौ. बाईसाहेबांचें राहणें सासरपेक्षां माहेरींच—भोरास—जास्त होई. कारण उभयतां सरकारांना व त्यांचे—बाईसाहेबांचे—बंधु **श्रीमंत सरकार** बाबा-

साहेब पंतसचीव यांना त्यांचा फारच लळा होता. श्री. रावसाहेब अत्यंत करारी स्वभावाचे व बाणेदार असे पुरुष होते. पण हा त्यांचा करारीपणा बाईसाहेबांच्या पुढें मुळींच चालत नसे. जें काम श्री. सौ. जिजीसाहेबांनाहि करून घेणें अशक्य, तें बाईसाहेबांना सहज साध्य असे. रावसाहेबांनीं इतर कोणाचें फारसें चालू दिलें नाहीं; पण बाईसाहेबांपुढें त्यांनाच हार खावी लागे. त्या अत्यंत मायाळु, दयाशील, सरलहृदयी अशा असल्यामुळें गरीब लोकांना त्यांचा फार उपयोग होई. बालपणापासून धर्मशील मातेच्या सह-वासाचा परिणाम त्यांचे मनावर दृढतर झाल्यानें त्यांचा बराच काल देवपूजा व ग्रंथपठणांत जात असे. बाईसाहेबांचें अपत्यप्रेमहि सुतनिर्विशेष असें होतें. आधीं अपत्यप्रेम हें स्त्रियांच्या ठिकाणीं निसर्गतःच जास्त असतें; तशांत बाई-साहेब मूलतःच प्रेमळ असल्यामुळें आपल्या कन्येवर त्यांचें कल्पनातीत गाढ प्रेम होतें. सन १९०३ मध्यें दिल्लीस लॉर्ड कर्झन साहेबांनीं बडा दरबार भरविला. त्या समारंभास श्री. रावसाहेब हे सहकुटुंब सहपरिवार गेले होते. आपल्याबरोबर बाईसाहेबांनींहि यावें, अशी सर्वांची प्रबलतम इच्छा होती; पण या वेळीं बाईसाहेबांचें अपत्य लहान, त्याला तेथील थंडी सोसणार नाहीं, असा विषय निघाल्यावर रावसाहेबांनीं 'येथेंच मुलीस ठेवा, मी सर्व तजवीज करितों', असें आग्रहपूर्वक बाईसाहेबांना सांगितलें, तरी त्यांनीं मुलीला येथें ठेवून मी एकटी येत नाहीं, असें स्पष्ट सांगून त्या दिल्लीदरबारास गेल्या नाहींत.

## अकालनिधन.

या जगांत '**सुखस्यानंतरं दुःखं दुःखस्यानंतरं सुखम्**' याचाच फार करून प्राणीमात्रांस अनुभव येत असतो. या परमेश्वरी नियमाला कोणीहि अपवाद होऊं शकत नाहीं. अर्थात् वरील नियमानुसार बाईसाहेबांचें पहिलें अपत्य वर्ष-दीड वर्षाचें होतें न होतें तोंच त्यांच्यावर द्वितीय संततीचा योग येऊन, त्या प्रसंगांतच त्यांचें निधन ता. १७ मे सन १९०३ (वैशाख वद्य ६ रविवार शके १८२५) या दिवशीं प्रसूतीनंतर पांचवे दिवशीं अवघ्या १७ वर्षांच्या वयांत भोरास झालें. त्या वेळीं श्री. रावसाहेब व श्री. सौ. जिजीसाहेब यांना तर हा प्रसंग वज्रपातासारखा भयंकर वाटला. पण उभयतांहि अत्यंत विवेकी व परमेश्वर-निष्ठ असल्यामुळें उभयतांनीं नातीकडे पाहून व तिच्याच जोपासनेंत आपलें सुखसर्वस्व सांठविलें असल्याची जाणीव करून घेऊन, स्वतःच्या अखेरीपर्यंत उभयतांनींहि तसेंच आचरण केलें.

श्री. सौ. बाईसाहेबांचें अकालीं निधन झाल्यानें त्यांचे ठिकाणीं जन्मादारभ्य **असलेल्या अनेक** गुणांचा परिपोष होण्यास अवधीच मिळाला नाहीं, हें **खरोखरच** त्यांच्या निकटवर्तीजनांचें दुर्भाग्य होय. त्यांच्या इतर गुणांपेक्षां **परोपकार** हा गुण त्यांचे ठिकाणीं प्रामुख्यानें दिसत असे.

बाईसाहेब दिवंगत झाल्यावर दुसरे वर्षींच रावसाहेबांनीं आपल्या प्रिय कन्येचें स्मारक चिरकाल राहावें म्हणून त्यांनीं आपल्या काशी येथील देवालयांतच नैऋत्य कोपऱ्यांत शिवलिंग स्थापन करून त्यास **पार्वतीश्वर** हें नांव देऊन निरंतर पूजा वगैरे चालण्याची व्यवस्था करून ठेविली. त्याप्रमाणें ती अव्याहत चालू आहे.

## उपसंहार.

सुदैवानें श्री. सौ. बाईसाहेबांप्रमाणें त्यांच्या कन्या श्री.सौ **जान्हवीबाई ऊर्फ ताईसाहेब,** यांचे ठिकाणीं आजा-आजींच्या सहवासानें त्यांच्यांतील सर्व गुण पूर्णपणें उतरले असून त्याचा अनुभव त्यांच्या संस्थानांतील निकटवर्ती लोकांना रात्रंदिवस येत आहे, हें त्या लोकांचें व राणीसाहेबांचे पति श्री. सरकार **राजे शामराज राजा रायरायान बहादुरसाहेब** डेक्कन हैद्राबाद यांचें परम भाग्य होय, असेंच आम्हांस वाटतें. हें दंपत्यहि अत्यंत धार्मिक व प्रेमळ असेंच आहे. या उभयतांच्या कृपापूर्ण प्रसादानेंच आज आम्हांस हें चरित्र लिहिण्याचा सुयोग आला, हें आमचेंहि परम भाग्य होय. इतिशम्.



# विषयानुक्रमणिका.

## सुंदरकाण्ड.

## चित्रांची सूचि.

### किष्किंधाकाण्ड.



### सुंदरकाण्ड.

# श्रीवाल्मीकिरामायण

## किष्किंधाकाण्ड.

### सर्ग पहिला.

#### श्रीरामाचा पंपातीरीं विलाप.

नीलकमलें, श्वेतकमलें आणि मत्स्य ह्यांनीं गजबजून गेलेल्या त्या पुष्करिणीसमीप लक्ष्मणासहवर्तमान राम गेला, आणि अंतःकरण व्याकुल झाल्यामुळें शोक करूं लागला. परंतु ती पुष्करिणी दृष्टीस पडतांक्षणीं त्याला हर्ष होऊन त्याचीं इंद्रियें थरथरूं लागलीं. तेव्हां मदनाचे अधीन होऊन तो सुमित्रापुत्र लक्ष्मणाला म्हणाला, "लक्ष्मणा, नानाप्रकारच्या वृक्षांनीं अलंकृत, प्रफुल्लित श्वेतकमलांनीं युक्त आणि वैदूर्य रत्नासारख्या निर्मल उदकानें भरलेली ही पंपा पुष्करिणी शोभा देत आहे. लक्ष्मणा, ज्याचें दर्शन शुभावह आहे, असें हें पंपेच्या तीरावरील वन तूं अवलोकन कर. ह्या वनांतील वृक्ष उच्च उच्च शाखांनीं युक्त असल्यामुळें शिखरयुक्त पर्वताप्रमाणें दिसत आहेत. परंतु सीतेच्या अपहाराचें आणि जटावल्कलादि धारण केल्यामुळें भरताला होत असलेल्या दुःखाचें स्मरण झालें, म्हणजे शोकाकुल झालेल्या मला मानसिक व्यथा पीडा देऊं लागतात. असो. मी जरी शोकाकुल झालों आहें, तरी अद्भुत वनांनीं युक्त, नानाप्रकारच्या पुष्पांनीं भरलेली आणि शीत जलानें परिपूर्ण असलेली ही कल्याणकारक पंपा मला सुखावह होत आहे. हिचें तीरीं सर्प आणि श्वापदें संचार करीत असून ही जरी पशुपक्ष्यांनीं गजबजून गेली आहे, आणि कमलांनीं आच्छादित झाली आहे, तरी हिचें दर्शन फारच कल्याणकारक आहे. वृक्षावरील नानाप्रकारच्या पुष्पराशींनीं युक्त असल्यामुळें नीलवर्ण आणि पीतवर्ण बनलेला हा हिरवागार प्रदेश फारच शोभा देत आहे. पुष्पभारांनीं परिपूर्ण झालेलीं वृक्षांचीं अग्रें, प्रफुल्लित अग्रांनीं

युक्त झालेल्या लतांनीं चोहोंकडून व्यापून टाकिलेलीं आहेत. लक्ष्मणा, हा वसंतकाल कामोद्दीपक असून कामी पुरुषाला गर्वयुक्त करणारा आहे. ह्यामध्यें वाराहि सुखावह वाहात आहे, आणि हा मधुमास असून ह्या वेळीं वृक्षांनाहि पुष्पें व फळें आलेलीं आहेत. लक्ष्मणा, जलवृष्टि करणाऱ्या मेघांप्रमाणें पुष्पांचे वर्षाव करणाऱ्या आणि पुष्पांच्या योगानें सुशोभित झालेल्या वनांची शोभा तूं अवलोकन कर. सपाट व रम्य प्रदेशावर असलेले नानाप्रकारचे वनवृक्ष वायूच्या वेगानें हालत असल्यामुळें पृथ्वीवर पुष्पांचा वर्षाव करीत आहेत. लक्ष्मणा, पडलेल्या, पडणाऱ्या आणि वृक्षांवरच असलेल्या पुष्पांच्या योगानें हा वायु पहा जसा कांहीं आसमंताद्भागीं क्रीडा करीत आहे. पुष्पांनीं भरलेल्या वृक्षांच्या अनेक शाखा हालवून सोडणाऱ्या ह्या वायूच्या ध्वनीच्या मागोमाग स्थलांतर केलेले भृंग गायन करीत आहेत. मत्त कोकिल पक्ष्यांच्या ध्वनीच्या योगानें हा वायु वृक्षांना जसा कांहीं तालसुरावर नृत्य शिकवीत असल्या-सारखा दिसत आहे; आणि पर्वताच्या गुहांतून बाहेर निघालेला हा वायु स्वतःच गायन करीत असल्यासारखा भासत आहे. इकडे तिकडे संचार करणाऱ्या वायूच्या योगानें वृक्षांचीं शाखाग्रें एकमेकांत गुंतून गेल्यामुळें हे वृक्ष एकत्र बांधून टाकिल्यासारखे दिसत आहेत. तोच हा वायू स्पर्श झाला असतां सुख देणारा आहे, चंदनाप्रमाणें थंड आहे, श्रम दूर करणारा आहे, आणि आपल्याबरोबर पवित्र गंध वाहून नेणारा आहे. मधाच्या वासानें युक्त असलेले हे वृक्ष वायूनें चलित झाल्यामुळें त्यांच्या आश्रयाला असलेले भृंग गुंजारव करूं लागल्या कारणानें गर्जना करीत असल्यासारखे दिसत आहेत. आसमंताद्भागीं प्रफुल्लित झालेले हे कर्णिकार पहा, कसे पीतांबर धारण करून सुवर्णभूषणांनीं आच्छादित झालेल्या पुरुषांप्रमाणें दिसत आहेत. लक्ष्मणा, अनेक पक्ष्यांच्या गर्जनेनें युक्त असलेला हा वसंत सीतेचा वियोग झालेल्या माझा शोकच वृद्धिंगत करीत आहे. मदनहि शोकग्रस्त झालेल्या मला अतिशय ताप देत आहे, आणि हा बोलका कोकिल पक्षी हंसत हंसत जसें कांहीं मला आव्हानच करीत आहे. लक्ष्मणा, वनांतील रम्य झऱ्यावर असलेला हा पाणकोंबडा आनंदित होऊन गर्जना करीत आहे, आणि त्यामुळें कामाधीन झालेल्या मला दुःख देत आहे. पूर्वीं ह्या पाणकोंबड्याचा शब्द ऐकतांक्षणीं आश्रमांत असलेली माझी आनंदित प्रिया मला हांक मारून आपला आनंद अतिशयच प्रकट करून दाखवीत असे. सारांश, ह्याप्रमाणें

नानाप्रकारचे ध्वनी करणारे हे चित्रविचित्र पक्षी सर्व बाजूंनीं वृक्ष, गुल्म व लता ह्यांवर उडून बसत आहेत, हें तूं पाहा. लक्ष्मणा, पतींनीं युक्त झालेल्या पक्षिस्त्रिया ह्या ठिकाणीं आपापल्या जातिसमूहामध्यें आनंदित झालेल्या आहेत. भृंगराजाचा समागम झाल्यामुळें आनंदित झालेल्या भृंगस्त्रियाहि ह्या ठिकाणीं मधुर स्वर करीत आहेत; आणि ह्या पंपेच्या तीरीं कळपांनीं राहात असलेले पक्षीहि आनंदित झालेले आहेत. पाणकोंबड्यांचे रतिक्रीडाविषयक शब्द आणि कोकिल पक्ष्यांचे ध्वनि ह्यांच्या योगानें जसें कांहीं गर्जना करीत असलेले हे वृक्ष माझे ठिकाणीं कामोद्दीपन करीत आहेत. अशोकगुच्छरूप अंगार, भृंगध्वनिरूप शब्द आणि पल्लवरूप आरक्तवर्ण ज्वाला ह्यांनीं युक्त असलेला वसंतरूप अग्नि मला दग्ध करण्याच्या बेतांत आहे. जिच्या नेत्रांच्या पापण्या सूक्ष्म आहेत, जिचे केश उत्कृष्ठ आहेत, आणि जिचें भाषण मृदु आहे, अशी ती सीता माझ्या दृष्टीस पडत नसल्यामुळें आतां मला जिवंत राहण्याचें कांहीं प्रयोजन दिसत नाहीं. हे निष्पापा, ह्या वसंतामध्यें कोकिल पक्ष्यांनीं सर्व सीमाप्रदेश व्याप्त करून टाकिले असून वनेंहि मनोहर झालीं आहेत; आणि त्यामुळें हा काल त्या माझ्या प्रियेला इष्ट वाटणारा आहे. कामपीडेमुळें उत्पन्न झालेला आणि मंदवायु, प्रफुल्लित वनें इत्यादि वसंतगुणांनीं प्रज्वलित झालेला हा शोकरूप अग्नि लवकरच मला दग्ध करून टाकील. ती स्त्री दृष्टीस न पडतां मनोहर वृक्षच अवलोकनांत येत असल्यामुळें माझा काम वृद्धिंगतच होत राहील. अदृश्य असलेली सीता ह्या ठिकाणीं माझा शोक वृद्धिंगतच करीत असून, दृश्य असलेला वसंत कामविकारजन्य घामामुळें मला मलीन करून टाकीत आहे. हरिणाच्या बछड्याप्रमाणें जिचे नेत्र आहेत, अशी ती सीता चिंता व शोक ह्यांच्या योगानें मला मुद्दाम पीडा देत आहे; आणि लक्ष्मणा, चैत्रमासांतील हा क्रूर वनवायूहि मला संतप्त करीत आहे. हे इकडे तिकडे नाचत असलेले मयूर, स्फटिकाच्या जाळ्याप्रमाणें दिसणाऱ्या आणि वायूनें उडविलेल्या आपल्या पंखांच्या योगानें शोभत आहेत; आणि मयूर पक्षिणींनीं परिवेष्टित झालेले ते हे मदमत्त मयूर, मदनानें ग्रस्त केलेला माझा काम अधिकच वृद्धिंगत करीत आहेत. लक्ष्मणा, पहा, ही मदनानें व्याकुळ झालेली लांडोर पर्वतशिखरावर नृत्य करीत असलेल्या आपल्या भर्त्यासमीप नृत्य करीत आहे; आणि आपले मनोहर पंख पसरून, शब्दांनीं उपहासच करीत आहे कीं काय, असा तो मयूर पक्षीहि मनापासून त्या

आपल्या मनोहर स्त्रियेच्या मागोमाग धावत आहे. राक्षसानें माझी प्रिया खरोखरें मयूरवनांतून नेली नाहीं, म्हणूनच हा मयूर रमणीय वनामध्यें आपल्या कांतेसहवर्तमान नृत्य करीत आहे. लक्ष्मणा, सीतेवांचून चैत्रमासांत हें वनामध्यें वास्तव्य मला अत्यंत दुःसह झालें आहे. पशुपक्ष्यांच्या जन्मास आलेल्या प्राण्यांमध्येंहि कसें प्रेम आहे, तें पहा. सांप्रत ही कामवासनेमुळें आपल्या भर्त्याशीं लगटत आहे, आणि विशालनयना सीतेला जर राक्षसानें नेलें नसतें, तर तीहि मदनाच्या योगानें घाबरी होऊन मला ह्याचप्रमाणें बिलगली असती. लक्ष्मणा, पुष्पभारांची समृद्धि असलेल्या वनांतील पुष्पें वसंत ऋतूमध्यें मला निष्फल होत आहेत. वृक्षांच्या अतिशय सौंदर्यामुळें मनोहर दिसत असलेलीं हीं पुष्पें भृंगसमुदायासहवर्तमान व्यर्थ पृथ्वीवर येत आहेत. कळपाकळपानें असलेले हे पक्षी आनंदित झाले असून एकमेकाला हाक मारीत असल्याप्रमाणेंच कीं काय, इच्छेनुरूप अस्पष्ट व मधुर ध्वनि करीत आहेत, आणि त्यामुळें ते मला कामोद्दीपक झाले आहेत. माझी प्रिया सीता जेथें वास्तव्य करीत आहे, तेथेंहि जर हा वसंतकाल असेल, तर तीहि पराधीन असल्यामुळें माझ्याप्रमाणेंच खरोखर शोक करीत असेल. जेथें ती आहे, त्या प्रदेशामध्यें खरोखर जरी वसंत नसला, तरी नीलकमलासारख्या नेत्रांनीं युक्त असलेली ती सीता माझ्यावांचून कशी बरें जिवंत राहील? अथवा जेथें माझी प्रिया आहे, तेथें वसंत हा असेलच; परंतु तो जरी असला, तरी शत्रूंनीं पीडिलेल्या त्या सुंदरीशीं त्याचें कांहींएक चालावयाचें नाहीं. सारांश शत्रूंच्या पीडेचें दुःख सोशीत असलेल्या स्त्रीला मदनाची बाधा होण्याचा संभव नाहीं. नित्य यौवन, कमलपत्रांसारखे नेत्र आणि मृदु भाषण ह्यांनीं युक्त असलेली माझी प्रिया वसंत प्राप्त झाल्यावर खरोखर प्राणत्याग करील. साध्वी सीतेला माझा वियोग झाला असल्यामुळें ती जिवंत राहण्यास समर्थ नाहीं, असें माझ्या मनानें पक्कें घेतलें आहे. सीतेचें खरें खरें प्रेम माझ्यावर जडलें असून माझेंहि प्रेम सर्व प्रकारें सीतेवर जडलें आहे. आपल्याबरोबर पुष्पें उडवून नेणारा थंडगार वारा जरी स्पर्श झाला असतां सुखदायक होणारा आहे, तरी मी त्या कांतेचें चिंतन करीत असल्यामुळें मला तो अग्नितुल्य झाला आहे. सीतेसहवर्तमान असतांना ज्याला मी पूर्वीं नेहमीं सुखकारक समजत होतों, तो वायु ती सीता नसल्यामुळें आज माझ्या शोकोत्पत्तीला कारण झालेला आहे. त्या वेळीं ह्या आकाशगामी पक्ष्यानें गर्जना केली, आणि तिच्या योगानें सीतेचा वियोग झाल्याचें मला ह्यानें सुचविलें; परंतु आतां

तोच काक पक्षी वृक्षावर बसून आनंदानें शब्द करीत आहे, आणि सीतेचा समागम होणार असल्याचें मला सुचवीत आहे. हा पक्षी त्या ठिकाणीं सीतेला अतिशय पीडा होत असल्याचें सुचवीत असून, मला मात्र त्या विशालनयनेचे समीप नेणार आहे. लक्ष्मणा, प्रफुल्लित अग्रांनीं युक्त अशा वृक्षांचे ठिकाणीं किलबिल किलबिल शब्द करीत असलेल्या पक्ष्यांचा कामोद्दीपक ध्वनि ऐक. वायूनें चलित झालेल्या ह्या तिलक-मंजरीकडे हा भ्रमर एकाएकीं येत आहे, आणि विषयांध होऊन अडखळत अडखळत चालू लागलेल्या आपल्या प्रियेकडे जाणाऱ्या कामी पुरुषाप्रमाणें तो दिसत आहे. हा अशोक कामी जनांचा शोक अतिशय वृद्धिंगत करणारा आहे, आणि वायूनें वर उडालेल्या पुष्पगुच्छांच्या योगानें जसा कांहीं मला दटावीतच येथें उभा राहिला आहे. लक्ष्मणा, मोहोरामुळें सुशोभित झालेले हे आम्रवृक्ष शृंगारानें मन प्रफुल्लित झालेल्या व शरिराला उटी लाविलेल्या पुरुषां-प्रमाणें दिसत आहेत. हे पुरुषश्रेष्ठा, पंपेच्या तीरीं असलेल्या ह्या चित्रविचित्र वनसमुदायामध्यें किन्नरीसहवर्तमान किन्नर इकडे तिकडे संचार करीत आहेत. लक्ष्मणा, हीं सुगंधि रक्तकमलें जलामध्यें सर्व प्रकारें बालसूर्याप्रमाणें प्रकाशत आहेत, पहा. निर्मल उदक आणि श्वेतवर्ण, नीलवर्ण व रक्तवर्ण कमलें ह्यांनीं युक्त असलेली ही पंपा, हंस व कारंडव पक्ष्यांनीं गजबजून गेलेली आहे. भ्रमरांनीं ज्यांतील पराग उदकामध्यें पाडिले आहेत, अशा बालसूर्यतुल्य आरक्त-वर्ण कमलांनीं सर्व बाजूंनीं ही व्याप्त झाली असल्यामुळें शोभा देत आहे. चक्रवाक पक्ष्यांनीं ही नेहमीं युक्त आहे. अद्भुत प्रदेशांनीं युक्त असलेलीं आणखी दुसरींहि वनें हिचे तीरीं आहेत. आणि जलपान करण्याच्या इच्छेनें आलेल्या गजांच्या व मृगांच्या कळपांनीं हिला शोभा आलेली आहे. वायूचा तडाखा बसल्यामुळें ज्यांच्यामध्यें वेग उत्पन्न झाला आहे, अशा लाटांनीं ताडित होत असलेलीं कमलें निर्मल उदकांत झळकत आहेत. पद्मपत्रांप्रमाणें विशाल नेत्रांनीं युक्त असून नित्य कमलांची आवड असलेली सीता दृष्टीस पडत नसल्यामुळें मला जगावेंसें वाटत नाहीं. अहो ! कायहो हा मदनाचा कुटिल-पणा ! अत्यंत कल्याणकारक भाषण करणारी कल्याणी सीता दूर गेली असतां-हि आणि म्हणूनच मला आतां दुर्लभ असतांहि हा आपला मला तिची स्मृति देत आहे ! प्रफुल्लित वृक्षांनीं युक्त असलेला वसंत जर मला अधिक प्रहार न करील, तर हा प्राप्त झालेला कामहि धारण करणें मला शक्य होईल. अरे,

जनकनंदिनी सीतेसहवर्तमान असतांना ज्या गोष्टी मला रमणीय होत होत्या, त्याच तिचा वियोग झाल्यामुळें रमणीय होत नाहींत. लक्ष्मणा, कमलकोशाचीं दलें सीतेच्या पापण्यांसारखीं आहेत, म्हणून दृष्टीला तीं पहावींशीं वाटतात. दुसऱ्या वृक्षांतून बाहेर पडून कमलकेसराचा संसर्ग झालेला वायु सीतेच्या निःश्वासाप्रमाणें मनोहर वहात आहे. लक्ष्मणा, पंपेच्या दक्षिणेस पर्वतशिखरांवर असलेली कर्णिकार वृक्षाची प्रफुल्लित व अत्यंत सुशोभित काठी तूं अवलोकन कर. हा ऋष्यमूक नामक श्रेष्ठ पर्वत धातूनें भूषित असून वायुवेगानें उडालेली पुष्कळच चमत्कारिक धूळ फेंकीत आहे. लक्ष्मणा, सर्व बाजूंनीं प्रफुल्लित, पर्णरहित आणि चोहोंकडून रमणीय अशा पलाशवृक्षांच्या योगानें पर्वतशिखरें जशीं कांहीं पेटल्यासारखीं दिसत आहेत. पंपेच्या तीरीं असलेले मालती, मोगरी, कमल व कन्हेर हे सुगंध वृक्ष जलसिंचनानें वाढलेले असून प्रफुल्लित झालेले आहेत. केतकी, निर्गुडी व कुसरी हीं झाडें प्रफुल्लित झालीं असून ह्या पंपेच्या तीरीं महाळुंगाचे वृक्ष फलांनीं भरलेले आहेत, व कुंदाचीं झांकरेंहि सर्वस्वी पुष्पांनीं भरलेलीं आहेत. करंज, मोहा, तिवस, बकुल, चांफा, तिळवा आणि नागचाफा हे वृक्ष प्रफुल्लित झालेले आहेत. पद्मक, नील, अशोक आणि सिंहांचे आयाळ ज्यांच्या योगानें पिंजरवर्ण झालेले आहेत, असे लोध्र वृक्ष पर्वताच्या माथ्यावर प्रफुल्लित झालेले असून शोभत आहेत. पिस्ते, पिवळ्या कोरांटया, सांबरी, मंदार, आम्र, गुलाब आणि कांचन प्रफुल्लित झालेले आहेत. मुचकुंद, अर्जुन, केतक, भोंकरी, शिरसू, शिसवा आणि धावडा हेहि वृक्ष पर्वतशिखरावर दृष्टीस पडत आहेत. सांबऱ्या, पळस, तांबड्या कोरांट्या, तिवस, करंज, चंदन, स्पंदन, हिंताल, तिलक आणि नागचाफे हेहि वृक्ष प्रफुल्लित दिसत आहेत. लक्ष्मणा, ह्या पंपेच्या तीरीं प्रफुल्लित अग्रांनीं युक्त असलेल्या लतांनीं परिवेष्टित आणि मनोहर असे हे पुष्कळच प्रफुल्लित वक्ष तूं अवलोकन कर. वायूच्या योगानें ज्यांच्या फांद्या अस्ताव्यस्त होऊन ज्यांची एकमेकामध्यें गुंतागुंत झालेली आहे, अशा ह्या वृक्षांना मत्त झालेल्या श्रेष्ठ स्त्रियांप्रमाणें लता चिकटून रहात आहेत. ह्या वृक्षावरून त्या वृक्षावर, ह्या पर्वतावरून त्या पर्वतावर, आणि ह्या वनांतून त्या वनांत वहात जाणारा वायु अनेक रसांच्या आस्वादामुळें हर्षयुक्त झाल्यासारखा दिसत आहे. कांहीं सुगंधि वृक्ष विपुल पुष्पांनीं युक्त आहेत, व कांहीं पुष्पकलिकांनीं परिवेष्टित असलेले वृक्ष श्यामवर्ण दिसत आहेत. हें मधुर, हें स्वादिष्ठ

व हें प्रफुल्लित असें समजून आरक्तवर्ण मधुमाक्षिका पुष्पांमध्येंच लीन आहेत. पुष्पांत लीन झाल्यावर ही मधुलुब्ध मधुमक्षिका पुनरपि उडून एका-एकीं पंपातीरीं असलेल्या वृक्षावरच दुसरे ठिकाणीं जात आहे. ह्या भूमीवर आपोआप पडलेल्या पुष्पराशींचे थर झालेले असल्यामुळें, शयन करण्याकरितां बिछाने पसरलेल्या भूमीप्रमाणें ही सुखकर झालेली दिसत आहे. लक्ष्मणा, नानाप्रकाच्या पुष्पांचे थर पर्वतशिखरावर झाले असल्यामुळें विस्तीर्ण, पीतवर्ण व रक्तवर्ण असे नानाप्रकारचे बिछाने तयार करून ठेविल्यासारखे दिसत आहेत. लक्ष्मणा, थंडी संपतांक्षणीं वृक्षांचे ठिकाणीं झालेला हा पुष्पप्रादुर्भाव तूं अवलोकन कर. ह्या चैत्र महिन्यामध्यें वृक्ष जसे कांहीं एकमेकाच्या ईर्षेनेंच प्रफुल्लित झालेले आहेत. लक्ष्मणा, भृंगांनीं नादित असल्यामुळें हें वृक्ष एकमेकांना आह्वान करीत असल्यासारखे दिसत आहेत; आणि फांद्या पुष्पांनीं भरलेल्या असल्यामुळें ते फारच शोभत आहेत. हा कारंवड पक्षी शुभ उदकामध्यें प्रविष्ठ होऊन माझे ठिकाणीं कामोद्दीपन करण्याकरितांच कीं काय आपल्या कांतेसहवर्तमान रममाण होत आहे. गंगेप्रमाणें पंपेचें हें रूप मनोहर असल्यामुळें, जगतामध्यें हिच्या उत्कृष्ठ गुणांची जी ख्याति झालेली आहे, ती अगदीं योग्य आहे. लक्ष्मणा, ती साध्वी स्त्री जर दृष्टीस पडेल, आणि तिच्यासहवर्तमान जर आमचें ह्या ठिकाणीं वास्तव्य होईल, तर अयोध्येचीच नव्हे, परंतु इंद्रपदाचीहि मी जरूर बाळगणार नाहीं. कारण ह्याप्रमाणें रमणीय असलेल्या ह्या हिरव्यागार प्रदेशावर मी तिच्यासहवर्तमान रममाण होऊं लागलों असतां मला कसलीहि चिंता रहाणार नाहीं, आणि दुसऱ्या गोष्टी माझ्या मनांतहि येणार नाहींत. नानाप्रकारच्या पर्णांनीं युक्त असलेले हे वृक्ष, ह्या वनामध्यें सीतेवांचून असलेल्या मला नानाप्रकारच्या पुष्पांनीं चिंताक्रांत मात्र करून टाकीत आहेत. लक्ष्मणा, शीत जलानें परिपूर्ण व कमलांनीं भरलेली ही पुष्करिणी तूं अवलोकन कर. चक्रवाक पक्षी हिचे तीरीं संचार करीत असून कारंडव पक्षी हिचा आश्रय करून राहिलेले आहेत. हे सुमित्रानंदना, बेडकांनीं व क्रौंच पक्ष्यांनीं ही भरलेली आहे, आणि मोठमोठया मृगांनीं हिचा आश्रय केलेला आहे. ही पंपा शब्द करणाऱ्या पक्ष्यांमुळें तर अधिकच शोभत आहे. पद्मपत्रांप्रमाणें नेत्र व चंद्राप्रमाणें आल्हादकारक मुख ह्यांनीं युक्त असलेल्या माझ्या नित्य तरुणी प्रियेची आठवण देऊन, हे आनंदित झालेले नानाप्रकारचे पक्षी माझे ठिकाणीं कामोद्दीपन करीत आहेत. अद्भुत शिखरांवरून मृगीसहवर्त-

मान असलेल्या मृगांना तूं अवलोकन कर; आणि बालहरिणासारखे जिचें नेत्र आहेत, त्या सीतेचा वियोग झालेल्या माझ्याकडेहि दृष्टि दे. इकडे तिकडे संचार करीत असलेले हे मृग माझ्या चित्ताला दुःख मात्र देत आहेत. मत्त पक्षिगणांनीं गजबजून गेलेल्या ह्या रमणीय पर्वतशिखरावर जर ती कांता माझ्या दृष्टीस पडेल, तरच माझी धडगत आहे. सारांश लक्ष्मणा, ती सुंदरी वैदेही जर माझ्याबरोबर ह्या पंपातीरावरील शुभ वायूचें सेवन करील, तरच खरोखर मी जिवंत राहीन. लक्ष्मणा, श्वेत कमलें व रक्त कमलें ह्यांचा गंध वाहून नेणाऱ्या अशा ह्या मंगलकारक व रोगनाशक पंपातीरावरील वनवायूचें जे सेवन करितात, ते धन्य आहेत. कमलपत्रांप्रमाणें जिचे नेत्र आहेत, व जी नेहमींच तरुण आहे, अशी ती जनककन्या प्रिया माझा वियोग होऊन शत्रूचे अधीन झाली असतांना कसा बरें प्राण धारण करील? सीता कोठें आहे, म्हणून लोकांच्या सभेमध्यें जनकानें मला प्रश्न केला, तर त्या धर्मवेत्त्या व सत्यवादी राजाला मी आतां काय बरें कुशल वृत्तांत कथन करूं? अरे, पित्यानें मला वनांत पाठविलें असतां जी धर्माचें अवलंबन करून हळू हळू माझ्या मागोमाग आली, ती प्रिया सीता कोठें आहे? लक्ष्मणा, राज्यापासून च्युत आणि मनामध्यें खिन्न झालेल्या माझ्या मागोमाग जी आली, तिचा वियोग झाल्यामुळें दीन झालेला मी कसा बरें प्राण धारण करूं? मनोहर आणि प्रशंसेस पात्र अशा कमलतुल्य नेत्रांनीं युक्त, शुभ, कसलाहि वण नसलेलें आणि सुगंधि असें तिचें मुख दृष्टीस पडत नसल्यामुळें माझें धैर्य अगदीं खचत आहे. लक्ष्मणा, मधून मधून किंचित् हास्यानें युक्त, मधुर, हितकारक आणि गुणसंपन्न असें सीतेचें अनुपम भाषण माझ्या आतां कधीं बरें कानीं पडेल? वनामध्यें दुःख प्राप्त झालें असूनहि ती तरुणी साध्वी दुःख नाहींसें झाल्यासारखी स्वतःला भासवीत होती, आणि जशी कांहीं हर्षयुक्त होऊन मदनानें जर्जर केलेल्या माझ्याशीं चांगलें भाषण करीत होती. 'हे राजकुमारा, ती माझी स्नुषा कोठें आहे' म्हणून विचारी कौसल्या मला विचारूं लागली असतां, मी तिला अयोध्येमध्यें काय सांगूं व कसें सांगूं? लक्ष्मणा, तूं जा आणि भ्रातृवत्सल भरताला भेट. मी आतां त्या जनककन्येवांचून जिवंत राहण्यास समर्थ नाहीं."

ह्याप्रमाणें महात्मा राम अनाथासारखा विलाप करूं लागला असतां भ्राता लक्ष्मण योग्य व व्यर्थ न होणारें असें भाषण त्याच्याशीं करूं लागला. तो

म्हणाला, "रामा, शोक आवरून धर. हे पुरुषोत्तमा, तुझें देव बरें करो. तूं शोक करूं नको. तुझ्यासारख्या निर्मल मनाच्या पुरुषाची मति अशी कधीं गुंग होत नाहीं. प्रिय वस्तूसंबंधानें वियोगजन्य दुःख अवश्य ठेविलेलेंच आहे, हें लक्ष्यांत आणून प्रियजनाचे ठिकाणीं असलेलें प्रेम तूं आतां सोडून दे. कारण अतिस्नेहाचा संबंध झाल्यामुळें भिजलेली वातहि जळूं लागते. रामा, रावण पाताळांत जावो, किंवा त्याच्यापेक्षांहि अधिक दुर्गम प्रदेशावर जावो, त्यानें कांहीं केलें, तरी तो आतां जिवंत राहणार नाहीं. तस्मात् त्या पापी राक्षसाची बातमी आपणांला प्रथम मिळविली पाहिजे; म्हणजे सीतेला सोडून देणें तरी त्याला भाग पडेल, किंवा मरावें तरी लागेल. फार कशाला? सीतेला घेऊन रावण जरी दितीच्या गर्भांत गेला, तरी सुद्धां तो सीतेला परत न देईल तर मी त्याचा तेथेंहि वध करीन. हे कल्याणसंपन्न पुरुषश्रेष्ठा, धैर्याचें अवलंबन कर, आणि हे असले धीर खचविणारे विचार सोडून दे. कारण नष्ट झालेली वस्तु ज्यांना अवश्य मिळावयाची आहे, त्यांना ती यत्नावांचून कधींहि मिळत नाहीं. हे सज्जना, उत्साहाचें सामर्थ्य ज्यास्त आहे. उत्साहापेक्षां श्रेष्ठ बल दुसरें नाहीं; आणि म्हणूनच उत्साही पुरुषाला त्रैलोक्यामध्यें कोणतीहि वस्तु दुर्लभ नाहीं. उत्साही पुरुष दुर्घट कार्य प्राप्त झालें असतांहि खचून जात नाहीं. ह्यास्तव आपणहि केवळ उत्साहाचेंच अवलंबन करून जानकी परत मिळवूं. शोकाला मागें टाकून तूं ही विषयाधीनता सोडून दे. तूं स्वतः महात्मा व कृतार्थ आहेस, हें तुला समजत नाहीं काय?"

ह्याप्रमाणें त्या लक्ष्मणानें रामाला समजाविलें असतां चित्त शोकाकुल झालेल्या रामानें शोकाचा व मोहाचा त्याग करून धैर्याचें अवलंबन केलें. नंतर तो अचिंत्य पराक्रमी राम वायूनें चंचल झालेल्या वृक्षांनीं युक्त, अत्यंत मनोहर व रम्य अशी ती पंपा सोडून सावधपणानें पुढें चालला. सारांश, दुःखाकुल आणि म्हणूनच मनामध्यें उद्विग्न झालेल्या त्या रामानें लक्ष्मणासहवर्तमान विचार केला, आणि तें सर्व वन, झरे व गुहा अवलोकन करीत करीत तो महात्मा एकाएकीं पुढें चालता झाला. तो राम जाऊं लागला असतां मत्त गजाप्रमाणें झुलत झुलत चालणाऱ्या आणि इष्ट व्यापारांचेंच अवलंबन करणाऱ्या महात्म्या लक्ष्मणानें सावध राहून धर्मानें व बलानें त्याचें रक्षण केलें.

नंतर ऋष्यमूक पर्वताचे समीप संचार करणारा महाबलाढ्य वानरराज सुग्रीव हिंडतां हिंडतां अद्भुत व दर्शनीय अशा त्या राम-लक्ष्मणांना अवलोकन करितां-

क्षणीं भयभीत होऊन हूं कीं चूं देखील करीनासा झाला ! तात्पर्य तेथें हिंडत असलेल्या त्या राम-लक्ष्मणांना अवलोकन करितांक्षणीं गजाप्रमाणें मंदगतीनें चालणारा तो सुग्रीव पराकाष्ठेचा खिन्न झाला, आणि चिंताक्रांत होऊन अतिशय भयामुळें त्याचा उत्साहहि नाहींसा झाला. पुण्यप्रद, सुखावह, आश्रय करण्यास योग्य व वानरांनीं वास्तव्य केलेल्या सीमांनीं युक्त अशा त्या आश्रमाला प्राप्त झालेल्या महाबलाढ्य राम-लक्ष्मणांना अवलोकन करितांक्षणीं इतर वानरहि तेथून चालते झाले.

## सर्ग दुसरा.

### राम-लक्ष्मणदर्शनानें सुग्रीवाला भयप्राप्ति.

धनुर्धारी व वीर असे ते महात्मे भ्राते राम-लक्ष्मण अवलोकन करून तो वानरराज सुग्रीव चिंताक्रांत झाला. त्याचें अंतःकरण उद्विग्न झालें. तो चोहोंकडे पाहूं लागला, आणि कोणत्याहि प्रदेशावर ठरेनासा झाला. महाबलाढ्य राम-लक्ष्मणांवर दृष्टि गेल्यामुळें एके ठिकाणीं स्थिर राहण्याचा विचार मनामध्यें मुळींच न येतां, अत्यंत भयभीत झालेल्या त्या वानराचें चित्त अगदीं गोंधळून गेलें. नंतर तेथें राहणें आणि तेथून चालतें होणें, ह्यांत बरें वाईट कोणतें, हें स्वतः लक्ष्यांत आणून आणि वानरांसहवर्तमान त्याचा विचार करून तो त्या सर्वांसह पराकाष्ठेचा उद्विग्न झाला. तदनंतर राम-लक्ष्मण दृष्टीस पडत असल्यामुळें अत्यंत उद्विग्न झालेला तो वानरराज आपल्या मंत्र्यांना म्हणाला, “कपटानें वल्कलें धारण करून हिंडत हिंडत येथें आलेले हे पुरुष निःसंशय ह्या दुर्गम वनामध्यें वालीनें पाठविले आहेत.”

हें भाषण ऐकिल्यावर ते महाधनुर्धारी राम-लक्ष्मण सुग्रीवाच्या मंत्र्यांनीं अवलोकन केले; आणि लगेच ते त्या पर्वताच्या कड्यापासून निघून त्याच पर्वताच्या दुसऱ्या उत्कृष्ठ शिखराकडे चालते झाले. नंतर आपल्या कळपाचें रक्षण करणारे ते वानर त्यांच्यामध्यें श्रेष्ठ असलेल्या कपिश्रेष्ठ सुग्रीवाकडे सत्वर गेले, आणि त्याच्याभोंवतीं गराडा घालून उभे राहिले. तात्पर्य एकसारखीच अवस्था झालेले ते सर्वहि वानर वेगानें पर्वतांचीं शिखरें कंपित करीत करीत ह्या पर्वतापासून त्या पर्वतावर उड्या मारूं लागले, आणि त्यांनीं तेथील दुर्गम प्रदेशावर असलेले

प्रफुल्लित वृक्ष मोडून टाकिले. चोहोंकडून त्या महापर्वतावर ते श्रेष्ठ वानर उड्या मारूं लागले; आणि हरिणें, मांजरें व व्याघ्र ह्यांना भाति उत्पन्न करीत करीत चालते झाले. तदनंतर धैर्याचें अवलंबन केलेले सुग्रीवाचे कांहीं मंत्री त्या श्रेष्ठ पर्वतावर जाऊन त्याजकडे गेले, आणि हात जोडून उभे राहिले. तेव्हां वालीच्या पोटांत कांहीं किल्मिष येऊन त्यानें ह्या उभयतांना पाठविलें आहे, अशी शंका आल्यामुळें भयभीत झालेल्या सुग्रीवाला संभाषणज्ञ हनुमान म्हणाला, " वालीकरितां जो हा सर्वांचा मोठा चित्तक्षोभ झालेला आहे, त्याचा त्याग केला पाहिजे. हा श्रेष्ठ पर्वत मलय आहे; आणि ह्या ठिकाणीं आपणांला वालीपासून भीति नाहीं. हे वानरराजा, ज्यामुळें चित्त उद्विग्न होऊन तूं ऋष्यमूक पर्वतापासून पळून आलास, तो क्रूर मुद्रा धारण करणारा दुष्ट वाली मला दिसत नाहीं. सारांश, हे विनयसंपन्न सुग्रीवा, ज्या पापकर्मी ज्येष्ठ भ्रात्यापासून तुला भय उत्पन्न झालें आहे, तो दुष्टात्मा वाली येथें नाहीं; आणि म्हणूनच मला वाटतें, तुला भीति नाहीं. सुग्रीवा, चंचल अंतःकरणामुळें तूं ज्या अर्थीं बुद्धीचा दृढ निश्चय करीत नाहींस, त्या अर्थीं तुझें वानरत्व व्यक्तच झालें आहे. बुद्धि आणि ज्ञान ह्यांनीं संपन्न होऊन इंगितांच्या योगानें तूं सर्व कांहीं करीत जा. कारण, बुद्धीचें अवलंबन न केलेला राजा आपल्या ताब्यांतील कोणत्याहि प्रजेवर अंमल चालविण्यास समर्थ होत नाहीं."

हनुमानाचें हें उत्तम भाषण ऐकून तो वानरश्रेष्ठ सुग्रीव हनुमानाला म्हणाला, " आजानुबाहु, विशाल नयन आणि बाण, धनुष्य व खड्ग धारण करणाऱ्या ह्या देवकुमारतुल्य उभयतांना अवलोकन केल्यावर कोणाला बरें भय उत्पन्न होणार नाहीं? वालीनें ह्या पुरुषश्रेष्ठांना पाठविलें आहे, असा मला संशय येतो. कारण राजेलोकांना पुष्कळ मित्र असतात. तेव्हां हेहि कोणी वालीचे मित्रच असतील. तस्मात् ह्यांच्याविषयीं विश्वास धरून राहणें योग्य नाहीं. कपटानें संचार करणारे शत्रू मनुष्यानें ओळखिले पाहिजेत. कारण ते विश्वासघातकी विश्वासानें स्वस्थ राहिल्याचें छिद्र पाहून प्रहार करितात. आपले मनोरथ सिद्धीस नेण्याविषयीं वाली मोठा बुद्धिमान आहे; आणि प्रतिपक्षाला फसविण्याचे अनेक उपाय राजे लोक जाणीत असून ते संधि साधून शत्रूवर प्रहार करीत असतात. ह्यास्तव सामान्य लोकांकडून त्यांचा पत्ता लावविला पाहिजे. तस्मात् हनुमंता, उदासीन पुरुषाप्रमाणें तूं जाऊन त्यांची नानाप्रकारची हालचाल, मुद्रा आणि बोलण्याची ढब ह्यांच्या योगानें परीक्षा

करून ये. तूं त्यांच्या मनाचा कल पाहा; आणि तूं समीप गेल्यावर बोलण्या-चालण्यांत जर त्यांचें मन संतुष्ट झालेलें तुझ्या दृष्टीस पडलें, तर प्रशंसा-बोधक शब्दांनीं आणि माझा अभिप्राय दर्शविणाऱ्या हावभावांनीं माझ्याविषयीं त्यांचे मनांत तूं विश्वास उत्पन्न कर. हे वानरश्रेष्ठा, धनुष्य धारण करून ह्या वनामध्यें प्रवेश करण्याचें प्रयोजन काय, हें माझ्या संमुख उभा राहून तूं त्यांना विचार. हे वानरा, त्यांचीं मनें शुद्ध आहेत कीं काय, हें तूं समजून घे, व ते दुष्ट असल्यास त्यांचा दुष्टपणाहि भाषणावरून अथवा आकारावरून तुला ओळखितां येईल."

ह्याप्रमाणें वानरराज सुग्रीवानें आज्ञा केली असतां वायुपुत्र हनुमानानें त्या राम-लक्ष्मणाकडे जाण्याचें मनांत आणिलें; आणि वालीनें गांठण्यास अशक्य-परंतु अत्यंत भयभीत झालेल्या त्या सुग्रीवाच्या भाषणाला 'ठीक आहे' म्हणून मान देऊन, तो महाप्रभावी हनुमान, जेथें अतिबलाढ्य राम लक्ष्मणा-सह होता, तेथें गेला.

## सर्ग तिसरा.

### हनुमानाचे राम-लक्ष्मणांना प्रश्न.

महात्म्या सुग्रीवानें सांगितलेलें लक्ष्यांत घेऊन हनुमान ऋष्यमूक पर्वतापासून राघवांकडे चालता झाला. प्रथमतः मनाला विश्वास न वाटल्यामुळें, वायुपुत्रानें वानररूपाचा त्याग करून सामान्य तापशाचें रूप धारण केलें. नम्रपणें त्या राघवांसमीप जाऊन व त्यांना प्रणिपात केला नंतर मधुर व मनोहर शब्दांनीं त्या वीरांशीं भाषण करून, त्यांची त्यानें यथायोग्य रीतीनें प्रशंसाहि केली. नंतर तो वानरश्रेष्ठ हनुमान त्या सत्यपराक्रमी राम-लक्ष्णांना मृदु शब्दांनीं आपल्याला अपेक्षित असलेलें विचारूं लागला. तो म्हणाला, "निर्मल तपश्चर्या करणारे तुम्ही तपस्वी राजर्षी अथवा देव ह्यांप्रमाणें दिसत आहां. तेव्हां तुम्ही श्रेष्ठ ब्रह्मचारी ह्या प्रदेशांवर कशाकरितां आलां आहां? तुमच्यामुळें मृगगणांना आणि वनांत संचार करणाऱ्या इतरहि प्राण्यांना त्रास होत आहे. कांहीं वस्तु शोधण्याच्या उद्देशानें तुम्ही पंपेच्या तीरावरील वृक्षांकडे चोहोंकडून निरखून पहात आहां, व शुभ जलानें युक्त असलेल्या ह्या नदीला तुम्ही शोभा

आणीत आहां. तस्मात् बलवान, धैर्यवान, सुवर्णासारख्या कांतीनें युक्त, आजानु-बाहु आणि वल्कलें परिधान केलेले असे तुम्ही कोण आहां, व दुःखाचे सुस्कारे कां टाकीत आहां ? आणि आपल्या मुद्रेनें ह्या वनसंबंधीं प्रजाजनांना पीडा कां देत आहां ? तुमची मुद्रा सिंहासारखी दिसत असून तुम्ही महाबलाढ्य व महा-पराक्रमी वीर आहां, आणि तुम्ही इंद्रधनुष्यासारखीं धनुष्यें घेतलीं असल्यामुळें शत्रूचा वध करण्याचा तुमचा उद्देश दिसत आहे. तुम्ही श्रीमान व रूपवान असून तुमची चालण्याची ढब उत्कृष्ठ बैलाप्रमाणें आहे. तुमचे बाहु गज-शुंडेप्रमाणें असून तुम्ही पुरुषश्रेष्ठ तेजस्वी आहां. हा पर्वतराजहि तुमच्या प्रभेनें झळकूं लागला आहे. तेव्हां राज्यालाच पात्र असलेले तुम्ही देवतुल्य ह्या प्रदेशाला कसें आलां ? तुमचे नेत्र कमलपत्रांप्रमाणें विशाल असून तुम्हीं वीरांनीं जटामंडल धारण केलें आहे, व तुम्ही उभयतांहि वीर एकमेकांसारखे असून देवलोकांपासून येथें आलां आहां, असें मला वाटतें. पृथ्वीवर तुम्ही चंद्रसूर्य सहज आलां आहां, असें मला वाटत आहे. विशाल वक्षः-स्थलांनीं युक्त असलेले तुम्ही वीर जरी मनुष्य आहां, तरी तुमचें रूप देवां-प्रमाणें आहे. तुमचे स्कंध सिंहासारखे असून तुम्ही आनंदित झालेल्या तरुण वृषभांप्रमाणें मोठे उत्साहि दिसत आहां. अडसराप्रमाणें असलेले तुमचे बाहु अत्यंत वर्तुल व दीर्घ असून सर्व अलंकार धारण करण्यास योग्य आहेत; परंतु ते तुम्ही कशाकरितां भूषित केले नाहींत ? विंध्य, मेरु इत्यादि पर्वतांनीं विभूषित असून सागर वनें ह्यांनीं युक्त असलेल्या ह्या संपूर्ण पृथ्वीचें रक्षण करण्यास तुम्ही उभयतां योग्य आहां, असें मला वाटतें. चित्रविचित्र शिडकाव टाकिलेली हीं तुमचीं लकलकित अद्भुत धनुष्यें इंद्राचीं सुवर्णभूषित वज्रेंच कीं काय अशीं दिसत आहेत. शुभ आकारानें युक्त असलेले तुमचे भाते, दग्ध करण्यास उद्युक्त झालेल्या सर्पांप्रमाणें प्राणनाशक अशा भयंकर व तीक्ष्ण बाणांनीं भरलेले आहेत. प्रमाणानें मोठे, रुंद व सुवर्णभूषणांनीं युक्त असे हे खड्ग कांत टाकिलेल्या सर्पांप्रमाणें झळकत आहेत. अरे, मी ह्याप्रमाणें तुम-च्याशीं बोलत असतांना तुम्ही माझ्याशीं कां भाषण करीत नाहीं ?"

हनुमान पुढें म्हणतोः—"सुग्रीव म्हणून कोणी एक धर्मात्मा व वीर वानरश्रेष्ठ आहे, आणि त्याला भ्रात्यानें हांकून लाविलें असल्यामुळें तो दुःखित असा जगतावर भ्रमण करीत आहे. त्या वानरश्रेष्ठाधिपति महात्म्या सुग्रीवानें पाठवि-ल्यावरून मी हनुमान नामक वानर येथें आलों आहे. तो धर्मात्मा सुग्रीव तुम्हां-

सहवर्तमान सख्य करण्याची इच्छा करीत असून, मी वायुपुत्र वानर त्याचा मंत्री आहें, असें तुम्ही समजा. सुग्रीवाचें प्रिय करण्याकरितां मीं तापसरूप धारण केलें आहे, व मीं इच्छेस येईल त्याप्रमाणें वागणारा व मनास वाटेल तिकडे जाणारा असून, ऋष्यमूक पर्वतापासून येथें आलों आहें."

### राममुखें हनुमानाची प्रशंसा.

ह्याप्रमाणें त्या वीर राम-लक्ष्मणांना सांगितल्यानंतर बोलण्यामध्यें कुशल असलेला तो संभाषणज्ञ हनुमान पुनरपि कांहींएक बोलला नाहीं. तेव्हां त्याचें भाषण श्रवण करून आनंदित मुद्रेनें युक्त झालेला वैभवशाली राम समीपच असलेल्या भ्रात्या लक्ष्मणाला म्हणाला, "हा वानरराज महात्म्या सुग्रीवाचा मंत्री त्याच्याचकरितां येथें माझ्यासमीप आला आहे. ह्याकरितां लक्ष्मणा, प्रेमयुक्त, शत्रूंचें दमन करणारा आणि संभाषणज्ञ अशा त्या सुग्रीवमंत्री वानराशीं मधुर शब्दांनीं तूं कांहीं तरी बोल. ज्यानें ऋग्वेदाचा अभ्यास केलेला नाहीं, ज्यानें यजुर्वेद धारण केलेला नाहीं, आणि जो सामवेद जाणीत नाहीं, त्याला असें भाषण करितां येणें शक्य नाहीं. खरोखर संपूर्ण व्याकरण ह्यानें अनेक वेळां ऐकिलेलें आहे. कारण हा जरी पुष्कळ बोलत होता, तरी कांहींहि अशुद्ध ह्याच्या तोंडांतून निघालेलें नाहीं. मुख, नेत्र, ललाट, भिवया आणि इतरहि सर्व अवयव ह्यांपैकीं कोठेंहि ह्याचे ठिकाणीं दोष दृष्टोत्पत्तीस आला नाहीं. ह्याच्या भाषणांत उगीच पाल्हाळ नाहीं. तें संदिग्ध नाहीं, अस्खलित आहे. ऐकणाऱ्याला कंटाळा आणण्यासारखें नाहीं, आणि मनामध्यें उत्कृष्ठ रीतीनें येऊन नंतर कंठविवरापासून तें श्रोत्यांच्या कानांवर पडत असल्यामुळें त्याचा उच्चार मध्यम स्वरानें होत आहे. सारांश, त्या त्या वर्णांचे संस्कार क्रमानें अंतःकरणावर ठसविण्यास समर्थ, त्वरारहित, विलंबशून्य आणि म्हणूनच हृदयाला आनंद देणारी अशी शुभ वाणी हा उच्चारीत आहे. ऊर, कंठ आणि शिर ह्या तिन्ही ठिकाणीं अभिव्यक्त होणाऱ्या ह्या अद्भुत वाणीनें खड्ग उपसून तयार असलेला शत्रू जरी झाला, तरी कोणाचें बरें चित्त अनुकूल होणार नाहीं? हे निष्पापा, ह्या प्रकारचा दूत ज्या राजापाशीं नसेल, त्याचीं कृत्यें सिद्धीस कशीं जाणार? ह्या प्रकारच्या गुणसमुदायांनीं युक्त असलेले कार्यसाधक ज्याच्यापाशीं असतील, त्याचे दूतांच्या भाषणानें बोधित केलेले सर्वहि मनोरथ सिद्धीस जातील."

ह्याप्रमाणें रामानें सुमित्रापुत्र लक्ष्मणाला सांगितलें असतां तो संभाषणज्ञ

लक्ष्मण वायूपुत्राला म्हणाला, "हे ज्ञानसंपन्न महात्म्या, सुग्रीवाचे गुण आम्हांला माहीत आहेत, व त्या वानरराज सुग्रीवालाच आम्ही शोधीत आहों. तस्मात् हे सज्जनश्रेष्ठ हनुमाना, सुग्रीवाच्या आज्ञेवरून जसें तूं आम्हांला सांगशील, तसें आम्ही करूं."

हें त्या लक्ष्मणाचें भाषण पूर्णपणें श्रवण केल्यावर तो वायुपुत्र आनंदित झाला, आणि सुग्रीवाचा विचार मनामध्यें आणून त्या राम-लक्ष्मणाशीं सख्य करण्याचें त्यानें मनामध्यें आणिलें.

## सर्ग चौथा.

### लक्ष्मणमुखें हनुमानाला स्ववृत्तकथन.

तदनंतर सुग्रीवासंबंधानें रामाचें सौम्य भाषण श्रवण करून व सुग्रीवाचें रामाचें कांहीं कार्य आहे, असें जाणून सुग्रीवाचा मनोरथ आतां परिपूर्ण होईल, असें मनामध्यें आल्यामुळें हनुमानाला हर्ष झाला, आणि तो मनामध्यें म्हणाला, "त्या महात्म्या सुग्रीवाला राज्यप्राप्ति अवश्य होणार. कारण हा महापुरुष कांहीं कार्याच्या उद्देशानें येथें आला आहे."

नंतर अत्यंत हर्षयुक्त झालेला तो वानरश्रेष्ठ हनुमान संभाषणनिपुण रामाला फिरून म्हणाला, "पंपेच्या तीरावरील वनांनीं भूषित असून नानाप्रकारच्या श्वापदांनीं व मृगांनीं युक्त असल्यामुळें दुर्गम झालेल्या ह्या घोर वनामध्यें कनिष्ठ भ्रात्यासहवर्तमान आपण कशाकरितां आलां?"

हें त्याचें भाषण श्रवण केल्यावर रामानें सांगितल्यावरून लक्ष्मणानें दशरथ-पुत्र महात्म्या रामाविषयीं त्याला हकीकत सांगितली. तो म्हणाला, "दशरथ म्हणून एक तेजस्वी व धर्मवत्सल राजा होऊन गेला. तो नेहमीं स्वधर्मानें चारी वर्णांचें सर्व प्रकारें परिपालन करीत असे. त्याचा द्वेष करणारा कोणीहि नव्हता, व तोहि कोणाचा द्वेष करीत नसे. पालक ह्या नात्यानें सर्व प्राण्यांना तो दुसरा ब्रह्मदेवच कीं काय असें वाटत असे. योग्य दक्षणांनीं युक्त असे अग्निष्टोमप्रभृति क्रतु त्यानें केले होते. त्याचा हा ज्येष्ठ पुत्र राम म्हणून लोकांमध्यें प्रसिद्ध आहे. हा दशरथाचा ज्येष्ठ पुत्र इतर पुत्रांपेक्षां गुणांनीं श्रेष्ठ असून पित्याची आज्ञा पार पाडणारा आहे, आणि प्राणिमात्रांनीं

आश्रय करण्यास योग्य आहे. ह्या राजचिन्हांनीं युक्त असून राज्यवैभवानेंहि युक्त असतांना, राज्यापासून च्युत होऊन वनामध्यें वास्तव्य करण्याकरितां माझ्यासहवर्तमान येथें आला आहे. हे महाभाग्यवान हनुमाना, सायंकाळीं महातेजस्वी सूर्याचे मागोमाग ज्याप्रमाणें प्रभा जाते, त्याप्रमाणें ह्या जितेंद्रिय रामाचे मागोमाग त्याची भार्या सीता अरण्यांत चालती झाली. मी ह्याचा कनिष्ठ भ्राता असून ह्याच्या गुणांमुळें ह्या कृतज्ञ व सर्वज्ञ रामाचा दास बनलों आहें, व लक्ष्मण ह्या नांवानें मी प्रसिद्ध आहें. सुखोपभोग घेण्यासच पात्र, महायोग्य, प्राणिमात्रांच्या हिताविषयींच मनाची प्रवृत्ति असलेल्या, आणि ऐश्वर्यहीन झाल्यामुळें वनवासच रुचत असलेल्या ह्या रामाची भार्या आम्ही जवळ नसतांना राक्षसानें हरण करून नेली. ज्यानें ह्याची पत्नी हरण करून नेली त्या राक्षसाचा पत्ताहि लागत नाहीं. दनु म्हणून एक दितीचा पुत्र शापामुळें राक्षस बनलेला होता. त्यानें वानरराज सुग्रीव समर्थ आहे, म्हणून सांगितलें. ‘ तो महावीर्यवान सुग्रीव तुझ्या भार्येचा अपहार करणाऱ्याचा शोध लावील ’ असें सांगून तेजानें झळकत असलेला तो दनु स्वर्गास जाण्याकरितां आकाशमार्गानें निघून गेला. तूं प्रश्न केल्यावरून हें सर्व इत्थंभूत वर्तमान तुला मीं कळविलें आहे; आणि मी व राम असे उभयतां सुग्रीवाला शरण आलों आहों. ह्या रामानें पूर्वीं ब्राह्मणांना द्रव्यदान करून उत्कृष्ट कीर्ति संपादन केलेली आहे, आणि पूर्वीं हा लोकांचा नाथहि झालेला आहे. तथापि दैवगतीमुळें सुग्रीव आपला नाथ असावा, अशी ह्याला इच्छा झाली आहे. सीता ज्याची स्नुषा होती, त्या शरण जाण्यास योग्य असलेल्या दशरथाचा धर्मवत्सल व इतरांनीं शरण जाण्यास योग्य असा पुत्र राम सुग्रीवाला शरण आला आहे. जो माझा गुरु धर्मात्मा राघव सर्व लोकांनीं शरण जाण्यास पूर्वीं योग्य होता, तो आज सुग्रीवाला शरण आला आहे. ज्याच्या प्रसदामुळें नेहमीं ह्या प्रजा संतुष्ट रहावयाच्या, तो राम आज वानरराजाच्या कृपेची इच्छा करीत आहे. पृथ्वींतील सुवर्णसंपन्न अशा संपूर्ण राजांना ज्या दशरथ राजानें नेहमीं मान दिला, त्याचा त्रैलोक्यविख्यात जेष्ठ पुत्र राम आज वानरराज सुग्रीवाला शरण आला आहे. सारांश, शोकग्रस्त झालेला राम शोकाच्या अगदीं अधीन होऊन जर शरण आला आहे, तर सुग्रीवानें आपल्या सेनापालकांसहवर्तमान त्याच्यावर कृपा करणेंच योग्य आहे. ”

ह्याप्रमाणें अश्रु ढाळीत ढाळीत सुमित्रापुत्र लक्ष्मण हृदयद्रावक भाषण

करीत असतांना तो संभाषणनिपुण हनुमान त्याला म्हणाला, "अशा प्रकारचे बुद्धिमान, जितेंद्रिय, क्रोध जिंकिलेले आणि वानरराजानें भेट घेण्यास योग्य अशांचें दर्शन झालें, ही सुदैवाचीच गोष्ट आहे. तो सुग्रीव भ्रात्या वालीशीं वैर बांधून असल्यामुळें राज्यापासून भ्रष्ट झालेला आहे, व स्त्रीचा अपहार करून भ्रात्यानें त्याला अत्यंत दुःख दिलें असल्यामुळें तो आतां त्रस्त होऊन वनामध्यें वास्तव्य करीत आहे. तस्मात्, तो सूर्यपुत्र सुग्रीव सीतेच्या शोधासंबंधानें आम्हां सहवर्तमान तुमचें साहाय्य करील."

### राम-लक्ष्मणांचें ऋष्यमूक पर्वतीं गमन.

ह्याप्रमाणें मधुर शब्दांनीं लक्ष्मणाशीं चित्तवेधक भाषण केल्यावर हनुमान रामाला म्हणाला, "फार उत्तम आहे, आपण सुग्रीवाकडे जाऊं." तेव्हां हनुमानाचें हें बोलणें ऐकून लक्ष्मणानें त्या धर्मात्म्याच्या भाषणाला योग्य रीतीनें मान दिला. तो रामाला म्हणाला, "हे रघुवंशजश्रेष्ठा रामा, हा वायुपुत्र वानर आनंदित होऊन सांगत आहे, त्याप्रमाणें त्या सुग्रीवाचेंहि कार्य व्हावयाचें आहे, ह्यामुळें आपलें कार्य झाल्यासारखेंच आहे. ह्याचा चेहरा प्रसन्न दिसत असून हा आनंदानें स्पष्ट भाषण करीत आहे, ह्यावरून हा वायुपुत्र वीर हनुमान अनृत भाषण करणार नाहीं, असा अदमास दिसतो."

ह्याप्रमाणें रामाला लक्ष्मणानें सांगितलें असतां तो महाबुद्धिवान वायुपुत्र हनुमान त्या रघुवंशज वीरांना बरोबर घेऊन वानरराजाकडे गेला. सारांश, भिक्षुरूपाचा त्याग करून हनुमानानें वानररूप धारण केलें, आणि त्या उभयतां वीरांना आपल्या पाठीवर घेऊन तो श्रेष्ठ कपि सुग्रीवाकडे चालता झाला. तात्पर्य महाकीर्तिमान, कार्यसिद्धि झालेल्या पुरुषाप्रमाणें आनंदित, महापराक्रमी आणि बुद्धीनें चांगला असा तो वायुपुत्र वानरश्रेष्ठ हनुमान राम-लक्ष्मणांसहवर्तमान श्रेष्ठ अशा ऋष्यमूक पर्वतावर चालता झाला.

## सर्ग पांचवा.

### राम-सुग्रीवांचें अग्निसाक्षिक सख्य.

हनुमंतानें राम-लक्ष्मणांना ऋष्यमूक पर्वतावर ठेवून तेथून तो त्या मलय पर्वतावर गेला. नंतर त्यानें वानरराज सुग्रीवाला त्या वीर रघुवंशज राम-लक्ष्मणांविषयीं हकीकत निवेदन केली. तो म्हणाला, "हे महाबुद्धिमान, हे महापराक्रमी, हा

राम भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान येथें आला आहे, व हा सत्यपराक्रमी आहे. इक्ष्वाकुवंशजांच्या कुलामध्यें उत्पन्न झालेल्या ह्या दशरथपुत्र रामाला स्वसत्यपरिपालनरूप धर्माविषयीं पित्याची प्रेरणा झाली आहे; आणि म्हणूनच हा त्या आपल्या पित्याची आज्ञा शेवटास नेण्यास उद्युक्त झाला आहे. राजसूय आणि अश्वमेध ह्या यागांनीं ज्यानें अग्नि संतुष्ट केला, त्याचप्रमाणें शेकडों व हजारों गाई ज्यानें दक्षिणा म्हणून दिल्या, आणि ज्यानें तपाचें व सत्य भाषणाचें अवलंबन करून पृथ्वीचें परिपालन केलें, त्या दशरथाच्या स्त्रीकरितां हा राम अरण्यामध्यें आला आहे. इतकेंच नव्हे, परंतु तो हा महात्मा जितेंद्रिय राम अरण्यामध्यें वास्तव्य करीत असतांना रावणानें ह्याची भार्या हरण करून नेली आहे, ह्यामुळें हा तुला शरण आला आहे. तस्मात्, ज्या अर्थीं ते भ्राते राम-लक्ष्मण तुझ्याशीं सख्य करण्याची इच्छा करीत आहेत, त्या अर्थीं तूं ह्यांची भेट घेऊन अत्यंत पूज्य अशा ह्या उभयतांचें पूजन कर. ''

हें हनुमाचें भाषण श्रवण केल्यावर वानराज सुग्रीव केवळ इच्छेच्याच जोरानें अत्यंत दर्शनीय बनून प्रेमानें रामाला म्हणाला, " आपण धर्मसंबंधानें सुशिक्षित असून महातपस्वी व सर्वांवर दया करणारे आहां; आणि वायुपुत्र हनुमानानें मला आपले गुण खऱ्या रीतीनें कथन केले आहेत. तस्मात् मज वानराशीं ज्या अर्थीं आपण मैत्री जोडण्याची इच्छा करीत आहां, त्या अर्थीं माझा हा सत्कार झालेला असून मला मोठा लाभच झालेला आहे. ह्याकरितां माझ्याशीं सख्य होणें जर आपणांस बरें वाटत असेल, तर हा हात पुढें केला आहे. आपल्या हातानें हा माझा हात धरा, आणि एकमेकांचें कार्य शेवटास नेण्याविषयीं कधींहि न फिरणाऱ्या अशा निश्चयाची विचारपूर्वक प्रतिज्ञा होऊं द्या."

हें सुग्रीवाचें उत्कृष्ठ रीतीनें झालेलें भाषण श्रवण करून राम अतिशय आनंदित झाला, आणि त्याचा हात घट्ट धरून आनंदित झालेल्या त्या रामानें प्रेमाचें अवलंबन करून त्याला गाढ आलिंगन दिलें. तदनंतर सुग्रीवाकडे जाते वेळीं पुनरपि धारण केलेल्या भिक्षुरूपाचा त्याग करून, आणि आपलें स्वतःचें रूप धारण करून, शत्रुदमन करणाऱ्या हनुमानानें दोन काष्ठांपासून अग्नि उत्पन्न केला, आणि त्या देदीप्यमान अग्नीचें सत्कारपूर्वक पुष्पांनीं पूजन केल्यावर, मनामध्यें अतिशय स्वस्थ असलेल्या व अत्यंत आनंदित झालेल्या त्या हनुमानानें राम आणि सुग्रीव ह्या दोघांच्या मध्यें त्या अग्नीची स्थापना केली. तदनंतर त्या देदीप्यमान अग्नीला त्या उभयतांनीं प्रदक्षिणा केली, आणि सुग्रीव

व राम ह्यांनीं अशा रीतीनें एकमेकांची मैत्री संपादन केली. ते उभयतां राम व सुग्रीव अत्यंत प्रसन्न झाले, आणि एकमेकांकडे एकसारखे पाहूं लागले; तथापि त्यांची परस्पर दर्शनाविषयीं तृप्ति झाली नाहीं. 'माझ्या अंतःकरणाला प्रिय असा तूं माझा मित्र आहेस, व आपलें उभयतांचें सुखदुःख एकच आहे' असें सुग्रीव आनंदित झाल्यासारखें दर्शवून रामाला म्हणाला. नंतर पक्ष्यांनीं गजबजलेली व अत्यंत प्रफुल्लित अशी एक सालवृक्षाची शाखा तोडून व ती खालीं पसरून तो सुग्रीव रामासहवर्तमान तिच्यावर बसला; आणि अत्यंत हर्षयुक्त झालेल्या वायुपुत्र हनुमानानें फारच प्रफुल्लित झालेली अशी एक चंदन वृक्षाची शाखा लक्ष्मणाला बसण्याकरितां दिली.

### सुग्रीवाची रामाला भयनाशार्थ प्रार्थना.

नंतर हर्षानें ज्याचे नेत्र विकसित झालेले आहेत, असा तो अतिशय आनंदित झालेला सुग्रीव मधुर शब्दांनीं रामाशीं चित्तवेधक भाषण करूं लागला कीं, "रामा, भ्रात्यानें माझा अगदीं पराजय केलेला आहे, व मी भयभीत होऊन येथें संचार करीत आहें. इतकेंच नव्हे, परंतु माझ्या भार्येचाहि त्यानें अपहार केला आहे. ह्यामुळें मी त्रस्त होऊन वनामध्यें ह्या दुर्गमस्थानाचा आश्रय करून राहिलों आहें. सारांश, हे रघुवंशजा, त्रस्त व भयभीत झाल्यामुळें चित्तालाहि भ्रम पडलेला असा मी वनामध्यें वास्तव्य करीत आहें. भ्रात्या वालीनें माझा पराजय केलेला आहे, आणि मीं त्याच्याशीं वैर बांधिलेलें आहे. तस्मात्, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना महाभाग्यवान रामा, भयग्रस्त झालेल्या मला वालीपासून फिरवून भीति न राहील अशा रीतीनें आपण माझ्या भयाचा नाश करा."

### वालिवधाची प्रतिज्ञा.

ह्याप्रमाणें सुग्रीवानें सांगितलें असतां धर्मवेत्ता व धर्मवत्सल असा तो ककुत्स्थकुलोत्पन्न तेजस्वी राम सुग्रीवाला हंसत हंसत म्हणाला, "हे महावानरा, उपकाररूप फल प्राप्त करून देणाऱ्याला मी मित्र समजत असतों. तस्मात्, तुझी भार्या हरण करून नेणाऱ्या त्या वालीचा मी वध करीन. सूर्यासारखे तेजस्वी असे हे माझे कधींहि व्यर्थ न जाणारे सांठवून ठेविलेले बाण वेगयुक्त होऊन त्या दुराचरणी वालीवर पडतील. कंक पक्ष्याच्या पिसांनीं आच्छादित, तीक्ष्ण अग्रें आणि सरळ पेरें ह्यांनीं युक्त व इंद्रवज्रतुल्य असलेले हे बाण क्रोधयुक्त भुजंगासारखे दिसत आहेत. ह्यास्तव सर्पतुल्य

तीक्ष्ण बाणांच्या योगानें वध पावून कोसळलेल्या पर्वताप्रमाणें भूमीवर पसरलेल्या वालीला तूं आज अवलोकन कर."

स्वतःला हितकारक असें तें रघुवंशज रामाचें भाषण श्रवण केल्यावर सुग्रीवानें अतिशय संतुष्ट होऊन आपला मुख्य मनोरथ रामाला निवेदन केला. तो म्हणाला, "हे पुरुषश्रेष्ठा वीरा, तुझ्या प्रेमामुळें प्रिया व राज्य हीं मला प्राप्त होतील. ह्यास्तव हे प्रजाधिपते, मला पुनरपि तो दुःख न देईल अशा रीतीनें त्या माझ्या वैरी ज्येष्ठ भ्रात्याची आपण व्यवस्था लावा." असो. ह्याप्रमाणें सुग्रीव व राम ह्यांचें सख्य चाललें असतां सीता, वाली आणि राक्षस ह्यांचें अनुक्रमें कमलासारखे, सुवर्णासारखे व अग्नीसारखे असलेले वामनेत्र एकदम स्फुरण पावूं लागले.

## सर्ग सहावा.

### सीतेनें टाकिलेले अलंकार रामाला दाखविणें.

पुनरपि सुग्रीव संतुष्ट होऊन रघुनंदन रामाला म्हणाला, "हे रामा, मंत्र्यांमध्यें श्रेष्ठ असा हा माझा सेवक हनुमान, तूं कोणत्या कारणाकरितां निर्जन वनामध्यें आला आहेस, हें मला सांगत आहे. भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान तूं वनामध्यें वास्तव्य करीत असतांना जनककन्या मैथिली—तुझी भार्या—राक्षसानें हरण करून नेली. त्या वेळीं तूं व बुद्धिमान लक्ष्मण ह्यांपैकीं कोणीहि समीप नसल्यामुळें राक्षसांचे अधीन झालेली ती रोदन करीत होती. सारांश, संधि पाहात असलेल्या त्या राक्षसानें जटायु गृध्राचा वध केला, आणि भार्यावियोगजन्य दुःख तुला प्राप्त करून दिलें. परंतु हें तुझें भार्यावियोगजन्य दुःख लवकरच नाहींसें होईल, कारण ब्रह्मज्ञानाला साधनीभूत असलेली श्रुति मधुकैटभांनीं हरण करून नेली असतांनाहि जशी विष्णूंनीं परत आणिली, तशी सांप्रत नाहींशी झालेली ती तुझी भार्या मी आणीन. हे शत्रुदमना, तुझी भार्या रसातलामध्यें असली, किंवा आकाशामध्यें जरी असली, तरी ती मी तुला आणून देईन. हे रघुवंशजा रामा, हें माझें भाषण सत्य आहे, असें तूं समज. हे महापराक्रमी रामा, विषमिश्रित अन्नाप्रमाणें इंद्रासहवर्तमान देवदैत्यांनाहि ती तुझी भार्या जिरणें शक्य नाहीं. ह्यास्तव हे महापराक्रमी रामा, शोकाचा त्याग कर. ती तुझी कांता मी आणून देईन. क्रूरकर्मी

राक्षस घेऊन जात असतांना 'रामा, रामा, लक्ष्मणा,' म्हणून भयंकर आक्रोश करीत असलेली आणि रावणाचे हातामध्यें नागराजाच्या स्त्रीप्रमाणें तडफड करीत असलेली जी माझ्या दृष्टीस पडली, ती निःसंशय मैथिलीच असावी, असें माझें अनुमान आहे. माझ्यासहवर्तमान पांच असामी पर्वतावर बसल्याचें पाहून तिनें आपलें उत्तरीय वस्त्र व शुभ भूषणें टाकून दिलीं. रामा, तीं आम्ही ठेवून घेतलीं आहेत. आतां तीं मीं येथें आणितों. तूं तीं कोणाचीं, तें ओळख."

हें ऐकून त्या प्रिय भाषण करणाऱ्या सुग्रीवाला राम म्हणाला, "मित्रा, तर मग आण लवकर, विलंब कशाकरितां करीत आहेस?" ह्याप्रमाणें त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें म्हटलें असतां, त्याचें प्रिय करण्याकरितां सुग्रीव सत्वर पर्वताच्या गहन गुहेमध्यें शिरला, आणि उत्तरीय वस्त्र व तीं भूषणें घेऊन, 'हें पहा' म्हणून रामाला त्या वानरानें तीं दाखविलीं. तदनंतर तें उत्तरीय वस्त्र व तीं शुभ भूषणें घेतल्यावर धुक्यानें ज्याप्रमाणें चंद्रमा आच्छादित होतो, त्याप्रमाणें रामाचें मुख अश्रूंनीं आच्छादित होऊन गेलें. सीतेवर असलेल्या प्रेमामुळें गळूं लागलेल्या अश्रूंच्या योगानें दूषित झालेला तो राम 'हे प्रिये' म्हणून धैर्य सोडून रोदन करूं लागला, व पृथ्वीवर पडला! इतकेंच नव्हे, परंतु ते उत्कृष्ठ अलंकार वारंवार आपल्या हृदयावर ठेवून क्रोधयुक्त झालेल्या बिळांतील सर्पाप्रमाणें तो एकसारखे सुस्कारे टाकूं लागला. नेत्रांतून एकसारखा अश्रूंचा प्रवाह चालला असतांना बाजूस असलेल्या लक्ष्मणाकडे पाहून तो दीन वाणीनें शोक करूं लागला. तो म्हणाला, "लक्ष्मणा, सीतेला राक्षस घेऊन जात असतांना शरिरापासून भूषणें आणि त्याचप्रमाणें हें उत्तरीय वस्त्र तिनें भूमीवर टाकिलें आहे, हें तूं पहा. राक्षस घेऊन चालला असतांना कोमल तृणानें युक्त असलेल्या भूमीवर तिनें टाकिलेलीं हीं भूषणें जशींच्या तशींच दिसत आहेत."

ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां लक्ष्मण म्हणाला, "सीतेचीं बाहुभूषणें मला ठाऊक नाहींत व कुंडलेंहि माहीत नाहींत; परंतु नित्य पादाभिवंदनाचा प्रसंग येत असल्यामुळें तोरड्यांची मात्र मला ओळख पटत आहे." मग राम सुग्रीवाला म्हणाला, "सुग्रीवा, माझी प्राणप्रिया क्रूर रूप धारण करणाऱ्या राक्षसानें हरण करून नेली आहे. तेव्हां कोणत्या प्रदेशावर तो हरण करून नेत असतांना ती तुझ्या दृष्टीस पडली, हें मला सांग. अथवा मला मोठ्या संकटांत पाडणारा तो राक्षस कोठें वास्तव्य करीत आहे, तें तरी कथन कर.

म्हणजे त्याच्याकरितां मी आज सर्व राक्षसांचा नाश करून टाकीन. मैथिलीला हरण करून ज्यानें मला कोपविलें आहे, त्यानें निःसंशय आपल्या जीविताचा अंत होण्याकरितां मृत्यूचें द्वार उघडून ठेविलें आहे. अत्यंत प्रिय अशी ती माझी भार्या ज्या राक्षसानें वनांतून फसवून नेली आहे, तो माझा शत्रु तूं मला सांग, म्हणजे आज मी त्याला यमाचे सन्निध पोहोंचवितों."

## सर्ग सातवा.

### श्रीरामाचें सांत्वन.

ह्याप्रमाणें आर्त झालेल्या त्या रामानें सुग्रीवाला सांगितलें असतां, अश्रूंनीं कंठ दाटून आलेला तो सुग्रीव हात जोडून अश्रू ढाळीत ढाळीत म्हणाला, "त्या पापी राक्षसाचें वसतिस्थान, सामर्थ्य, पराक्रम किंवा दुष्कुलामध्यें उत्पन्न झालेल्या त्या राक्षसाचें कुल मला मुळींच माहीत नाहीं. परंतु हे शत्रुदमना, सीता तुला प्राप्त होईल अशा रीतीनें मी यत्न करीन, हें मात्र मी खरें खरें प्रतिज्ञेवर सांगतों. तूं वाईट वाटूं देऊं नको. अनुयायीगणांसहवर्तमान रावणाचा वध करून आणि तुझ्या संतोषाला पात्र अशा स्वतःच्या पौरुषाचें अवलंबन करून, तूं ज्या रीतीनें प्रसन्न होशील, त्या रीतीनें मी लवकरच तजवीज करीन. आतां खेद पुरे झाला. धैर्याचें अवलंबन करून स्वतःसंबंधानें कांहीं तरी स्मर. तुझ्यासारख्यांना अशा प्रकारचा हा बुद्धीचा कोतेपणा योग्य नाहीं. भार्याविरहामुळें मलाहि मोठें संकट प्राप्त झालेलें आहे; परंतु मी ह्याप्रमाणें शोक करीत बसत नाहीं, व धैर्यहि सोडीत नाहीं. मी यःकश्चित् वानर असतांनाहि त्या प्रियेबद्दल शोक करीत नाहीं; मग महात्मा, सुशिक्षित, धैर्यवान आणि उदार अशा तुझी गोष्ट पाहिजे कशाला? तस्मात्, आलेले अश्रू धैर्यानें तूं आवरून धर. सत्त्वगुणी लोकांची धैर्यरूप मर्यादा सोडून देणें तुला योग्य नाहीं. इष्टवियोगामुळें संकट आलें असतां, धनाचा नाश झाला असतां अथवा जीविताचा नाश करणारें असें भय प्राप्त झालें असतांहि स्वतःच्या बुद्धीनें विचार करणारा धैर्यवान पुरुष मनामध्यें खचत नाहीं. जो बालिश पुरुष मनामध्यें नेहमीं खेद करीत बसतो, तो ओझ्यानें जर्जर झालेली नौका ज्याप्रमाणें जलामध्यें बुडते, त्याप्रमाणें निरुपाय होऊन शोकामध्यें बुडून जातो. हे मी हात जोडिले आहेत, आणि प्रेमामुळें मी तुझी प्रार्थना

करीत आहें. ह्यास्तव पौरुषाचें अवलंबन करून शोकाला थारा देऊं नको. जे शोकाचें अवलंबन करितात, त्यांना सुख प्राप्त होत नसून त्यांचें तेजहि नाहींसें होत जातें. तस्मात्, शोक करणें तुला योग्य नाहीं. शोकाकुल झालेल्याच्या जीविताविषयीं संशय उत्पन्न होत असतो. तस्मात् हे राजाधिराज, शोकाचा त्याग करून तूं केवळ धैर्याचें अवलंबन कर. मित्रभावामुळें मी तुला हिताची गोष्ट सुचवीत आहें. मी कांहीं उपदेश करीत नाहीं. तेव्हां माझ्या मित्रत्वाला मान देऊन शोक करणें तुला योग्य नाहीं."

ह्याप्रमाणें मधुर शब्दांनीं त्या सुग्रीवानें सांत्वन केलें असतां, अश्रूंनीं भिजून गेलेलें आपलें मुख रामानें वस्त्राच्या टोंकानें पुसून काढिलें, आणि सुग्रीवाच्या सांगण्यावरून मूळ स्वभावाचें अवलंबन करून तो प्रभु ककुत्स्थकुलोत्पन्न राम सुग्रीवाला आलिंगन देऊन म्हणाला, "सुग्रीवा, हितकारक आणि प्रेमयुक्त मित्राचें अनुरूप व योग्य असें जें कांहीं कर्तव्य आहे, तें तूं केलें आहेस. मित्रा, तूं सांत्वन केल्यामुळें मी आतां सावध झालों आहें. खरोखर विशेषेंकरून अशा वेळीं अशा प्रकारचा बंधु दुर्लभ आहे. सीतेच्या आणि दुरात्म्या क्रूर रावणाच्या शोधाविषयीं तूं यत्न कर, आणि मी काय करावें तेंहि तूं निःशंकपणें सांगून टाक. पर्जन्यकालीं चांगल्या जमिनीमध्यें पेरिलेल्या बीजाप्रमाणें तुझें सर्व कांहीं कृत्य सफल होईल. मी अभिमानामुळें जें कांहीं भाषण केलें आहे, तें खरें आहे, असें तूं समज. ह्यापूर्वींहि मीं कधीं अनृत भाषण केलें नाहीं, व पुढेंहि कधीं करणार नाहीं, हें तुला प्रतिज्ञेवर सांगून मी सत्याची शपथ घेतों."

ह्याप्रमाणें रामाचें भाषण श्रवण केल्यानंतर आणि विशेषतः त्याची प्रतिज्ञा श्रवण केल्यानंतर, वानरमंत्र्यांसहवर्तमान सुग्रीवाला मोठा हर्ष झाला. ह्याप्रमाणें एकांतामध्यें परस्परांशीं सख्य केलेले ते उभयतां नरवानर परस्परांना योग्य अशा सुखदुःखांच्या गोष्टी बोलूं लागले; आणि त्या महाप्रभावी राजाधिराज रामाचें भाषण श्रवण केल्यावर तो श्रेष्ठ वानरवीर समंजस सुग्रीव आपलें कार्य झालेंच, असें मनामध्यें समजूं लागला.

# सर्ग आठवा.



## राम-सुग्रीवसंवाद.

त्या भाषणानें सुग्रीव संतुष्ट व हर्षयुक्त झाला, आणि लक्ष्मणाच्या त्या शूर ज्येष्ठ भ्रात्याला म्हणाला, "ज्या अर्थी तुझ्यासारखा गुणी मित्र मला प्राप्त झाला आहे, त्या अर्थी देवतांची सर्वस्वी मजवर कृपा आहे, ह्याबद्दल मुळींच शंका नाहीं. हे निष्पापा रामा, तुझ्यासारखा साहाय्यकर्ता असला म्हणजे देवराज्यहि प्राप्त होणें शक्य आहे, मग स्वराज्याची ती कथा काय? अग्नीसमक्ष राघववंशज मित्र ज्याला प्राप्त झाला, तो मी बंधूंच्या व मित्रांच्या मानाला पात्र आहे. मी तुला योग्य असाच मित्र आहें, हें हळू हळू तुला समजून येईल. आपल्या गुणांचा उच्चार तुझ्यापाशीं करण्यास मी समर्थ नाहीं. हे स्वावलंबी पुरुषश्रेष्ठा, तुझ्यासारख्या मनोनिग्रहि महात्म्यांची प्रीति व धैर्य अधिकच निश्चल होत असतात. असो. मित्रासंबंधानें रुपें, सोनें अथवा शुभ भूषणें ह्यांविषयीं आपपरभाव मित्र मनामध्यें आणीत नाहींत. मित्र संपन्न असो, दरिद्री असो, दुःखी असो, निर्दोष असो, अथवा सदोष असो, तोच मुख्य आश्रय आहे. हे निष्पापा, तशा प्रकारचें प्रेम दृष्टोत्पत्तीस आलें, म्हणजे धनाचा, सुखाचा व देशाचाहि त्याग मित्राकरितां होत असतो."

तदनंतर कांतीनें युक्त असलेला तो राम इंद्रतुल्य विचारी लक्ष्मणासमोर प्रियदर्शन सुग्रीवाला 'ठीक आहे' असें म्हणाला. तेव्हां राम व महाबलाढ्य लक्ष्मण उभे राहिलेले पाहून सुग्रीवानें आपली चंचल दृष्टि वनामध्यें सर्व ठिकाणीं फिरविली असतां, प्रफुल्लित, थोडक्याशा पानांनीं युक्त आणि भ्रमरांनीं सुशोभित असा एक तालवृक्ष जवळच त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां पानांनीं भरलेली व सुशोभित अशी एक त्या वृक्षाची फांदी तोडून रामाकरितां त्यानें खालीं पसरली, आणि रामासहवर्तमान तो सुग्रीव त्या फांदीवर बसला. तदनंतर त्या उभयतांना बसलेले पाहून हनुमानानेंहि दुसरी एक वृक्षाची फांदी मोडिली, आणि विनयसंपन्न लक्ष्मणाला त्यानें तिच्यावर बसविलें. नंतर तालपुष्पांनीं आच्छादित झालेल्या त्या श्रेष्ठ पर्वतावर राम प्रसन्न सागराप्रमाणें सुखानें बसला आहे, असें पाहून त्या कपिश्रेष्ठ सुग्रीवाला हर्ष झाला; आणि आनंदाच्या भरामुळें जिच्यांतील अक्षरांचा उच्चार अस्पष्टपणें होत आहे, अशा सौम्य व शुभ वाणीनें तो सुग्रीव स्नेहामुळें रामाला म्हणाला, "भ्रात्यानें पराजित केलेला, आणि भार्येचा अपहार झाल्यामुळें अत्यंत

दुःखित झालेला मी भयग्रस्त होऊन ऋष्यमूक पर्वतावर संचार करीत आहें. राघवा, भ्रात्या वालीनें वैर धरून मला दुःख दिलें असल्यामुळें मी त्रस्त झालों असून भयामध्यें मग्न झालों आहें, आणि चित्तक्षोभ होऊन वनामध्यें फिरत आहें. तस्मात्, हे सर्व लोकांना अभय देणाऱ्या रामा, वालीमुळें भयभीत झालेल्या मज अनाथावर तूं कृपा कर."

ह्याप्रमाणें सुग्रीवानें सांगितलें असतां तेजस्वी, धर्मवेत्ता आणि धर्मवत्सल असा तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम हंसत हंसत सुग्रीवाला म्हणाला, "उपकार हें मित्रापासून प्राप्त होणारें फल असून अपकार हें शत्रूचें चिन्ह आहे. ह्यास्तव तुझी भार्या हरण करणाऱ्या त्या वालीचा मी आजच वध करीन. हे महाभाग्यवान सुग्रीवा, पिसें व तीक्ष्ण तेज ह्यांनीं युक्त असलेले हे माझे सुवर्णभूषित बाण कार्तिकेयाच्या वनामध्यें उत्पन्न झालेले आहेत. कंक पक्ष्याच्या पिसांनीं हे आच्छादित झालेले आहेत. ह्यांचीं अग्रें फारच तीक्ष्ण आहेत, आणि महेंद्राच्या वज्राप्रमाणें असलेले हे बाण क्रुद्ध झालेल्या भुजंगासारखे शत्रुनाशक आहेत. तात्पर्य, तुझा अपराध केलेला जो वाली नांवाचा तुझा भ्रातृरूप शत्रु, तो बाणाच्या योगानें वध पावून पर्वताप्रमाणें भूमीवर पसरलेला तूं अवलोकन कर."

हें रामाचें भाषण श्रवण केल्यावर त्या वानरसेनाधिपति सुग्रीवाला अनुपम हर्ष झाला व तो म्हणाला, "शाबास, शाबास. रामा, मी शोकग्रस्त झालों आहें, व शोकग्रस्तांचा तूं आश्रय आहेस. ह्यास्तव मित्र असें समजून मी तुझ्यापाशीं आपलें दुःख निवेदन करीत आहें. हातावर हात देऊन अग्नीचे समक्ष मी तुला मित्र केला आहे, व प्राणापेक्षांहि तूं मला अधिक संमत आहेस, हें मी शपथेवर खरें सांगतों. जें अंतर्गत दुःख माझ्या मनाला नेहमीं क्षुब्ध करीत आहे, तें मित्र असें समजून मी निःशंकपणें तुला सांगतों."

हें बोलत असतां सुग्रीवाचा कंठ दाटून आल्यामुळें त्याच्या तोंडांतून अक्षरहि निघेना. तथापि नदीच्या वेगाप्रमाणें एकाएकीं उसळलेला तो अश्रूंचा वेग सुग्रीवानें धैर्यानें आवरून धरिला, आणि तो वेग आवरून धरून व शुभ नेत्रांतील अश्रू पुसून आणि दीर्घ श्वास टाकून तो तेजस्वी सुग्रीव पुनरपि रामाला म्हणाला, "रामा, पूर्वीं वालीनें स्वराज्यापासून मला भ्रष्ट केलें, आणि कठोर शब्द ऐकवून त्या बलाढ्यानें माझी निर्भर्त्सना केली. प्राणांहूनहि प्रिय अशी माझी भार्या त्यानें हरण करून नेली, आणि जे माझे मित्र होते, तेहि त्यानें कारागृहामध्यें अडकवून ठेविलें. राघवा, माझ्या नाशाकरितां त्या दुरात्म्याचे प्रयत्न चाललेलेच अस-

तात, व माझ्या वधाकरितां त्यानें पाठविलेले पुष्कळ वानर मीं आजपर्यंत मारिलेलेहि आहेत. तेव्हां रामा, तुलाहि अवलोकन करून माझ्या वधाकरितां त्यानें पाठविलेल्यांपैकींच तूं आहेस कीं काय, अशी शंका येत असल्यामुळें मी भीतिग्रस्त होऊन तुझ्या समीप येत नाहीं. कारण कांहीं भय प्राप्त झालें असतां कोणीहि झाले तरी भीतच असतात. हनुमान ज्यांतील प्रमुख आहे, असे हेच काय ते माझे केवळ मित्र आहेत; आणि मी संकटांत सांपडलों असतांनाहि ह्यांच्यामुळें आज प्राण धारण करून राहिलों आहें. हे वानर माझ्यावर प्रेम करणारे असून सर्व बाजूंनीं माझें रक्षण करीत असतात. मला कोठें जावयाचें असल्यास सर्वहि माझ्या बरोबर येतात, आणि मी बसलों असतांनाहि ते नेहमीं उभे असतात. रामा, ही मीं संक्षेपानें आपली हकीकत तुला सांगितली आहे. कारण सविस्तर सांगून तुला तरी काय उपयोग होणार आहे ? तो ज्येष्ठ भ्राता वाली माझा शत्रु असून त्याचा पराक्रम विख्यात आहे. तस्मात्, त्याचा नाश झाल्यानंतरच माझ्या दुःखाचें परिमार्जन होणारें असून माझें सुख व जीवित हींहि त्याच्याच नाशावर अवलंबून आहेत. रामा, हा माझें दुःख नाहींसें होण्याचा उपाय मीं शोकग्रस्तानें तुला निवेदन केला आहे. कारण दुःखी अथवा सुखी असला, तरी मित्रच नेहमीं मित्राचा आधार आहे. "

हें भाषण श्रवण करून राम सुग्रीवाला म्हणाला, "तुमचें वैर कशामुळें पडलें, हें खरें खरें श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. हे वानरा, तुझ्या वैराचें कारण श्रवण करून व बलाबलांचा विचार करून नंतर मी तुझ्या सुखाची तजवीज करीन. तुझा अवमान झाल्याचें ऐकून हृदयाला कंपित करणारा माझा प्रबल क्रोध पर्जन्यकाळच्या जलवेगाप्रमाणें वृद्धिंगत होत आहे. तस्मात्, तूं हर्षयुक्त होऊन व माझ्यावर विश्वास टाकून तो वाली कोठें आहे, हें मला सांग. म्हणजे लगेच धनुष्याला प्रत्यंचा चढवून व बाण सोडून मीं तुझ्या शत्रूचा वध केलाच, असें तूं समज. "

ह्याप्रमाणें महात्म्या कुकुत्स्थकुलोत्पन्न रामानें सुग्रीवाला सांगितलें असतां चारी वानरांसहवर्तमान त्या सुग्रीवाला अनुपम हर्ष झाला. नंतर प्रसन्न मुखानें युक्त झालेला तो सुग्रीव रामाला खरें खरें वैराचें कारण सांगूं लागला.

# सर्ग नववा.

## सुग्रीवाचें वृत्त.

सुग्रीव म्हणाला—"हे कुकुत्स्थकुलोत्पन्ना रामचंद्रा, वाली म्हणून माझा ज्येष्ठ भ्राता आहे तो शत्रूचें निर्दलन करणारा असून पित्याला नेहमी संमत असे, व मीहि त्याचप्रमाणें पूर्वी त्याला मोठा मान देत असें. पुढें तो पिता निवर्तल्यावर हा ज्येष्ठ पुत्र आहे, असें समजून वानरांचा राजा म्हणून लोकांना अतिशय संमत असलेल्या त्या वालीला मंत्र्यांनीं राज्यावर बसविलें. वाडवडिलां-पासून चालत आलेलें प्रचंड राज्य तो चालवीत असतांना मी नेहमीं दासा-प्रमाणें त्याचेपाशीं नम्र होऊन उभा राहात असें. दुंदुभीचा मायावी म्हणून एक तेजस्वी ज्येष्ठ पुत्र होता. त्याच्याशीं त्या वालीचें पूर्वी स्त्रीकरितां मोठें वैर पडलें होतें. एके समयीं रात्रीं लोक निद्रिस्थ झाल्यावर तो किष्किंधेच्या वेशी-पाशीं आला, व फारच क्षुब्ध होऊन गर्जना करूं लागला. तेव्हां संग्रामामध्यें वालीला त्यानें आव्हान केलें. त्याची ती भयंकर गर्जना निद्रिस्थ असलेल्या असलेल्या त्या माझ्या भ्रात्यानें ऐकिल्यावर ती त्याला सहन झाली नाहीं. ह्यामुळें तो वेगावेगानें तेथून निघाला. त्या श्रेष्ठ असुराचा वध करण्याकरितां रागानें तो वाली बाहेर पडूं लागला असतां सर्व स्त्रिया व मी नम्रपणानें त्याचें निवारण करूं लागलों; परंतु माझ्यासहवर्तमान त्या सर्व स्त्रियांना झिडकारून देऊन तो महाबलाढ्य वाली चालता झाला. तेव्हां मीहि बंधुप्रेमामुळें वाली-बरोबर निघालों असतां तो मायावी असुर, माझा भ्राता व मी दूर उभे अस-ल्याचें अवलोकन करून भयभीत झाला, आणि अतिशयच पळत सुटला. तो त्रस्त होऊन धावूं लागला असतां आम्हीहि त्यापेक्षां त्वरेनें त्याच्या अंगावर धावून गेलों, व इतक्यांत उदय पावणाऱ्या चंद्रानें मार्गहि प्रकाशित केला. तेव्हां त्याच्या पाठोपाठ धावून जाऊन आम्ही उभे राहिलों असतां तो दैत्य वेगावेगानें तृणांनीं आच्छादित व प्रवेश करण्यास कठीण अशा एका मोठ्या भूविवरामध्यें प्रविष्ठ झाला. तें पाहून वाली अंतःकरणामध्यें क्षुब्ध होऊन क्रोधाचे अधीन झाला, आणि मला म्हणाला, "सुग्रीवा, ह्या ठिकाणीं बिळाच्या द्वाराशीं तूं आज सावधपणानें उभा रहा, म्हणजे मी इतक्यांत आंत प्रवेश करून संग्रामामध्यें त्या शत्रूचा वध करितों."

सुग्रीव सांगतो:—"रामा, हें भाषण श्रवण केल्यावर मला बरोबर नेण्याविषयीं मी त्या शत्रुतापन वालीची प्रार्थना केली. तथापि आपल्या पायांची मला शपथ घालून तो एकटाच बिळामध्यें प्रविष्ट झाला. तो बिळांत शिरून एक संपूर्ण संवत्सर लोटलें, तरी तो काल लोटेपर्यंत मी त्या बिळाच्या द्वाराशींच उभा राहिलों होतों. तेव्हां तो नाहींसा झाला, असें जाणून प्रेमामुळें मला भय उत्पन्न झालें; आणि भ्राता दृष्टीस पडत नसल्यामुळें माझ्या मनामध्यें त्याच्या मृत्यूविषयीं वाईट शंका येऊं लागली. ह्या गोष्टीलाहि बरेच दिवस लोटल्यावर त्या बिळांतून फेंसासहवर्तमान रक्त बाहेर आलें, व तें अवलोकन करितांक्षणीं तर मला अतिशय दुःख झालें. गर्जना करणाऱ्या असुरांचा शब्द माझ्या कानांवर आला. परंतु संग्रामाविषयीं तत्पर असलेला तो माझा पूज्य ज्येष्ठ भ्राता आक्रोश करीत असतांनाहि त्याचा शब्द माझ्या कानावर आला नाहीं. तेव्हां भ्रात्याचा वध झाला, असा त्या चिन्हांवरून मीं तर्क केला, व एका पर्वतप्राय शिलेनें त्या बिळाचें द्वार झांकून टाकिलें. नंतर शोकाकुल होऊन भ्रात्याचें उत्तरकार्य केलें, आणि किष्किंधा नगरीला परत आलों. तेव्हां खरी गोष्ट जरी मी लपवून ठेवीत होतों, तरी प्रयत्नांमुळें मंत्र्यांनीं ती समजून घेतलीच. नंतर ते एकत्र जुळून माझ्यापाशीं आले, आणि मला त्यांनीं राज्याभिषेक केला. असो. राघवा, मी त्याचें राज्य न्यायानें चालवूं लागलों असतां तो वानर असुररूप शत्रूचा वध करून परत आला, आणि मला राज्याभिषेक झाल्याचें अवलोकन करितांक्षणीं क्रोधानें डोळे लाल करून आणि माझ्या मंत्र्यांनाहि बांधून टाकून त्यांच्याशीं कठोर भाषण करूं लागला; परंतु मी त्याचा निग्रह करण्यास समर्थ असूनहि भ्रात्याबद्दल वाटत असलेल्या मोठेपणानें जखडून गेलेलें माझें मन त्या पाप्याचा निग्रह करण्यास प्रवृत्त झालें नाहीं. असो. शत्रूचा वध करून तो माझा भ्राता किष्किंधा नगरीमध्यें प्रविष्ट झाल्यावर त्या महात्म्याला मान देऊन मीं रीतीप्रमाणें त्याला अभिवंदन केलें. परंतु त्यानें मनामध्यें संतुष्ट होऊन मला आशीर्वाद दिले नाहींत. तेव्हां नम्र होऊन मी आपल्या मुकुटानें त्याच्या पायांना स्पर्शहि केला. तथापि क्रोधामुळें वालीनें मजवर कृपा केली नाहीं."

# सर्ग दहावा.

**सुग्रीवाचें वृत्त.** ( पुढें चालू )

सुग्रीव म्हणाला:–" हे रघुवंशजश्रेष्ठा, नंतर क्रोधानें व्याप्त होऊन व क्षुब्ध होऊन आलेल्या त्या भ्रात्याची स्वहितबुद्धीनें मी विनवणी करूं लागलों कीं, ' हे आनंदायक प्रभो, शत्रूचा वध करून तूं कुशल परत आलास, ही फारच आनंदाची गोष्ट आहे; आणि मज अनाथाचा तूंच एक नाथ आहेस. उदय पावलेल्या पूर्णचंद्राप्रमाणें आल्हादकारक व अनेक शलाकांनीं युक्त असें हें तुझें छत्र जें मीं मोर्चेलासहवर्तमान धारण केलें होतें, तें तूं परत घे. राजा, त्या बिळाच्या द्वाराशीं मी आर्त होऊन तुझी मार्गप्रतीक्षा करीत करीत एक संवत्सरपर्यंत उभा राहिलों; आणि बिळांतून बाहेर आलेलें रक्तहि जेव्हां मीं अवलोकन केलें, तेव्हां माझें हृदय शोकानें उद्विग्न होऊन चित्त व्याकुल झालें असतां, पर्वतशिखराच्या योगानें तें बिळद्वार झांकून टाकून मी त्या प्रदेशांतून निघालों, आणि पुनरपि किष्किंधा नगरीमध्यें दुःखानें प्रविष्ट झालों. तेव्हां मला अवलोकन करून, तूं निवृत्त झालास ह्या समजुतीवर नगरवासी जनांनीं व मंत्र्यांनीं निरुपाय होऊन मला अभिषेक केला; मला राज्याची इच्छा झाल्यामुळें त्यांनीं तो केलेला नाहीं, ह्यास्तव तूं मला क्षमा कर. सन्मानास पात्र असा राजा तूंच आहेस, व मी पूर्वींप्रमाणेंच सर्वदा तुझा दास आहें. अमात्य आणि नगरवासी जन ह्यांसहवर्तमान उपद्रवरहित असलेलें सर्व नगर तसेंच कायम रहावें, ह्याकरितां मंत्र्यांनीं तुझा वियोग झाल्यामुळें राज्याचे ठिकाणीं ही माझी योजना केली होती. तस्मात् ठेव ह्या नात्यानें असलेलें हें तुझें राज्य मी आज तुझ्या स्वाधीन करीत आहें. हे दयाशील शत्रुनाशका, मजवर क्रुद्ध होऊं नको. राजा मस्तक नम्र करून मी तुझी प्रार्थना करीत आहें, व तुझ्यापुढें हे मीं हात जोडिले आहेत. मंत्री आणि नगरवासी जन ह्यांनीं एकत्र जुळून, राजरहित झालेला प्रदेश जिंकण्याची इतरांना इच्छा होऊं नये, एतदर्थ बलात्कारानें माझी ह्या राज्यावर योजना केलेली आहे.'

सुग्रीव पुढें सांगतो:–"रामा, ह्याप्रमाणें मी सप्रेम भाषण करीत असतांनाहि त्या वानरानें माझी निर्भत्सना केली, आणि 'तुला धिक्कार असो' असें मला म्हणून आणखीहि पुष्कळच तो मला बोलला. इतकेंच नव्हे, परंतु आपली प्रजा व आपणाला संमत असलेले मंत्री बोलावून आणून मित्रमंडळींमध्यें फारच

निंद्य असें भाषण त्यानें माझ्याशीं केलें. तो म्हणाला, 'महामायावी दैत्य क्रुद्ध होऊन रात्रीं युद्धाच्या इच्छेनें मला पूर्वीं आह्वान करीत असे, हें तुम्हांला विदितच आहे.' त्याचें तें भाषण श्रवण करून मी राजवाड्यांतून बाहेर पडलों असतां हा अतिक्रूर भ्राताहि सत्वर माझ्या मागोमाग आला; परंतु भ्रात्याला बरोबर घेऊन मी आलों आहें, असें अवलोकन करितांक्षणीं तो महाबलाढ्य असुर रात्रींच भयभीत होऊन पळून गेला, आणि पाठोपाठ आम्ही आलेले पाहिल्या-वर वेगावेगानें धाव मारून तो एका मोठ्या बिळामध्यें शिरला. तेव्हां फारच प्रचंड व अतिभयंकर अशा बिळामध्यें तो प्रविष्ठ झाला असें समजून आल्या-वर दिसण्यांतहि क्रूर असलेल्या ह्या भ्रात्याला मी म्हणालों, 'शत्रूचा वध केल्यावांचून नगरीला परत जाणें, मला शक्यच नाहीं. ह्यास्तव मी त्याचा वध करीपर्यंत तूं ह्या बिळाच्या द्वाराशीं माझी प्रतीक्षा करीत रहा.' ह्यानंतर हा तेथें उभा आहे, असें समजून मी त्या दुर्गम बिळामध्यें प्रविष्ठ झालों असतां त्या दैत्याला हुडकितां हुडकितां माझें एक वर्ष तेथें गेलें. शेवटीं एक वर्षपर्यंत कंटाळा न आणितां शोध चालला असतांनाहि दृष्टोत्पत्तीस न आल्यामुळें भयावह झालेला तो शत्रु माझ्या दृष्टीस पडला. तेव्हां मी तत्क्षणीं-च त्याच्या सर्व बांधवांसहवर्तमान त्याचा वध केला. तेव्हां पाताळा-मध्यें तो राक्षस गर्जना करूं लागला असतांना त्याच्या शरिरापासून निघालेल्या रक्ताच्या प्रवाहानें तें दुर्गम बिळ भरून गेलें. असो. त्या पराक्रमी शत्रूचा अनायासें वध केल्यावर पाहतों तों मला बाहेर पडण्याचा मार्ग दिसेनासा झाला. कारण तें बिळाचें द्वार झांकून टाकिलेलें होतें. तदनंतर 'सुग्रीवा' म्हणून मी वारंवार आरोळ्या मारूं लागलों असतांहि जेव्हां प्रत्युत्तर येईना, तेव्हां तर मला अतिशयच दुःख झालें. पुष्कळ लाथा मारून मीं तें आच्छादन खालीं पाडिलें, आणि त्या मार्गानें बाहेर पडून मी आपल्या नगराला आलों. सारांश आपणाला राज्य मिळावें ह्या इच्छेनें ह्या दुष्ट सुग्रीवानें भ्रातृप्रेम विसरून जाऊन मला त्या बिळामध्यें अडकवून ठेविलें."

सुग्रीव सांगतोः—"रामा, असें त्या मित्रमंडळींमध्यें मला बोलून मनामध्यें कांहींएक न आणितां त्या वालीनें एका वस्त्रानिशीं मला हांकून लाविलें. सारांश, राघवा, त्यानें मला हांकून लाविलें असून माझ्या भार्येचा अपहार केला असल्यामुळें त्याच्या भीतीनें वनें व पर्वत ह्यांसहवर्तमान ह्या पृथ्वीचें मीं पर्यटण केलें; आणि भार्येचा अपहार झाल्यामुळें दुःखित असलेला मीं शेवटीं

कांहीं कारणामुळें वालीचा प्रवेश होण्यास अशक्य झालेल्या ह्या ऋष्यमूक नामक श्रेष्ठ पर्वतावर आलों. असो. वैर पडण्याचें हें मुख्य कारण मीं तुला सर्व निवेदन केलें आहे. सर्व लोकांचें भय दूर करणाऱ्या राघवा, मी निरपराधी असतांनाहि त्या वालीच्या भीतीमुळें मला कसें संकट प्राप्त झालें आहे, तें तूं अवलोकन कर, आणि त्याचा निग्रह करून तूं मजवर कृपा कर."

ह्याप्रमाणें सुग्रीवानें रामाला सांगितलें असतां तो तेजस्वी धर्मवेत्ता राम सुग्रीवाशीं हंसत हंसत धर्माला अनुसरून असलेलें भाषण करूं लागला. तो म्हणाला, "सूर्यासारखे तेजस्वी, तीक्ष्ण व क्रोधयुक्त असे हे माझे कधींहि व्यर्थ न जाणारे बाण त्या दुराचारी वालीवर जाऊन पडतील. तुझ्या भार्येचा अपहार करणारा तो पापी व दुर्वर्तनी वाली माझ्या दृष्टीस पडला नाहीं, तोंपर्यंतच जिवंत राहील. स्वतःच्या स्थितीवरून पाहातां तूं शोकसागरामध्यें मग्न झाला आहेस, असें माझें अनुमान होतें. तस्मात् मी तुला ह्या शोकसागरापासून तारीन, व भार्या व विपुल राज्य हींहि तुला प्राप्त होतील."

ह्याप्रमाणें हर्ष व पौरुष वृद्धिंगत करणारें तें ककुत्स्थकुलोत्पन्न रामाचें भाषण श्रवण करून सुग्रीवानें त्या भाषणाची वाखाणणी करून रामाची प्रशंसा केली, आणि तो रामाशीं फारच मोठें भाषण करूं लागला.

## सर्ग अकरावा.

### वालीच्या हातून दुंदुभीचा वध.

सुग्रीव म्हणाला:—"हे रघुवंशजश्रेष्ठा, तूं क्रुद्ध झाल्यास मर्मभेदक, तीक्ष्ण व प्रज्वलित अशा बाणांच्या योगानें प्रलयकालच्या सूर्याप्रमाणें निःसंशय त्रैलोक्य दग्ध करून टाकशील. तथापि वालीचें पौरुष, वीर्य आणि धैर्य हें सर्व एकाग्र अंतःकरण करून तूं ऐकून घे, आणि नंतर तुला काय कर्तव्य असेल तें कर. ब्राह्ममुहूर्तावर उठून सूर्योदय होण्याचे पूर्वींच वाली यत्किंचित्हि श्रम न होतां पश्चिम समुद्रापासून पूर्व समुद्रापर्यंत आणि दक्षिण समुद्रापासून उत्तर समुद्रापर्यंत प्रत्यही फेरी करीत असतो. पर्वतांच्या माथ्यावर आरोहण करून तो वीर्यवान वाली वेगानें उंच उड्डाण करीत असतो, आणि चेंडूप्रमाणें पर्वतांचीं मोठमोठीं शिखरें हातांत घेत असतो. आपलें सामर्थ्य

गाजविण्याकरितां त्या वालीनें वनामध्यें नानाप्रकारचे पुष्कळच बळकट वृक्ष जोरानें मोडून टाकिले आहेत. कैलास पर्वताच्या शिखरासारख्या प्रभेनें युक्त आणि महिषरूप धारण केलेला असा एक दुंदुभी म्हणून दैत्य होता, व त्या वीर्यवान दैत्याला सहस्र गजांचें बल होतें. वरप्रदानामुळें मोहित होऊन वीर्याच्या गर्वानें दुरात्मा बनलेला तो धिप्पाड राक्षस नदीपति समुद्राकडे गेला, आणि लाटांनीं युक्त असलेल्या त्या रत्नाकर सागराची मर्यादा न राखितां 'माझ्याशीं युद्ध कर' म्हणून तो त्या महासागराला म्हणाला. तेव्हां महा-बलाढ्य धर्मात्मा समुद्र उठला, आणि कालाची प्रेरणा झालेल्या त्या असुराला म्हणाला, "हे युद्धनिपुण, मी तुझ्याशीं युद्ध करण्यास समर्थ नाहीं. तुझ्याशीं युद्ध कोण करील, तें मी तुला सांगतों, श्रवण कर. महारण्यामध्यें तपस्वी जनांचें मुख्य आश्रयस्थान आणि शंकराचा श्वशुर असा एक हिमवान ह्या नांवानें विख्यात असलेला पर्वतराज आहे. मोठमोठ्या जलप्रवाहांनीं, अनेक गुहांनीं व झऱ्यांनीं युक्त असलेला तो पर्वतराज तुझ्याशीं युद्ध करण्यास समर्थ असून युद्धाच्या योगानें तुझा अनुपम मनोरथ परिपूर्ण करील."

ह्याप्रमाणें समुद्रानें सांगितलें असतां तो भ्याला आहे, असें समजून धनुष्यापासून सुटलेल्या बाणाप्रमाणें तो असुरश्रेष्ठ दुंदुभी वेगावेगानें हिमालय पर्वतसंबंधीं वनामध्यें गेला. नंतर त्या पर्वतावरील मोठमोठ्या गजांसारख्या श्वेतवर्ण शिला भूमीवर नानाप्रकारांनीं फेंकून देऊन तो दुंदुभी गर्जना करूं लागला. तेव्हां श्वेतवर्ण मेघासारख्या आकारानें युक्त, आनंददायक मुद्रा धारण केलेला व दिसण्यांतहि सौम्य असलेला हिमवान पर्वत स्वतःच्याच शिखरावर उभा राहून त्याला म्हणाला, 'हे धर्मवत्सल दुंदुभे, तूं मला क्लेश देऊं नको. तपस्विजनांना आश्रयभूत असलेला मी रणकर्मामध्यें प्रवीण नाहीं.'

हें त्या विचारी पर्वतराजाचें भाषण श्रवण केल्यावर क्रोधानें डोळे लाल झालेला दुंदुभी त्याला म्हणाला, 'तूं जर युद्ध करण्यास असमर्थ असशील, किंवा माझ्या भीतीमुळें निश्चेष्ट झाला असशील, तर मज युद्धेच्छूशीं युद्ध कर-णारा कोण, तो मला सांग.'

हें भाषण श्रवण केल्यावर त्या वेळेपर्यंत युद्ध करणारा असा ज्याला कोणीं सांगितलाच नव्हता, त्या असुरश्रेष्ठाला रागारागानें तो धर्मात्मा हिमवान म्हणाला, "हे महाबुद्धिमान दुंदुभे, वाली म्हणून एक प्रतापी व वैभवशाली इंद्रपुत्र वानर अतुलप्रभेनें युक्त असलेल्या किष्किंधा नगरीमध्यें वास्तव्य करीत

आहे. तो महाबुद्धिमान वाली युद्धामध्यें निपुण असून नमुचीशीं युद्ध कर-ण्यास समर्थ असलेल्या देवराज इंद्राप्रमाणें तुझ्याशीं द्वंद्वयुद्ध करण्यास समर्थ आहे. तस्मात्, ह्या भूतलावर जर तुला युद्ध करण्याची इच्छा असेल, तर तूं सत्वर तिकडे जा. तो नेहमींच क्रुद्ध असून संग्रामकर्मामध्यें शूर आहे."

हें हिमवान पर्वताचें भाषण श्रवण केल्यावर दुंदुभी क्रुद्ध झाला, आणि वालीच्या किष्किंधा नगरीमध्यें गेला. जातांना त्यानें महिषाचा वेष धारण केला असल्यामुळें तो तीक्ष्ण शृंगांनीं युक्त होऊन भयावह झाला होता, आणि पर्जन्यकालीं आकाशामध्यें असलेल्या जलपूर्ण महामेघाप्रमाणें दिसत होता. असो.

नंतर तो महाबलाढ्य दुंदुभी किष्किंधा नगरीच्या द्वारापाशीं आला, आणि भूमि कंपित करीत करीत दुंदुभीप्रमाणें गर्जना करूं लागला. इतकेंच नव्हे, परंतु समीप असलेले वृक्ष मोडूं लागला, खुरांनीं पृथ्वी विदीर्ण करूं लागला, आणि गर्वामुळें शृंगांच्या योगानें तें द्वार हत्तीप्रमाणें उखळून टाकूं लागला. तेव्हां तो शब्द ऐकिल्यावर अंतःपुरामध्यें असलेला वाली क्रुद्ध झाला, आणि तारांनीं युक्त असलेल्या चंद्राप्रमाणें स्त्रियांसहवर्तमान बाहेर पडला. नंतर वनामध्यें संचार करणाऱ्या सर्व वानरांचा अधिपति तो वाली, ज्यांतील अक्ष-रांचा व शब्दांचा उच्चार स्पष्ट आहे, असें मितभाषण दुंदुभीशीं करूं लागला. तो म्हणाला, 'दुंदुभे, हें नगराचें द्वार अडवून धरून तूं कशाकरितां गर्जना करीत आहेस? हे महाबलाढ्य दुंदुभे, तूं मला विदित आहेस. आपल्या प्राणांचें संरक्षण कर.'

हें त्या विचारी वानरराजाचें भाषण श्रवण करून, क्रोधानें नेत्र आरक्तवर्ण झालेला दुंदुभी त्याला म्हणाला, "हे वीरा, स्त्रियांचे सन्निध असें भाषण करणें तुला योग्य नाहीं. आज तूं माझ्याशीं युद्ध कर, म्हणजे तुझें काय सामर्थ्य आहे, तें आढळून येईल. अथवा ही रात्र संपेपर्यंत मी आपला क्रोध आवरून धरीन. हे वानरा, सूर्योदयापर्यंत तुला काय विषयांचा उपभोग घेणें असेल तो खुशाल घे, दान दे, मित्रांचाहि निरोप घे, आणि वानरांना भेट. कारण सर्व वानरांचा तूं राजा आहेस. किष्किंधा नगरी एकदा चांगली पाहून घे. त्या राजधानीमध्यें कोणी आपल्यासारखा राजा नेमून टाक, आणि स्त्रियांसहवर्तमान क्रीडा करून घे. सूर्योदय झाला म्हणजे मी तुझा दर्प नाहींसा करीन. कारण मत्त, बेसावध, भग्न, आयुधादिकांनीं शून्य, कृश अथवा तुझ्यासारख्या मदमोहित पुरुषाचा जो वध करितो, त्याला ह्या जगतामध्यें भ्रूणहत्येचें पातक लागतें."

ह्यानंतर त्या सर्व ताराप्रभृति स्त्रिया सोडून देऊन, व किंचित् हास्य करून वाली रागारागानें त्या असुराधिपतीला म्हणाला, "युद्धाविषयीं जर तुला भय नसेल, तर हा मत्त झाला आहे असें तूं समजूं नको. हा मद जरी स्त्रीसान्निध्यामुळें आलेला आहे, तरी तुझ्याशीं होणाऱ्या ह्या युद्धामध्यें मन उत्साहयुक्त होण्याकरितां केलेल्या वीरपानाचा हा परिणाम आहे, असें तूं समज."

ह्याप्रमाणें त्या असुराला बोलून, अत्यंत क्रुद्ध झालेला तो वाली पित्या इंद्रानें दिलेली सुवर्णमाला गळ्यांत घालून युद्धाकरितां उभा राहिला; आणि महिषरूप धारण करणाऱ्या त्या पर्वतप्राय दुंदुभीचीं शिंगें धरून, गर्जना करीत करीत त्या वानरराजानें त्याला फेंकून दिलें. सारांश, वालीनें उच्च स्वरानें गर्जना करून त्याला खालीं पाडिलें. तेव्हां पडतां पडतां त्याच्या कानांतून रक्तस्राव होऊं लागला. तात्पर्य, परस्परांना जिंकिण्याची इच्छा करणाऱ्या त्या उभयतांमध्यें क्रोधाच्या आवेशामुळें घोर युद्ध झालें. इंद्रतुल्य पराक्रमी वालीनें त्या दुंदुभीला मुष्टी, गुडघे, लत्ता, पाषाण व वृक्ष ह्यांनीं प्रहार केला. ह्याप्रमाणें ते दैत्य-वानर एकमेकांना प्रहार करूं लागले असतां दैत्याचा पक्ष कमी पडून इंद्रपुत्र वालीची सरशी झाली. शेवटीं वालीनें त्या दुंदुभीला उचलून भूमीवर पाडिलें, आणि ह्याप्रमाणें त्या प्राणनाशक युद्धामध्यें दुंदुभीचा नाश झाला. दुंदुभी पडतां पडतां त्याच्या नासिकाप्रभृति द्वारांतून अतिशयच रक्त वाहूं लागलें, व तो महापराक्रमी दुंदुभी पृथ्वीवर पडून मृत्यु पावला ! तेव्हां गतप्राण होऊन निचेष्ट पडलेल्या त्या दुंदुभीला अजमावून पहाण्याकरितां तोलून धरून वेगवान वालीनें एका हिसक्याबरोबर एक योजनपर्यंत दूर फेंकून दिलें. तेव्हां त्याच्या मुखापासून निघालेले रक्तबिंदु वाऱ्यानें उडून मातंग मुनींच्या आश्रमांत जाऊन पडले. तेव्हां त्या असुराचे ते रक्तबिंदु तेथें पडलेले पाहून मातंग क्रुद्ध झाले, आणि 'हा कोण' म्हणून विचारूं लागले. 'ज्या दुरात्म्यानें एकाएकीं रक्ताचा स्पर्श केला, असा अविचारी, उल्लू, मूर्ख व दुरात्मा कोण आहे?' असा विचार करून ते श्रेष्ठ मुनि बाहेर पडले असतां, एक पर्वतप्राय महिष गतप्राण होऊन पृथ्वीवर पडलेला त्यांनीं पाहिला. हें काम वानराचें आहे, असें तपःसामर्थ्यानें जाणून, त्या महिषाला फेंकून देणाऱ्या वानराला उद्देशून त्या मुनींनीं मोठा शापहि दिला. ते म्हणाले, "ज्यानें हें कृत्य केलें त्यानें ह्या ठिकाणीं प्रवेश करितां उपयोगी नाहीं. माझ्या आश्रमाला असलेलें हें वन रुधिर-स्रावाच्या योगानें ज्यानें दूषित केलें, तो येथें प्रविष्ठ झाल्यास त्याचा वध होईल.

असुराचा देह फेंकून देतांना ज्यानें हे वृक्ष मोडून टाकिले, तो ह्या माझ्या आश्रमाच्या आसपास एक संपूर्ण योजनपर्यंत जर येईल, तर तो दुर्बुद्धि निःसंशय जिवंत राहणार नाहीं. त्याचप्रमाणें जे कोणी त्याचे मंत्री माझ्या वनाचा आश्रय करून राहिले असतील, त्यांनींहि येथें वास्तव्य न करितां हें माझें भाषण ऐकून इच्छेस येईल तिकडे सुखानें चालतें व्हावें. ते जर येथें राहतील, तर मी त्यांनाहि निःसंशय शाप देईन. पुत्राप्रमाणें नेहमीं सर्वस्वी संभाळिलेल्या माझ्या वनामध्यें वानरांचें आगमन पानें, अंकुर, फळें व मुळें ह्यांच्या नाशाकरितांच होत असतें. ह्यास्तव माझ्या शापाला हा आजचाच दिवस काय तो अवधि आहे; परंतु वालीशीं संबंध असलेला असा जो वानर उदयीक येथें माझ्या दृष्टीस पडेल, तो पुष्कळ वर्षेंपर्यंत पर्वत होऊन पडेल."

ह्याप्रमाणें मुनींनीं उच्चारिलेली ती शापवाणी श्रवण केल्यावर तेथें असलेले ते वानर त्या वनांतून चालते झाले असतां, त्यांना अवलोकन करून वाली म्हणाला, "मातंग मुनींच्या वनामध्यें वास्तव्य करणारे तुम्ही सर्वजण माझ्यासमीप कशाकरितां आलां आहां? तुम्हां वनचरांचें कुशल आहेना?"

### श्रीरामाच्या सामर्थ्याविषयीं सुग्रीवाला शंका.

असें वालीनें विचारिलें असतां सुवर्णमाला धारण केलेल्या त्या वालीला मतंग मुनींनीं दिलेला शाप व त्याचें सर्व कारण त्या संपूर्ण वानरांनीं कथन केलें. तें श्रवण करून वाली त्या महर्षींकडे गेला, आणि हात जोडून प्रार्थना करूं लागला; तथापि त्याची पर्वा न करितां मतंगमुनि आश्रमामध्यें गेले, व शापविषयक दोष समजून आल्यामुळें भयभीत झालेला वाली अंतःकरणामध्यें अगदीं विव्हल होऊन गेला. तेव्हांपासून शापाच्या भयाला भीत असलेला तो वाली ऋष्यमूकसंज्ञक महापर्वतावर प्रवेश करीत नाहीं, अथवा तो पर्वत पाहण्याचेंहि मनामध्यें आणीत नाहीं. तस्मात् रामा, ह्या महावनामध्यें त्याचा प्रवेश होणें नाहीं असें समजून कसलीहि भीति न बाळगितां मी अमात्यांसहवर्तमान येथें संचार करीत असतों. वीर्याचा गर्व झाल्यामुळें फेंकला गेलेल्या त्या दुंदुभीचा हा अस्थींचा पर्वतप्राय मोठा ढीग पडला आहे. हे जे मोठमोठ्या शाखांनीं युक्त असलेले प्रचंड सात सालवृक्ष आहेत, ते वाली शेजारून गेला असतां सर्वहि एकदम त्याच्या वेगानें कंपित होऊन पर्णरहित होणारे आहेत. सारांश रामा, हें त्याचें अतुल वीर्य मीं तुला उघड करून

सांगितलें आहे. तस्मात् रामा, समरांगणामध्यें त्या वालीचा वध करण्यास तूं कसा बरें समर्थ होशील?"

ह्याप्रमाणें सुग्रीव बोलत असतांना "काय केलें म्हणजे वालीचा वध रामाचे हातून होण्याविषयीं तुला विश्वास येईल?" म्हणून लक्ष्मणानें हंसत हंसत त्याला विचारिलें. तेव्हां सुग्रीव म्हणाला, "पूर्वीं एका वेळीं ह्या सातहि सालवृक्षांची वाली नेहमीं अशी दुर्दशा करीत असे. ह्यास्तव ह्या वृक्षांपैकीं एक वृक्ष जरी एका बाणानें रामानें विदीर्ण करून टाकिला, तरी सुद्धां ह्या रामाचा पराक्रम अवलोकन करून मी वालीचा वध झाला, असेंच समजेन. त्याचप्रमाणें लक्ष्मणा, वध पावलेल्या ह्या महिषरूप दुंदुभीच्या अस्थींचा ढीग एका पायानें उचलून आपल्या सामर्थ्यानें जर दोनशें धनुष्येंपर्यंत रामानें फेंकून दिला, तरीहि मी वालीचा वध झाला, असें समजेन."

ह्याप्रमाणें लक्ष्मणाला बोलून आरक्तवर्ण नेत्रप्रांतांनीं युक्त असलेला तो सुग्रीव कुकुत्स्थकुलोत्पन्न रामाविषयीं क्षणभर विचार करून पुनरपि म्हणाला, "वालीचें सामर्थ्य व पौरुष प्रख्यात असून स्वतःला शूर समजणारा तो शूर व महाबलाढ्य वानर युद्धामध्यें अजिंक्य आहे; आणि देवांच्याहि हातून होण्यास दुर्घट अशीं ह्याचीं कृत्यें माझ्या दृष्टोत्पत्तीस येत आहेत. तीं मनांत आणून मी भयभीत झालों असल्यामुळें ऋष्यमूक पर्वताचा आश्रय करून राहिलों आहें. सारांश, त्या क्रुद्ध वानरराजाचा पराजय होणें अथवा त्याच्यावर हल्ला होणेंहि अशक्य आहे, असें समजून आणि ऋष्यमूक पर्वतावर त्याचा प्रवेश होणें नाहीं, हें लक्ष्यांत आणून मी नेहमीं उद्विग्न व साशंक राहून ह्या महावनामध्यें माझे ठिकाणीं प्रेम करणाऱ्या ह्या हनुमत्प्रभृति श्रेष्ठ श्रेष्ठ अमात्यांसहवर्तमान संचार करीत असतों. हे मित्रवत्सला, आतां मला प्रशंसेस पात्र असा सन्मित्र प्राप्त झाला आहे, आणि हिमालय पर्वताप्रमाणें निश्चल असलेल्या तुझा आश्रय करून मी राहिलों आहें. तथापि त्या बलाढ्य दुष्ट भ्रात्याचें बल मला विदित असून, समरांगणामध्यें तुझें वीर्य माझ्या अवलोकनांत आलेलें नाहीं. ह्यामुळें तुझी त्याच्याशीं तुलना करण्याचा, तुझा अवमान करण्याचा अथवा तुझे ठिकाणीं भीति उत्पन्न करण्याचा जरी माझा उद्देश नाहीं, तरी त्या वालीच्या भयंकर कर्मामुळें मला भीति उत्पन्न झालेली आहे. राघवा, तुझी प्रमाणभूत वाणी, धैर्य व मुद्रा हीं भस्मानें आच्छादित झालेल्या अग्नीप्रमाणें तुझे ठिकाणीं उत्कृष्ट तेज असल्याचें खरोखर सुचवीत आहेत."

हें महात्मा सुग्रीवाचें भाषण श्रवण केल्यावर राम हास्यपूर्वक त्या सुग्रीवाला म्हणाला, "पराक्रमासंबंधानें जर आमच्याविषयीं तुला विश्वास नसेल, तर समरांगणामध्यें प्रशंसेस पात्र होणारी अशी प्रतीति मी तुला आणून देतों."

ह्याप्रमाणें सुग्रीवाला सांगून, त्याचें सांत्वन करण्याकरितां रघुवंशज रामानें पायाच्या अंगठ्यानें तें दुंदुभीचें शरीर सहज तोलून धरिलें; आणि नंतर अजमाऊन पाहून, त्या वीर्यवान पराक्रमी रामानें दैत्याचें तें शुष्क शरीर पायाच्या अंगठ्यानें दहा योजनें लांब फेंकून दिलें. तें पाहून सूर्याप्रमाणें परम तेजस्वी असलेल्या वीर रामाला, वानर व लक्ष्मण यांसमक्ष अर्थपरिपूर्ण वाणीचें अवलंबन करून सुग्रीव म्हणाला, "रामा, आर्द्र, मांसपरिपूर्ण व ताजा असा देह पूर्वी श्रांत व मत्त झालेल्या माझ्या भ्रात्या वालीनें फेंकून दिला होता; परंतु सांप्रत मांसरहित झालेला हा देह तृणासारखा हलका झालेला आहे, आणि म्हणून ह्याप्रमाणें तो आनंदानें तुला फेंकून देतां आला आहे. तस्मात्, ह्यावरून ताडून पाहूं लागलें असतां तुझें बल जास्त अथवा वालीचें जास्त हें समजणें शक्य नाहीं. कारण राघवा, आर्द्र आणि शुष्क हें अंतर फारच मोठें आहे. बा रामा, तुझें व त्याचें बल किती आहे, ह्याविषयीं संशय पूर्वीप्रमाणें अद्यापहि मला आहेच. ह्यास्तव, सात सालवृक्षांपैकीं एकाचा भेद झाल्यानें बलाबलांविषयीं फोड होणार आहे. तस्मात्, दुसरी गजशुंडाच कीं काय असें धनुष्य सज्ज करून व कानापर्यंत ताणून तूं मोठा बाण सोड. तूं सोडिलेला बाण ह्या सालवृक्षाला विदीर्ण करून टाकील, ह्याविषयीं मला संशय नाहीं. ह्यास्तव, विचार न करितां माझा मनोरथ निःसंशय परिपूर्ण कर. तुला माझी शपथ आहे. अरे, तेजस्व्यांमध्यें जसा रवि सदैव श्रेष्ठ आहे, महापर्वतांमध्यें जसा हिमालय श्रेष्ठ आहे, तसाच पराक्रमासंबंधानें पाहूं गेलें असतां पुरुषांमध्यें तूं श्रेष्ठ आहेस."

## सर्ग बारावा.

### सुग्रीवाला रामसामर्थ्यप्रतीति.

उत्कृष्ठ रीतीनें उच्चारिलेलें सुग्रीवाचें हें भाषण श्रवण केल्यावर, त्याला विश्वास येण्याकरितां महातेजस्वी रामानें धनुष्य घेतलें, आणि त्या मानी रामानें एक बाण हातीं घेतल्यावर, प्रत्यंचेच्या टणत्कारानें दशदिशा नादित करीत

करीत सालवृक्षाला उद्देशून तो बाण सोडिला. बलाढ्य रामानें सोडिलेला तो सुवर्णभूषित बाण सात साल व त्या सालांना आधारभूत असलेलें पर्वतशिखर भेदून रसातलामध्यें प्रविष्ट झाला. इतकेंच नव्हे, परंतु तो महावेगवान बाण एका क्षणामध्यें सात साल भेदून रसातलामध्यें गेल्यावर पुनरपि उड्डाण करून त्याच भात्यामध्यें प्रविष्ट झाला. तेव्हां ते सात सालवृक्ष रामाच्या बाणवेगानें विदीर्ण झालेले अवलोकन करितांक्षणीं वानरराज सुग्रीवाला पराकाष्ठेचा विस्मय झाला, व भूषणें धारण केलेल्या त्या सुग्रीवानें अत्यंत आनंदित होऊन रामाला शिरसाष्टांग नमस्कार घातला. नंतर हात जोडून व त्या कृत्यानें हर्षयुक्त होऊन सर्व अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ व शूर अशा तेथें स्थित असलेल्या धर्मवेत्त्या रामाला तो म्हणाला, “ हे पुरुषश्रेष्ठा, इंद्रासहवर्तमान सर्व देवांचाहि बाणांच्या योगानें समरांगणामध्यें वध करण्यास तूं समर्थ आहेस. मग हे प्रभो, वालीची ती कथा काय ? हे ककुत्थकुलोत्पन्ना रामा, ज्यानें प्रचंड सात सालवृक्ष, पर्वत आणि भूमि हीं एका बाणानें विदीर्ण करून टाकिलीं, त्या तुझ्याशीं समरांगणामध्यें कोण बरें सामना करणार आहे ! इंद्रवरुणतुल्य असलेला तूं मित्र प्राप्त झाल्यामुळें माझ्या दुःखाचा आज परिहार झाला असून, मला पराकाष्ठेचें सुख झालें आहे. तस्मात्, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, माझें प्रिय करण्याकरितां माझ्या भ्रातृरूप वालीसंज्ञक वैऱ्याचा आपण आजच वध करा. मीं हे आपणांपुढें हात जोडिले आहेत.”

### सुग्रीवाचें वालीशीं युद्ध आणि त्याचा पराजय.

तदनंतर लक्ष्मणाप्रमाणें प्रिय म्हणून स्वीकारिलेल्या आणि म्हणूनच दर्शनाच्या योगानें आनंद देणाऱ्या सुग्रीवाला कडकडून भेटून महाबुद्धिमान राम म्हणाला, “सुग्रीवा, आपण ऋष्यमूक पर्वतापासून किष्किंधा नगरीला जाऊं. तूं सत्वर पुढें जा. पुढें गेल्यावर भ्राता ह्या संज्ञेला व्यर्थ पात्र झालेल्या वालीला आव्हान कर.”

असें रामानें सांगितल्यानंतर ते सर्वहि वालीच्या किष्किंधा नगरीमध्यें सत्वर गेले, आणि वृक्षांच्या आड आपले देह छपवून ते गहन वनामध्यें उभे राहिले. तेव्हां वालीला आव्हान करण्याकरितां वस्त्रानें कंबर घट्ट खेंचून आरोळ्यांनीं गगनमंडल विदीर्ण करीतच कीं काय, सुग्रीवानेंहि भयंकर गर्जना केली. भ्रात्याची ती गर्जना श्रवण करून महाबलाढ्य वाली क्रुद्ध झाला, आणि मनामध्यें अतिशय क्षुब्ध होऊन अस्ताचलापासून स्वल्प कालामध्यें उदयाचलाला येणाऱ्या सूर्या-

प्रमाणें तो वेगानें तेथें येऊन पोहोंचला. तदनंतर आकाशामध्यें बुध व मंगळ या ग्रहांच्या घोर युद्धाप्रमाणेंच कीं काय, वाली व सुग्रीव ह्यांमध्यें तुमुल युद्ध झालें. त्या युद्धांत वज्रप्राय हस्ततल आणि मुष्टी ह्यांच्यायोगानें त्या क्रोधानें व्याप्त झालेल्या भ्रात्यांनीं एकमेकांना प्रहार केले. नंतर राम धनुष्य हातांत घेऊन त्या उभयतांकडे पाहूं लागला असतां देव अश्विनीकुमारांप्रमाणें असलेले ते उभयतां वीर एकसारखे दिसूं लागले. ह्यामुळें वाली कोणता व सुग्रीव कोणता ह्याचा उमजच रामाला पडला नाहीं; आणि म्हणूनच त्यानें वालीचा अंत करणारा बाण सोडण्याचें मनामध्यें आणिलें नाहीं. इतक्यांत त्या वालीनें सुग्रीवाला पराजित केलें. तेव्हां नाथ राघव दृष्टीस न पडल्यामुळें तो सुग्रीव ऋष्यमूक पर्वताकडे धांवूं लागला, आणि रागारागानें वाली पाठोपाठ धांवत असतांहि तो महावनामध्यें प्रविष्ट झाला. त्या वेळीं सुग्रीव फारच श्रमला होता. त्याच्या शरिरावर रक्ताचा सडा झालेला होता, आणि प्रहाराच्या योगानें तो अगदीं जर्जर झालेला होता.

### सुग्रीवाचें दीन भाषण.

असो. तो वनामध्यें प्रविष्ट झाल्याचें अवलोकन करून शापभीतीमुळें वाली त्या सुग्रीवाला 'तूं सुटलास' असें म्हणाला, आणि महाबलाढ्य वाली तेथून परत फिरला. इतक्यांत भ्राता लक्ष्मण व हनुमान ह्यांच्या बरोबर, जेथें सुग्रीव वानर होता, त्या वनामध्यें रामहि आला. तेव्हां लक्ष्मणासहवर्तमान आलेल्या त्या रामाला अवलोकन करून लज्जित झालेला सुग्रीव मान खालीं घालून भूमीकडे पहात पहात दीन वाणीनें म्हणाला, "वालीला आव्हान कर, असें मला सांगून प्रत्यय येण्याकरितां मला पराक्रम दर्शवून आणि माझ्याकडून त्या वैऱ्याची कुचाळी काढून सांप्रत हें तूं काय केलेंस? राघवा, वालीला मी मारणार नाहीं, असें त्याच वेळीं तूं मला खरें खरें सांगावयाचें होतेंस, म्हणजे मी येथून गेलों नसतों."

### बाणप्रक्षेप न करण्याचें कारण.

ह्याप्रमाणें तो महात्मा सुग्रीव अंतःकरणाला करुणा येण्यासारख्या दीन वाणीनें बोलूं लागला असतां राम पुनरपि त्याला म्हणाला, "बा सुग्रीवा, क्रोध सोडून दे, आणि मीं हा बाण न सोडण्याचें कारण काय, तें ऐक. सुग्रीवा, अलंकार, वेष, शरिराची ठेवण आणि चालण्याची ढब ह्यांसंबंधानें तूं व वाली हे उभयतां अगदीं एकमेकांसारखे आहां. इतकेंच नव्हे, परंतु स्वर, कांति,

पहाणें, चालणें आणि भाषण ह्यांसंबंधानें तुम्हां उभयतांमध्यें मला भेद मुळींच दृष्टीस पडत नाहीं. तस्मात्, उभयतांचें रूप अगदीं सारखें असल्यामुळें तूं कोणता आणि वाली कोणता ह्याविषयीं मला मोह पडून मीं प्राणनाशक व शत्रुघातक असा महावेगवान घोर बाण सोडिला नाहीं. तात्पर्य उभयतांचें सादृश्य असल्यामुळें वाली कोणता व तूं कोणता ह्याविषयीं मला शंका आली, आणि बाण सोडिला असतां कदाचित् तो तुला लागून आपणां उभयतांचा समूळ घात होण्याचा प्रसंग येईल, ह्याकरितां मीं बाणप्रक्षेप केला नाहीं. हे वीरा, अज्ञानामुळें आणि घाईमुळें जर माझ्या हातून तुझा नाश झाला असता, तर माझ्या मूढपणाची व बालिशपणाची मात्र सर्व जगतांत ख्याति होऊन राहिली असती. इतकेंच नव्हे, परंतु ज्याला अभय दिलें, त्याचा वध हातून घडला असता, म्हणजे दत्ताभयवधसंज्ञक मोठें अद्भुत पातक मला लागलें असतें. मी, लक्ष्मण व सुंदरी सीता असे आम्ही सर्व तुझ्या अधीन आहों, आणि ह्या वनामध्यें तूंच आमचा आश्रय आहेस. तस्मात् वानरश्रेष्ठा, तूं पुनरपि युद्ध कर, आणि मजविषयीं कसलीहि शंका घेऊं नको. आतांच्या आतांच युद्धामध्यें माझ्या हातून एका बाणानें वालीचा नाश होऊन तो भूतलावर तडफड करीत असलेला तूं अवलोकन करशील परंतु हे वानरराज, तूं स्वतः-विषयीं कांहीं तरी ओळखितां येण्यासारखी खूण करून ठेव, म्हणजे द्वंद्वयुद्धा-मध्यें गुंतलेल्या तुला मी ओळखून काढीन. लक्ष्मणा, शुभ लक्षणांनीं युक्त अशी ही प्रफुल्लित झालेली नागपुष्पी लता उपटून तूं ह्या महात्म्या सुग्रीवाच्या कंठामध्यें घाल."

असें रामानें सांगितलें असतां पर्वताचे तटावर उगवलेली ती प्रफुल्लित नाग-पुष्पी लता उपटून लक्ष्मणानें त्याच्या गळ्यांत घातली. तेव्हां तो श्रीमान सुग्रीव संध्यारागासहवर्तमान असलेला मेघ बगळ्यांच्या मालिकेनें ज्याप्रमाणें शोभतो, त्याप्रमाणें कंठगत लतेनें शोभूं लागला. नंतर रामाच्या सांगण्यावरून अंतः-करणामध्यें स्वस्थ झालेला व शरिरानें झळकत असलेला तो सुग्रीव रामासह पुनरपि किष्किंधा नगरीमध्यें गेला.

# सर्ग तेरावा.

## किष्किंधेकडे पुनः गमन.

तो धर्मात्मा राम ऋष्यमूक पर्वतावरून सुग्रीवासहवर्तमान वालीच्या पराक्रमानें सुरक्षित असलेल्या किष्किंधा नगरीमध्यें गेला. जातांना आपलें सुवर्णभूषित प्रचंड धनुष्य उचलून धरून समरांगणामध्यें विजय देणारे व प्रभेनें सूर्यासारखे असलेले बाण त्यानें बरोबर घेतले. त्या महात्म्या रामाच्या व लक्ष्मणाच्याहि पुढें दृढ कंठानें युक्त असलेला महाबलाढ्य सुग्रीव चालूं लागला. वानरसेनाधिपतींच्या समुदायाचें रक्षण करणारा, महातेजस्वी व सामर्थ्यवान असा हनुमान, आणि नल, नील व तार हे वीर मागून चालले. जातां जातां पुष्पभारानें नम्र झालेले वृक्ष व निर्मल जल वाहणाऱ्या समुद्रगामी नद्या त्यांच्या अवलोकनांत आल्या. त्याचप्रमाणें ज्यांची मुद्रा उत्कृष्ठ आहे, असे ते हनुमत्प्रभृति वीर जाऊं लागले असतां मंदिरांच्या आकाराचीं पर्वतविवरें, गुहा, उत्कृष्ठ शिखरें आणि दऱ्या त्यांनीं अवलोकन केल्या; आणि वैडूर्य मण्यांसारख्या निर्मल उदकानें आणि किंचित् उमललेल्या कमलपुष्पांनीं सुशोभित झालेले सजल तडाग अवलोकन करीत करीत ते चालले. कारंडव, सारस, हंस, वंजुल, पाणकोंबडे, चक्रवाक आणि इतरहि पक्षी ज्यांचा शब्द ऐकून प्रतिशब्द करीत आहेत, व मृदु अशा तृणांकुरांवर ज्यांची उपजीविका आहे, अशीं निर्भय हरिणें संचार करणाऱ्या वनचरांच्या स्थानांचे ठिकाणीं चोहोंकडे जातां जातां त्यांच्या दृष्टीस पडत होतीं. असो. शुभ्र दंतांनीं भूषित, एकाएकी संचार करणारे, नद्यांचीं तीरें पाडणारे आणि म्हणूनच तटाकांचे शत्रू असलेले, भयंकर, मदमत्त आणि पर्वतावर गर्जना करणारे असून आकृतीनें फारच धिप्पाड असल्यामुळें संचार करणाऱ्या पर्वतांप्रमाणेंच भासणारे वन्य गज, पृथ्वीवरील धुळीनें व्याप्त झालेले गजतुल्य वानर, इतरहि वनचर प्राणी आणि आकाशांत संचार करणारे पक्षी वनामध्यें अवलोकन करीत करीत ते सुग्रीवाच्या आज्ञेंत वागणारे वीर सत्वर चालते झाले. ते जाऊं लागले असतां वृक्षसमूहानें युक्त असलेलें एक वन अवलोकन करून राम सुग्रीवाला म्हणाला, " आकाशांतील मेघांप्रमाणें हा वृक्षसमूह झळकत आहे. मेघसमूहाप्रमाणें विपुल आणि सभोंवतीं कदलीवृक्षांनीं व्याप्त असलेले हें काय आहे, तें जाणण्याची माझी इच्छा आहे. मित्रा, हें समजण्याविषयीं मला

फार उत्कंठा लागलेली आहे, आणि ही उत्कंठा तुझ्याकडून तृप्त करवावी अशी माझी इच्छा आहे."

### सप्तजनाश्रमदर्शन.

हें महात्म्या रामचंद्राचें भाषण श्रवण केल्यावर सुग्रीव जातां जातांच त्या प्रचंड वनाविषयीं रामाला सांगूं लागला. तो म्हणाला, "राघवा, बागा व उपवनें ह्यांनीं समृद्ध आणि मधुर मुळें, फळें व उदक ह्यांनीं युक्त असा हा श्रमनाशक विस्तीर्ण आश्रम आहे. ह्या आश्रमामध्यें प्रशंसेस पात्र असें व्रतानुष्ठान करणारे सप्तजन नामक सात मुनी मस्तक खालीं ठेवून, पाय वर करून आणि नेहमीं जलामध्यें राहून तपश्चर्या करीत होते. सात दिवस लोटल्यानंतर आहाराकरितां केवळ वायूचेंच एकवार सेवन करणारे ते पर्वतनिवासी सप्तजन मुनी सातशें वर्षांनीं देहासहवर्तमान स्वर्गाला गेले. त्यांच्या प्रभावामुळें, वृक्षरूप प्राकारानें परिवेष्ठित असलेल्या ह्या आश्रमावर इंद्राचें साहाय्य असलेल्या देवदैत्यांचाहि हल्ला होणें अत्यंत दुर्घट झालें आहे. पक्ष्यांनीं आणि त्याचप्रमाणें इतर वनचर प्राण्यांनीं हा आश्रम वर्ज्य केला असून मोहामुळें जे ह्यांत प्रवेश करितात, ते पुनरपि परत येत नाहींत. मधुर शब्दांनीं युक्त असे अप्सरांच्या भूषणांचे ध्वनी येथें कानांवर येत असून वाद्यें व गायन ह्यांचे ध्वनीहि कर्णपथावर येत असतात. त्याचप्रमाणें दिव्य सुगंधहि येथें येत असतो. इतकेंच नव्हे, परंतु अग्निहोत्रसंबंधीं अग्निहि येथें प्रज्वलित असतात. कपोत पक्ष्याच्या शरिराप्रमाणें धूसर वर्ण असून मेघाप्रमाणें भासणारा हा धूम वृक्षांचीं अग्रें व्याप्त करीत असल्यासारखा दिसत आहे. मस्तकांचे ठिकाणीं धूमाचा संपर्क झालेले हे वृक्ष मेघसमूहांनीं आच्छादित झालेल्या वैदूर्यरत्नमय पर्वतासारखे दिसत आहेत. हे धर्मात्मन्, भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान हात जोडून तूं नम्र हो, आणि त्या मुनींना उद्देशून प्रणाम कर. कारण रामा, त्या जितेंद्रिय मुनींना उद्देशून जे प्रणाम करितात, त्यांच्या शरिराचे ठिकाणीं कांहींहि अशुभ राहात नाहीं."

ह्याप्रमाणें सुग्रीवानें सांगितल्यानंतर भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान रामानें हात जोडिले, आणि त्या महात्म्या ऋषींना उद्देशून अभिवंदन केलें. नंतर राम, लक्ष्मण, सुग्रीव आणि इतर वानर ह्या सर्वांच्या मनाला आनंद झाला, व ते पुढें चालते झाले. असो.

त्या सप्तजन मुनींच्या आश्रमापासून बराच दूर मार्ग चालून गेल्यावर पराजय होण्यास अशक्य अशी ती वालीनें रक्षण केलेली किष्किंधा नगरी त्यांनीं अवलोकन केली. तदनंतर उत्कृष्ठ व उग्र तेजानें युक्त झालेला राम, लक्ष्मण व वानर शस्त्रें घेऊन इंद्रपुत्र वालीच्या सामर्थ्यानें सुरक्षित असलेल्या नगरीमध्यें शत्रूचा वध करण्याकरितां पुनरपि प्रविष्ठ झाले.

## सर्ग चौदावा.

### वालीला युद्धार्थ आव्हान.

किष्किंधा नगरीला गेल्यावर ते सर्व वृक्षांच्या आड लपून गहन वनामध्यें उभे राहिले असतां मोठ्या कंठानें युक्त असलेला वनप्रिय सुग्रीव वनामध्यें चोहोंकडे दृष्टि फेंकिल्यावर अत्यंत क्रुद्ध झाला. ज्याच्या अग्रभागीं वायूचा वेग आहे, अशा महामेघाप्रमाणें परिवारांनीं परिवेष्ठित असलेला तो सुग्रीव गर्जना करूं लागला, आणि ध्वनीच्या योगानें आकाशमंडलाचा भेदच करीत आहे कीं काय अशीं भयंकर गर्जना करून त्यानें वालीला युद्धार्थ आव्हान केलें. नंतर वर्णानें व प्रतापानें बालसूर्याची बरोबरी करणारा आणि मत्त सिंहाप्रमाणें चालणारा सुग्रीव सत्कर्मतत्पर रामाकडे पाहून म्हणाला, "वानररूप जाळ्यानें व्याप्त, सुवर्णभूषणांनीं युक्त आणि ध्वजयंत्रांनीं समृद्ध अशा वालीच्या नगरीला आपण आलों आहों. तेव्हां हे वीरा, प्राप्त झालेला ऋतु ज्याप्रमाणें लता फलयुक्त करितो, त्याप्रमाणें वालीच्या वधाविषयीं पूर्वीं जी तूं प्रतिज्ञा केली होतीस, ती सत्वर सफल कर."

ह्याप्रमाणें सुग्रीवानें धर्मात्म्या रामाला सांगितलें असतां तो शत्रुनाशक राम त्या सुग्रीवालाच म्हणाला, "ह्या नागपुष्पी लतेच्या योगानें तूं मला ओळखूं येण्याचें चिन्ह धारण केलेलें आहेस. लक्ष्मणानें ही लता उपटून तुझ्या कंठामध्यें घातलेली आहे, आणि आकाशामध्यें नक्षत्रमालेनें परिवेष्टित असलेला सूर्य ज्याप्रमाणें शोभतो, त्याप्रमाणें गळ्यामध्यें घातलेल्या ह्या लतेच्या योगानें तूं अधिकच शोभत आहेस. असो. सुग्रीवा, वालीमुळें प्राप्त झालेलें तुझें भय व वैर हीं मी आज युद्धामध्यें एकच बाण सोडून नाहींतशीं करून टाकितों. त्या भ्रातृरूप वैऱ्याला मला दाखीव, म्हणजे लगेच तो वाली वध होऊन वनामध्यें

धुळींत तडफडूं लागेल. माझ्या दृष्टीच्या टप्प्यांत येऊन तो वाली जर जिवंत परत गेला, तर मी तत्क्षणीं तुझ्या दूषणाला व निंदेला पात्र होईन अरे, तुझ्यासमक्ष मीं सात तालवृक्ष एका बाणानें विदीर्ण केले आहेत. तेव्हां त्या माझ्या सामर्थ्याच्या बलानें वाली रणामध्यें वध पावून पडलेला आजच तुझ्या आढळण्यांत येईल. पुष्कळ दिवसपर्यंत संकटांत असतांनाहि धर्मसेवनेच्या इच्छेनें अंतःकरण व्याप्त झाल्यामुळें मीं कधीं पूर्वीं अनृत भाषण केलेलें नाहीं. तात्पर्य उगवलेलें भाताचें शेत वृष्टीच्या योगानें ज्याप्रमाणें इंद्र सफल करितो, त्याप्रमाणें मी आपली प्रतिज्ञा सफल करीन. तूं भीति सोडून दे. सुग्रीवा, सुवर्णमाला धारण केलेल्या वालीला आव्हान करण्याकरितां तूं एकदा गर्जना कर, म्हणजे तो वानर येथें धावत येईल. सारांश, निर्भय व विजयाची इच्छा करणाऱ्या त्या वालीला संग्रामप्रिय असल्यामुळें, तुझें आव्हान होतांक्षणीं विलंब न करितां तो आपल्या नगरांतून धावत येईल. कारण, शत्रूंचें संग्रामामध्यें आव्हान श्रवण केल्यावर स्वतःच्या वीर्याबद्दल खात्री असलेल्या वीरांना—विशेषतः स्त्रियांचे समक्ष—तें सहन होत नाहीं."

सुवर्णासारख्या वर्णानें युक्त असलेल्या सुग्रीवानें तें रामाचें भाषण श्रवण केल्यावर, आकाश विदीर्ण करीतच कीं काय अशा क्रूर स्वरानें गर्जना केली. तेव्हां त्या गर्जनेच्या योगानें मोठमोठे बैल भयभीत व निस्तेज झाले, आणि पालन न करणें ह्या राजाच्या दोषामुळें शत्रूंनीं हस्तगत करून घेतलेल्या कुलस्त्रिया ज्याप्रमाणें इकडे तिकडे धावत सुटतात, त्याप्रमाणें ते धावाधाव करूं लागले. इतकेंच नव्हे, परंतु संग्रामामध्यें दाणादाण उडून गेलेल्या अश्वाप्रमाणें मृग सत्वर धावूं लागले, आणि पुण्य संपल्यामुळें आकाशांतून भ्रष्ट होणाऱ्या देवांप्रमाणें पक्षीहि भूमीवर पडूं लागले.

असो. तदनंतर रामाच्या शौर्याविषयीं खात्री वाटत असलेल्या व मेघाप्रमाणें पूर्वीं गर्जना केलेल्या त्या सूर्यपुत्र सुग्रीवानें पुनरपि तशीच गर्जना केली, आणि वायूनें ज्यांतील लाटा उचंबळूं लागल्या आहेत, अशा सागराप्रमाणें पराक्रम करण्याविषयीं त्याचें तेज वृद्धिंगत झालें.

# सर्ग पंधरावा.



## युद्धोत्सुक वालीचा निषेध.

भ्रात्याची ती गर्जना अंतःपुरांत असलेल्या वालीला सहन झाली नाहीं. ह्यामुळें प्राणिमात्रांना कंपित करणारा तो सुग्रीवाचा शब्द श्रवण केल्याबरोबर वालीचा मद तत्क्षणीं नाहींसा होऊन त्याला प्रचंड क्रोध चढला, आणि सुवर्णासारख्या कांतीनें युक्त असलेला तो वाली क्रोधानें व्याप्त झाल्यामुळें ग्रहण लागलेल्या सूर्याप्रमाणें एकाएकीं निस्तेज झाला. दंष्ट्राच्या योगानें अक्राळविक्राळ दिसत असून क्रोधानें प्रदीप्त अग्नीप्रमाणें नेत्र लाल झालेला तो वाली कमलें उध्वस्त झाल्यामुळें शोभारहित होऊन केवळ कमलनालांनीं व्याप्त झालेल्या सरोवराप्रमाणें निस्तेज दिसूं लागला.

सुग्रीवाचा तो दुःसह शब्द श्रवण करितांक्षणीं वेगानें पावलें टाकीत असल्यामुळें पृथ्वी जशी कांहीं विदीर्णच करीत करीत तो वानर वाली तेथून उडाला. तेव्हां पूर्वींपासून जिनें प्रेम दर्शविलें आहे, अशी भयभीत व क्षुब्ध झालेली तारा त्या वालीला प्रेमानें आलिंगन देऊन परिणामीं हितावह होणारें भाषण त्याच्याशीं करूं लागली. ती म्हणाली “ हे वीरा, तूं प्रातःकालीं झोंपेंतून उठल्यावर ज्याप्रमाणें पूर्वरात्रीं उपभोग घेतलेल्या पुष्पमालेचा त्याग करतोस, त्याप्रमाणें नदीच्या वेगाप्रमाणें एकाएकीं प्राप्त झालेल्या ह्या क्रोधाचा तूं बऱ्या विचारानें त्याग कर. हे वानरा, तूं ह्या सुग्रीवाशीं उदयीक प्रातःकालीं संग्राम कर. हे वीरा, जरी तुला शत्रु पुष्कळ नाहींत, आणि तुझे ठिकाणीं कसलीहि न्यूनता नाहीं, तरी एकाएकीं हें तुझें युद्धार्थ बाहेर जाणें मला रुचत नाहीं. मी कशाकरितां तुझें निवारण करीत आहे, तें ऐक. पूर्वीं रागारागानें येऊन तुला एकदां त्यानें युद्धाकरितां आह्वान केलें होतें, परंतु तूं सत्वर जाऊन त्याचा पराजय केलास, व तोहि मार खातां खातां वाट फुटेल तिकडे चालता झाला; तथापि तूं त्याला जिंकून विशेषतः पीडा दिली असतांनाहि ज्या अर्थीं तो पुनरपि येथें येऊन तुला आह्वान करीत आहे, त्या अर्थीं ह्या त्याच्या आह्वानामुळें माझ्या मनांत भय उत्पन्न झालें आहे. गर्जना करणाऱ्या त्या सुग्रीवाचा गर्व, युद्धाविषयीं औत्सुक्य, आणि गर्जनेचा जोर जो दृष्टीस पडत आहे, त्याचा विचार केला असतां, ह्याच्या मुळाशीं कांहीं क्षुल्लकच कारण असेल, असें मला वाटत

नाहीं. कोणी साहाय्यकर्ता बरोबर आल्यावांचून तो सुग्रीव येथें आला आहे असें मला वाटत नाहीं. त्यानें कोणा तरी साहाय्यकर्त्या पुरुषाचें अवलंबन केलें आहे, व त्याचाच आश्रय केला असल्यामुळें हा गर्जना करीत आहे. शिवाय सुग्रीव जात्याच कुशल व बुद्धिमान असल्यामुळें, ज्याच्या वीर्याचा कधीं प्रत्यय आलेला नाहीं, त्याच्याशीं तो कधीं सख्य करणार नाहीं. हे वीरा, पूर्वींच कुमार अंगद सांगत असतांना जें भाषण मीं श्रवण केलें आहे, तेंच हितावह भाषण मी आज तुला सांगतें. अंगद एकदां वनामध्यें गेला असतां हेरांनीं त्याला जो वृत्तांत कळविला, तो त्यानें मला कथन केला आहे. इक्ष्वाकूंच्या कुलामध्यें उत्पन्न झालेले अयोध्याधिपति, समरांगणामध्यें अजिंक्य असलेले दशरथाचे शूर पुत्र राम-लक्ष्मण वनामध्यें गेलेले आहेत, आणि सुग्रीवाचें प्रिय करण्याकरितां ते अजिंक राम-लक्ष्मण तेथें प्राप्त झालेले आहेत. सारांश, प्रलयकाळीं उत्पन्न झालेल्या अग्नीप्रमाणें शत्रुसैन्याचा विध्वंस करणारा, आणि संग्रामकर्मामध्यें विख्यात असलेला तो राम तुझ्या भ्रात्याला साहाय्य करणारा आहे. तो साधुरूप पक्ष्यांचा निवासवृक्ष असून शरण आलेल्यांचा मुख्य आश्रय आहे. दुःखितांचा आधार आहे. यशाचें परम निधान आहे. ब्रह्मज्ञान आणि धर्मज्ञान ह्यांनीं संपन्न असून पित्याची आज्ञा परिपालन करण्याविषयीं तो तत्पर आहे, आणि धातूंची खाण असलेल्या गिरिराज हिमालय महापर्वताप्रमाणें तो गुणांची एक मोठी खाणच आहे. तस्मात्, दुर्जय व युद्धकर्मासंबंधानें अतुल अशा त्या महात्म्या रामाशीं विरोध करणें तुला योग्य नाहीं. हे वानरश्रेष्ठा, तुझा मत्सर न करितां मी कांहीं तुला सांगतें. ह्यास्तव, मी जी तुझ्या हिताची गोष्ट तुला सांगेन, ती ऐकून घेऊन त्याप्रमाणें तूं वाग. अरे, सुग्रीवाला तूं बऱ्या विचारानें सत्वर यौवराजाचा अभिषेक कर. हे वीरा, कनिष्ठ भ्रात्याशीं तूं युद्ध करूं नको. त्या बलाढ्य रामाशीं सख्य व सुग्रीवाचे ठिकाणीं प्रेम करणेंच तुला योग्य आहे, असें मला वाटतें. ह्या कनिष्ठ भ्रात्याचें तुला लालनच केलें पाहिजे. अरे, तो दूर असला किंवा येथें असला, तरी सर्वस्वी तुझा बंधूच आहे, व त्याच्यासारखा तुझा बंधु ह्या भूतलावर मला कोणी आढळत नाहीं. ह्यास्तव, ह्या वैराचा त्याग करून दान, मान इत्यादि सत्कारांच्या योगानें तूं त्याला स्वाधीन करून घे. तो तुझ्या संनिध उभा राहो. प्रचंड प्रीतेनें युक्त असलेला सुग्रीव हाच मुख्य बंधु म्हणून तुला अनुमत असून, भ्रातृप्रेमाचें अवलंबन केल्याशिवाय ह्या प्रसंगीं तूं संकटांतून पार पडण्याचा दुसरा कांहींएक

उपाय नाहीं. तस्मात्, जर तुला माझें प्रिय कर्तव्य असेल, आणि हित करणारी म्हणून जर तूं मला समजत असशील, तर मला प्रिय असलेली गोष्ट करण्याविषयीं मी प्रार्थना करीत आहें, त्याप्रमाणें तूं माझा उत्कृष्ठ उपदेश ऐक. अरे, मजवर कृपा कर, आणि मीं केलेला हितकारक उपदेश ऐकून घे. माझ्यावर रागावणें तुला योग्य नाहीं. खरोखर कोसलदेशाधिपतीच्या इंद्रतुल्य तेजस्वी पुत्राशीं युद्ध करणें तुला योग्य नाहीं.

ह्याप्रमाणें त्या वालीला तारेनें हितावह व पथ्यकारक असा उपदेश केला असतांहि, मृत्यूनें ग्रासिलेल्या त्या वालीचा विनाशकाल आला असल्यामुळें त्याला तो उपदेश रुचला नाहीं.

## सर्ग सोळावा.

### तारेचा निषेध करून वालीचें युद्धार्थ गमन.

ताराधिपति चंद्रासारख्या आल्हादकारक मुखानें युक्त असलेली ती तारा ह्याप्रमाणें उपदेश करीत असतांना वाली निर्भर्त्सना करून तिला म्हणाला, " हे सुंदरि, गर्जना करीत असलेल्या ह्या भ्रात्याची आणि विशेषतः शत्रूची ही गडबड सहन करण्याचें मला काय कारण आहे ? अग भित्रे, ज्यांच्यावर कधीं कोणीं चाल केलेली नाहीं, आणि युद्धामध्यें जे कोणी परावृत्त होत नाहींत, अशा शूर लोकांना कोणी आह्वान केलें असतांना तें निमूटपणें सहन करणें हें मरणापेक्षांहि अधिक दुःखदायक आहे. संग्रामामध्यें युद्धाची इच्छा धरणाऱ्या व भूषणरहित कंठानें युक्त असलेल्या सुग्रीवाची गर्जना व उद्धटपणा सहन करण्यास मी समर्थ नाहीं. रामासंबंधानें तूं माझ्याकरितां मुळींच दुःखी होऊं नको. कारण, धर्मवेत्ता व कृतज्ञ जो राम, तो पाप कसें करील ? आतां इतर स्त्रियांबरोबर तूं परत जा. फिरून फिरून कशाकरितां तूं माझ्या मागोमाग येत आहेस ? तूं आपलें प्रेम दर्शवून माझे ठिकाणीं असलेली भक्ति प्रकट केलीस, ही पुरे आहे. मी सुग्रीवाकडे जाऊन त्याच्याशीं युद्ध करीन, आणि त्याचा गर्व नाहींसा करीन. तूं भय बाळगूं नको. तो कांहीं माझ्या हातून प्राणाला मुकणार नाहीं. सारांश, संग्रामामध्यें स्थित असलेल्या ह्या सुग्रीवाची व्यवस्था मी तुझ्या इच्छेप्रमाणेंच करीन; म्हणजे वृक्ष आणि मुष्टिप्रहार ह्यांनीं

ताडित होऊन तो परत जाईल. त्या दुष्टाला माझा गर्व आणि दृढ प्रयत्न सहन होणार नाहीं. तारे, तूं मला मदत केली असून माझे ठिकाणीं आपलें प्रेमहि दर्शविलें आहेस. ह्यास्तव, इतर स्त्रियांसहवर्तमान तूं परत जा. तुला माझ्या प्राणाची शपथ आहे. ह्या भ्रात्याचा संग्रामामध्यें केवळ पूर्ण पराजय करूनच मी परत फिरेन."

ह्यानंतर प्रिय भाषण करणाऱ्या तारेनें वालीला आलिंगन दिलें, आणि स्वभावानें सरळ असून हळू हळू रडत असलेल्या त्या तारेनें त्याला प्रदक्षिणाहि केली. नंतर भर्त्याच्या विजयाची इच्छा करणाऱ्या त्या मंत्रवेत्या तारेनें वालीचें स्वस्त्ययन केलें, आणि शोकाकुल होऊन स्त्रियांसहवर्तमान ती अंतःपुरामध्यें गेली.

### वाली व सुग्रीव यांचें युद्ध.

स्त्रियांसहवर्तमान तारा स्वस्थानीं प्रविष्ट झाल्यावर, क्रुद्ध झालेल्या महा-भुजंगाप्रमाणें सुस्कारे टाकीत टाकीत वाली नगराच्या बाहेर पडला, आणि प्रचंड क्रोधानें व पराकाष्ठेच्या वेगानें युक्त असलेला तो सुस्कारे टाकून शत्रु दृष्टीस पडावा ह्या हेतूनें चोहोंकडे दृष्टि फेकूं लागला. तेव्हां त्या वैभव-शाली वालीनें सुग्रीवाला अवलोकन केलें. त्या सुग्रीवाचा वर्ण सुवर्णासारखा पिंवळा होता, कंबर बांधून तो तयार होता, युद्धाच्या इच्छेनें तो रणभूमीमध्यें धैर्यानें उभा राहिलेला होता, आणि अग्नीप्रमाणें तो दैदिप्यमान दिसत होता. असो. रणभूमीमध्यें युद्धाकरितां स्थित असलेल्या त्या सुग्रीवाला अवलोकन करून महाकोपी व महापराक्रमी वालीनें आपलें वस्त्र घट्ट केलें, आणि वस्त्र आवळून युद्धाकरितां तयार झालेला तो वीर्यवान वाली मूठ उगारून सुग्रीवाचे सन्मुख गेला. तेव्हां सुवर्णमाला धारण केलेल्या वालीला उद्देशून सुग्रीवहि घट्ट वळलेली मूठ उगारून वालीपेक्षां अधिकच जोराजोरानें त्याच्याकडे गेला असतां, संग्रामनिपुण आणि क्रोधामुळें डोळे लाल झालेला तो सुग्रीव मोठ्या वेगानें आपल्या अंगावर धावून येत आहे, हें अवलोकन करून वाली म्हणाला, "बोटें चांगलीं जुळून घट्ट आवळलेल्या ह्या प्रचंड मुठीचा मीं वेगानें प्रहार केला असतां तो तुझे प्राण घेतल्यावांचून राहणार नाहीं."

ह्याप्रमाणें वालीनें भाषण केलें असतां सुग्रीव क्रुद्ध होऊन त्याला म्हणाला, "ही माझी मूठ तुझे प्राण हरण करण्याकरितां तुझ्या मस्तकावर पडो." नंतर वालीनें वेगावेगानें त्या क्रुद्ध सुग्रीवाजवळ येऊन त्याला ताडण केलें असतां तो

सुग्रीव रक्ताच्या गुळण्या टाकू लागल्यामुळें झऱ्यांनीं युक्त असलेल्या पर्वताप्रमाणें दिसूं लागला. तथापि सुग्रीवानें निःशंकपणें जोराजोरानें एक सालवृक्ष उपटून वालीच्या शरिरावर मारिला. तेव्हां वज्राचा प्रहार झालेल्या महापर्वताप्रमाणें तो वाली शोभूं लागला; आणि वृक्षाच्या योगानें जेरीस आलेला व—अतिशय ओझें लादलेली नौका ज्याप्रमाणें आंतील व्यापाऱ्यांच्या तांड्यासहवर्तमान समुद्रामध्यें बुडूं लागते त्याप्रमाणें—सालवृक्षाच्या ताडनानें विव्हल झालेला तो वाली मनामध्यें खचूं लागला. भयंकर बल, प्रचंड पराक्रम, गरुडासारखा वेग व घोर शरीर ह्यांनीं युक्त असलेले ते शत्रुघातक भ्राते सुग्रीव आणि वाली एकमेकाचें छिद्र पाहाण्याविषयीं दक्ष राहून निकरानें युद्ध करूं लागले असतां, आकाशामध्यें चंद्रसूर्यच युद्ध करीत आहेत कीं काय असें दिसूं लागलें. नंतर बल व वीर्य ह्यांनीं युक्त असलेल्या वालीची सरशी होऊं लागली आणि महावीर्यवान सूर्यपुत्र सुग्रीवाचा पराभव होऊं लागला. तेव्हां वालीनें गर्व नाहींसा केल्यामुळें पराक्रमांतहि कमी झालेला सुग्रीव वालीवर क्रुद्ध झाला, आणि आपला उतरता पाया आहे, असें तो रामाला दर्शवूं लागला. नंतर शाखांसहवर्तमान वृक्ष, पर्वतशिखरें, वज्रप्रहार, नखें, मुष्टि, गुडघे, लाथा व बाहु ह्यांच्या योगानें त्या उभयतांमध्यें वृत्रासुर आणि इंद्र ह्यांच्या युद्धाप्रमाणें घोर युद्ध झालें. सारांश, रक्तानें माखलेले ते उभयतां वनचर मेघांप्रमाणें मोठमोठ्या गर्जना करून एकमेकाला दटावीत दटावीत युद्ध करूं लागले. इतक्यांत वानरराज सुग्रीवाचा पक्ष कमी होऊन तो वारंवार इकडे तिकडे पाहात आहे, असें रामाच्या दृष्टोत्पत्तीस आलें.

### वालीवर बाणप्रहार.

अशा प्रकारें सुग्रीव भयभीत झाला आहे, असें अवलोकन करितांक्षणीं तो महातेजस्वी वीर राम वालीचा वध करण्याच्या इच्छेनें बाण पाहूं लागला. नंतर सर्पासारखा एक प्राणनाशक बाण धनुष्याला लावून, मृत्युच कालचक्राचें आकर्षण करीत आहे कीं काय, अशा रीतीनें त्यानें तें धनुष्य ताणिलें. तेव्हां त्याच्या प्रत्यंचेच्या टणत्कारानें मोठमोठे पक्षी व मृग त्रस्त व प्रलयकालाप्रमाणें मोहित होऊन धावूं लागले. इतक्यांत वज्रासारख्या गर्जनेनें युक्त आणि उज्ज्वल विद्युल्लतेप्रमाणें तेजस्वी असा रामानें सोडिलेला प्रचंड बाण वालीच्या वक्षःस्थलावर पडला, व त्या बाणाचा वेगानें तडाका बसला असतां तो महातेजस्वी वानरराज मरणोन्मुख व निश्चेष्ट होऊन भूतलावर पडला. पडतां

पडतां अश्रूंनीं कंठ दाटून आलेला तो वाली भयभीत होऊन हलके हलके रडूं लागला. सारांश, मुखासमीप असलेल्या ललाटस्थ नेत्राच्या योगानें शंकरानें सोडिलेला सधूम अग्निच कीं काय अशा रीतीनें सुवर्णभूषणानें झळकत असलेला तो शत्रुघातक, मृत्युतुल्य व देदीप्यमान उत्कृष्ठ बाण कालाप्रमाणें दिसत असलेल्या पुरुषश्रेष्ठ रामानें सोडिला असतां, रक्तरूप जलस्रावानें सिंचित झालेला तो इंद्रपुत्र वाली पर्वतावर उगवलेल्या प्रफुल्लित अशोक वृक्षाप्रमाणें दिसूं लागला, आणि उत्सव समाप्त झाल्यानंतर खालीं उतरलेल्या इंद्रध्वजाप्रमाणें तो निश्चेष्ट होऊन समरांगणामध्यें भूतलावर पडला !

## सर्ग सतरावा.



### श्रीरामाची निंदा.

वानरसमाज आणि अस्वलांचा समुदाय ह्यांचा तो अधिपति भूमीवर पडला असतां भूमि चंद्ररहित आकाशाप्रमाणें शोभेनाशी झाली; परंतु तो महात्मा भूमीवर पडला असतांहि कांति, तेज, पराक्रम व प्राण हीं त्याच्या देहाला सोडून गेलीं नाहींत. कारण इंद्रानें दिलेल्या रत्नभूषित उत्कृष्ठ सुवर्णमालेनें त्या वानरश्रेष्ठाचें तेज, कांति व प्राण धारण केले होते, आणि त्या सुवर्णमालेच्या योगानें तो वानरसेनांचें रक्षण करणारा वीर वाली, संध्याकाळच्या आरक्तवर्ण प्रकाशानें ज्याच्या कडा युक्त झालेल्या आहेत अशा मेघांप्रमाणें दिसूं लागला. सारांश, तो खालीं पडला असतांना त्याची कांति माला, देह आणि मर्मघाती बाण ह्या तीन ठिकाणीं विभागून राहिल्यासारखी शोभूं लागली. रामाच्या धनुष्यापासून सुटलेल्या त्या स्वर्गमार्गदर्शक बाणानें त्या महावीर्यवान वीराला उत्कृष्ठ गति दिली.

असो. प्रतिपक्ष्यांनीं चाल करून जाण्यास इंद्रासारखा अशक्य, विष्णूसारखा दुःसह आणि सुवर्णमाला, विशाल वक्षःस्थल, दीर्घ बाहु, उज्ज्वल मुख व पीतवर्ण नेत्र ह्यांनीं युक्त असलेला इंद्रपुत्र वाली ज्वालारहित अग्नीप्रमाणें, पुण्यक्षय झाला असतां देवलोकापासून च्युत झालेल्या ययातीप्रमाणें, अथवा प्रलयसमयीं कालानें भूतलावर पाडिलेल्या सूर्याप्रमाणें, समरांगणामध्यें पडलेला अवलोकन करितांक्षणीं लक्ष्मणासह त्या वीराला बहुमान देऊन महावीर्यवान भ्राते राम-लक्ष्मण त्याच्यासमीप गेले. बाणाचा प्रहार झाल्यामुळें तेज व प्राण

क्षीण होऊन भूमीवर निश्चेष्ट पडलेला तो वाली, रणाविषयीं गर्व चढलेल्या परंतु विनयसंपन्न व धर्मयुक्त असलेल्या रामाला आणि महाबलाढ्य लक्ष्मणाला अवलोकन करून, अर्थपरिपूर्ण वाणीनें कठोर भाषण करूं लागला. तो म्हणाला, "अरे, युद्धाकरितां मी दुसऱ्यावर क्षुब्ध झालों असतांना तुझ्याकरितां मी प्राणाला मुकलों आहे. तेव्हां मी तुझ्या सन्मुख नसतांना माझा वध करून तूं कोणता बरें पुरुषार्थ संपादन केलास? अरे, राम कुलीन, सत्त्वशील, तेजस्वी, व्रतस्थ, परदुःख जाणणारा, प्रजेच्या हिताविषयीं तत्पर, दयाळु, मोठा उत्साहवान, काळवेळ जाणणारा आणि स्वीकारिलेलें व्रत नेटानें चालविणारा असा आहे, म्हणून सर्व प्राणी पृथ्वीवर तुझी कीर्ति सांगत असतात. राजा, दम, शांति, क्षमा, धर्म, धैर्य, सत्त्व, पराक्रम आणि उपद्रव देणाऱ्यांना दंड हे राजांचे गुण आहेत. तेव्हां ते गुण तुझ्यापाशीं आहेत; आणि तुझें कुल मोठें आहे, असें समजून तारेनें निषेध केला असतांनाहि मी सुग्रीवाशीं येऊन भिडलों. सारांश, मी दुसऱ्याशीं भिडलों असतां आणि असावध असतां तूं मला वेध करणार नाहींस, असें तुझ्यासंबंधानें तूं दृष्टीस पडण्याचे पूर्वीं मला वाटलें होतें; परंतु तृणांनीं आच्छादित झालेल्या कूपाप्रमाणें धर्माचें ढोंग करून तूं लोकांचा घात करणारा असा दुराचारी, अधर्मनिष्ठ व आत्मघातकी आहेस, असें मला आतां कळून आलें. अरे, धर्माच्या मिषानें व्याप्त होऊन सज्जनांचा वेष धारण करणारा तूं वस्तुतः पापी असून गुप्त अग्नीप्रमाणें घात करणारा आहेस, हें पूर्वीं माझ्या लक्ष्यांत आलें नाहीं. तुझ्या देशामध्यें अथवा नगरामध्यें जर मीं कांहीं पाप केलें नाहीं. आणि तुझी अवज्ञा सुद्धां जर केली नाहीं, तर मज निरपराध्याचा तूं कशाकरितां वध केला आहेस? नेहमीं फलमूलांवर उपजीविका करणारा असा मी वानर तुझ्याशीं युद्ध करीत नसून दुसऱ्याशीं भिडलों असतांना तूं कशाकरितां माझा वध केलास? अरे, तूं राजपुत्र असून दिसण्यांत मोठा मनोहर व विश्वासूक आहेस; आणि जटा व वल्कलें हें धर्माचें चिन्हहि तुझ्या ठिकाणीं दृष्टीस पडत आहे. क्षत्रिय कुलामध्यें उत्पन्न झालेला, आणि बहुश्रुत असल्यामुळें धर्माविषयीं कसलाहि संशय न राहिलेला असा कोण बरें धर्माचें कातडें पांघरून क्रूर कर्म करण्यास प्रवृत्त होईल? राघवकुलामध्यें उत्पन्न झालेला तूं धर्मवान म्हणून जरी प्रसिद्ध असलास, तरी हलकट आहेस. तेव्हां नम्रवेष धारण करून तूं कशाकरितां भटकत आहेस? राजा, साम, दान, क्षमा, धर्म, सत्य, धैर्य, पराक्रम आणि अपकार करणाऱ्यांना

दंड हे राजांचे गुण आहेत. रामा, फलमूलांवर उपजीविका करून वनामध्यें संचार करणारे आम्ही मृग आहों, व हा आमचा स्वभावच आहे; आणि तूं तर पुरुष आहेस. सारांश, मनुष्यानें एखाद्याचा निग्रह करण्याला भूमि, सुवर्ण आणि स्त्रीरूप हीं कारणें होत असतात. तेव्हां वनसंबंधानें अथवा माझ्या उपजीविकेच्या फलासंबंधानें तुला कसला लोभ उत्पन्न झाला आहे? न्याय, विनय आणि निग्रह व अनुग्रह हे गुण राजाचे वर्तनांत अवश्य असल्यामुळें, राजाची वागणूक कधींहि धोंटाळ्याची नसते. सारांश, राजे स्वेच्छाचारी नसतात. परंतु तूं धर्म व अर्थ ह्यांची पर्वा बाळगणारा नसून मुख्यतः कामाच्याच मागें लागलेला, क्रोधशील, अव्यवस्थित, बाण सोडण्याविषयींच तत्पर, आणि राजनीतीसंबंधानें अनियमित आहेस. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, धर्माविषयीं तुझी पूज्य बुद्धि नाहीं व अर्थाकडेहि तुझें लक्ष्य नाहीं. तूं कामी असल्यामुळें इंद्रियाधीन झालेला आहेस. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना, मज निरपराध्याचा बाणानें वध करून म्हणजे अर्थात् निंद्य कर्म करून तूं सज्जनांमध्यें काय बरें सांगशील? अरे, राजघातकी, ब्रह्मघातकी, गोघातकी, चोर, प्राण्यांच्या वधाविषयीं तत्पर, नास्तिक आणि ज्येष्ठ भ्रात्याचे पूर्वीं विवाह करणारा हे सर्व नरकाला जाणारे आहेत. चहाडखोर, कृपण, मित्रघातकी आणि गुरुपत्नीशीं रत होणारा ह्यांना पाप्यांना प्राप्त होणारा लोक प्राप्त होत असतो, ह्यांत संशय नाहीं. अरे, माझें चर्म सज्जन धारण करीत नसून माझे केश व अस्थिहि सज्जनांनीं वर्ज केल्या आहेत; आणि तुझ्यासारखे धर्मनिष्ठ माझें मांसहि भक्षण करीत नाहींत. राघवा, शल्यक[1], श्वाविध[2], गोधा[3] शश[4] आणि पांचवा कूर्म हे पांचच पांच नखांच्या प्राण्यांपैकीं ब्राह्मण व क्षत्रिय याचें भक्ष्य आहेत. तात्पर्य, माझ्या चर्माला व अस्थींना ज्ञानी लोक स्पर्शहि करीत नसून, माझें मांसहि त्यांना अभक्ष्यच आहे. तथापि असें असतांनाहि मज पांचनखी प्राण्याचा तूं वध केलास. अरे, सर्वज्ञ तारेनें सत्य व हितकारक असा उपदेश मला केला असतांनाहि, मोहानें त्याची पर्वा न करितां मी कालाच्या तावडींत सांपडलों. हे रघुवंशजा, अधर्मचारी पतीच्या योगानें जशी सुशील स्त्री वस्तुतः सनाथ होत नाहीं, तशी ही पृथ्वी तूं नाथ असल्यामुळें वस्तुतः सनाथ झालेली नाहीं. अरे, महात्म्या दशरथापासून शठ, उपद्रवी, क्षुद्र आणि मन विनयसंपन्न आहे असें खोटेंच दर्शविणारा तूं पापी कसा उत्पन्न झालास? सज्जनांच्या धर्माचें

---

१ साळू, साय्राळ. २ साळूचीच एक विशिष्ट जात. ३ नक्र. ४ ससा.

अतिक्रमण करणाऱ्या, सद्वर्तनरूप मर्यादा नाहींशीं करणाऱ्या, आणि धर्मरूप अंकुशाला न जुमानणाऱ्या रामरूप हत्तीनें माझा वध केला आहे. अशुभ, अयोग्य आणि सज्जनांनीं निंदित अशा प्रकारचें हें कर्म करून सज्जनांची गांठ पडली असतां तूं त्यांना काय बरें सांगशील? रामा, आम्ही उदासीन असतांना तूं आमचे ठिकाणीं हा आपला पराक्रम गाजविला आहेस; परंतु तुझा अपराध करणाऱ्यांचे ठिकाणीं अर्थात् तुझी भार्या हरण करणाऱ्या राक्षसाचे ठिकाणीं तूं अशा प्रकारचा पराक्रम करशील, असें मला वाटत नाहीं. हे राजपुत्रा, समरांगणामध्यें माझ्या दृष्टीस पडून जर तूं माझ्याशीं युद्ध केलें असतेंस, तर आज माझ्या हातून वध पावल्यामुळें यमदेवाचेंच दर्शन घेण्याची तुला पाळी आली असती! परंतु अदृश्य असलेला सर्प ज्याप्रमाणें निद्रिस्थ झालेल्या पापी मनुष्याचा वध करितो, त्याप्रमाणें संग्रामामध्यें अदृश्य राहून, प्रत्यक्ष युद्धामध्यें अजिंक्य असलेल्या माझा तूं वध केलास. अरे, सुग्रीवाचे हातून आपलें प्रिय करून घेण्याच्या इच्छेनें तूं माझा वध केला आहेस; परंतु ही गोष्ट तूं मला पूर्वींच सांगतास, तर एका दिवसांत मी मैथिली तुझ्याकडे आणून दिली असती, आणि तुझ्या भार्येचा अपहार करणारा तो दुरात्मा राक्षस संग्रामामध्यें गळ्याला बांधून मी जिवंत तुझ्या हवालीं केला असता! अरे, श्वेतवर्ण खेंचरीचें रूप धारण केलेली श्रुति मधुकैटभांनीं पातालामध्यें नेली असतांहि ज्याप्रमाणें हयग्रीवानें पुनरपि ती भूतलावर आणिली, त्याप्रमाणें समुद्राच्या उदकामध्यें अथवा पातालामध्यें जरी सीतेला रावणानें नेऊन ठेविली असती, तरी मी तुझ्या आज्ञेनें तिला परत आणून दिली असती. अरे, मी स्वर्गाला गेल्यानंतर सुग्रीवाला राज्य प्राप्त व्हावें, हें योग्य आहे; परंतु रणामध्यें तूं माझा अधर्मानें वध केलास हें मात्र अयोग्य आहे. अरे, अशा प्रकारचा प्राणी कोणीहि झाला तरी त्याला मृत्यु हा यावयाचाच असतो; परंतु पुढें मागें तुला राज्य प्राप्त झाल्यावर, माझ्या वधासंबंधानें तुला लोकांनीं प्रश्न केला असतां त्या प्रश्नाचें तुला योग्य उत्तर काय देतां येईल, ह्याचा तूं चांगला विचार कर."

असो. बाणाच्या प्रहारामुळें विव्हल होऊन तोंड कोरडें पडलेला तो महात्मा वानरराज वाली ह्याप्रमाणें बोलून व रवितुल्य रामाला अवलोकन करून स्वस्थ राहिला.

# सर्ग अठरावा

## श्रीरामाचें उत्तर.

वस्तुतः कठोर परंतु दिसण्यांत हितावह, विनययुक्त आणि धर्म व अर्थ ह्यांना धरून असलेलें भाषण मूर्च्छित झालेल्या मुमुर्षु वालीनें रामाला अनुलक्षून केलें. तेव्हां निस्तेज सूर्याप्रमाणें, वृष्टि केलेल्या मेघाप्रमाणें अथवा विझलेल्या अग्नीप्रमाणें दिसत असलेला तो वानरराज सर्वोत्कृष्ट वाली रामाची निंदा करून स्वस्थ बसला असतां धर्म व अर्थ ह्या गुणांनीं युक्त असलेलें भाषण रामानें त्याच्याशीं केलें.

श्रीराम म्हणाले:—"धर्म, अर्थ, काम आणि लौकिक व्यवहार जाणिल्याशिवाय तूं मूर्खपणामुळें आज माझी कां बरें येथें निंदा करीत आहेस ? हे वानरा, आचार्य म्हणून संमत असलेल्या ज्ञानवान वृद्धांना न विचारितां तूं चालतेमुळें माझ्याशीं अशा प्रकारचें सौम्य भाषण बोलण्याचें मनामध्यें आणिलेंस, परंतु हें तुझें भाषण योग्य नाहीं. कारण मनूनें पर्वत, वनें व अरण्यें ह्यांसहवर्तमान ही भूमि इक्ष्वाकुवंशजांना दिलेली असून पशु, पक्षी व मनुष्यें ह्यांच्यावर अनुग्रह आणि ह्यांचा निग्रह करण्याचा अधिकारहि त्यानें दिलेला आहे; आणि त्याचप्रमाणें दुष्टांचा निग्रह व सज्जनांवर अनुग्रह करण्याविषयीं तत्पर, धर्म, अर्थ व काम ह्यांचें तत्त्व जाणणारा, सत्यनिष्ठ, सरळ आणि धर्मात्मा भरत ह्या पृथ्वीचें परिपालन करीत आहे. न्याय, नियम, सत्य आणि पराक्रम हीं त्या भारताचे ठिकाणीं अक्षय असल्याचें अनुभवसिद्ध आहे; व देश आणि काल जाणणारा तो भरत सांप्रत सर्व पृथ्वीचा राजा आहे. धर्मसंरक्षणार्थ त्यानें आमची व इतर राजांची योजना केलेली आहे. आम्हीहि धर्मवृद्धीची इच्छा धरून संपूर्ण पृथ्वीवर संचार करीत आहों. अरे, तो धर्मवत्सल नृपश्रेष्ठ भरत संपूर्ण पृथ्वीचें परिपालन करीत असतांना धर्मनाश करण्यास कोण बरें उद्युक्त होईल ? सारांश, सर्वोत्कृष्ट अशा स्वधर्माविषयीं तत्पर असलेले आम्ही भरताची आज्ञा शिरसा मान्य करून मार्गाला सोडून जात असलेल्याचा यथायोग्य विचार करीत असतों; आणि तूं तर कृतीनें लोकनिंदेस पात्र, कामाच्याच मागें लागलेला, आणि धर्मवंचक आहेस; व म्हणूनच राजमार्गाला अनुसरून चालतहि नाहींस. अरे, ज्येष्ठ भ्राता, पिता आणि जो विद्या देतो तो, हे तीन धर्ममार्गानें चालणाऱ्यांचे पिते आहेत असें समजलें पाहिजे. त्याचप्रमाणें कनिष्ठ भ्राता, औरस पुत्र व

गुणी शिष्य ह्या तिघांना पुत्रांप्रमाणेंच समजलें पाहिजे, आणि धर्म हेंच त्याचें कारण होय. वानरा, सज्जनांचा धर्म सूक्ष्म असल्यामुळें तो इतरांना समजण्यास अत्यंत अशक्य आहे. प्राणिमात्राच्या हृदयामध्यें वास करणारा परमात्मा मात्र पापपुण्य जाणीत आहे. सारांश, एखाद्या जन्मांधानें दुसऱ्या जन्मांधाबरोबर एखादी वस्तु अवलोकन करण्यास उद्युक्त व्हावें, त्याप्रमाणें स्वभावत: चपल असलेला तूं तुझ्यासारख्या चपल व अशिक्षित वानरांसहवर्तमान खलबत करणारा आहेस. तेव्हां तुला धर्म कोठून समजणार? हें भाषण मी तुला स्पष्ट करून सांगतों. केवळ रागानें माझी निंदा करणें तुला योग्य नाहीं. मीं तुझा कशाकरितां वध केला, ह्याचें कारण लक्ष्यांत आण. अरे, सनातन धर्माचा त्याग करून तूं आपल्या भ्रात्याच्या भार्येचा अभिलाष धरिलेला आहेस. सारांश, हा महात्मा सुग्रीव जिवंत असतांना, वस्तुत: तुला स्नुषेप्रमाणें असलेली जी त्याची भार्या रुमा, तिचा अभिलाष तूं करीत आहेस; आणि म्हणून अर्थात्‌च तूं पापकर्म करणारा आहेस. तेव्हां हे वानरा, धर्माला सोडून स्वेच्छाचारानें वागत असलेल्या तुला ह्या भ्रातृभार्योपभोगरूप पातकाबद्दल मीं हा दंड केलेला आहे. हे वानरसेनानायका, लोकमर्यादा सोडून लोकविरुद्ध वर्तन करणाऱ्या तुझा निग्रह वधदंडावांचून दुसऱ्या रीतीनें करणें मला बरोबर दिसत नाहीं. तात्पर्य, मी कुलीन क्षत्रिय असल्यामुळें तुझ्या पापाची कधींहि उपेक्षा करणार नाहीं. कन्येशीं, भगिनीशीं अथवा कनिष्ठ भ्रात्याच्या भार्येशीं जो पुरुष विषयवासनेनें रत होतो, त्याला वध हाच दंड शास्त्रामध्यें सांगितला आहे. अरे, भरत पृथ्वीचें परिपालन करणारा असून आम्ही त्याच्या आज्ञेप्रमाणें वागणारे आहों; आणि तूं तर धर्माचें अतिक्रमण केलेलें आहेस. तेव्हां श्रेष्ठ जो धर्म, त्यापासून भ्रष्ट झालेल्या तुझी उपेक्षा आमच्या हातून होणें कसें बरें शक्य होईल? राजनीति जाणणारा भरत धर्मानें वागणाऱ्यांचें परिपालन धर्मानेंच करीत असून, कामाच्याच मागें लागलेल्यांचा निग्रह करण्याविषयीं तत्पर असतो. आणि आम्हीहि भरताची आज्ञा शिरसा मान्य करीत असून, मर्यादा सोडून वागणाऱ्या तुझ्यासारख्यांचा निग्रह करण्याविषयीं उद्युक्त आहों. शिवाय लक्ष्मणाप्रमाणें सुग्रीवाशीं माझें सख्य आहे, आणि भार्या व राज्य प्राप्त होण्याकरितां त्यानें माझें हित करण्याविषयीं प्रतिज्ञा केलेली असून मींहि वानरांसमक्ष त्याच्या मनाप्रमाणें वागण्याचें त्याला वचन दिलेलें आहे. तेव्हां दिलेलें वचन न पाळणें माझ्यासारख्याच्या हातून कसें बरें शक्य होईल? तस्मात्, हीं सर्व कारणें महत्त्वाचीं

व धर्माला अनुसरून असल्यामुळें, तुला जें योग्य शासन केलें आहे, तें तुला मान्य असावें. तुझा जो मीं निग्रह केला, हा सर्वस्वी धर्मच झाला आहे, असें तूं समज. धर्माकडे दृष्टि देऊन वागणाऱ्यानें मित्रावर उपकार केलाच पाहिजे. तूं जर धर्माला अनुसरून वागणारा असतास, तर मीं जी गोष्ट केली ती तूंहि केली असतीस. तात्पर्य, ज्याप्रमाणें मीं तुला शासन केलें आहे, त्याप्रमाणें तूंहि अशा प्रकारचें पातक करणाऱ्या पुरुषाधमाला शासन केलें असतेस. हे वानरश्रेष्ठा,

> **राजभिर्धृतदण्डाश्च कृत्वा पापानि मानवाः ।**
> **निर्मलाः स्वर्गमायान्ति सन्तः सुकृतिनो यथा ॥**
> **शासनाद्वापि मोक्षाद्वा स्तेनः पापात्प्रमुच्यते ।**
> **राजा त्वशासन्पापस्य तदवाप्नोति किल्बिषम् ॥** [१]

असे हे सद्वर्तनप्रतिपादक दोन श्लोक मनूंनीं सांगितलेले माझ्या ऐकण्यांत आहेत; आणि धर्मनिष्ठांनीं त्यांचा स्वीकार केला असून तुझा वध करण्यांत मीहि त्यांना अनुसरूनच वर्तन केलेलें आहे."

श्रीराम पुढें म्हणाले, "हे वानरश्रेष्ठा, पूर्वीं तुझ्यासारखें एका बौद्ध यतीनें पातक केलें असतां, मांधाता ह्या नांवाच्या माझ्या पूर्वजानेंहि त्याला योग्य असलेला असाच भयंकर दंड केलेला होता; आणि त्याचप्रमाणें मदमत्त झालेल्या पुरुषांनीं केलेल्या पापाबद्दल इतरहि भूपालांनीं असाच दंड केलेला आहे. पापी लोक पश्चात्ताप झाला असतां, आपल्या पातकाच्या क्षालनार्थ नुसत्या राजदंडावरच अवलंबून रहात नसून धर्मशास्त्रविहित प्रायश्चित्तहि करीत असतात; आणि त्याच्या योगानें त्यांचें पातक नाहींसें होत असतें. तस्मात्, तुझा संताप आतां पुरे. हे वानरश्रेष्ठा, धर्मानेंच तुझा वध झालेला आहे, आणि आम्ही स्वतंत्र नसून धर्माधीन आहों. असो. हे वानरश्रेष्ठा, तुझ्या वधाचें आणखीहि एक कारण मी सांगतों, तें श्रवण कर. हे वीरा, तें महत्त्वाचें कारण श्रवण केल्यानंतर माझ्यावर क्रोध करणें तुला योग्य होणार नाहीं. तुझा परोक्ष रीतीनें वध केल्याबद्दल माझ्या मनाला पश्चात्तापहि झालेला नाहीं, आणि क्रोध हेंहि माझ्या हातून तुझा वध होण्याचें कारण नाहीं; लोक दृश्य अथवा गुप्त राहून जाळ्यांनीं अथवा कष्टयुक्त उपायांनीं पुष्कळ मृग धरीत असतात;

---

१ पुरुषांच्या हातून पातकें झालीं असतां राजांनीं त्यांना दंड केला म्हणजे ते निष्पाप होतात, आणि पुण्यवान सज्जनांप्रमाणें ते स्वर्गाला जातात. राजाला विदित झाल्यानंतर त्यानें शासन केल्यास अथवा सोडून दिल्यास पातकी पातकापासून मुक्त होतो; परंतु पापी पुरुषाला शासन न करणाऱ्या राजाला मात्र त्याचें पातक लागतें.

आणि मृग धावत असतांना, त्रस्त झाले असतांना, स्वस्थ बसले असतांना मृगांशीं निकरानें युद्ध करीत असतांना, आणि तसेंच गैरसावध असतांना किंवा पराङ्मुखहि असतांना मांसभक्षक पुरुष आड लपून अगर उघड रीतीनें त्यांना वेध करीत असतात. तात्पर्य, कोणत्याहि रीतीनें मृगाचा वध करण्याला दोष नाहीं. धर्मवेत्ते राजर्षी मृगयेला जात असतात. हे मृगवध निर्दोष असण्याला प्रमाण आहे, व म्हणूनच तूं प्रतिपक्ष्याशीं युद्ध करीत असून माझ्याशीं जरी युद्ध करीत नव्हतास, तरी शाखामृग असल्यामुळें मीं तुझा युद्धामध्यें बाणानें वध केला आहे. हे वानरश्रेष्ठा, प्रजेला राजेच दुर्लभ धर्म, जीवित आणि अभ्युदय प्राप्त करून देणारे आहेत, ह्यांत संशय नाहीं. त्या राजांची संग्रामावांचून हिंसा करूं नये, निंदा करूं नये, त्यांचा अवमान करूं नये आणि त्यांना अप्रिय असलेलीहि गोष्ट करूं नये. कारण हे देवच मनुष्यरूपानें भूतलावर संचार करीत असतात. तूं धर्माविषयीं मुळींच अज्ञानी असतांना केवळ क्रुद्ध होऊन वाडवडिलांपासून चालत आलेल्या मज धर्मानें वागणाऱ्याला दूषण देत आहेस."

### वालीचा पश्चात्ताप.

ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां, रामाला विनाकारण दोष लाविल्याबद्दल वाली अत्यंत दुःखित झाला, आणि धर्म कोणता याविषयीं त्याला निश्चित ज्ञान झाल्यामुळें, रामाचे ठिकाणीं दोषारोप करण्याचें त्यानें पुनरपि मनामध्यें आणिलें नाहीं. तदनंतर वानराधिपति वाली हात जोडून रामाला म्हणाला, "हे पुरुषश्रेष्ठा, तूं म्हणतोस त्याप्रमाणेंच आहे, ह्यांत संशय नाहीं. कारण श्रेष्ठाच्या पुढें निकृष्ट उत्तर देण्यास समर्थ होणार नाहीं. प्रमादामुळें मीं जें पूर्वीं आपणांला अप्रिय असें भाषण केलें, त्याबद्दल आपण मला दोष देऊं नका. कारण, आपण धर्मादिकांचें तत्त्व स्वानुभवानें जाणणारे असून प्रजेच्या कल्याणाविषयीं दक्ष आहां; आणि कार्य कोणतें व कारण कोणतें ह्या गोष्टींचा निश्चय करण्यामध्यें आपलें अंतःकरण निर्दोष व निर्मल आहे. तस्मात्, धर्मातिक्रमण करणाऱ्यांमध्यें अग्रगण्य म्हणून प्रसिद्ध असलेल्या माझें धर्मयुक्त उपदेशानें आपण परिपालन करा."

### अंगदाचें रक्षण करण्याविषयीं वालीची रामाला प्रार्थना.

असें म्हणतां म्हणतां वालीचा कंठ अगदीं दाटून आला, आणि चिखलांत रुतलेल्या हत्तीप्रमाणें कांहीं सुचेनासें झालेला तो वाली रामाकडे पाहून रडत रडत हळू हळू त्यांना म्हणाला, "ज्याप्रमाणें सुवर्णबाहुभूषणांनीं युक्त आणि

गुणांनीं वरिष्ठ अशा अंगद नामक पुत्राबद्दल मला वाईट वाटत आहे, त्याच-प्रमाणें स्वत:संबंधानें वाटत नाहीं. तारेकरितां मी दु:ख करीत नाहीं, व बांध-वांविषयींहि मला विषाद वाटत नाहीं. बालपणापासून मीं अंगदाचें लालन केलें असल्यामुळें मी दिसेनासा झाल्यावर तो दीन होऊन उदक संपून गेलेल्या तडागाप्रमाणें शुष्क होऊन जाईल. तस्मात् रामा, बाल आणि बुद्धीनेंहि पोक्त नसलेला असा जो माझा तारेचे ठिकाणीं झालेला एकुलता एक महाबलाढ्य व प्रिय पुत्र अंगद, त्याचें आपण रक्षण करा. सारांश, सुग्रीवाविषयीं आणि त्याचप्रमाणें अंगदाविषयीं आपलें मन चांगलें असूं द्या. कारण, कर्तव्य केल्या-बद्दल रक्षण आणि अकार्य केल्याबद्दल शासन करणारेहि आपणच ठरलेले आहां. हे प्रजाधिपते, भरत आणि लक्ष्मण यांच्याशीं जशी आपली वागणूक आहे, तशीच सुग्रीव आणि अंगद ह्यांच्याशीं ठेवण्याचें मनामध्यें असावें; आणि माझ्या अपराधामुळें अपराधी ठरलेल्या त्या बिचाऱ्या तारेचा सुग्रीव अवमान न करील अशा रीतीनें आपण व्यवस्था ठेवावी. तुमच्या अधीन राहून तुमच्या मनाप्रमाणें वागणारा जो तुमच्या मर्जींतला असेल, त्याला राज्य चालविणें, स्वर्ग-प्राप्ति होणें आणि पृथ्वीचें परिपालन करणें ह्या गोष्टी शक्य आहेत. तुमच्या हातून वध व्हावा, ह्या इच्छेनें तारा 'नको नको' म्हणत असतांहि भ्रात्या सुग्रीवासहवर्तमान मीं द्वंद्वयुद्ध केलें."

इतकें रामाला सांगून तो वानरराज स्वस्थ बसला असतां, ज्ञान प्राप्त झा-लेल्या त्या वालीचें सज्जनांना संमत आणि धर्मतत्त्वविषयकअर्थानें युक्त अशा वाणीनें रामांनीं सांत्वन केलें. ते म्हणाले, "वानरश्रेष्ठा, तुला आम्हांविषयीं अथवा स्वत:विषयीं काळजी करण्याचें कारण नाहीं. धर्मशास्त्रासंबंधानें तुझ्यापेक्षां आम्ही कार्याकार्यनिश्चय करण्यांत अधिक प्रवीण आहों. जो अपराध्याला दंड करितो, आणि ज्या अपराध्याला दंड होतो, ते दोघेहि दंडास पात्र असणें आणि दंड करविणें ह्यांच्या योगानें परलोकप्राप्तीचें साधन प्राप्त करून घेत असल्यामुळें हानि पावत नाहींत. तस्मात्, हा वधरूप दंड तुला प्राप्त झाल्या-मुळें तूं पापरहित होऊन, दंडबोधक शास्त्रोक्त मार्गानें आपल्या धर्माला अनु-सरून असलेल्या शुद्ध स्वभावाप्रत प्राप्त झाला आहेस. ह्यास्तव, अन्त:करणां-तील भय, शोक व मोह ह्यांचा तूं त्याग कर. हे वानरश्रेष्ठा, प्राक्तनकर्मामुळें जें होणार, तें तुला टाळितां येणें शक्य नाहीं. हे वानरराजा, अंगद ज्याप्रमाणें

नेहमीं तुझ्याशीं वागतो, त्याचप्रमाणें तो सुग्रीवाशीं व माझ्याशींहि वागेल, ह्यांत संशय नाहीं."

ह्याप्रमाणें रणामध्यें प्रतिपक्ष्याचा नाश करणाऱ्या त्या महात्म्या रामाचें धर्ममार्गाला अनुसरून असलेलें मधुर व विचारयुक्त भाषण श्रवण करून वानरवालीनेंहि रामाशीं योग्य भाषण केलें. तो म्हणाला, "हे प्रभो, हे इंद्रतुल्य भयंकर पराक्रमी रामा, बाणानें संतप्त झाल्यामुळें कांहीं सुचेनासें होऊन अज्ञानानें मीं जें हें आपणाला उद्देशून भाषण केलें, त्याबद्दल मला क्षमा असावी. मजवर कृपा होण्याविषयीं मीं आपली प्रार्थना केली आहे."

## सर्ग एकोणिसावा.

### तारेचें युद्धभूमीवर आगमन.

रामबाणानें व्यथित झाल्यामुळें भूतलावर पडलेल्या त्या वानरांच्या सार्वभौम राजाला सहेतुक भाषणानें उत्तर मिळालें असतां, त्यानें कांहींएक प्रत्युत्तर दिलें नाहीं. नंतर पाषाणांनीं शरीर फुटून गेलेला, वृक्षांनीं अत्यंत ताडित झालेला आणि रामबाणानें जर्जर झालेला तो वाली प्राणप्रयाणसमयीं मूर्च्छित झाला. तेव्हां रामानें सोडिलेल्या बाणानें वानरश्रेष्ठ वालीचा युद्धामध्यें वध झाला, हें तारेनें श्रवण केलें; आणि भर्त्याचा वध हें भयंकर अप्रिय वर्तमान श्रवण करितांक्षणीं आपल्या पुत्रासहवर्तमान अत्यंत उद्विग्न होऊन ती त्यासह त्या पर्वतगुहारूप किष्किंधा नगरीपासून बाहेर निघाली. अंगदाभोंवतीं जे बलाढ्य वानर होते, तेहि धनुष्य धारण केलेल्या रामाला अवलोकन करितांक्षणीं भयभीत होऊन पळूं लागले. तेव्हां समाजरक्षकाचा वध होऊन कळपापासून दूर झालेल्या मृगांप्रमाणें, भयभीत होऊन सत्वर पळत सुटलेल्या त्या वानरांना तिनें अवलोकन केलें; आणि जसे कांहीं रामाचे बाणच मागें लागले आहेत कीं काय अशा रीतीनें भयभीत होऊन दुःखित झालेल्या त्या वानरांसमीप गेल्यावर ती दुःखाकुल झालेली ती साध्वी तारा त्यांना म्हणाली, "हे वानरहो, ज्या श्रेष्ठ राजाच्या पुढें तुम्ही चालणारे आहां, त्याला सोडून तुम्ही संकटांत सांपडल्यामुळें अत्यंत भयभीत होऊन कशाकरितां पळत आहां? लांबून वेध करणाऱ्या व दूर उभें राहून रामानें सोडिलेल्या बाणांनीं जर क्रूर

भ्रात्या सुग्रीवानें राज्याकरितां त्या भ्रात्याचा वध केला असेल, तर पळून काय उपयोग ? त्याच्या सेवेनेंच तुमचा निभाव लागणारा आहे. "

हें त्या वानरपत्नीचें भाषण श्रवण केल्यावर, यथेष्ट रूप धारण करणारे वानर समयोचित अशा स्पष्ट शब्दांनीं तिला म्हणाले, "हे पुत्रवति स्त्रिये, तूं परत फीर, आणि आपल्या पुत्राचें रक्षण कर. रामरूपानें अंतकच वालीला मारून यमसदनीं नेत आहे. वेगावेगानें जाणाऱ्या वृक्षांनीं व प्रचंड शीलांनीं वालीनें प्रतिपक्ष्याला वेध केला असूनहि, वज्रतुल्य बाणांच्या योगानें त्याचा वध झाला आहे, आणि तो वज्रानेंच झाला आहे कीं काय, असें वाटत आहे. सांप्रत पराभव पावलेलें हें सर्व वानरसैन्य पळत सुटलें आहे. तस्मात्, तेजानें इंद्रतुल्य असलेला हा वानरराज वध पावला असतांना शूर वानरांच्या योगानें नगरीचें रक्षण करून अंगदाला अभिषेक करावा. कारण वालीचा पुत्र राज्यावर बसला असतां वानर त्याची सेवा करूं लागतील. अथवा वानर आजच किष्किंधा नगरींतील दुर्गम स्थानांमध्यें प्रवेश करतील. ते प्रविष्ट झाले असतां अपत्नीक आणि सपत्नीक असे जें दुसरे वनचर वानर येथें आहेत, तेहि त्यांच्या मागोमाग प्रवेश करतील; आणि त्या राज्यलुब्ध व पूर्वीं आमचे हातून फसले गेलेल्या सुग्रीवपक्षीय वानरांपासून आम्हांला फारच मोठें भय प्राप्त होईल."

समीपच असलेल्या वानरांचें हें भाषण श्रवण केल्यावर, मनोहर हास्यानें युक्त असलेली तारा आपल्याला योग्य असें भाषण करूं लागली. ती म्हणाली, "तो महाभाग्यवान वानरश्रेष्ठ भर्ता मृत्यु पावला असतांना पुत्राशीं, राज्याशीं अथवा स्वतःचे देहाविषयीं तरी मला काय कर्तव्य आहे ? जो हा माझा भर्ता रामानें सोडिलेल्या बाणाच्या योगानें सुग्रीवानें संग्रामामध्यें पाडिला आहे, त्या महात्म्या भर्त्याच्याच पायांपाशीं मी जातें. "

असें बोलून ती शोकाकुल झालेली तारा रडत रडत आणि दुःखानें मस्तक व ऊर बडवून घेत घेत धावूं लागली. जातां जातां भूमीवर पडलेला भर्ता तिनें अवलोकन केला. संग्रामामध्यें परावृत्त न होणाऱ्या वानरराजांचा वध करण्यास तो समर्थ असे. वज्रें फेंकण्यास समर्थ असलेल्या इंद्राप्रमाणें संग्रामामध्यें मोठमोठे पर्वत फेंकण्यास समर्थ, प्रचंड वायूप्रमाणें रणामध्यें ज्याला आवेश येई असा, मोठमोठ्या समुदायांप्रमाणें गर्जना करणारा, इंद्रतुल्य पराक्रमी, जडवृष्टि करून शांत झालेल्या मेघाप्रमाणें स्वस्थ राहिलेला, गर्जना करणाऱ्या योद्ध्याप्रमाणें भयंकर गर्जना करणारा, शूर मांसाकरितां व्याघ्रानें मारिलेल्या

मोठ्या मृगाप्रमाणें शूराच्या हातून वध पावलेला, सर्व लोकांना पूज्य, आणि आंत असलेले सर्प भक्षण करण्याकरितां गरुडानें स्थानासहवर्तमान उद्ध्वस्त करून टाकिलेल्या मार्गावरील वारुळाप्रमाणें, ध्वजासहवर्तमान रामानें उलथून पाडिलेला आपला भर्ता तिनें अवलोकन केल्यावर, धैर्य धरून हातामध्यें प्रचंड धनुष्य धारण करणाऱ्या रामाला, लक्ष्मणाला आणि त्याचप्रमाणें भर्त्याच्या कनिष्ठ भ्रात्यालाहि तिनें अवलोकन केलें. नंतर त्यांना पाहून पुढें गेल्यावर रणामध्यें वध पावून पडलेल्या भर्त्यासमीप ती आली, आणि त्याला पहातांक्षणीं दुःखाकुल व मूर्च्छित होऊन ती भूमीवर पडली. तदनंतर झोपेंतून उठलेल्या स्त्रीप्रमाणें पुनरपि सावध झाल्यावर मृत्युपाशांनीं बद्ध झालेल्या पतीला अवलोकन करून 'हे आर्यपुत्रा' असें म्हणत म्हणत ती रडूं लागली. तेव्हां कुररीप्रमाणें आक्रोश करीत असलेल्या तारेला आणि जवळ असलेल्या अंगदाला अवलोकन करून सुग्रीवाला मोठें दुःख झालें.

## सर्ग विसावा.



### तारेचा विलाप.

चंद्रासारख्या आल्हादकारक मुखानें युक्त असलेल्या तारेनें रामाच्या धनुष्यापासून सुटलेल्या प्राणघातक बाणाच्या योगानें भूमीवर वध होऊन पडलेल्या वालीला अवकोकन केलें. गजासारखा धिप्पाड असलेला तो वाली बाणाच्या योगानें वध पावलेला पाहून ती त्याच्या समीप जाऊन त्याला कडकडून भेटली. तेव्हां शोकानें मन संतप्त झालेली ती तारा दुःखाकुल होऊन, महापर्वताप्रमाणें दिसणाऱ्या आणि उपटून पडणाऱ्या वृक्षाप्रमाणें समरांगणांत पडलेल्या त्या वानराकरितां शोक करूं लागली. ती म्हणाली, "हे रणामध्यें भयंकर पराक्रम करणाऱ्या महावीरा, हे वानरश्रेष्ठा, सांप्रत मीं मर्यादेचें अतिक्रमण केलें आहे, असें समजून तूं माझ्याशीं भाषण करीत नाहींस काय? हे वानरश्रेष्ठा, ऊठ, आणि उत्कृष्ट शय्येवर शयन कर. अरे, तुझ्यासारखे नृपश्रेष्ठ भूमीवर शयन करीत नाहींत. हे पृथ्वीपते, पृथ्वी तुला खरोखर अतिशयच प्रिय आहे. कारण तूं सांप्रत गतप्राण झाला असूनहि मला सोडून तिचेंच आपल्या अवयवांच्या योगानें सेवन करीत आहेस. वीरा, धर्मानें युद्ध

करून तूं आज स्वर्गसाधनभूत रणभूमीमध्यें किष्किंधा नगरीप्रमाणें दुसरी एक रम्य नगरी निर्माण केली आहेस. असें नसेल तर किष्किंधा नगरी सोडून तूं येथें कशाकरितां शयन करीत आहेस ? मधुगंधानें युक्त असलेल्या वनामध्यें आमच्यासहवर्तमान ज्या तूं क्रीडा केल्यास, त्यांची ह्या वेळीं तूं परिसमाप्तिच केली आहेस. मोठमोठ्या वानरसेनानायकांच्याहि समुदायांचें संरक्षण करणारा तूं मृत्यु पावल्यामुळें मी आनंदशून्य व निराश होऊन शोकसागरामध्यें अगदीं मग्न झालें आहें. खरोखर माझें हृदय फारच बळकट आहे. कारण भूमीवर पडलेल्या तुला अवलोकन करूनहि शोकसंतप्त होऊन त्याचे अद्यापि हजारों तुकडे होऊन जात नाहींत. हे वानरराजा, सुग्रीवाच्या भार्येचा अपहार करून त्याला जें तूं हांकून लाविलेंस, त्याचें हें फल आज तुला प्राप्त झालें आहे. हे वानरराज, तुझ्या हिताची इच्छा धरून व तुझ्या कल्याणाविषयीं तत्पर राहून मीं तुला हिताची गोष्ट सांगितली असतांनाहि मोहानें तूं माझी निंदा केलीस. हे मानी राजा, हे आर्या, सौन्दर्य आणि यौवन ह्यांच्या योगानें गर्विष्ठ झालेल्या चतुर अप्सरांचीं अंतःकरणें खरोखर तूं क्षुब्ध करून टाकशील. खरोखर तुझ्या जीविताचा अंत करणारा हा कालच निःसंशय प्राप्त झाला आहे, आणि म्हणूनच दुसऱ्यांना आपल्या ताब्यांत ठेवणाराहि तूं त्या कालाच्या योगानें निरुपाय होऊन सुग्रीवाच्या तावडींत सांपडलास ! अरे, वाली दुसऱ्याशीं युद्ध करीत असतांना त्याचा वध करून म्हणजे अर्थात् अत्यंत निंद्य कर्म करूनहि कुकुत्स्थकुलोत्पन्न रामाला पश्चात्ताप होत नाहीं, हें अयोग्य आहे. पूर्वीं मला कधीं दुःख भोगण्याचा प्रसंग आला नसूनहि सांप्रत अत्यंत दैन्यावस्थेस पोहोंचलेल्या मला, अनाथाप्रमाणें राहून वैधव्यांत व शोकसंतापांतच दिवस काढण्याचा प्रसंग आला आहे. सुकुमार, सुखाचीच संवय असलेला, आणि मीं लाड केलेला हा वीर अंगद क्रोधसंतप्त झालेल्या चुलत्यापाशीं कोणत्या स्थितीमध्यें राहील ? बाळा अंगदा, आपल्या धर्मवत्सल पित्याला एकदा चांगलें पाहून घे. कारण वत्सा, आतां त्याचें दर्शन तुला दुर्लभ होईल. हे वानरराजा, तूं आतां प्रवासाला निघाला आहेस. ह्यास्तव माझ्या पुत्राचें सांत्वन कर, आणि कर्तव्याचा उपदेश कर. तुझा वध करून रामानें तर मोठेंच कर्म केलें आहे. कारण, सुग्रीवाशीं केलेल्या प्रतिज्ञेसंबंधानें तो आतां त्याचा अनृणी झाला आहे. सुग्रीवा, आतां तुझे मनोरथ परिपूर्ण होऊं दे. तुला आतां रुमा प्राप्त होईल. तूं निःशंकपणें राज्याचा उपभोग घे. कारण तुझा शत्रु जो तुझा भ्राता, त्याचा आतां वध झाला आहे. हे वानरराजा,

ह्याप्रमाणें मी तुझी प्रिया विलाप करीत असतांनाहि तूं माझ्याशीं कां बरें भाषण करीत नाहींस? येथें आलेल्या ह्या आपल्या अनेक श्रेष्ठ भार्यांकडे तरी पहा."

हा तिचा विलाप श्रवण केल्यावर चोहोंकडून जुळलेल्या दीन व दुःखाकुल वानरस्त्रिया अंगदाला कवटाळून धरून आक्रोश करूं लागल्या. नंतर तारा म्हणाली, "भूषणांनीं भूषित व वीरघातक बाहूंनीं युक्त असलेल्या वानरराजा, अंगदाला सोडून तूं कां बरें दीर्घ प्रवासाला निघाला आहेस? अरे, प्रिय व मनोहर रूप धारण करीत असून गुणांनींहि तुजसमान असलेल्या पुत्राला सोडून देऊन ह्याप्रमाणें निघून जाणें तुला योग्य नाहीं. हे महापराक्रमी वानरसेनाधिपते, अविचारानें माझ्या हातून जर कांहीं आपल्या मर्जीविरुद्ध गोष्ट घडली असेल, तर आपण मला क्षमा करा. हे वीर, मी आपल्या चरणीं मस्तक ठेवितें."

ह्याप्रमाणें वानरींसहवर्तमान भर्त्याचे समीप दीन स्वरानें तारा रोदन करूं लागली, आणि उत्कृष्ठ कांतीनें युक्त असलेल्या त्या तारेनें, ज्या भूमीवर वाली पडला होता, त्या भूमीसमीप असलेल्या भूमीवर अन्न ग्रहण न करितां प्राण सोडण्याचा निश्चय केला.

---

## सर्ग एकविसावा.

### हनुमत्मुखें तारेचें सांत्वन.

तदनंतर आकाशांतून च्युत झालेल्या तारेप्रमाणें भूमीवर पडलेल्या त्या तारेचें वानरसेनाधिपति हनुमान हलके हलके सांत्वन करूं लागला. तो म्हणाला, "गुणदोषांमुळें जें प्राण्याच्या हातून स्वर्गनरकादि फलसाधनरूप कर्म घडलेलें असतें, त्याचें सर्व बरेंवाईट फल मरणानंतर स्वस्थ असलेल्या ह्या प्राण्याला प्राप्त होतें. वास्तविक तूं शोचनीय असतांना शोचनीय अशा दुसऱ्या कोणाकरितां शोक करीत आहेस? आणि स्वतःच दीन असून दुसऱ्या कोणा दीनाकरितां तुला कळवळा येत आहे? बुडबुड्याप्रमाणें असलेला हा देह नाहींसा झाल्यावर खरोखर कोण बरें कोणाच्या शोकास पात्र होणार आहे? कुमार अंगदाकडे पाहून ह्या वालीच्या मरणोत्तरसमयीं कोणतीं कृत्यें करण्यास योग्य आहेत, ह्याचा तूं पुत्रवतीनें विचार केला पाहिजे. प्राण्यांचें जन्ममरण ह्याप्रमाणें अनियमित असल्याचें तुला विदितच आहे. तस्मात् हे समंजस राजपत्नि,

ह्या प्रसंगीं लौकिकी रोदन वगैरे न करितां भर्त्याला परलोकीं सुखावह होणारें जें कांहीं असेल, तेंच तुला केलें पाहिजे. जो जिवंत असतांना शेंकडों, हजारों, लाखों वानरांची मनाप्रमाणें उपजीविका चालत असे, तो आज मृत्यु पावला आहे. ज्या अर्थीं ह्यानें नीतिशास्त्ररूप तत्त्वाला अनुसरून राज्य चालविलें आहे, आणि ज्या अर्थीं साम, दान व क्षमा ह्यांविषयीं तत्पर राहूनच इतर वानरांशीं हा वागत असे, त्या अर्थीं धर्मानें पृथ्वी जिंकणाऱ्या राजांचें स्थान ह्याला प्राप्त होईल. ह्याच्याविषयीं शोक करण्याचें तुला कारण नाहीं. हे निर्दोष राजपत्नि, सर्व वानरश्रेष्ठ, हा तुझा पुत्र अंगद, आणि वानर व ऋक्षगण ह्यांचा अधिपति जो वाली त्याचें राज्य, हीं सर्व तुझ्यामुळेंच सनाथ होणारीं आहेत. तस्मात् हे राजपत्नि, शोकाकुल झालेल्या ह्या उभयतां चुलत्या-पुतण्यांना तूं उत्तरकार्य करण्याची अनुज्ञा दे, आणि तूं हातीं धरलेल्या ह्या अंगदाला पृथ्वीचें परिपालन करूं दे. शास्त्रामध्यें संततीचें जें कर्तव्य सांगितलें आहे, आणि राजासंबंधानें जें कर्तव्य करणें सध्यां प्राप्त झालें आहे, तें सर्व केलें पाहिजे. शोक करीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कालानें अवश्य घडणारीच गोष्ट ही झालेली आहे. तस्मात्, वानरराज वालीचें उत्तरकार्य होऊन अंगदाला राज्याभिषेक झाला पाहिजे, म्हणजे आपल्या पुत्राला सिंहासनावर बसलेला पाहून तुझ्या मनाला स्वस्थता वाटेल."

### तारेचें हनुमंताला उत्तर.

हें त्याचें भाषण श्रवण केल्यावर, पति मरणानें दुःखित झालेली तारा समीप उभ्या असलेल्या हनुमानाला म्हणाली, "अंगदासारखे शंभर पुत्र एका बाजूला घालून वध पावलेल्या ह्या वीराच्या देहाला आलिंगन देणें हें जर दुसऱ्या बाजूला घातलें, आणि सुखाची तुलना करून पाहिली, तर वध पावलेल्याहि ह्या वीराच्या देहाला आलिंगन देणेंच मला जास्त सुखावह आहे. आतां वानरराज्यालाहि मी योग्य नाहीं, आणि अंगदाचीहि मी मालकीण नाहीं. सांप्रत सर्व गोष्टींविषयीं त्याचा चुलता सुग्रीवच त्याला माझ्यापेक्षां जवळ आहे. हनुमंता, अंगदाला मीं अभिषेक करावा, असा विचार तूं मनामध्येंहि आणूं नको. कारण हे वानरश्रेष्ठा, पितृतुल्य असलेला सुग्रीवच माझ्या पुत्राला सुख देण्याविषयीं अधिकारी आहे, मज मातेचा तो अधिकार नाहीं. सारांश, वानरराज वालीच्या आश्रयापेक्षां इहलोकीं अथवा परलोकीं अधिक योग्य असें

मला कांहींही नाहीं. संग्रामामध्यें परावृत्त न होतां वध पावलेल्या ह्या वीरानें स्वीकारिलेल्या या शय्येचेंच सेवन करणें मला योग्य आहे."

## सर्ग बाविसावा.

### वालीचा सुग्रीवाला उपदेश.

सर्व प्रकारें मुमुर्षु होऊन हलके हलके श्वासोच्छ्वास करणारा वाली इकडे तिकडे पाहूं लागला असतां, प्रथमतः कनिष्ठ भ्राता सुग्रीवच त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां विजयी झालेल्या त्या वानरराज सुग्रीवाला हांक मारून तो स्पष्ट वाणीनें प्रेमपूर्वक त्याला म्हणाला, "सुग्रीवा, तूं मला दोष लावूं नको. कारण, प्राक्तनकर्माच्या प्रभावामुळें अवश्य होणाऱ्या बुद्धिभ्रमाच्या तावडींत मी माझे इच्छेविरुद्ध सांपडल्यामुळें अशा गोष्टी घडून आल्या. बा सुग्रीवा, आपणां उभयतांना एकदम सुख होणें आपल्या नशिबीं लिहिलेलेंच नव्हतें, असें मला वाटतें. आणि म्हणूनच आपल्या ह्या बंधुविषयक प्रेमाचा परिणाम विपरीत झाला, असें मी समजत आहें. आतां ह्या वनचर वानरांच्या राज्याचा तूं आजच स्वीकार कर, आणि मीहि आजच यमसदनीं जात आहें, असें समज. जीवित, राज्य, विपुल संपत्ति आणि निष्कलंक यश ह्या सर्वांचा त्याग करून हा मी सत्वर चालता होत आहें. राजन्, ह्या अवस्थेमध्यें जें कांहीं मी सांगत आहें, तें जरी करण्यास कठीण असलें, तरीहि तूं करच. सुखाला पात्र, सुखामध्यें वाढलेला आणि बाल असूनहि बुद्धीनें बालिश नसलेला हा अंगद अश्रूंनीं मुख व्याप्त होऊन भूमीवर पडलेला तूं अवलोकन कर; आणि प्राणापेक्षांहि मला अधिक प्रिय असलेल्या परंतु मीं सोडिलेल्या ह्या माझ्या गुणसंपन्न पुत्राचें तूं औरस पुत्राप्रमाणें सर्व प्रकारें परिपालन कर. हे वानरराजा, माझ्याप्रमाणें तूंच आतां ह्याचा पिता, दाता, परित्राता आणि भय प्राप्त झालें असतां सर्व प्रकारें अभय देणारा असा आहेस. तारेपासून झालेला हा माझा वैभवशाली पुत्र पराक्रमामध्यें तुझी बरोबरी करणारा आहे. तेव्हां रामाशीं विरोध धरणाऱ्या राक्षसांचा वध करण्याविषयीं हा तुझ्या पुढें होईल. हा बलाढ्य, तरुण व तेजस्वी तारापुत्र संग्रामामध्यें पराक्रम करून आपल्याला अनुरूप अशीं कर्में करील. ही सुषेणकन्या ताराहि सूक्ष्म गोष्टींचा निर्णय करण्याविषयीं आणि नानाप्रकारचीं संकटें आलीं असतां त्यांतून पार पडण्याचे

उपाय जाणण्याविषयीं सर्व प्रकारें अतिशयच समर्थ आहे. ही जें चांगलें म्हणेल, तें तूं निःसंशय करीत जा. तारेनें योग्य ठरविलेली कोणतीहि गोष्ट विपरीत होत नाहीं. रघुवंशज रामाचेंहि जें कांहीं कार्य कर्तव्य असेल, तें तूं निःशंकपणें कर. तें न करण्यांत तुझा अधर्म होणार असून, त्याचा अपमान झाल्यामुळें तुझाहि तो वध करील. सुग्रीवा, ही दिव्य सुवर्णमाला तूं धारण कर. कारण हिचे ठिकाणीं असलेली प्रशस्त जयश्री मी मृत झाल्यावर हिला सोडून जाईल."

ह्याप्रमाणें भ्रातृप्रेमामुळें वालीनें सुग्रीवाला सांगितलें असतां, हर्षाचा त्याग करून पुनरपि ग्रहण लागलेल्या चंद्राप्रमाणें तो दीन झाला. वालीच्या त्या भाषणामुळें सुग्रीवाच्या मनांतील वैरबुद्धि नाहींशी झाली, व त्यानें केलेल्या योग्य उपदेशाप्रमाणें लक्ष्यपूर्वक वागण्याचें मनांत धरून वालीच्या अनुज्ञेनें त्यानें ती सुवर्णमाला स्वीकारिली.

### वालीचा अंगदाला उपदेश.

असो. सुग्रीवाला ती सुवर्णमाला देऊन व तेथें असलेल्या आपल्या पुत्राकडे पाहून, मरण्याविषयीं निश्चित झालेला तो वाली प्रेमानें अंगदाला म्हणाला, "देशकालाकडे लक्ष्य देऊन, प्रिय व अप्रिय प्रकार सहन करून, आणि प्रसंग असतां सुखदुःख सोसून तूं आजपासून सुग्रीवाच्या मतानें वागत जा. हे महापराक्रमी पुत्रा, मीं ज्याप्रमाणें नेहमीं तुझें लालन केलें, त्याप्रमाणें जर तूं वागूं लागलास, तर सुग्रीव तुझी विशेषशी पर्वा करणार नाहीं. हे शत्रुदमना, ह्याच्या अनुपकाऱ्याशीं अथवा ह्याच्या शत्रूशीं कधींहि सख्य न करितां जितेंद्रिय व स्वामी अशा सुग्रीवाच्या कार्याविषयीं तत्पर राहून तूं नेहमीं त्याच्या मर्जीप्रमाणें वागत जा. ह्याच्याशीं तूं फार लगटपणाहि करूं नको, आणि ह्यापासून दूरदूरहि रहात जाऊं नको. कारण हीं दोन्हीहि मोठीं अनर्थावह आहेत. तस्मात्, तूं मध्यम मार्गाकडे लक्ष्य देऊन वागत जा."

### वालीचें प्राणोत्क्रमण.

ह्याप्रमाणें अंगदाला सांगितल्यावर रामबाणामुळें अतिशयच व्यथित झालेला तो वाली डोळे फिरवूं लागला, आणि भयंकर असे आपले दांत वासून गतप्राण झाला. तेव्हां सेनानायक वध पावल्यामुळें वानर आक्रोश करूं लागले, आणि तेथें असलेले ते सर्वहि वानरश्रेष्ठ शोक करूं लागले. ते म्हणाले, "महापराक्रमी असा हा वानरराज वाली स्वर्गाला जातांक्षणीं आज ही किष्किंधा नगरी,

उपवनें, पर्वत व अरण्यें हीं सर्व शून्य दिसत आहेत; आणि वानरश्रेष्ठ वालीचा वध झाल्यामुळें आम्ही सर्व वानर निस्तेज झालों आहों. अहो, महात्म्या व महापराक्रमी गोलभ गंधर्वाशीं ज्यानें पंधरा वर्षेंपर्यंत रात्रीं अथवा दिवसां न थांबतां मोठें युद्ध करून सोळाव्ये वर्षीं त्याचा वध केला, आणि त्या दुष्ट गंधर्वाचा वध केल्यावर दंष्ट्रांच्या योगानें भयंकर दिसणाऱ्या ज्या वालीनें आम्हां सर्वांचें भय नाहींसें केलें, त्याच ह्या वालीचा आज कसा बरें वध झाला ! ”

असो. गायींच्या अधिपतीचा वध झाला असतां ज्याप्रमाणें वनांत संचार करणाऱ्या गायींना सिंहयुक्त महावनामध्यें स्वस्थता वाटत नाहीं, त्याचप्रमाणें वानरराज वीर वालीचा वध झाल्यावर वध करणाऱ्या रामचंद्रानें युक्त असलेल्या त्या वनामध्यें वानरांना स्वस्थता वाटेनाशी झाली; आणि ह्याप्रमाणें वाली गतप्राण झाल्यानंतर दुःखसागरांत निमग्न झालेल्या तारेनें भर्त्याच्या मुखाकडे पाहून त्याला कवटाळून धरिलें, व महावृक्षाच्या आश्रयाला असलेली लता ज्याप्रमाणें तो वृक्ष तुटून पडला असतां भूमीवर पडते, त्याप्रमाणें ती भूमीवर पडली !

## सर्ग तेविसावा.

### ताराविलाप.

तदनंतर वानरराज वालीचें तें मुख हुंगीत हुंगीत ती जगविख्यात तारा आपल्या मृत पतीला म्हणाली, “ हे वीरा, माझ्या सांगण्याप्रमाणें न वागल्यामुळें विषम पाषाणांनीं व्याप्त आणि म्हणूनच अत्यंत दुःखदायक अशा ह्या भूतलावर तूं दुःखानें शयन करीत आहेस. हे वानरराजा, खरोखर पृथ्वीच तुला माझ्यापेक्षां जास्त प्रिय आहे. कारण तिला कवटाळून धरून तूं शयन करीत आहेस; आणि माझ्याशीं नुसतें भाषणहि करीत नाहींस. हे साहसप्रिया, हा रामरूप विधाताच सुग्रीवाचे अधीन झाला आहे. तस्मात्, सुग्रीवालाच पराक्रमी समजलें पाहिजे. मोठमोठ्या अस्वलांनीं व वानरांनीं तुज बलाढ्याची सेवा केलेली आहे. तेव्हां त्यांचा व शोक करणाऱ्या अंगदाचा दुःसह विलाप आणि माझे हे शब्द श्रवण करून तूं कां बरें जागा होत नाहींस ! ज्या ठिकाणीं पूर्वीं तूंच आपल्या शत्रूंचा वध करून त्यांना निजविलेंस, तीच ही वीरशय्या होय; आणि त्याच शय्येवर तूं आज युद्धामध्यें वध पावून शयन

करीत आहेस. हे युद्धप्रिया, मी तुला प्रिय असून तूं शुद्धसात्त्विक कुलामध्यें उत्पन्न झालेला आहेस. तेव्हां हे मान्या, मला एकटीला अनाथ सोडून देऊन तूं गेलास, हें काय बरें ? खरोखर विचारी पुरुषानें आपली कन्या शूद्राला कधींहि देऊं नये. पहा—मी शूरभार्या असल्यामुळें एकाएकीं मला वैधव्य येऊन माझा घात झाला आहे ! आज माझी मानमान्यता नाहींशी होऊन माझ्या शाश्वत सुखाचीहि परिसमाप्ति झाली आहे ! आणि अगाध अशा शोकसागरामध्यें मी बुडून गेलें आहें. खरोखर हें माझें बळकट हृदय अभेद्य पाषाणाचेंच केलेलें आहे. कारण वध पावलेल्या भर्त्याला पाहूनहि ह्याचे आज शेंकडों तुकडे झालेले नाहींत. स्वभावतःच मला प्रिय असलेला हा माझा मित्ररूप भर्ता शूर असून शत्रूला प्रहार करण्याविषयीं पराक्रमी असतांनाहि वध पावला ! पतिहीन झालेली स्त्री खुशाल पुत्रवती असो, किंवा तिच्याजवळ धनधान्यांची समृद्धि असो, ज्ञानी लोक तिला ‘ विधवा ’ असें म्हणतात. हे वीरा, इंद्रगोपप्रभृति कीटकांसारखा रंगीत पलंगपोस जिच्यावर अंथरला आहे, अशा स्वतःच्या शय्येवर ज्याप्रमाणें तूं शयन करीत होतास, त्याप्रमाणें स्वतःच्याच शरिरापासून उत्पन्न झालेल्या ह्या रक्ताच्या थारळ्यांत तूं शयन करीत आहेस. हे वानरश्रेष्ठा, धूळ आणि रक्त ह्यांनीं चोहोंकडून व्याप्त झालेल्या ह्या तुझ्या शरिराला मला हातांनीं आलिंगन देतां येत नाहीं. त्या अतिभयंकर वैरामध्यें सुग्रीव आज कृतकृत्य झाला ! कारण, रामानें सोडिलेल्या एका बाणाच्या योगानें आज त्याचें भय नाहींसें झालें. तूं मृत्यु पावल्यामुळें तुझ्या मुखाकडे निरखून पहात असलेल्या मला, तुझ्या हृदयामध्यें खिळून राहिलेल्या बाणामुळें तुझ्या शरिराला आलिंगन देतां येत नाहीं. ”

हें तिचें भाषण श्रवण केल्यावर, तेथें असलेल्या नीलानें, पर्वताच्या गुहेमध्यें लीन होऊन राहिलेल्या देदीप्यमान सर्पाप्रमाणें त्याच्या शरिरामध्यें खिळून राहिलेला तो बाण बाहेर काढिला. तो बाण रक्तानें भरला असल्यामुळें, बाहेर निघतांना त्याचें तेज अस्ताचलाशीं किरणें संयुक्त झालेल्या सूर्याप्रमाणें दिसूं लागलें, व त्याच्या शरिराला झालेल्या जखमांतून सर्व बाजूंनीं रक्ताचे प्रवाह, ताम्र व गैरिक ह्या धातूंनीं युक्त अशा पर्वतावरील जलधारांप्रमाणें वाहूं लागले ! नंतर रणभूमींतील धुळीनें व्याप्त झालेल्या भर्त्याच्या देहावरील धूळ झाडूं लागलेल्या तारेनें, रामबाणानें वध पावलेल्या आपल्या शूर भर्त्याला अश्रूंनीं स्नान घातलें; आणि सर्वांगावर रक्ताचा सडा होऊन मरून पडलेल्या त्या पतीला

अवलोकन करून, पिंगटवर्ण नेत्रांनीं युक्त असलेल्या अंगद नामक पुत्राला ती तारा म्हणाली, " वत्सा, अत्यंत भयंकर अशी ही पित्याची शेवटली अवस्था अवलोकन कर. प्राक्तनपापकर्मामुळें उत्पन्न झालेल्या वैराचा अंत झाला! बाळा, बालसूर्याप्रमाणें उज्ज्वल शरिरानें युक्त असलेल्या ह्या आपल्या यमसदनाला गेलेल्या वानरराज मान्य पित्याला अभिवंदन कर."

ह्याप्रमाणें तारेनें सांगितलें असतां अंगद उठला, आणि 'मी अंगद आहें' असें म्हणत म्हणत त्यानें आपल्या पुष्ट व वर्तुल हातांनीं पित्याचे चरण धरिले. तेव्हां वाली कांहींच बोलत नाहीं असें पाहून तारा म्हणाली, " अंगद आपणांला अभिवंदन करीत असतांना आपण पूर्वींप्रमाणें त्याला 'दीर्घायु हो' असा आशीर्वाद कां बरें देत नाहीं? सिंहानें एकाएकीं मारून टाकिलेल्या वृषभाचे समीप स्थित असलेल्या सवत्स गायीप्रमाणें मी पुत्राला घेऊन गतप्राण झालेल्या आपल्या शेजारीं उभी आहें. आपण संग्रामयोग करून त्या अवभृथामध्यें रामबाणरूप उदकानें मज पत्नीशिवाय कसें बरें स्नान केलें? देवराज इंद्रानें युद्धामध्यें संतुष्ट होऊन जी प्रिय सुवर्णमाला आपणांला दिली होती, ती माझ्या कां बरें दृष्टीस पडत नाहीं? अस्ताचलास जाणाऱ्या सूर्याची प्रभा ज्याप्रमाणें त्या पर्वतराजाला सोडून जात नाहीं, त्याप्रमाणें आपण गतप्राण झालां असूनहि आपले ठिकाणीं असलेलें राजतेज आपणांला सोडून अद्यापि गेलें नाहीं. माझें तें हितकारक भाषण आपण ऐकिलें नाहीं, आणि म्हणूनच आपलें निवारण करण्यास मी समर्थ झालें नाहीं. ह्यास्तव, युद्धामध्यें आपला वध झाल्यामुळें माझाहि पुत्रासहवर्तमान घात झाला असून, ही राजलक्ष्मी आपणांबरोबर माझाहि त्याग करीत आहे."

## सर्ग चोविसावा.

### सुग्रीवाचा दुःखमूलक वैताग.

अतिवेगवान, दुस्तर व प्रचंड शोकसागरामध्यें मग्न झालेल्या तारेला अवलोकन करून, बलाढ्य सुग्रीवाला आपल्याला अयोग्य अशा भ्रातृवधाचें दुःख होऊं लागलें. त्याचें मुख अश्रूंनीं भरून गेलें, आणि मनाला खेद वाटून दासांनीं परिवेष्टित आणि शोक करीत असलेला तो विचारी सुग्रीव क्षणभर तिच्याकडे पाहून हलके हलके रामासमीप गेला, आणि राजचिन्हें व सर्पतुल्य

भयंकर बाण ह्यांनीं युक्त असून हातामध्यें धनुष्य धारण केलेल्या यशस्वी व उदार रामाला म्हणाला, " राजन्, प्रतिज्ञा केल्याप्रमाणें तूं हें दृष्ट फलानें युक्त असलेलें कर्म केलें आहेस; परंतु हे राजपुत्रा, जीवितहि व्यर्थ झालेल्या माझें मन भोग्य वस्तूंपासून आज परावृत्त झालें आहे. रामा, ही राजपत्नी अतिशय रडत असल्यामुळें, किष्किंधा नगर दुःखसंतप्त होऊन अतिशय आक्रोश करीत असल्यामुळें, आणि राजाचा वध झाल्या कारणानें अंगदाचें जीवितहि पितृवियोगानें संशयित झाल्याचें दिसत असल्यामुळें, राज्याचे ठिकाणीं माझें मन रमत नाहीं. हे इक्ष्वाकुवंशजश्रेष्ठा, भ्रात्यानें माझा अतिशयच पराभव केला असल्या कारणानें, क्रोधामुळें व असहिष्णुतेमुळें पूर्वीं मला त्याचा वध होणें बरें वाटलें होतें; परंतु हा वानरसेनानायक वध पावल्यावर आतां मला अत्यंत दुःख होत आहे. स्वजातीला उचित असें वर्तन करून कशाहि रीतीनें वर्तन ठेवण्याचा प्रसंग आला, तरी त्या ऋष्यमूक नामक श्रेष्ठ पर्वतावर वास्तव्य करणें आज श्रेयस्कर आहे, असें मला वाटतें; परंतु त्याचा वध करून स्वर्ग प्राप्त झाला तरी तो नको. ' मी तुझा घात करणार नाहीं, तूं चालता हो ' असे जें हा विचारी महात्मा मला म्हणाला, तें त्याचें म्हणणें त्यालाच योग्य असून, हें माझें वधरूप कर्म, व तो वध घडवून आणणारें भाषण मात्र मलाच योग्य आहे. कोणीहि भ्राता जरी कितीही विषयलंपट असला, तरी राज्यप्राप्तीचें सुख आणि भ्रातृवधामुळें होणारें दुःख ह्यांचा सारासार विचार करूं लागल्यावर गुणवान भ्रात्याचा वध करणें माझ्याप्रमाणें त्याला कसें बरें रुचेल? स्वतःची अपकीर्ति होण्याचा प्रसंग येईल, ह्या भयामुळें वालीला माझा वध अभिमत नव्हता, तरी माझी बुद्धि दुष्ट असल्यामुळें माझ्या हातून मात्र हा भ्रात्याचे प्राण जाण्यास कारणीभूत होणारा अन्याय झालेला आहे. वृक्षशाखेचा तडाका बसल्यामुळें पलायन करण्याचा प्रसंग येऊन मी जेव्हां तुझ्या नांवानें एक मुहूर्तभर आक्रोश करीत बसलों, तेव्हां ' तूं असें फिरून करूं नको ' एवढेंच ह्या वालीनें सांत्वनपूर्वक मला सांगितलें. सारांश बंधुत्व, मोठेपणा आणि धर्म हीं ह्यानें पाळिलीं, व मीं मात्र काम, क्रोध व वानरस्वभाव हीं दर्शविलीं. मित्रा, विश्वरूपाचा वध केल्यामुळें जसें इंद्राला पातक प्राप्त झालें, तसें विचार करण्यास, मनामध्यें आणावयास आणि अवलोकन करण्यासहि अयोग्य असें हें पातक भ्रात्याच्या वधामुळें मला प्राप्त झालें आहे. इंद्राचें पातक पृथ्वी, उदक, वृक्ष आणि स्त्रिया ह्यांनीं खुशाल स्वीकारिलें; परंतु हे वानराचें पातक घेण्याची

कोणाला इच्छा आहे ? आणि तें घेण्यास समर्थ तरी कोण आहे ! राघवा, कुलाचा नाश ज्याच्या योगानें होईल, अशा प्रकारचें हें धर्मविरुद्ध कर्म माझ्या हातून घडल्यामुळें मी प्रजेच्या सन्मानास अथवा यौवराज्यासहि पात्र नाहीं. तेव्हां मी राज्याला पात्र कोठून होणार ? इहलोकीं निंद्य, परलोकींहि परमार्थाच्या आड येणारें आणि क्षुद्र प्राण्यालाच योग्य असलेलें पातक माझ्या हातून घडलें असल्यामुळें, पर्जन्यवृष्टीच्या उदकाचा प्रवाह जसा सखल प्रदेश व्याप्त करून टाकितो, तसा हा प्रचंड शोक मला व्यापून टाकीत आहे. सहोदर भ्रात्याचा वध हेच ज्याचे दुसरे अवयव व केश आहेत, आणि संताप हेंच ज्याचें डोकें, सोंड, मस्तक व दांत आहेत, असा हा पापमय प्रचंड हत्ती मद-दत्त होऊन नदीच्या तीराप्रमाणें मला धडका मारीत आहे. हे पुरुषश्रेष्ठा राघवा, निस्तेज आणि म्हणूनच अग्नीमध्यें तापत घातलेलें सुवर्ण जसें मळ नाहींसा करून टाकितें, तसें हें माझ्या मनाला लागून राहिलेलें दुःसह पातक माझें जन्मांतरार्जित पुण्य नाहींसें करीत आहे. राघवा, महाबलाढ्य वानरसेनाधिपतीचें हें कुल, माझ्याकरितां आणि ह्या अंगदाच्या शोकतापामुळें अर्धवट मेल्यासारखें झालें आहे, असें मला वाटतें. पित्याला पुन्नामक नरकापासून तारणारा सज्जन, आणि पित्याच्या आज्ञेंत वागणारा असा अंगदासारखा पुत्र प्राप्त होणें सुलभ नाहीं; आणि जेथें सहोदर भ्रात्याची गांठ पडेल, असा कोणता प्रदेशहि येथें विद्यमान नाहीं. हा श्रेष्ठ वीर अंगद आज जिवंत राहील, असें मला वाटत नाहीं. तथापि हा जर जिवंत राहिला, तर त्याचें परिपालन करण्याकरितां त्याची माताहि जिवंत राहील; परंतु शोकामुळें दीन झालेली ही तारा पुत्रा-वांचून मात्र जिवंत राहणारच नाहीं, असें मला निश्चित वाटत आहे. तस्मात्, भ्रात्याशीं व त्याच्या पुत्राशीं सख्य व्हावें एतदर्थ मी अत्यंत प्रदीप्त अग्नीमध्यें प्रवेश करितों. हे श्रेष्ठ वानर तुझ्या आज्ञेमध्यें वागणारे आहेत, व हे सीतेचा शोध लावितील. हे राजपुत्रा, मी परलोकीं गेल्यावरहि हें तुझें संपूर्ण कार्य सिद्धीस जाईल. ह्यास्तव रामा, कुलघातकी आणि म्हणूनच जिवंत राहाण्यास अयोग्य अशा मज पाप्याला तूं अग्निप्रवेश करण्याविषयीं अनुज्ञा दे."

### तारेचा वैताग.

ह्याप्रमाणें दुःखित होऊन सुग्रीवानें केलेलें भाषण श्रवण केल्यावर, शत्रु-पक्षीय वीरनाशक रघुवीर रामाच्याहि नेत्रांमध्यें अश्रु आले, आणि क्षणभर

त्याला कांहीं सुचेनासेंहि झालें. तो त्याच वेळीं दुःखामध्यें मग्न झाल्यामुळें रोदन करणारी तारा अत्यंत उत्सुक, वारंवार इकडे तिकडे पहाणाऱ्या, जगत्पालक व पृथ्वीसारख्या क्षमाशील रामाच्या दृष्टीस पडली. सुंदर नेत्रांनीं युक्त असलेली ती वानराधिपतीची स्वामिनी व वानरराज वालीची उदार पत्नी पतीला कवटाळून भूमीवर पडली असतां, श्रेष्ठ मंत्र्यांनीं तिला उठविलें. तेव्हां भर्त्याला कवटाळण्याकरितां तडफडत असलेल्या त्या तारेला ते मुख्य मुख्य मंत्री भर्त्यापासून दूर नेऊं लागले असतांना, स्वतःच्या तेजानें सूर्यासारखा प्रकाशमान होत असलेला राम हातामध्यें धनुर्बाण घेतलेला तिनें अवलोकन केला; व राजलक्षणांनीं संपन्न, मनोहर नेत्रांनीं युक्त, आणि पूर्वीं कधींच पहाण्यांत न आलेला असा तो पुरुषश्रेष्ठ अवलोकन केल्याबरोबर, हा काकुत्स्थ आहे, असें त्या मृगनयनेनें पक्कें जाणिलें. तेव्हां संकटांत सांपडल्यामुळें दुःखित झालेली ती कुलीन तारा विवळत विवळत तत्काल त्या इंद्रतुल्य व अजिंक्य अशा महापराक्रमी रामाचे समीप गेली; आणि शोकामुळें देहभानावर नसलेली ती विचारी तारा, शुद्ध अंतःकरणानें युक्तच संग्रामांत लक्ष्यभेद करण्याविषयीं सर्वांपेक्षां अधिक अशा त्या रामाला म्हणाली, "आरक्तवर्ण नेत्रांनीं युक्त असलेला तूं योगिजनांनाहि प्राप्त होण्यास अशक्य आहेस, जितेंद्रिय आहेस व उत्कृष्ट धर्मानें चालणारा आहेस. तुझें ज्ञान होणें दुर्घट आहे. तुझी कीर्ति कधींहि क्षीण होणारी नाहीं व तूं पृथ्वीप्रमाणें क्षमाशील असून ज्ञानी आहेस. हातामध्यें धनुर्बाण धारण केलेला तूं महाबलाढ्य असून, तुझें शरीरहि बांधेसूत आहे; व तुझ्याच हस्तें वध पावलेला वाली मनुष्यदेहामध्यें प्राप्त होणाऱ्या सुखाचा त्याग करून दिव्य देहानें प्राप्त होणाऱ्या सुखाचा उपभोग घेत आहे. ह्यास्तव हे वीरा, ज्या बाणाच्या योगानें माझ्या प्रिय पतीचा वध झाला, त्याच बाणाच्या योगानें तूं माझा वध कर, म्हणजे मी तत्काल त्याचे समीप जाईन. त्या वालीला माझ्यावांचून चैन पडावयाचें नाहीं. हे निर्मलकमलपत्राक्षा, स्वर्गामध्यें नानाप्रकारच्या रक्तपुष्पांचे गजरे मस्तकामध्यें घालून अद्भुत वेष धारण केलेल्या अप्सरांचा जरी त्याला समागम झाला, तरी तो मला पाहूं लागेल, आणि मी त्याच्या दृष्टीस पडलें नाहीं, म्हणजे त्या अप्सरांचाहि तो उपभोग घेणार नाहीं. सारांश हे वीरा, ज्याप्रमाणें सीतेचा विरह झाल्यामुळें ऋष्यमूक पर्वताच्या तटासमीप असलेल्या रम्य प्रदेशामध्येंहि तूं शोकाकुल व निस्तेज झाला आहेस, त्याचप्रमाणें तो वाली स्वर्गामध्येंहि माझा विरह झाल्यामुळें शोका-

ग्रस्त व निस्तेज होईल! तात्पर्य स्त्रीचा वियोग झाला असतां तरुण पुरुषाला कसें दुःख होतें, हें तूं तर जाणीत आहेस. तेव्हां हें लक्ष्यांत आणून तूं माझा वध कर, म्हणजे माझ्या विरहामुळें वालीला दुःख होणार नाहीं. हे राजपुत्रा, आपल्याला स्त्रीवधाचा दोष लागेल, असें जर तुज महात्म्याला वाटत असेल, तर तेंहि बरोबर नाहीं. ही तारा वालीचा आत्माच आहे, असें समजून तूं माझा वध कर, म्हणजे स्त्रीहत्येचा दोष तुला लागणार नाहीं. अरे, शास्त्र-विहित अनुष्ठानाचा पतीसहवर्तमान अधिकार असल्यामुळें, आणि स्त्री हा पतीचा अर्धा आत्मा आहे, अशा अनेक श्रुती असल्यामुळें स्त्री वस्तुतः पुरुषा-हून भिन्न नाहीं. शिवाय स्त्रीदानासारखें दुसरें दानहि ज्ञानवानांच्या दृष्टीनें ह्या जगतामध्यें नाहीं. ह्यास्तव, तूंहि धर्माकडे लक्ष्य देऊन मला त्या माझ्या प्रियाचे स्वाधीन कर. कारण हे वीरा, तुझ्या हातून हें दान झालें म्हणजे माझ्या पतीच्या वधाचें तुला पातक लागणार नाहीं. मी अनाथ व दुःखाकुल झालें असून सांप्रत मला आपल्या पतीपासून हे श्रेष्ठ मंत्री दूर नेत आहेत. तेव्हां अशा अवस्थेमध्यें असलेल्या माझा वध न करणें तुला योग्य नाहीं. गजाप्रमाणें विलासी, गतीनें युक्त, श्रेष्ठांना योग्य अशी उत्कृष्ट सुवर्णमाला धारण करणारा आणि वानरांमध्यें श्रेष्ठ असा जो माझा विचारी पति वाली त्याच्या-वांचून मी फार दिवस जिवंत राहाण्यास समर्थ नाहीं."

ह्याप्रमाणें तारेनें विनंति केली असतां, तिचें सांत्वन करून तो महात्मा प्रभु राम तिच्याशीं हितावह भाषण करूं लागला. तो म्हणाला, "हे वीरपत्नि, तूं असें भलतेंसलतें मनामध्यें आणूं नको. हें सर्व जगत् विधात्यानें निर्माण केलें असून, यांत भोगावें लागणारें हें सर्व सुखदुःखहि त्या विधात्यानेंच केलें आहे, असें श्रुतीनें सांगितलें आहे; आणि म्हणूनच त्रैलोक्यांतील प्राणी त्याच्या अधीन असून त्यानें जें ठरविलें असेल, तें टाळण्यास समर्थ होत नाहींत. तुझ्या पुत्राला यौवराज्य प्राप्त होईल, आणि तें प्राप्त झालें म्हणजे तुलाहि पहिल्याप्रमाणेंच पराकाष्ठेचा आनंद होईल. हे राजपत्नि, शूरांच्या स्त्रिया कधीं शोक करीत बसत नाहींत. ही जी गोष्ट झाली, ती तशीच व्हावयाची म्हणून विधात्यानें ठरविलें होतें."

ह्याप्रमाणें त्या महात्म्या, शत्रुतापन व महाप्रभावी रामानें तिचें सांत्वन केलें असतां, उत्कृष्ट वेष व रूप ह्यांनीं युक्त असलेली ती तारा आपलें सुरू अस-लेलें तोंड बंद करून स्वस्थ राहिली!

# सर्ग पंचविसावा.

## राममुखें सर्वांचें सांत्वन.
### ( कालसामर्थ्यवर्णन. )

लक्ष्मणासहवर्तमान असलेला तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम त्यांच्याचप्रमाणें शोक करूं लागला, आणि सुग्रीवाचें व अंगदासहवर्तमान तारेचें सांत्वन करण्याकरितां म्हणाला, "शोकसंतापामुळें मृताला कधींहि सुगति प्राप्त होत नाहीं. तस्मात्, आतां ह्यानंतर जें कांहीं कर्तव्य असेल, तें तुम्ही करा. लोकव्यवहाराप्रमाणें वागलेंच पाहिजे, आणि त्याप्रमाणें तुम्हीं अश्रुहि ढाळिलेतच; परंतु आतां मरणानंतर जें कांहीं कर्तव्य असेल, तें करा. वेळ निघून गेली म्हणजे कोणतेंहि सत्कर्म करितां येत नाहीं. जगतामध्यें सर्व कांहीं कालावरच अवलंबून असून कर्मेंहि कालवरच साध्य होत असतात; आणि त्याचप्रमाणें धर्माचा अधिकार असलेल्या प्राण्यांना विहित असलेले जे ज्योतिष्टोमादि याग, ते होण्यालाहि कालच कारण आहे. कोणतेंहि कर्म कालाचा आश्रय असल्यावांचून कोणालाहि करितां येत नाहीं, व कालाचा आधार असल्यावांचून विहित कर्म करण्यालाहि पुरुष समर्थ होत नाहीं. लोकव्यवहार हा प्राक्तनकर्मावर अवलंबून आहे, आणि त्या कर्माला कालाचाच मुख्य आश्रय आहे. कालामुळें अवश्य घडणाऱ्या गोष्टी घडण्याला कधीं कालातिक्रमण होत नाहीं, व त्या कधीं आधींहि घडून येत नाहींत. सारांश, प्राक्तनकर्माच्या कचाट्यांत सांपडलेल्या कोणत्याहि प्राण्याला अवश्य घडणारी गोष्ट टाळितां येत नाहीं. ह्या कालस्वरूप ईश्वराच्या ठिकाणीं कोणाविषयींहि पक्षपात नाहीं. तो टाळण्याकरितां कोणताहि उपाय चालत नाहीं. त्याच्यापुढें कसल्याहि पराक्रमाची मात्रा चालत नाहीं. मित्र आणि ज्ञातिसंबंध ह्यांचाहि कांहीं उपयोग होत नाहीं, आणि तो भगवान काल कोणाच्या इच्छेप्रमाणेंहि वागणारा नाहीं. सुखदुःखादि प्राप्त होणें हें सर्व कालाधीन असलेल्या आपापल्या कर्मांचेंच फल आहे, असें विवेकी पुरुषानें मनांत जाणावें. कारण धर्म, अर्थ आणि काम हे कालाला अनुसरून प्राप्त होत असतात. साम व दान ह्यांनीं संपादन केलेल्या ऐश्वर्याच्या योगानें शुभ कर्माचें फल जो राज्याचा उपभोग, तो वानरराज वालीला इहलोकीं प्राप्त झाला होता, आणि सांप्रतहि त्याला स्वकर्माचेंच फल प्राप्त झालें आहे. सारांश, स्वधर्मामुळें त्या महात्म्यानें इहलोकीं स्वर्ग संपादन करून

ठेविला होता, आणि सांप्रत युद्धामध्यें प्राणाला मुकल्यामुळें त्याला तो प्राप्तहि झाला आहे. ही कालकृत व्यवस्था अपरिहार्य आहे, आणि तीच वानरसेनाधिपति वालीला प्राप्त झाली आहे. तस्मात्, आतां शोक पुरे झाला. समयाला उचित असें जें कर्म, तें आतां होऊं द्या."

वालीचें और्ध्वदेहिक.

हें रामाचें भाषण संपल्यावर, देहभानावर नसलेल्या सुग्रीवाला शत्रुदमन लक्ष्मण म्हणाला, "सुग्रीवा, मरणानंतर कर्तव्य असें ह्या वालीचें और्ध्वदेहिक कर्म तूं कर, आणि तारा व अंगद ह्यांसहवर्तमान तूं वालीला दहन करण्याच्या उद्योगाला लाग. वालीचा संस्कार करण्याकरितां तूं पुष्कळ शुष्क काष्ठें व दिव्य चंदन जमविण्याची आज्ञा कर, व मनामध्यें खिन्न झालेल्या ह्या दीन अंगदाचें तूं सांत्वन कर. असा पोरकट विचार मनामध्यें आणूं नको. हें किष्किंधा नगर तुझ्या अधीन आहे. पुष्पें, नानाप्रकारचीं वस्त्रें, घृत, तेल, सुगंधि द्रव्यें आणि इतरहि आवश्यक साहित्यें हीं सर्व अंगद घेऊन येईल. हे तार, सत्वर लगबगीनें जा, आणि तेवढी पालखी घेऊन ये. कारण ह्या प्रसंगीं योग्य त्वराच फायदेशीर होणारी आहे. पालखी वाहून नेण्याचा सराव असलेले समर्थ व बलाढ्य वानर तयार होऊं द्या, म्हणजे ते वालीला घेऊन जातील."

सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणारा व शत्रुपक्षीय वीरांचा घात करणारा लक्ष्मण सुग्रीवाला ह्याप्रमाणें सांगून आपल्या भ्रात्यासमीप उभा राहिला. नंतर लक्ष्मणाचें भाषण श्रवण केल्यावर अंतःकरणाची धांदल उडून गेलेला तार पालखी आणण्याचा उद्देश मनांत धरून सत्वर गुहेमध्यें गेला, आणि पालखी घेऊन परत फिरला. वाहाण्याचा सराव असलेले शूर वानर ती पालखी घेऊन येत होते. ती दिव्य शिबिका रथासारखी असून राजाला उचित अशा मोठ्या मूल्यवान आसनानें ती युक्त होती. तिच्या आसमंताद्भागीं पक्ष्यांचीं चित्रें काढलेलीं होतीं. नानाप्रकारच्या वृक्षांच्या चित्रांनीं तिला शोभा आणिलेली होती. पायदळांच्या चित्रांनीं ती व्याप्त झालेली होती. सर्व बाजूंनीं तिची रचना उत्तम प्रकारें केलेली होती, आणि जाळ्या व खिडक्या ह्यांनीं युक्त असून ती सिद्धांच्या विमानाप्रमाणें दिसत होती. तिच्या रचनेची योजना फार उत्कृष्ठ होती. ती विशाल असून कारागिरांनीं उत्तम प्रकारें बनविलेली होती. काष्ठनिर्मित क्रीडापर्वतांनीं ती युक्त होती. मोहक असें काम तिच्यावर केलेलें होतें. उत्कृष्ठ भूषणें व माळा ह्यांनीं ती संपन्न असून चित्रविचित्र पुष्पांच्या योगानें

सुशोभित केलेली होती. वर पिंजरी घालून आच्छादित केलेली होती. आरक्त-वर्ण चंदनानें ती भूषित केलेली होती. पुष्पसमुदायांनीं ती व्याप्त झालेली होती, आणि बालसूर्यासारखा ज्यांचा वर्ण आहे, अशा उज्ज्वल कमलमालांनीं ती आच्छादित झालेली होती.

अशा प्रकारची ती शिबिका अवलोकन करून राम लक्ष्मणाला म्हणाला, " वालीला सत्वर न्या, आणि त्याचा और्ध्वदेहिक संस्कार करा. " ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां, अंगदासहवर्तमान आक्रोश करीत असलेल्या सुग्रीवानें गतप्राण झालेल्या त्या वालीला नानाप्रकारच्या अलंकारांनीं, पुष्पांनीं व वस्त्रांनीं भूषित करून पालखींत ठेविलें; आणि "नदीच्या तीराजवळ ह्याचें और्ध्व-देहिक करा " म्हणून आज्ञा करून तो म्हणाला, " नानाप्रकारचीं असंख्य रत्नें उधळीत उधळीत वानरांनीं पुढें जावें, आणि त्यांच्या मागून पालखी जावी. सारांश, ह्या भूतलावर राजांच्या संपत्ति ज्या प्रकारच्या दृष्टीस पडतात, त्या प्रकारच्या संपत्तींच्या योगानें वानरांनीं राजाचें क्रियाकर्म करावें. "

सुग्रीवाच्या ह्या आज्ञेप्रमाणें वानरांनीं वालीचा और्ध्वदेहिक संस्कार सत्वर केला. नंतर बंधुवध झालेले ताराप्रभृति सर्व वानर अंगदाला सत्वर कवटाळून आक्रोश करीत करीत वालीकडे चालते झाले. तदनंतर वालीचे अधीन असलेल्या सर्व वानरस्त्रिया एकत्र जमल्या, आणि ' हे वीरा, हे वीरा, ' असें म्हणून त्या आपल्या प्रिय पतीविषयीं अधिकच करुणस्वरानें आक्रोश करीत करीत मागोमाग चालल्या. तेव्हां त्या वानरस्त्रियांच्या रोदनस्वराच्या योगानें वनामध्यें प्रतिध्वनि निघूं लागल्या-मुळें वृक्षसमुदाय आणि पर्वत चोहोंकडून आक्रोशच करीत आहेत कीं काय असा भास होऊं लागला. पर्वतावरून वहात येणाऱ्या एका नदीच्या निर्जन व जलानें परिपूर्ण अशा वाळवंटावर असंख्य वनचर वानरांनीं चिता तयार केली. नंतर श्रेष्ठ श्रेष्ठ वानरांनीं आपल्या खांद्यांवरून पालखी खालीं उतरली, आणि शोकाकुल झालेले ते सर्व वानर एकांत स्थलाचा आश्रय करून उभे राहिले. पालखींत पडलेल्या पतीला अवलोकन करितां क्षणीं तारेला अत्यंत दुःख झालें, आणि त्या वालीचें मस्तक आपल्या मांडीवर ठेवून ती विलाप करूं लागली.

तारा म्हणाली:—" हे मजवर प्रेम करणाऱ्या वानरमहाराजा, हे नाथा, हे महामान्य, हे महापराक्रमी, हे प्रिया, माझ्याकडे पहा. अरे, शोकानें व्याप्त झालेल्या ह्या स्त्रियांकडे तूं कां बरें पहात नाहींस ! हे मान्य, गतप्राण झालेल्याहि

तुझें मुख जिवंत असलेल्या पुरुषाप्रमाणें आनंदित व अस्ताचलाला गेलेल्या सूर्याप्रमाणें आरक्तवर्ण दिसत आहे. हे महाराजा, रामाच्या रूपानें हा कालच तुला परलोकीं ओढून नेत आहे, आणि रणामध्यें एकाच बाणाच्या योगानें तुझा वध करून यानें आम्हां सर्वांना विधवा करून टाकिलें आहे. हे राजाधिराज, ज्यांना उड्या मारितां येत नाहींत, अशा या तुझ्या वानरस्त्रिया तुझ्याकरितां पायांनीं चालत चालत फारच दूर आल्या आहेत, हें तुझ्या गांवीं सुद्धां कसें येत नाहीं ? खरोखर चंद्रासारख्या आल्हादकारक मुखांनीं युक्त असलेल्या ह्या तुझ्या प्रिय भार्या आहेत; परंतु हे वानराधिपते, तूं सांप्रत ह्यां-च्याकडे अथवा सुग्रीवाकडे कां बरें पहात नाहींस ? राजा, हे तुझे तारप्रभृती मंत्री आले आहेत, आणि हे नगरवासी लोक तुझ्याभोंवतीं गराडा देऊन खेद करीत आहेत. तस्मात् हे शत्रुदमना, तूं ह्या मंत्र्यांना जाण्याची अनुज्ञा दे, म्हणजे आम्ही सर्वहि पूर्वींप्रमाणें तुझ्यासह वनामध्यें क्रीडा करूं.''

ह्याप्रमाणें पतीच्या शोकानें व्याप्त झालेली तारा विलाप करीत पडली असतां शोकाकुल झालेल्या वानरस्त्रियांनीं तिला उठविलें. तदनंतर शोकानें ज्याचें अंतःकरण ग्रस्त झालें आहे, अशा त्या अंगदानें रडत रडत आपल्या त्या पित्याला सुग्रीवाच्या साहाय्यानें चितेवर ठेविलें. नंतर यथाविधि अग्नि देऊन अंतः-करणामध्यें व्याकुळ झालेल्या त्या अंगदानें फारच दूर मार्गाला लागलेल्या आपल्या पित्याला एक उलटी प्रदक्षिणा केली, आणि त्या वालीचा यथाविधि संस्कार करून त्याला उदक देण्याकरितां श्रेष्ठ श्रेष्ठ वानर शुभ जलानें युक्त असलेल्या पवित्र नदीवर गेले. तदनंतर अंगदाला पुढें करून सुग्रीव आणि तारा ह्यांसहवर्तमान तेथें एकत्र जुळलेल्या वानरांनीं वालीच्या नांवानें पाणी सोडिलें. तेव्हां दीन सुग्रीवाप्रमाणें दीन होऊन त्याच्याचप्रमाणें शोक करूं लागलेल्या महाबलाढ्य ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें वालीचे और्ध्वदेहिक संस्कार करविले. असो. नंतर इक्ष्वाकुवंशज श्रेष्ठ रामाच्या बाणानें उघडपणें वध पाव-लेल्या त्या महापराक्रमी व प्रदीप्त अग्नीप्रमाणें तेजस्वी असलेल्या वालीचें दहन करून सुग्रीव लक्ष्मणासहवर्तमान असलेल्या रामासमीप गेला.

# सर्ग सव्विसावा



## सुग्रीवाला राज्याभिषेक.

तदनंतर आर्द वस्त्रानें युक्त व शोकसंतप्त झालेल्या सुग्रीवाभोंवतीं गराडा देऊन वानरसेनेचे अधिपति उभे राहिले, आणि ब्रह्मदेवासमीप जाऊन उभे राहाणाऱ्या ऋषींप्रमाणें, महापराक्रमी व सरळ रीतीनें वागणाऱ्या रामापाशीं जाऊन सर्वहि हात जोडून स्थित झाले. तदनंतर बालसूर्याप्रमाणें आरक्तवर्ण मुखानें युक्त व सुवर्णाचा पर्वतच की काय असा धिप्पाड असलेला वायुपुत्र हनुमान हात जोडून म्हणाला, "श्रीरामा, उत्तम दंष्ट्रा आणि समृद्ध बल ह्यांनीं युक्त असलेल्या महात्म्या वानरांना प्राप्त होण्यास अतिदुर्घट असलेलें हें वाडवडिलांपासून चालत आलेलें प्रचंड राज्य आपल्या प्रसादामुळें प्राप्त झालें आहे. आतां आपली अनुज्ञा झाल्यावर शुभ नगरामध्यें प्रवेश करून सुग्रीव सुहृदगणांसहवर्तमान सर्व कार्य उरकून टाकील, आणि स्नान करून हा नानाप्रकारचे सुगंध, औषधि, पुष्पें आणि रत्नें ह्यांच्यायोगानें विशेषेंकरून तुझें यथाविधि पूजन करील. ह्यास्तव ह्या पर्वताच्या रमणीय गुहेमध्यें तूं जा, आणि स्वामी ह्या नात्यानें सुग्रीवाचा वानरांशीं संबंध घडवून आणून तूं त्यांना आनंद दे."

ह्याप्रमाणें हनुमानानें सांगितलें असतां राम हनुमानाला म्हणाला, "हे विनयसंपन्न हनुमाना, चौदा वर्षें संपूर्ण होत तोंपर्यंत मी ग्रामामध्यें अथवा नगरामध्यें प्रवेश करणार नाहीं. कारण मी पित्याची आज्ञा शेवटास नेणारा आहें. ह्यास्तव ह्या वानरश्रेष्ठ वीर सुग्रीवानें अत्यंत समृद्ध अशा दिव्य गुहेमध्यें प्रवेश करावा, आणि ह्यालाच सत्वर यथाविधि राज्याभिषेक व्हावा."

ह्याप्रमाणें हनुमानाला सांगितल्यानंतर, सदाचार जाणणारा राम सदाचार-संपन्न आणि महाबलाढ्य व महापराक्रमी अशा हनुमानाला म्हणाला, "अंगदालाहि यौवराज्याचा अभिषेक करीव. कारण हा वीर, ज्येष्ठ जो वाली त्याचा ज्येष्ठ पुत्र असून पराक्रमानें त्याची बरोबरी करणारा आहे, आणि म्हणूनच यौवराज्याला पात्र आहे. हे विनयसंपन्ना, हे वर्षाकालचे चार महिने आहेत; पैकीं पर्जन्यानें युक्त असा हा वर्षाकालसंबंधीं श्रावण मास दोन ऋतूं-पैकीं पहिल्याच ऋतूंतला आहे. तस्मात्, हा उद्योगाचा समय नव्हे. तूं शुभ नगरीमध्यें प्रवेश कर, आणि मी लक्ष्मणासहवर्तमान तोंपर्यंत ह्या पर्वतावर वास्तव्य करीन. हे विनय सुग्रीवा, ही पर्वताची गुहा रमणीय, विशाल व

हवाशीर असून कमलपुष्पांची आणि उदकाची हिच्यामध्यें समृद्धि आहे. तेव्हां मी ह्या गुहेमध्यें वास्तव्य करीन. कार्तिक लागल्यावर तूं रावणाच्या वधाविषयीं यत्न कर. हा आपला संकेत ठरला आहे. आतां तूं स्वस्थानाप्रत जा. अंगदाला यौवराज्याचा अभिषेक कर, आणि सुहृदांना आनंद दे."

ह्याप्रमाणें रामानें अनुज्ञा दिल्यावर वानरश्रेष्ठ सुग्रीव वालीनें रक्षण केलेल्या रमणीय किष्किंधा नगरीमध्यें प्रविष्ठ झाला. तेव्हां हजारों वानर त्या वानर-राजाच्या मागोमाग गेले, आणि सर्व बाजूंनीं त्याच्या भोंवतीं उभे राहिले. नंतर सर्व मंत्र्यांनीं वानरगणाधिपति सुग्रीवाला अवलोकन करितांक्षणीं मस्तकानें त्याला प्रणाम करून साष्टांग नमस्कार घातला. तेव्हां स्वस्थ अंतः-करणानें युक्त असलेल्या त्या मंत्र्यांना उठवून व त्यांच्याशीं संभाषण करून तो वीर्यवान व महाबलाढ्य सुग्रीव भ्रात्याच्या शांत अंतःपुरामध्यें प्रविष्ठ झाला. तो भयंकर पराक्रम करणारा वानरश्रेष्ठ सुग्रीव प्रविष्ठ झाल्यावर इंद्राला अभिषेक करणाऱ्या देवांप्रमाणें सुहृदांनीं त्याला अभिषेक केला. ज्या-वर सुवर्णाचें काम केलेलें आहे, असें श्वेत छत्र वानरांनीं त्याच्याकडे आणिलें; आणि त्याचप्रमाणें सुवर्णदंडांनीं युक्त व यशस्कारक अशा शुभ्र चौऱ्या, सर्व प्रकारचीं बीजें, औषधि व चिकाळू वृक्षांच्या पारंब्या, पुष्पें, शुभ्र वस्त्रें, श्वेत-वर्ण अनुलेपनें, सुगंधि पुष्पें, भूमीवर येणारीं कमलें, दिव्य चंदन, नानाप्रका-रचीं पुष्कळ सुगंधि द्रव्यें, अक्षता, सुवर्ण, वाघंटीं, मध, तूप, दहीं, व्याघ्रचर्म आणि उत्कृष्ठ पादुका हें सामानहि ते घेऊन आले; आणि गोरोचन व मन-शीळ हें अनुलेपनद्रव्य बरोबर घेऊन आनंदित झालेल्या सोळा श्रेष्ठ कन्याहि तेथें आल्या. तदनंतर त्यांनीं वानरश्रेष्ठ सुग्रीवाला यथाविधि अभिषेक करण्या-करितां नानाप्रकारच्या वस्त्रांनीं व भक्ष्य पदार्थांनीं द्विजश्रेष्ठ ब्राह्मणांना संतुष्ट केलें. दर्भांचीं परिस्तरणें घालून प्रज्वलित केलेल्या अग्नीमध्यें मंत्रवेत्त्या लोकांनीं घृताचा समंत्रक होम केला. राजवाड्यांतील हेमप्रतिष्ठान नांवाच्या रम्य, उत्कृष्ठ आस्तरणें घातलेल्या आणि चित्रविचित्र पुष्पांनीं सुशोभित केलेल्या गच्चीवर एक श्रेष्ठ आसन घालून त्यावर सुग्रीवाला मंत्र म्हणून यथाविधि प्राङ्मुख बसविलें. नद्या व नद आणि आसमंताद्भागीं असलेलीं तीर्थें ह्यां-पासून उदक आणून, आणि त्याचप्रमाणें सर्व समुद्रांपासूनहि निर्मल जल आणून वानरश्रेष्ठांनीं सुवर्णकुंभामध्यें ठेविलें. अष्टवसूंनीं ज्याप्रमाणें सहस्रनयन इंद्राला अभिषेक केला, त्याचप्रमाणें बैलाचीं पवित्र शिंगें व सुवर्ण-

कलश ह्यांमध्यें तें निर्मल व सुगंधि उदक घालून महर्षींनीं सांगितल्याप्रमाणें शास्त्रोक्त पद्धतीनें गज, गवाक्ष, गवय, शरभ, गंधमादन, मैंद, द्विविध, हनुमान आणि जांबुवान ह्यांनीं सुग्रीवाला अभिषेक केला.

अंगदाला यौवराज्याभिषेक.

ह्याप्रमाणें सुग्रीवाला राज्याभिषेक झाल्यावर वानरश्रेष्ठ आनंदित होऊन गर्जना करूं लागले. नंतर रामाची आज्ञा शेवटास नेण्याकरितां वानराधिपति सुग्रीवाला आलिंगन देऊन त्याला यौवराज्याचा अभिषेक केला. तेव्हां सर्व महात्म्या सदय वानरांनीं ' शाबास, शाबास ' म्हणून सुग्रीवाची प्रशंसा केली. अशा प्रकारचें वर्तमान त्या किष्किंधा नगरींत घडल्यामुळें सर्वहि संतुष्ट होऊन महात्म्या रामाची व सुग्रीवाची वारंवार स्तुति करूं लागले. तेव्हां पर्वताच्या गुहेमध्यें असलेली व पताका आणि ध्वज ह्यांनीं सुशोभित झालेली ती रमणीय किष्किंधा नगरी तुष्ट व पुष्ट जनांनीं व्याप्त दिसूं लागली.

असो. ह्याप्रमाणें झालेल्या महाभिषेकाचें वर्तमान महात्म्या रामाला निवेदन करून, आणि आपली भार्या रुमा प्राप्त करून घेऊन, देवराज्याचा स्वीकार करणाऱ्या इंद्राप्रमाणें त्या वानरसेनाधिपति वीर्यवान सुग्रीवानें वानरराज्याचा स्वीकार केला.

## सर्ग सत्ताविसावा.

### श्रीरामाचें प्रस्रवण पर्वतीं वास्तव्य.

सुग्रीव गुहेमध्यें प्रविष्ठ होऊन त्याला राज्याभिषेक झाल्यावर, भ्रात्यासहवर्तमान राम प्रस्रवण पर्वताकडे आले. तो पर्वत व्याघ्र व मृग ह्यांनीं नादित झालेला होता. भयंकर गर्जना करणाऱ्या सिंहांनीं व्याप्त झालेला होता. नानाप्रकारच्या झांकरांनीं व वेलींनीं तो अगदीं झांकला गेलेला होता. अनेक वृक्षांनीं तो गजबजलेला होता. ऋक्ष, वानर, गोपुच्छ व मार्जार ह्यांनीं त्याचा आश्रय केलेला होता. तो मेघसमुदायाप्रमाणें दिसत होता, आणि सर्वदा कल्याणकारक व पुण्यवर्धक असा होता. त्या पर्वताच्या शिखरावर एक मोठी विस्तीर्ण गुहा वास्तव्य करण्याकरितां लक्ष्मणासहवर्तमान रामानें स्वीकारिली. सुग्रीवाशीं बेत केल्यावर तो निष्पाप रघुनंदन विनयसंपन्न आणि लक्ष्मीवर्धक अशा आपल्या भ्रात्या लक्ष्मणाशीं समयोचित व भारदस्त भाषण करूं लागला. तो म्हणाला,

"ही पर्वताची गुहा रमणीय, विशाल व हवाशीर आहे. तस्मात्, लक्ष्मणा, पर्जन्यकाल संपेपर्यंत आपण ह्या गुहेमध्यें वास्तव्य करूं. हें पर्वतशिखर रमणीय व उत्कृष्ठ असून श्वेतवर्ण, कृष्णवर्ण आणि ताम्रवर्ण शिलांनीं हें भूषित झालेलें आहे. हें नानाप्रकारच्या धातूंनीं व्याप्त झालेलें आहे. नदीसंबंधीं बेडूक ह्या ठिकाणीं आहेत. नानाप्रकारच्या वृक्षसमुदायांनीं हें सुंदर दिसत आहे. चित्रविचित्र लतांनीं हें युक्त आहे. अनेक प्रकारच्या पक्ष्यांचा येथें किलबिलाट चाललेला आहे. उत्कृष्ठ मयुरांच्या शब्दांनीं हें नादित झालेलें आहे. मालतीचीं व कुंदाचीं झांकरें, निर्गुडी, शिरस व प्रफुल्लित कळंब, अर्जुनसादडा आणि साल ह्या वृक्षांनीं हें सुशोभित झालेलें आहे. लक्ष्मणा, प्रफुल्लित कमलांच्या योगानें भूषित झालेलें हें रमणीय सरोवर आपल्या गुहेपासून फारसें लांब नसेल. ईशान्येच्या बाजूस सखल असलेल्या प्रदेशावर असलेली ही गुहा सुखसाधनच होईल; आणि पश्चिमेच्या बाजूनें किंचित् चढ असलेली ही गुहा निवाऱ्याचीहि असेल. लक्ष्मणा, गुहेच्या दाराशीं पसरलेल्या कज्जलपर्वताप्रमाणें विस्तृत, कृष्णवर्ण, सपाट व सुखावह अशी एक शिळा आहे. बा लक्ष्मणा, आकारानें विदीर्ण झालेल्या कज्जलपर्वतासारखें दिसत असून आकाशांत आलेल्या ढगा-प्रमाणें भासणारें असें हें शुभ पर्वतशिखर उत्तरेच्या बाजूला तूं अवलोकन कर, आणि त्याचप्रमाणें दक्षिण दिशेस असलेलें दुसरें एक शिखर पहा. नानाप्रकारच्या धातूंनीं झळकत असलेलें, आणि श्वेत वस्त्रासारखें भासमान होत असलेलें हें शिखर कैलासशिखराची बरोबरी करणारें आहे. चित्रकूटा-चलावर असलेल्या जान्हवीतुल्य मंदाकिनीप्रमाणें अत्यंत निर्मल अशी पूर्व-वाहिनी नदी गुहेसभोवतीं असलेली तूं अवलोकन कर. चंदन, तिळवा, साल, तमाल, कस्तुरी, मोगरा, पद्मक, सरल आणि अशोक ह्यांच्या योगानें ही सुशोभित झालेली आहे. देवनळ, तिमिद, बकुल, केतक, हिंताळ, तिवस, कळंब, वेत आणि बाहवा अशा अनेक प्रकारच्या तीरावरील वृक्षांनीं सुशोभित असल्यामुळें वस्त्रें व भूषणें ह्यांनीं युक्त व अलंकार धारण केलेल्या स्त्रीप्रमाणें ही दिसत आहे. शेंकडों पक्षिगणांमुळें नानाप्रकारच्या ध्वनींनीं ही नादित झालेली असून, परस्परांवर प्रेम करणाऱ्या चक्रवाक पक्ष्यांच्या योगानें ही भूषित झालेली आहे. अत्यंत रमणीय वाळवंटांनीं ही युक्त असून हंस व सारस पक्ष्यांनीं हिचा आश्रय केलेला आहे, आणि नानाप्रकारच्या रत्नांनीं युक्त असलेली ही नदी हास्य करीत असल्यासारखी दिसत आहे. कोठें कोठें

नील कमलांनीं, कोठें कोठें आरक्त कमलांनीं व कांहीं ठिकाणीं श्वेतवर्ण व दिव्य कमलकलिकांनीं ही आच्छादित झाल्यासारखी दिसत आहे. शेंकडों जलचर पक्ष्यांनीं व मुनिगणांनीं आश्रय केलेली ही सौम्य व रमणीय नदी मयूर आणि क्रौंच पक्ष्यांच्या ध्वनीनें नादित झालेली आहे. चंदनवृक्षांच्या अत्यंत रमणीय रांगा तूं अवलोकन कर, आणि मनाप्रमाणें उगवलेल्या अशा ह्या ह्या ककुभ वृक्षांच्या रांगा दिसत आहेत, त्याहि तूं पहा. हे शत्रुनाशका, हा प्रदेश अत्यंत रमणीय आहे. आपणांला येथें करमणूक होईल. तेव्हां आपण खुशाल येथें वास्तव्य करूं. अद्‌भुत वनांनीं युक्त असलेली ही सुग्रीवाची रमणीय किष्किंधा नगरी येथून फार लांब नाहीं. कारण मृदंग आणि आडंबर[1] ह्यांसहवर्तमान गायनोपयुक्त वाद्यांचा व गर्जना करीत असलेल्या वानरांचा ध्वनि येथें ऐकूं येत आहे. ह्यावरून भार्या प्राप्त होऊन वानरश्रेष्ठ सुग्रीवाला राज्यहि मिळालें आहे, आणि प्रचंड ऐश्वर्य प्राप्त झाल्यामुळें सुहृदांनीं परिवेष्ठित असलेला तो सुग्रीव निःसंशय आनंद करीत आहे."

ह्याप्रमाणें बोलून, अनेक उत्कृष्ठ वस्तूंनीं भरलेल्या दऱ्या व कुंजवनें ज्यावर आहेत, अशा त्या प्रस्रवण पर्वतावर लक्ष्मणासहवर्तमान तो रघुवंशज राम वास्तव्य करूं लागला. परंतु अत्यंत सुखावह आणि सुखसाधनभूत अनेक द्रव्यांनीं युक्त असलेल्या त्या पर्वतावर वास्तव्य करीत असलेल्या रामाचें यत्किंचित्‌हि चित्तरंजन झालें नाहीं. कारण विशेषतः उदयाचलावर असलेला चंद्र दृष्टीस पडला असतां प्राणापेक्षांहि अधिक प्रिय असलेली जी रावणानें नेलेली भार्या, तिचें स्मरण होत असल्यामुळें रात्रीं शय्येवर पडला असतांना त्याला कधींहि निद्रा येत नसे; आणि त्या वियोगजन्य शोकामुळें नेत्र अश्रूंनीं भरून येऊन त्याच्या मनाला मुळींच चैन पडत नसे. तेव्हां नेहमीं दुःखपरायण होऊन शोक करीत असलेल्या त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला समदुःखी भ्राता लक्ष्मण नम्रपणानें म्हणाला, "हे वीरा, आतां हें दुःख करणें पुरें झालें. तुझ्यासारख्याला शोक करणें हें प्रशस्त नाहीं. कारण शोक करीत असलेल्या पुरुषाचे सर्वहि मनोरथ जागच्या जागींच राहातात, हें तुला विदितच आहे. हे रघुनंदना, तूं जगतामध्यें उद्योगतत्पर, देवकार्यार्थ वाहिलेला, आस्तिक, धर्मशील व व्यवसायी म्हणून प्रसिद्ध आहेस; आणि पराक्रम दर्शविण्याचें स्थान जो संग्राम, त्यामध्यें विशेषतः कपटाचें अवलंबन करणाऱ्या त्या शत्रु राक्षसांचा वध करण्यास तूं

[1] ढोल, रणढोल.

उद्योगशील बनल्यावांचून समर्थ होणार नाहींस. तस्मात्, शोक सोडून देऊन तूं आतां एकसारखा उद्योग सुरू ठेव, म्हणजे तूं त्या राक्षसाचा सपरिवार वध करण्यास समर्थ होशील. इतकेंच नव्हे तर उद्योगाचें अवलंबन केल्यावर समुद्र, वनें व पर्वत ह्यांसहवर्तमान पृथ्वीहि उलथीपालथी करण्यास तूं समर्थ होशील. मग त्या रावणाचा वध करण्यास तूं समर्थ होशील, ह्याविषयीं संशय तो कसला ? सांप्रत हा पर्जन्यकाल आलेला आहे. ह्यास्तव शरदृतु येईपर्यंत वाट पहा. शरदृतु प्राप्त झाल्यावर तूं राष्ट्र व परिवार ह्यांसहवर्तमान रावणाचा वध करशील. भस्मामध्यें आच्छादित होऊन राहिलेल्या अग्नीला योग्य वेळीं उद्दीपक आहुतींच्या योगानें ज्याप्रमाणें होमकालीं ऋत्विज प्रदीप्त करितात, त्याचप्रमाणें तुझे ठिकाणीं निद्रिस्थ असलेलें वीर्य खरोखर मी जागृत करीत आहें."

ह्याप्रमाणें त्या लक्ष्मणाच्या हितकारक व शुभ भाषणाला मान देऊन शुद्ध अंतःकरणानें युक्त असलेल्या भ्रातृवत्सल लक्ष्मणाला राम म्हणाला, "अनुरक्त, स्नेहयुक्त, हितकारक आणि अमोघ पराक्रमी अशा भ्रात्यानें जें कांहीं सांगण्यासारखें आहे, तें तूं सांगितलें आहेस. ह्यास्तव, सर्व कार्यांचा नाश करणारा हा शोक मीं सोडून दिला असून, पराक्रमसमयीं अकुंठित असलेलें नैसर्गिक तेज मी आतां वृद्धिंगत करितों. मी तुझ्या सांगण्याप्रमाणें वागण्यास तयार झालों असून, सुग्रीवाचें मन शांत होण्याची आणि नद्यांचें उदक निर्मल होण्याची अर्थात् शरदृतूची वाट पाहात आहें. कोणीं उपकार केला असतां वीर पुरुष त्याच्यावर प्रत्युपकार अवश्य करीतच असतो. कारण दुसऱ्याचा उपकार झाला असतां जो कृतघ्न बनून त्याच्यावर प्रत्युपकार करीत नाहीं, त्याची उपकार करणाऱ्या सामर्थ्यवानाशीं मैत्री राहात नाहीं."

ह्याप्रमाणें रामानें केलेल्या भाषणाला मान देऊन, आणि तेंच योग्य आहे असा विचार करून लक्ष्मणानें हात जोडिले, आणि आपला सुविचार रामाला दर्शविण्याच्या उद्देशानें तो मनोहर मुद्रेनें युक्त असलेल्या रामाला म्हणाला, "राजन्, तुझ्या म्हणण्याप्रमाणें हा तुझा सर्वहि मनोरथ सुग्रीव वानर लवकरच शेवटास नेईल. शत्रूचा निग्रह करण्याविषयीं आपला निश्चय झालेला आहे; तथापि हा पर्जन्यकाल संपेपर्यंत धीर धर. सारांश, क्रोध आवरून धर, शरदृतूची वाट पहा, वर्षाकालाचे हे चार महिने लोटत तोंपर्यंत थांब, आणि शत्रूचा वध करण्याविषयीं समर्थ असलेला तूं शरदृतूपर्यंत कालक्षेप करीत करीत सिंहांनीं आश्रय केलेल्या ह्या पर्वतावर माझ्यासहवर्तमान वास्तव्य कर."

# सर्ग अठ्ठाविसावा.



## वर्षाऋतुवर्णन.

वालीचा वध करून सुग्रीवाला अभिषेक केल्यानंतर माल्यवान पर्वतावर वास्तव्य करीत असलेला राम लक्ष्मणाला म्हणाला, " तो हा काल म्हणजे वर्षाऋतु सांप्रत प्राप्त झाला आहे. कारण पर्वतप्राय मेघांनीं व्याप्त झालेलें आकाश तूं अवलोकन कर. सूर्याच्या किरणांच्या योगानें मेघोदक शोषून घेऊन, कार्तिकप्रभृति नऊ महिनेपर्यंत धारण केलेला व रसायनाप्रमाणें लोकांच्या जविनास कारण होणारा जलरूप गर्भ आकाशरूप स्त्री टाकून देत आहे. मेघरूप जिन्यांच्या समुदायांनीं आकाशावर चढून जाऊन कुडे आणि अर्जुनवृक्ष ह्यांच्या मालांच्या योगानें सूर्याला भूषित करणें शक्य आहे, असें वाटतें. संध्याकाळच्या आरक्तवर्णानें युक्त झाल्यामुळें ताम्रवर्ण आणि शेवटीं श्वेतवर्ण असून जलसंबंधामुळें स्निग्ध ( ओलसर ) दिसत असलेल्या अभ्ररूप फडक्यांनीं आकाश जसें कांहीं जखम बांधलेल्या पुरुषाप्रमाणें दिसत आहे. मंद मंद वहात असलेला वायु हाच ज्याचा निःश्वास आहे, संध्यारूप केशर ज्याला चोपडिलेलें आहे, आणि सभोंवतीं श्वेतवर्ण असलेले मेघ हेच ज्याचे पांडुरवर्ण झालेले गाल आहेत, असें हें आकाश कामातुर पुरुषाप्रमाणें दिसत आहे. सूर्याच्या तेजानें संतप्त होऊन नवीन उदकानें परिप्लुत झालेली ही भूमि, शोकसंतप्त सीता ज्याप्रमाणें अश्रु ढाळीत असेल, त्याप्रमाणें वाफ बाहेर सोडीत आहे. मेघांतून बाहेर पडल्यामुळें कर्पूरवृक्षाच्या पानांप्रमाणें शीतल होऊन केवड्याच्या सुवासानें युक्त झालेले वायु ओंजळीनें पितां येतील कीं काय असे भासत आहेत. प्रफुल्लित अर्जुनवृक्षांनीं युक्त व केतकवृक्षांच्या योगानें सुगंधयुक्त झालेल्या ह्या पर्वताला शत्रूचा नाश झालेल्या वानरश्रेष्ठ सुग्रीवाप्रमाणें जलधारांनीं अभिषेक होत आहे. मेघरूप कृष्णाजिन आणि पर्जन्यधारारूप यज्ञोपवीत धारण करणारे हे पर्वत वायुप्रपूरित गुहांनीं युक्त असल्यामुळें अध्ययन सुरू केलेल्या विद्यार्थ्यांप्रमाणें भासत आहेत. पीतवर्ण विद्युल्लतांनीं ताडित झालेलें हें आकाश अंतर्गत मेघगर्जनारूप ध्वनीनें युक्त झाल्यामुळें, सोन्याच्या चाबुकांनीं ताडित झाल्या कारणानें अंतस्थ वेदना सोशीत असलेल्या उत्कृष्ठ अश्वाप्रमाणें भासत आहे. नील मेघाचा आश्रय करून स्फुरण पावणारी ही विद्युल्लता रावणाच्या अंकावर तडफड करणाऱ्या बिचाऱ्या सीतेप्रमाणें मला

भासत आहे. कामशांतिसाधनरूप स्त्रियांनीं युक्त असलेल्या पुरुषांना सुखकर होणाऱ्या ह्या धुंद झालेल्या दिशा मेघांनीं व्याप्त झाल्या असल्यामुळें त्यांतील ग्रह व चंद्र हे दिसेनातसे झाले आहेत. लक्ष्मणा, जमिनींतून निघणाऱ्या वाफांनीं व्याप्त, प्रफुल्लित, पर्जन्यकाल प्राप्त झाल्यामुळें आनंदित आणि मज शोकग्रस्ताचे ठिकाणीं कामोद्दीपन करणारे कुटजवृक्ष कोठें पर्वतशिखरावर असलेले तूं अवलोकन कर. सांप्रत वातावरणांतील धूळ नाहींशी झाली आहे, वायु शीतल आहे, ग्रीष्मऋतूंतील उष्णताप्रभृति दोषांचा प्रसार नाहींसा झाला आहे, राजांच्या स्वाऱ्या बंद झाल्या आहेत, प्रवासी लोक स्वदेशास जात आहेत, मानस सरोवरावर वास्तव्य करण्याविषयीं उत्सुक असलेले चक्रवाक पक्षी सांप्रत ह्या सरोवराकडे निघाले आहेत, व एकसारख्या पर्जन्याच्या उदकानें बिघडून गेलेल्या मार्गावरून रथादि यानें चालेनातशीं झालीं आहेत. शांत झालेल्या महासागराचें रूप ज्याप्रमाणें कोठें कोठें पर्वतांनीं व्याप्त झालेलें दिसतें, त्याचप्रमाणें ज्यांत इकडे तिकडे मेघ पसरले आहेत, असें हें आकाश कोठें उज्ज्वल आणि कोठें प्रकाशरहित दिसत आहे. शाल व कदंब ह्यांच्या पुष्पांनीं मिश्रित व पर्वतावरील धातूंच्या योगानें ताम्रवर्ण असें नवीन उदक पर्वतावरील नद्या फारच सत्वर वाहून नेत आहेत, आणि त्या शीघ्र जाणाऱ्या उदकाबरोबरच मयूर पक्ष्यांचा ध्वनि लांब जात आहे. भ्रमराप्रमाणें कृष्णवर्ण झालेलीं जांबळें वनचर यथेष्ठ खात आहेत, आणि नानाप्रकारच्या वर्णांनीं युक्त झालेलीं परिपक्व आम्रफलें वाऱ्याचा धक्का लागतांक्षणीं भूमीवर पडत आहेत. विद्युल्लतारूप पताकांनीं व बगळ्यांच्या रांगांनीं युक्त असून पर्वताच्या शिखरांप्रमाणें दिसत असलेले मेघ समरांगणामध्यें स्थित असलेल्या मत्त गजेंद्रांप्रमाणें उच्च स्वरानें गर्जना करीत आहेत. पर्जन्याच्या उदकामुळें ज्यांतील तृण वृद्धिंगत झालें आहे, ज्यांच्यांतील मयूर पक्षी नृत्यरूप उत्साह करण्यास प्रवृत्त झाले आहेत, आणि ज्यांमध्यें मेघांनीं अतिशय वृष्टि केलेली आहे, अशीं अपराण्णकालीं शोभूं लागणारीं वनें अवलोकन कर. बगळ्यांनीं युक्त, गर्जना करणारे व उदकांचें प्रचंड ओझें वाहून नेणारे मेघ पर्वतांच्या मोठमोठ्या शिखरांवर वारंवार विश्रांति घेत घेत जात आहेत. गर्भधारणेकरितां मेघांची इच्छा धरून आकाशामध्यें संचार करणारी, आणि म्हणूनच आनंदित झालेली ही बगळ्यांची माळका मनोहर आकाशाला घातलेली व वायूनें हालत असलेली श्वेत कमळांची दीर्घ माळाच कीं काय अशी भासत आहे. लहान लहान इंद्रगोप-

संज्ञक कीटकांनीं मधून मधून चित्रविचित्र झालेल्या हिरव्यागार गवतानें युक्त झालेली भूमि लाक्षाबिंदुयुक्त अशी पोपटी रंगाची शालजोडी अंगासरशीं पांघरून बसलेल्या स्त्रीप्रमाणें दिसत आहे. निद्रा हळू हळू केशवाकडे जात आहे, नदी सागराकडे सत्वर चालली आहे. आनंदित झालेली बगळ्यांची रांग मेघाकडे निघाली आहे, आणि कामवासना उत्पन्न झालेली स्त्री आपल्या प्रियाकडे गमन करीत आहे. वनप्रदेशामध्यें मयूर पक्ष्यांचीं नृत्यें सुरू झालीं आहेत, कदंब वृक्ष प्रफुल्लित शाखांनीं युक्त झालेले आहेत, आणि पिकांमुळें व वनांमुळें भूमि मनोहर बनली आहे. नद्या वाहूं लागल्या आहेत. मेघांनीं वर्षाव सुरू केला आहे. मत्त गजांनीं गर्जना करण्यास सुरुवात केली आहे. वनप्रदेशामध्यें शोभा येत चालली आहे. प्रिय स्त्रियांचा वियोग झालेले पति चिंताक्रांत होऊं लागले आहेत. मयूर पक्षी नृत्य करण्यास प्रवृत्त झाले आहेत, आणि सुग्रीवाला राज्य प्राप्त झाल्या कारणानें वानरांनाहि धीर येऊं लागला आहे. केतकीपुष्पांचा वास घेऊन आनंदित झालेले, आणि धबधब्याच्या ध्वनींनीं गोंधळून गेलेले मोठमोठे मत्त गज मयूर पक्ष्यांसहवर्तमान वनांतील जलप्रवाहामध्यें गर्जना करीत आहेत. जलधारांनीं ताडित होत असलेल्या व कदंबवृक्षांच्या शाखांवर लोंबत असलेल्या भृंगांचा उत्साहामुळें प्राप्त व पुष्परसाच्या आस्वादानें वृद्धिंगत झालेला मद हळू हळू कमी होत आहे. कृष्णवर्ण राखेच्या पुंजक्याप्रमाणें दिसत असलेलीं आणि रसानें भरलेलीं टपोरीं फळें जंबुवृक्षांच्या शाखांना लटकलेलीं आहेत, आणि त्यामुळें शाखांतील रस शोषून घेण्याकरितां मृगसमुदायच ठिकठिकाणीं त्यांना लगटून राहिलेले आहेत, असें दिसत आहे. विद्युल्लतारूप पताकांनीं विभूषित आणि मोठ्या गंभीर गर्जनेनें युक्त असलेल्या मेघाच्या मुद्रा युद्धाला उत्सुक झालेल्या वानरांच्या मुद्रांप्रमाणें दिसत आहेत. पर्वतावरील वनामध्यें संचार करणारा मत्त गजेंद्र आपल्या मार्गानें जात असतांना, मेघगर्जना कानांवर आल्यामुळें कोणीं प्रतिपक्षी गजानेंच गर्जना केली आहे, अशी शंका घेऊन त्याच्याशीं युद्ध करण्याकरितां परत फिरला आहे. भृंगसमुदायांच्या योगानें कोठें कोठें गायनयुक्त, मयूर पक्ष्यांच्या योगानें कोठें कोठें जसें कांहीं नृत्य करण्यास प्रवृत्त, आणि गजेंद्रांच्या योगानें कोठें कोठें जसे कांहीं मत्त झालेले वनप्रदेश गायन, नृत्य इत्यादि अनेक कलांनीं युक्त असल्यासारखे दिसत आहेत. कळंब, शाल, अर्जुन आणि स्थलकमल ह्यांच्या पुष्पांनीं समृद्ध झालेली, व मधुतुल्य जलानें परिपूर्ण झालेली ही

वनभूमि मयूर पक्ष्यांच्या मत्तावस्थेंतील गर्जना आणि नृत्य ह्यांच्या योगानें पानभूमीप्रमाणें भासत आहे. कारण पानभूमीवरहि पुष्पांचा सडा, मद्याची समृद्धि, मत्त जनांचा शब्द आणि नृत्य इतक्या गोष्टी होत असतात. पर्जन्य-वृष्टीमुळें पंखांच्या रंगांत फेरबदल झालेले तृषाक्रांत पक्षी, पडतां पडतां वृक्षां-च्या पानांवर चिकटून राहिलेलें आणि मोत्यांप्रमाणें दिसत असलेलें अत्यंत निर्मल असें इंद्रदत्त जल आनंदित होऊन पीत असतात. वनामध्यें गायन सुरू झाल्यासारखें दिसत आहे. कारण भृंग गुंजारव करीत असल्यामुळें तंतु-वाद्यांच्या मधुर ध्वनीचा भास होत आहे. बेडूक शब्द करीत असल्यामुळें कोणी गवईच आपल्या कंठांतून तालसूर काढीत असल्यासारखें भासत आहे, आणि मेघांची गर्जना चालू असल्यामुळें मृदंगवादनच सुरू असल्याचा भास होत आहे. मस्तकावरील तुरा व पिसारा ह्या भूषणांनीं युक्त असलेले मयूर पक्षी कोठें कोठें नृत्य करीत असल्यामुळें, कोठें उच्च स्वरानें गर्जना करीत असल्यामुळें आणि कोठें प्रेक्षक म्हणूनच कीं काय वृक्षांवर बसले असल्यामुळें वनामध्यें संगीतच सुरू झाल्यासारखें दिसत आहे. नानाप्रकारचे आकार, वर्ण व ध्वनि ह्यांनीं युक्त असलेले बेडूक मेघांच्या ध्वनीमुळें फार वेळपर्यंत प्राप्त झालेल्या निद्रेचा त्याग करून जागे झाले आहेत, आणि नवीन उदकांच्या धारांनीं ताडित झाल्यामुळें गर्जना करीत आहेत. मदमत्त झालेल्या नदीरूप कामातुर स्त्रिया आपले चक्रवाकरूप स्तन उन्नत करून, आणि भर्त्याकडे जाण्याला आडकाठी आणणाऱ्या तटरूप वृद्ध स्त्रियांना लोटून देऊन, विषयाचा उपभोग परिपूर्ण घेतां यावा, एतदर्थ पुष्पादि नवीन शेले पांघरून मोठ्या उत्सुकतेनें आपल्या समुद्र भर्त्याकडे जात आहेत. दावाग्नीनें दग्ध झालेल्या पर्वताचे ठिकाणीं दावाग्नीनें दग्ध झालेले पर्वत चिकटून राहिले असतां ते जसे मुळें खोल गेल्यामुळें उभे राहिल्यासारखे दिसतील, तसे नीलमेघाचे ठिकाणीं आसक्त झालेले व नूतन जलानें परिपूर्ण असलेले हे नीलमेघ मुळें धरून राहिल्यासारखे दिसत आहेत. मदमत्त झालेले मयूर पक्षी ज्यामध्यें गर्जना करीत आहेत, इंद्रगोपसंज्ञक कीटकांच्या योगानें ज्यांतील हिरवेंचार गवत भरून गेलेलें आहे, आणि कदंब व अर्जुन ह्या वृक्षांच्या पुष्पांनीं जीं सुवासिक झालेलीं आहेत, अशा अत्यंत रमणीय वनामध्यें गज संचार करीत आहेत. पर्जन्याच्या धारांमुळें ज्यांतील पराग झडून गेले आहेत, अशा कमलपुष्पांना घट्ट धरून आनंदित झालेले भ्रमर परागयुक्त नूतन कदंबपुष्पांतील मकरंदाचें पान करीत

आहेत. वनामध्यें जिकडे तिकडे गजेंद्र मत्त झालेले आहेत, मोठमोठे वृषभ आनंदित झालेले आहेत, सिंह आपला पराक्रम जास्त जास्तच गाजवूं लागले आहेत, मोठमोठे पर्वत रमणीय दिसूं लागले आहेत, राजे लोक उद्योग सोडून स्वस्थ बसले आहेत, आणि देवराज इंद्र मेघांच्या योगानें क्रीडा करीत बसला आहे. समुद्राच्या गर्जनेलाहि ज्यांनीं मागें टाकिलें आहे असे गगनाचा आश्रय करून राहिलेले मेघ आपल्या प्रचंड जलप्रवाहांच्या योगानें नद्या, तडाग, सरोवरें, वापी आणि ही संपूर्ण पृथ्वी जलानें परिपूर्ण करून टाकीत आहेत. उदक-वर्षाव अतिशय होत आहे, वायु फारच सोसाट्यानें वहात आहे आणि नद्यांचीं तीरें ढांसळून जाऊन त्यांचें उदक वेगानें वाहूं लागलें आहे, व त्या नद्यांनीं लोकांचे मार्ग बंद पाडिले आहेत. लोक राजांना अभिषेक करूं लागले असतां ज्याप्रमाणें ते राजे आपलें निर्मल रूप व सौंदर्य प्रकट करितात, त्याप्रमाणें देवराजानें दिलेल्या व वायूनें जवळ आणिलेल्या अशा मेघोदकपरिपूर्ण कलशांच्या योगानें अभिषिक्त होत असलेले महापर्वत जसे कांहीं आपलें निर्मल स्वरूप व सौंदर्य प्रकट करीत आहेत. आकाश मेघांनीं व्याप्त झालें असल्यामुळें नक्षत्रें व सूर्य हीं दिसेनातशीं झालीं आहेत. नूतन जलप्रवाहांनीं भूमि भरून गेली आहे, आणि दिशा अधःकारानें व्याप्त झाल्यामुळें प्रकाशरहित झाल्या आहेत. जलधारांच्या योगानें धुपून गेलेलीं पर्वतांचीं प्रचंड शिखरें, उंचवट्यावरून पडत असल्यामुळें लोंबणाऱ्या मोत्यांच्या सरांप्रमाणें दिसणाऱ्या मोठमोठ्या असंख्य धबधब्यांच्या योगानें फारच शोभूं लागलीं आहेत. पर्वतांवरील पाषाणांमुळें ठिकठिकाणीं ज्यांच्या वेगाला अडथळा होत आहे, असे अनेक धबधबे गर्जना करणाऱ्या मयूर पक्ष्यांनीं युक्त असलेल्या उत्कृष्ठ पर्वतांच्या गुहांमध्यें जसे कांहीं तुटून पडत असलेल्या हारांप्रमाणें दिसत आहेत. पर्वतशिखरांवरील प्रदेश ज्यांनीं धुऊन काढिले आहेत, अशा सत्वर वाहणाऱ्या व मोत्यांच्या हारांप्रमाणें दिसणाऱ्या पर्वतावरील असंख्य धबधब्यांना पडतां पडतांच मोठमोठ्या गुहांतील उन्नत प्रदेश धारण करीत आहेत. सर्व दिशांस आसमंताद्भागीं पडत असलेल्या अनुपम धारा स्वर्गनिवासी स्त्रियांच्या हारांतील रतियुद्धामध्यें तुटलेल्या आणि म्हणूनच खालीं गळत असलेल्या मोत्यांप्रमाणें भासत आहेत. पक्षी आपआपल्या घरट्यांत जाऊं लागले असल्यामुळें सूर्यविकासी कमलें मिटूं लागल्यामुळें, आणि मालती विकसित होऊं लागल्यामुळें, सूर्य अस्ताचलास गेल्याचें अनुमान होत आहे. राजांच्या स्वाऱ्या तहकूब झाल्या आहेत, सेना

मार्गांतच तळ देऊन राहिली आहे, आणि अंतःकरणांत धुमसत असलेलें वैर आणि मार्ग ह्यांना उदकांच्या योगानें एकसारखाच अडथळा आलेला आहे. भाद्रपद महिना जवळ आल्यामुळें वेदाध्ययन करणाऱ्या सामवेदी ब्राह्मणांच्या श्रावणीचा हा काल जवळच आला आहे. निवासस्थानाची शाकारणी वगैरे करून, आणि वर्षाकालापुरती बेगमी करून ठेवून, आषाढी पौर्णिमा लागल्यावर कोसलदेशाधिपति भरत खरोखरच चातुर्मास्यासंबंधीं कांहीं तरी नेम करून बसला असेलच. उदकाची भर पडत असल्यामुळें, सरयू नदीचा वेग खरोखरच—येत असलेल्या मला पाहून अयोध्यावासी जनांच्या स्वराप्रमाणें—वर्द्धिगत होत आहे. शत्रूंना पादाक्रांत करून मोठ्या राज्यावर आरूढ झालेल्या सुग्रीवाला ह्या पावसाळ्यांत पीकपाणी चांगलें असल्यामुळें, पत्नीसहवर्तमान सुख होत असेल. परंतु लक्ष्मणा, स्त्रीचा अपहार झाल्यामुळें आणि मोठ्या राज्याला मुकावें लागलें असल्यामुळें, माझी मात्र भिजून गेलेल्या नदीच्या तीराप्रमाणें दैना झाली आहे. माझा शोक तर पुष्कळ वृद्धिंगत झाला आहे. पर्जन्यकालाचे दिवस फार असल्यामुळें ते पार पडणें फारच दुर्घट झालें आहे, आणि प्रचंड शत्रु रावणहि मला अजिंक्य भासत आहे. सुग्रीव जरी नम्र होऊन माझ्या आज्ञेची वाट पहात होता, तरी सांप्रत प्रवास बंद पडल्याचें पाहून, आणि मार्गहि अत्यंत दुर्गम झाल्याचें अवलोकन करून मीं त्याला सीतेचा शोध लावण्याच्या संबंधानें वगैरे कांहीं एक सांगितलें नाहीं. शिवाय, माझें कार्य थोडक्या वेळांत न उकरण्यासारखें असल्यामुळें, अतिशय क्लेश सोसून पुष्कळ दिवसांनीं स्त्रीची गांठ पडलेल्या सुग्रीव वानराला काम सांगण्याचें मीं मनामध्यें आणिलें नाहीं. पर्जन्यकाल संपेपर्यंत विश्रांति घेतल्यानंतर प्राप्त झालेला प्रवासकाल स्वतःच जाणून सुग्रीव माझा उपकार जाणील, ह्यांत संशय नाहीं. तस्मात् हे शुभलक्षणसंपन्न लक्ष्मणा, सुग्रीवाचें मन स्वस्थ होऊन नद्यांचें जल निर्मल होण्याची इच्छा धरणारा मी प्रस्थानकालाची वाट पहात राहिलों आहें. कोणीं उपकार केला असतां वीर पुरुष त्याच्यावर प्रत्युपकार अवश्य करीतच असतो. कारण, दुसऱ्याचा उपकार झाला असतां जो कृतघ्न बनून त्याच्यावर प्रत्युपकार करीत नाहीं, त्याची उपकार करणाऱ्या सामर्थ्यवानाशीं मैत्री राहात नाहीं."

ह्याप्रमाणें रामांनीं लक्ष्मणाला सांगितलें असतां, त्याच्या भाषणाला मान देऊन व तें लक्ष्यांत आणून लक्ष्मणानें हात जोडिले, आणि आपला सुविचार

दर्शविण्याच्या उद्देशानें तो म्हणाला, " राजा, ह्या म्हणण्याप्रमाणें आपला सर्व मनोरथ थोडक्याच दिवसांनीं वानरराज सुग्रीव सिद्धीस नेईल. तेव्हां शत्रूचा निग्रह करण्याचा निश्चय करून आपण शरदतूची प्रतीक्षा करीत रहा, आणि एवढा हा पर्जन्यकाल संपेपर्यंत धीर धरा."

## सर्ग एकोणतिसावा.

### हनुमंताची रामकार्याविषयीं सुग्रीवाला सूचना.

ज्यांतील विद्युल्लता व मेघ नाहींतसे झाले आहेत, जेथें सारस पक्ष्यांच्या समुदायांचा ध्वनि सुरू झाला आहे, आणि रमणीय चंद्रिकेचा थर ज्यामध्यें बसून राहिलेला आहे, असें निर्मल आकाश अवलोकन करून हनुमान सुग्रीवाकडे गेला. त्या सुग्रीवाचा मनोरथ परिपूर्ण झालेला होता. धर्म आणि अर्थ ह्यांचा संग्रह करण्याकडे त्याचें विशेषसें लक्ष्य नव्हतें. कामप्रवृत्तिरूप दुर्जनमार्गाचें अवलंबन तो अतिशयच करीत होता. विषयोपभोगाला योग्य अशा एकांत प्रदेशाचे ठिकाणीं त्याचें चित्त अगदीं वेधून गेलेलें होतें. कार्यसिद्धि होऊन राज्यप्राप्तीचाहि त्याचा उद्देश सिद्धीस गेलेला होता. इतकेंच नव्हे, तर दुसरेहि त्याचे सर्व इष्ट मनोरथ परिपूर्ण झालेले होते. तो सर्वदा तरुण स्त्रियांचेच ठिकाणीं रममाण होऊन राहिलेला होता. योग्य व इष्ट अशी स्वतःची स्त्री व तारा त्याला प्राप्त झालेली होती. कृतकृत्य झाल्यामुळें निश्चिंत होऊन तो अहोरात्र क्रीडा करण्यामध्येंच दंग झालेला होता, आणि म्हणूनच गंधर्व व अप्सरा ह्यांच्या समुदायासहवर्तमान क्रीडा करीत असलेल्या देवराज इंद्राप्रमाणें तो भासत होता. मंत्र्यांवर त्यानें सर्व कामें सोंपविलेलीं होतीं. इतकेंच नव्हे, तर मंत्र्यांची तो कधीं भेटहि घेईनासा झाला होता. राज्याविषयीं सर्व प्रकारची भीति नाहींशी झाली असल्यामुळें विषयलंपट पुरुषाप्रमाणें त्याची अवस्था झालेली होती. तेव्हां भाषणाचें सार जाणणाऱ्या वानरराज सुग्रीवाचें मन मुद्देसूद आणि मनोहर अशा नानाप्रकारच्या भाषणांनीं वळवून, सर्व शास्त्रार्थाविषयीं निश्चय झालेला, कोणत्याहि गोष्टीचें तत्त्व जाणणारा आणि कालाला अनुसरून असणारे विशेष धर्म जाणणारा संभाषणज्ञ वायुपुत्र हनुमान, विनय आणि प्रेम ह्यांनीं संपन्न असून स्वतःचें वचन खरें करण्याविषयीं निश्चित असलेल्या वानरराज सुग्रीवाचे समीप गेला, आणि तत्काल व

परिणामींहि हितकारक, सत्य, साम, धर्म, अर्थ आणि नीति ह्यांनीं भरलेलें भाषण त्याच्याशीं करूं लागला.

हनुमान म्हणाला:—“ राज्य व यश प्राप्त झालें असून कुलपरंपरागत वैभवहि आपण वाढविलें आहे. आतां फक्त मित्राचा संग्रह उरलेला आहे. ह्यास्तव तेवढें कार्य आपण सांप्रत करावें. जो प्रसंग जाणणारा पुरुष मित्राशीं नेहमीं चांगल्या रीतीनें वागतो, त्याचें राज्य, कीर्ति व प्रताप ह्यांची अभिवृद्धि होत असते; आणि त्याचप्रमाणें खजिना, सैन्य, मित्र आणि मन हीं ज्याचीं एकसारखीं स्वाधीन असतात, त्याला मोठें राज्य प्राप्त होत असतें. तस्मात्, ज्या अर्थीं आपण सदाचारसंपन्न असून निर्भय मार्गाचें अवलंबन करणारे आहां, त्या अर्थीं मित्राकरितां केलेली प्रतिज्ञा योग्यरीतीनें आतां आपण शेवटास न्यावी. कारण, सर्व कामें एका बाजूला ठेवून मित्रकार्याकरितां विशेष उत्साह धरून जो सत्वर झटत नाहीं, तो संकटानें घेरून जात असतो. मित्रकार्याची वेळ निघून गेल्यावर जो ती सिद्धीस नेण्याकरितां झटतो, त्याच्या हातून मोठमोठीं कार्यें झालीं असतांहि मित्रकार्य सिद्धीस नेल्याचें फल त्याला प्राप्त होत नाहीं. ह्यास्तव हे शत्रुदमना, हें आपलें मित्रकार्य करण्याची वेळ निघून जाणार आहे. तस्मात्, सीतेचा शोध लावणें हें राघवाचें कार्य आतां केलें पाहिजे. काळवेळ जाणणाऱ्या व तुझ्या स्वाधीन असलेल्या त्या रघुकुलवंशजश्रेष्ठ रामचंद्राला जरी स्वतःचें काम सिद्धीस नेण्याची त्वरा आहे, तरी तो एखाद्याला ओळखून चालणारा असल्यामुळें, कार्याचा समय निघून जात असल्याविषयीं तुला सूचना करणार नाहीं. रघुवंशज रामाचा स्वभाव अतुल असून तो स्वतःहि गुणांनीं अप्रतिम आहे. इतकेंच नव्हे, पण तुझा तर तो नेहमी कायम रहाणारा बंधु असून तुझ्या मोठ्या कुलाच्या अभिवृद्धीला कारण होणारा आहे. शिवाय त्यानें तुमचें कार्य आधींच केलेलें आहे. ह्यास्तव त्याचें कार्य आपण आतां करा, आणि रामचंद्राची आज्ञा होण्याचे पूर्वीं तें सिद्धीस नेण्याविषयीं श्रेष्ठ श्रेष्ठ वानरांना आपण आज्ञा करा. कार्य करण्याविषयीं पुनरपि जोंपर्यंत सूचना झाली नाहीं, तोंपर्यंत त्या कार्याची वेळ निघून गेली, असें म्हणतां येणार नाहीं. कार्य करण्याविषयीं फिरून सूचना झाली म्हणजे मात्र कालातिक्रम होईल. हे वानरराज, अनुपकारी पुरुषाचेंहि आपण कार्य करणारे आहां, मग वालीचा वध करून आणि राज्य प्राप्त करून देऊन ज्यानें आपणांवर उपकार केला, त्याचें कार्य आपणांला केलेंच पाहिजे, हें सांगण्याची काय बरें आवश्यकता आहे. हे वानरकुलाधीश, हे ऋक्षगणाधि-

असते. एकदां क्षुधेनें व्याकुल होऊन मी आहाराची वाट पाहात असतां, सूर्योदयसमयीं भक्ष्य आणण्याकरितां गेलेला तो माझा पुत्र सायंकाळीं मांस न आणितां रिकाम्या हातींच परत आला. तेव्हां भक्ष्य न मिळाल्यामुळें मीं त्याला बोलून बोलून बरेंच दुःख दिलें. त्या वेळीं तो आनंदवर्धक माझी क्षमा मागून खरें खरें माझ्याशीं बोलूं लागला. तो म्हणाला, "संपाते, मांसाकरितां मी वेळेवर आकाशामध्यें उड्डाण केलें होतें, आणि महेंद्र पर्वताचें दार रोखून मी स्वस्थ राहिलों होतों. सागरासमीप संचार करणाऱ्या हजारों प्राण्यांचा मार्ग रोखण्याचा निश्चय करून मी एकटा अधोमुख होऊन बसलों होतों. इतक्यांत उदयकालच्या सूर्याप्रमाणें जिची प्रभा आहे, अशी एक स्त्री घेऊन कज्जलपर्वताप्रमाणें दिसणारा कोणी एक पुरुष जातांना माझ्या दृष्टीस पडला. तेव्हां त्या उभयतांना अवलोकन करितांक्षणीं ह्यांनाच पित्याच्या आहाराकरितां घेऊन जावें, असा मीं निश्चय केला; परंतु त्यानें नम्र होऊन दीन वाणीनें 'मार्ग दे' म्हणून माझी प्रार्थना केल्यामुळें मीं त्याला सोडून दिलें. कारण गरिबीनें वागणाऱ्यांचा घात करणारा नीचांमध्येंहि कोणी ह्या जगतांत सांपडणार नाहीं, मग माझ्यासारख्याची गोष्ट कशाला पाहिजे ? असो. मीं सोडून दिल्यावर तेजानें आकाश व्याप्त करीतच कीं काय तो पुरुष सत्वर चालता झाला. तो गेल्यानंतर आकाशामध्यें संचार करणाऱ्या सिद्ध-चारणादिकांनीं माझ्यासमीप येऊन त्या उभयतांना जीवदान दिल्याबद्दल माझी प्रशंसा केली. ते म्हणाले, "सीता तुझ्या हातून जिवंत राहिली, हें फारच चांगलें झालें; व कसा तरी रावण रामभार्येसहवर्तमान जिवंत निघून गेला, ह्याबद्दल तुझें निःसंशय कल्याण होईल." ह्याप्रमाणें त्या परमश्रेष्ठ सिद्धांनीं मला सांगितलें, आणि स्त्रीला घेऊन जाणारा तो राक्षसांचा राजा रावण होता, असें मला कळविलें. त्या वेळीं दशरथपुत्र रामाची भार्या सीता शोकावेगानें व्याकूल झालेली होती. तिच्या शरिरावरील भूषणें वस्त्रासहवर्तमान अस्ताव्यस्त झालेलीं होतीं, आणि तिचे केंस मोकळे सुटले असून राम-लक्ष्मणांच्या नांवानें ती आक्रोश करीत चालली होती. हें पहाण्यांत गुंतल्यामुळें मला येण्याला इतका उशीर झाला, आणि रिकाम्या हातीं परत येण्याचें कारण तरी हेंच."

गृध्रराज संपाति पुढें सांगतो:—"ह्याप्रमाणें वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या सुग्रीवानें हा सर्व वृत्तांत मला निवेदन केला; परंतु तो ऐकूनहि पराक्रम गाजविण्याविषयीं माझ्या मनांत कांहींएक विचार आला नाहीं. कारण पंख नाहींतसे झालेला

पक्षी कांहीं पराक्रमाचें कृत्य करण्यास प्रवृत्त होणार कसा? वाणी आणि बुद्धि ह्यांच्या गुणांवर अवलंबून असलेल्या माझ्या हातून जें होणें शक्य आहे, तें तुम्ही श्रवण करा. तें होणें तुमच्या पराक्रमावर अवलंबून आहे. मी फक्त वाणी व मति ह्यांच्या योगानें तुम्हां सर्वांचें प्रिय करीन. दशरथपुत्र रामाचें जें कार्य आहे, तें माझेंच आहे, ह्यांबद्दल संशय नाहीं. शिवाय वानरराज सुग्रीवानें पाठविलेले तुम्ही श्रेष्ठ, बलाढ्य व विचारी असून देवांनाहि अजिंक्य आहां; आणि कंक पक्ष्यांच्या पंखांनीं युक्त असलेले राम-लक्ष्मणांचे धनुष्यापासून सुटलेले बाण त्रैलोक्याचें रक्षण व निग्रह करण्यास समर्थ आहेत. तेव्हां दशकंठ रावण जरी तेजस्वी व बलाढ्य आहे, तरी तुम्हां समर्थांना कांहींच कठीण नाहीं. तस्मात् आतां कालविलंब पुरे. सीतेचा शोध लावण्याविषयीं तुम्ही आपल्या मनाचा निश्चय करा. अरे, तुमच्यासारखे बुद्धिमान पुरुष योग्य कृत्यांना आळस करीत नाहींत."

## सर्ग साठावा.

### संपातीचें पूर्ववृत्त.

तदनंतर स्नान करून व भ्रात्याच्या नांवानें पाणी सोडून तो संपाति गृध्र रमणीय पर्वतावर बसला असतां वानरसेनाधिपति त्याच्या सभोंवतीं गराडा देऊन बसले. तेव्हां त्या सर्व वानरांनीं परिवेष्ठित असलेला अंगद तेथें बसला असतांना विश्वास आल्यामुळें संपाती आनंदानें पुनरपि त्याला म्हणाला:—"कांहींएक गडबड न करितां वानरांनीं माझें म्हणणें ऐकून घ्यावें. मिथिलराजकन्या सीतेचा पत्ता मला कसा लागला, हें मी खरें खरें सांगतों. हे निष्पापा अंगदा, सूर्याच्या तापानें व्याकूळ होऊन सूर्यकिरणांनीं दग्ध झाल्यामुळें पूर्वीं मी ह्या विंध्यपर्वताच्या शिखरावर पडलों. अगदीं मूर्च्छित होऊन मी विवळत पडलों असतां, सहा दिवसांनंतर मी शुद्धीवर आलों, आणि चोहोंकडे पाहूं लागलों, तों माझ्या कांहींच ओळखीचें दिसेना. तदनंतर सागर, पर्वत, सर्व नद्या, सरोवरें, वनें आणि प्रदेश अवलोकन केल्यावर माझी मति चालूं लागली, आणि आनंदित पक्षिसमुदायांनीं व्याप्त, गुहा व शिखरें ह्यांनीं युक्त आणि दक्षिण समुद्राच्या तीरीं असलेला ह्या विंध्याद्रि अशी माझी खात्री झाली. ह्या ठिकाणीं देवांनाहि अत्यंत पूज्य असा एक पवित्र आश्रम होता. त्या आश्रमामध्यें उग्र तपश्चर्या करणारा एक निशा-

कर नामक ऋषि रहात असे. तो धर्मज्ञ निशाकर स्वर्गाला गेल्यानंतर त्या ऋषीवांचून ह्या पर्वतावर वास्तव्य करीत असतांना, माझीं आठ हजार वर्षें लोटलीं. मी येथें येऊन पडल्यानंतर मोठ्या संकटानें व दुःखानें हळू हळू विंध्यशिखरापासून खालीं उतरून तीक्ष्णाग्र दर्भांनीं युक्त असलेल्या पृथ्वीवर पुनरपि येऊन पोहोंचलों. अत्यंत दुःखित झालेल्या मला त्या ऋषींचें दर्शन घेण्याची इच्छा प्राप्त झाली होती. कारण, जटायूनें व मीं त्यांची पुष्कळ वेळां सेवा केलेली होती. त्यांच्या आश्रमस्थानासमीप सुगंधि वायु वहात असत, आणि पुष्परहित अथवा फलरहित असा एकहि वृक्ष तेथें दृष्टीस पडत नसे. असो. त्या पवित्र आश्रमासमीप मी एका वृक्षाखालीं भगवान निशाकर मुनींच्या दर्शनाची वाट पहात बसलों. तेव्हां उज्ज्वल तेजानें युक्त असे ते ऋषि स्नान करून व उत्तरेकडे तोंड करून वळलेले मी दूर अवलोकन केले. ते ऋषि फारच तेजस्वी असल्यामुळें अनोळखी प्राण्यानें त्यांच्यासमोर जाणेंहि अशक्य होतें. तथापि उदार पुरुषाचे भोवतीं गराडा देऊन ज्याप्रमाणें याचक लोक जात असतात, त्याचप्रमाणें ऋक्ष, सृमर, व्याघ्र, सिंह आणि नानाप्रकारचे सर्प त्याला गराडा देऊन चालले होते. तदनंतर राजा राजवाड्यामध्यें प्रविष्ट झाला असतां, ज्याप्रमाणें अमात्यांसहवर्तमान सर्व सैन्य परत फिरतें, त्याप्रमाणें ते निशाकर ऋषि आश्रमांत प्रविष्ट होतांच सर्व प्राणी परत गेले. येतां येतां मला अवलोकन करितांक्षणीं ते ऋषि संतुष्ट होऊन आश्रमामध्यें गेले; परंतु एका क्षणांत पुनरपि बाहेर येऊन मला त्यांनीं कार्याविषयीं प्रश्न केला. ते म्हणाले, 'हे विनयसंपन्न गृध्रा, केंस विकल झालेले पाहिल्यावर तुझी एकाएकीं ओळख पटत नाहीं. तुझे पंख अग्नीनें दग्ध झालेले असून तुझे प्राणहि दग्ध झाल्यासारखेच झाले आहेत. वेगामध्यें वायूची बरोबरी करणारे असे दोन सामान्य गृध्रच नव्हत, परंतु यथेष्ट रूप धारण करणारे उभयतां भ्राते असलेले गृध्रांचे राजे पूर्वीं माझ्या अवलोकनांत होते. संपाते, त्यांतील तूं ज्येष्ठ आहेस, हे मीं ओळखिलें. जटायु हा तुझा कनिष्ठ भ्राता होय. तुम्ही मनुष्यरूप धारण करून माझे पाय धरीत होतां. तुला काय व्याधि उत्पन्न झाली आहे, तुझे पंख कशानें झडले आहेत, अथवा हा कोणीं प्रहारच तुझ्यावर केला आहे कीं काय, हें सर्व तूं मला कथन कर."

# सर्ग एकसष्टावा.

## संपातीचें पूर्ववृत्त. ( पुढें चालू. )

तदनंतर इंद्रासहवर्तमान युद्ध करणें हें जें दुष्कर व भयंकर कर्म अविचारामुळें झालें होतें, तें आणि त्याचप्रमाणें सूर्यासमीप जाणें, हें सर्व कृत्य मीं त्या मुनींना कथन केलें. मी म्हटलें, "भगवन् ,इंद्राशीं झालेल्या युद्धामध्यें वज्रप्रहारानें मला जखमा लागल्यामुळें मी थकून गेलों आहें; आणि पंख नाहींतसे होण्यासारखें अनुचित कर्म केल्याची लाज वाटत असल्यामुळें माझ्या मनाला कांहीं सुचेनासें झालें आहे. ह्या कारणामुळें जरी मी कांहीं भाषण करण्यास समर्थ नाहीं, तरी कांहीं कांहीं सांगतों. मी व जटायु गर्वानें मोहित होऊन स्पर्धेनें आकाशामध्यें गेलों, आणि 'जो लांब उडून जाईल तो श्रेष्ठ' असा पण लावून आपलें सामर्थ्य किती आहे, हें पाहूं लागलों. कैलास पर्वताच्या शिखरावर, सूर्य अस्ताचलाला जाण्याचे पूर्वींच त्याला गाठावयाचें, असा मुनींच्या समक्ष पण करून आम्हीं एकदम आकाशामध्यें उड्डाण केलें असतां, भूतलावरील वेगवेगळीं नगरें रथांच्या चाकांप्रमाणें आम्हांला दिसूं लागलीं; आणि वर वर जातांना कोठें वाद्यांचा घोष, व कोठें भूषणांचा ध्वनि कानीं पडूं लागला असून, कोठें कोठें रक्तवस्त्र परिधान केलेल्या पुष्कळ स्त्रिया गात असतांना आम्हीं अवलोकन केल्या. एकदम आकाशामध्यें उडून सूर्यमंडलासमीप आम्ही जाऊं लागलों असतां, गवतानें भरलेलें वन जसें दिसतें, तसें देशांनीं भरलेलें भूतल आम्हांला दिसूं लागलें. सारांश, भूतलावरील प्रदेश तृणासारखे आम्हांला सूक्ष्म दिसूं लागले. पर्वतांनीं आच्छादित असलेली ही भूमि लहान लहान धोंड्यांनीं आच्छादित झाल्यासारखी दिसूं लागली, आणि त्याचप्रमाणें पृथ्वी वास्तविक नद्यांनीं व्याप्त झाली असतांना ती सुतांनीं व्याप्त झाल्यासारखी दिसूं लागली. हिमालय, विंध्य आणि सर्वांत मोठा असा मेरु पर्वत हे सर्व, जलाशयामध्यें क्रीडा करीत असलेल्या गजांप्रमाणें दिसूं लागले.वर जातां जातां,मध्यान्हसमय आला असतां आम्हांला फारच उष्मा भासूं लागला. आम्ही अतिशय थकून गेलों. भयहि अतिच वाटूं लागलें. पूर्व कोणती व पश्चिम कोणती हें कांहींएक समजेनासें झालें, आणि नंतर मूर्च्छाहि आली. दक्षिण दिशा कोणती तें समजेना. आग्नेय कोणती हें ओळखूं येईना. पश्चिम कोणती ह्याचीहि अटकळ होईना. सारांश, जगताचा दाह प्रलयकालीं व्हावयाचा, हें जरी ठरलेलें आहे, तरी जगत् अग्नीनें दग्ध झाल्याचा आम्हांला तेव्हां

अनुभव येऊं लागला. माझ्या मनाला तर कांहींच सुचेनासें झालें. मनाचाच आधार असा डळमळीत झाल्यावर दृष्टीचीहि गति खुंटली. तथापि मोठ्या यत्नानें ह्या सूर्यसंबंधानें मन व दृष्टि स्थिर करण्याचा आम्हीं यत्न केला, व आणखी एकदा पाहिलें, तों सूर्य आम्हांला पृथ्वीएवढा मोठा दिसूं लागला. जटायु मला कांहींएक न सांगतां भूमीवर पडला. तो पडल्याचें अवलोकन करितांक्षणीं मीहि त्याच्या रक्षणाकरितां पंख पसरून आपलें अंग सोडून दिलें. जटायूचें मी पंखांनीं रक्षण केलें असल्यामुळें तो दग्ध झाला नाहीं; परंतु आकाशांतून पडतां पडतां निष्काळजीपणामुळें मी मात्र दग्ध होऊन गेलों. जटायु जनस्थानामध्यें पडला असावा, असा माझा अदमास आहे. मी तर पंख जळून गेल्यामुळें ह्या विंध्यपर्वतावर जड गोळा होऊन पडलों. सांप्रत मी राज्यापासून भ्रष्ट झालों असून भ्रात्याचा मला वियोग झाला आहे; आणि पंख नाहींतसे झाले असून माझे ठिकाणीं पराक्रमहि राहिलेला नाहीं. ह्यास्तव, सर्वथा मरणाचीच इच्छा धरून मी ह्या पर्वतशिखरावरून खालीं उडी घेतों."

## सर्ग बासष्टावा.

### संपातीचें पूर्ववृत्त.

( पुराणकथा. )

संपाति पुढें सांगतो:—"ह्याप्रमाणें अत्यंत दुःखित होऊन मी त्या मुनिश्रेष्ठांना सांगितलें, व मी रोदन करूं लागलों. तेव्हां क्षणभर विचार करून भगवान निशाकर मुनि मला म्हणाले, 'तुला मुख्य पक्ष व उपपक्ष पुनरपि दुसरे फुटतील; आणि त्याचप्रमाणें चक्षु, प्राण, पराक्रम व बल हींहि तुझीं उत्कृष्ठ होतील. पुराणामध्यें पुढें होणारें एक फारच मोठें कार्य मीं श्रवण केलें आहे. ज्याप्रमाणें पुराणांत श्रवण करून तें कार्य मला विदित झालें आहे, त्याप्रमाणें तपश्चर्येच्या योगानेंहि तें मीं अवलोकन केलें आहे. इक्ष्वाकुकुलाची कीर्ति वृद्धिंगत करणारा कोणी दशरथ म्हणून राजा होईल, आणि त्याला राम ह्या नांवाचा महातेजस्वी पुत्र होइल. तो अमोघ पराक्रमी राम पित्याची आज्ञा झाल्यावरून भार्या सीता व भ्राता लक्ष्मण यांसहवर्तमान अरण्यामध्यें जाईल. देवदानवांना अवध्य आणि राक्षसांचा अधिपति रावण नामक राक्षस त्याची भार्या जनस्थानांतून हरण करून नेईल, आणि घरीं नेल्यानंतर

भोग्य वस्तु, भक्ष आणि भोज्य पदार्थ ह्यांच्या योगानें तो तिचें मन वळविण्याचाहि प्रयत्न करील. तथापि दुःखामध्यें मग्न झालेली ती महाभाग्यवती यशस्विनी रामपत्नी कांहींएक खाणार नाहीं. तदनंतर, विदेहराजकन्या सीता क्षुधित आहे, असें जाणून अमृततुल्य आणि देवांनाहि दुर्लभ असें परमान्नसंज्ञक अन्न इंद्र तिला देईल. इंद्रापासून हें प्राप्त झालें, असें समजून सीता तें अन्न स्वीकारील; आणि प्रथमतः त्यांतील कांहीं अंश काढून रामाच्या उद्देशानें ती भूतलावर अर्पण करील. तें भूतलावर अर्पण करितांना, माझा भर्ता आणि देवर लक्ष्मण जर जिवंत असतील, किंवा देवत्व पावले असतील, तर त्यांना हें अन्न प्राप्त होवो' असें ती म्हणेल. येथें सीतेच्या शोधाकरितांपाठविलेले रामदूत वानर येतील. त्यांना रामपत्नी सिता कोठें आहे, तें तूं निवेदन कर. सारांश, कांहीं जरी झालें, तरी तुला तेथून जातां उपयोगी नाहीं. तूं अशा प्रकारचा असतांना कोठें जाशील? देश आणि काल ह्यांची तूं वाट पहा, म्हणजे आपोआप तुला पंख प्राप्त होतील. तुला आजच्या आजच पक्षयुक्त करण्याचा माझा उद्देश आहे, परंतु पक्ष प्राप्त झाल्यावर तूं हें स्थान सोडून जाण्याचा संभव असल्यामुळें, कदाचित् देवकार्य तुझ्या हातून होणार नाहीं. ह्यास्तव सांप्रत मी तसें करीत नाहीं. तूं येथें राहूनच लोकांना हितावह असें कृत्य करशील. तें कार्य साधारण लोकांचेंच नसून श्रेष्ठ ब्राह्मण, मुनि, इंद्र आणि ते राजकुमार राम-लक्ष्मण ह्यांचेंहि आहे; आणि तें तुझ्या हातून होण्यास योग्य आहे. भ्रात्या राम-लक्ष्मणांना अवलोकन करण्याची माझीहि इच्छा आहे; परंतु इतका दीर्घ काल लोटेपर्यंत प्राण धारण करून राहाण्याची माझी इच्छा नाहीं. म्हणून मी आतां लवकरच ह्या देहाचा त्याग करीन."

## सर्ग त्रेसष्टावा.

### वानरांचें समुद्रतीरीं गमन.

संपाती सांगतोः—"वानरहो, ह्या व अशाच प्रकारच्या दुसऱ्या पुष्कळ वाक्यांनीं माझी प्रशंसा करून आणि मला निरोप देऊन भगवान निशाकर मुनि आपल्या निवासस्थानामध्यें प्रविष्ट झाले. नंतर मी हळू हळू पर्वताच्या गुहेपासून बाहेर निघालों व विंध्याचल शिखरावर आरूढ होऊन तुमची वाट पहात बसलों. आज त्या गोष्टीला शेंकडों वर्षें लोटून गेलीं आहेत. तेव्हांपासून मी त्या मुनींचें वचन मनांत धरून तुह्मी केव्हां व कोठें दृष्टीस पडतां, ह्याची वाट

पहात बसलों आहें. महाप्रस्थानाचें अवलंबन करून निशाकर मुनि स्वर्गाला चालते झाल्यानंतर, अनेक विचारांनीं व्याप्त झालेल्या माझ्या अंगाचा एकसारखा संतापामुळें दाह होत आहे; आणि प्राण देण्याचा जो विचार माझ्या मनांत आला होता, तो त्या मुनींच्या शब्दांवरून मी रहित करून बसलों आहें. अग्नीची उज्ज्वल ज्वाला ज्याप्रमाणें अंधकाराचा नाश करिते, त्याप्रमाणें माझ्या प्राणरक्षणाकरितां त्या महर्षींनीं जी मला बुद्धि दिली, ती माझ्या दुःखाचा परिहार करीत आहे. दुरात्म्या रावणाचें सामर्थ्य माझ्या पुत्राच्या सामर्थ्यापेक्षां कमी आहे, हें मला ठाऊक असल्यामुळें, 'तूं मैथिलीचें रक्षण कसें केलें नाहींस?' म्हणून मी पुत्राची चांगलीच खरडपट्टी काढिली. तथापि 'राम, रामा, लक्ष्मणा' अशा प्रकारचा तिचा विलाप श्रवण करून, आणि अर्थात्‌च सीतेचा त्यांना वियोग झाला आहे, असें ऐकून, दशरथाचें ठिकाणीं असलेल्या प्रेमामुळें मला प्रिय अशी जी अवश्य कर्तव्य गोष्ट ती माझ्या पुत्रानें केली नाहीं."

ह्याप्रमाणें एकत्र जमलेल्या वानरांसहवर्तमान तो संपाती भाषण करीत असतांना, त्या वानरांसमक्ष त्याला पंख फुटले. तेव्हां आपलें शरीर नूतन फुटलेल्या अरुणवर्ण पक्षांनीं युक्त झालें आहे, असें अवलोकन करून त्या संपातीला अनुपम हर्ष झाला, आणि तो वानरांना म्हणाला, "अपरिमित सामर्थ्यवान निशाकर ऋषींच्या प्रसादानें सूर्यकिरणांनीं दग्ध झालेले पंख मला पुनरपि फुटले. त्यामुळें यौवनावस्थेमध्यें असतांना माझ्या ठिकाणीं जो पराक्रम वसत होता, तोच पराक्रम व सामर्थ्य आज मला प्राप्त झालें आहे, असें मला वाटतें. ह्यास्तव तुम्ही सर्व प्रकारें यत्न करा, म्हणजे सीतेचा शोध लागेल. कारण, ज्या गोष्टी निशाकर महर्षींनीं सांगितल्या, त्यांपैकीं मला पंखांचा लाभ झाला, ही गोष्ट तुमचा प्रयत्न सिद्धीस जाईल, असा विश्वास तुमचे ठिकाणीं उत्पन्न करण्यासारखी झाली आहे."

ह्याप्रमाणें त्या सर्व वानरांना सांगून आकाशामध्यें संचार करणारा तो पक्षिश्रेष्ठ संपाती आपणांला पूर्वीप्रमाणें गति प्राप्त झाली आहे किंवा नाहीं, हें पाहण्याकरितां विंध्याचलाच्या शिखरापासून उडून गेला. तेव्हां त्याचें भाषण श्रवण करून मनामध्यें संतुष्ट झालेले ते वानरश्रेष्ठ प्रयत्नसाध्य जो सीताप्राप्तिरूप अभ्युदय तो प्राप्त करून घेण्याविषयीं उद्युक्त झाले. सारांश संपातीचें भाषण श्रवण केल्यानंतर गतीनें वायूची बरोबरी करणारे आणि त्याच्या भाषणामुळें धैर्य आलेले ते वानरश्रेष्ठ जनककन्येचा शोध लावण्याविषयीं उत्सुक होऊन अभिजित् नक्षत्राचे संमुख असलेल्या दक्षिण दिशेकडे चालते झाले.

# सर्ग चौसष्टावा.

## समुद्रोल्लंघनाविषयीं चिंता.

गृध्रराज संपातीनें सीतेचा वृत्तांत सांगितला असतां, आनंदित झालेले ते सिंहासारखे पराक्रमी वानर उड्या मारून एकत्र जुळले आणि गर्जना करूं लागले. संपातीचें भाषण श्रवण करितांक्षणीं रावणक्षयाचा उद्देश मनांत धरून सीतेच्या दर्शनाची इच्छा करणारे ते वानर आनंदित होऊन समुद्राकडे गेले, आणि त्या सागरतीररूप प्रदेशाला जाऊन पोहोंचल्यानंतर ज्या ठिकाणीं चंद्रसूर्य-प्रभृति ग्रहांसहवर्तमान सर्व द्युलोकाचें[1] पूर्णपणें प्रतिबिंब पडलेलें असतें, तो समुद्र त्या भयंकर पराक्रमी वानरांनीं अवलोकन केला. नंतर त्या महाबलाढ्य वानर-वीरांनीं दक्षिण समुद्राच्या उत्तर तीरावर तळ दिला. कोठें कोठें लाटा मुळींच नसल्यानें तो समुद्र गाढ निद्रिस्थ झाल्यासारखा भासत होता, कोठें कोठें लाटा उसळत असल्यामुळें क्रीडा करीत आहेत, असा दिसत होता, कोठें कोठें पर्वत-प्राय जलतरंगांनीं व्याप्त झालेला दिसत होता, आणि कोठें कोठें पातालनिवासी दानवाधिपतींनीं तो गजबजून गेलेला होता; अशाप्रकारें शरिरावर रोमांच उठ-विणारा तो समुद्र अवलोकन करितांक्षणीं ते वानरश्रेष्ठ मनामध्यें खिन्न झाले. आकाशाप्रमाणें तो दुस्तर सागर अवलोकन करून खिन्न झालेले ते सर्व वानर एकत्र जुळले, व ' पुढें काय करावें ' म्हणून एकमेकांशीं बोलूं लागले. तेव्हां समुद्र अवलोकन करितांक्षणीं वानरसेना खिन्न झालेली पाहून त्या भयभीत झालेल्या वानरांना वानरश्रेष्ठ अंगद धीर देऊं लागला. तो म्हणाला, " तुम्ही खेद करूं नका. खेद हा फार वाईट आहे. कारण क्रुद्ध झालेला सर्प ज्या-प्रमाणें बालकाचा घात करितो, त्याप्रमाणें खेद हा पुरुषाचा घात करितो. परा-क्रम करण्याचा प्रसंग प्राप्त झाला असतां, जो पुरुष विचार न करितां खिन्न होऊन बसतो, त्या तेजोहीन पुरुषाचा मनोरथ कधींहि सिद्धीस जात नाहीं. "

असो. ती रात्र निघून गेल्यानंतर वृद्ध वृद्ध वानरांसहवर्तमान अंगद पुन-रपि मसलत करूं लागला. सारांश, मरुद्गणांच्या सैन्यामध्यें बसलेला इंद्रच कीं काय अशा रीतीनें शोभत असलेल्या अंगदाचे भोंवतीं गराडा देऊन वानरांची ती सर्व सेना बसली. कारण वालिपुत्र अंगद आणि हनुमान ह्यांवांचून ती वानरांची सेना आंवरून धरण्याला दुसरा कोण बरें समर्थ झाला असता? असो.

---

१ स्वर्गाचें.

तदनंतर त्या वृद्ध वृद्ध कपींचें आणि त्या सैन्याचें अनुमोदन घेऊन शत्रूला जेरीस आणणारा वैभवशाली अंगद मुद्देसूद भाषण करूं लागला. तो म्हणाला, " ह्या वेळेस कोण महातेजस्वी वानर समुद्राचें उल्लंघन करील ? आणि शत्रु- दमन करणाऱ्या सुग्रीवाला सत्यप्रतिज्ञ कोण करील ? कोणता बरे वीर शंभर योजनें समुद्र ओलांडून जाईल ? आणि ह्या सर्व वानरसेनाधिपतींना मोठ्या भया- पासून कोण बरें मुक्त करील ? येथून मनोरथ परिपूर्ण होऊन परत गेल्यावर कोणाच्या बरें प्रसादामुळें आपण भार्या, पुत्र व गृहें सुखानें अवलोकन करूं ? कोणाच्या बरें प्रसादामुळें आम्हांला आनंदानें महाबलाढ्य राम, लक्ष्मण आणि वनचर सुग्रीव यांचे समीप जातां येईल ? तुम्हांपैकीं जर कोणी समुद्राचें उल्लं- घन करून जाण्याविषयीं समर्थ असेल, तर त्यानें येथल्या येथें आम्हांला सत्वरच पवित्र अशी अभयदक्षिणा द्यावी. "

हें अंगदाचें भाषण श्रवण केल्यावर कोणी कांहींएक बोलेना. ती सर्व वानरसेना तेथें जशी कांहीं स्तिमित होऊन राहिली. तेव्हां पुनरपि वानरश्रेष्ठ अंगद त्यांना म्हणाला, " तुम्ही सर्वजण बलवानांमध्यें श्रेष्ठ असून महापराक्रमी आहां. इतकेंच नव्हे, परंतु सर्वजण निष्कलंक कुलांमध्यें उत्पन्न झालेले असून पराक्रमासंबंधानें तुम्ही सर्व वारंवार प्रशंसेसहि पात्र झालां आहां. तात्पर्य, तुम्हां- पैकीं कोणाचीहि गति कधींहि कुंठित होत नाहीं. ह्यास्तव, मार्ग उल्लंघन करून जाण्याविषयीं आपापल्या सामर्थ्याला अनुसरून तुम्ही काय तें सांगा. "

## सर्ग पांसष्टावा.

### समुद्रोल्लंघनाविषयीं वाटाघाट.

(वानरसामर्थ्य.)

अंगदाचें भाषण श्रवण केल्यावर ते सर्व वानरश्रेष्ठ गतीसंबंधानें अनुक्रमें आपापले सामर्थ्य कथन करूं लागले. गज, गवाक्ष, गवय, शरभ, गंधमादन, मैंद, द्विविद, अंगद आणि जांबवान ह्यांनीं आपआपलें सामर्थ्य कथन केलें. पैकीं गज म्हणाला, ' मी दहा योजनें उडी मारीन. ' गवाक्ष म्हणाला, ' मी वीस योजनें मारीन. ' हें ऐकून शरभ वानर तेथें जुळलेल्या वानरांना म्हणाला, ' वानरहो, मी तीस योजनें उड्डाण करीन. ' तदनंतर ऋषभ वानर

म्हणाला, 'मी एका उडीसरसा चाळीस योजनें निःसंशय जाईन.' नंतर महातेजस्वी गंधमादन म्हणाला, 'मी पन्नास योजनें उडी मारीन, ह्यांत संशय नाहीं.' नंतर मैंद म्हणाला, 'माझ्या अंगीं साठ योजनें उल्लंघून जाण्याचें सामर्थ्य आहे.' तें ऐकून महातेजस्वी द्विविद म्हणाला, 'मी सत्तर योजनें उडी मारीन, ह्यांत संदेह नाहीं.' तेव्हां महातेजस्वी व धैर्यवान वानरश्रेष्ठ सुषेण म्हणाला, 'गमनाविषयीं ऐशीं योजनांची तर मी प्रतिज्ञाच करितों.'

ह्याप्रमाणें ते वानर सांगत असतांना त्या सर्वांना अनुमोदन देऊन त्यांतील सर्वांत श्रेष्ठ जांबवान म्हणाला, "पूर्वीं आमच्याहि अंगांत बरीच लांब उडी मारण्याचा कांहीं पराक्रम होता; परंतु सांप्रत आमच्या वयाची अगदीं पराकाष्ठा झालेली आहे. असा जरी प्रकार आहे, तरी ज्या कार्याकरितां वानरराज सुग्रीव आणि राम ह्यांचा निश्चय झालेला आहे, त्या ह्या कार्याची उपेक्षा करणें योग्य नाहीं. तस्मात्, सांप्रतकाळीं गमनाविषयीं आमचें काय सामर्थ्य आहे, हें तुम्ही ऐकून घ्या. मी आद्यापीहि नव्वद योजनें उडी मारीन, ह्यांत संशय नाहीं."

ह्यानंतर त्या सर्व वानरश्रेष्ठांना जांबवान पुनरपि म्हणाला, "गमनाविषयीं माझें सामर्थ्य कांहीं एवढेंच नव्हतें. विरोचनपुत्र बलि यज्ञ करण्यास उद्युक्त झाला असतांना, जयशील असा जो विष्णु, तो पूर्वीं जेव्हां तीन पायांनीं त्रैलोक्य व्याप्त करूं लागला, तेव्हां मीं त्याला प्रदक्षिणा केलेली आहे. परंतु सांप्रत मी वृद्ध झालों असल्यामुळें गमनाविषयीं माझें सामर्थ्य कमी झालें आहे. त्या वेळीं यौवनावस्थेमध्यें माझे ठिकाणीं मोठें अप्रतिम सामर्थ्य होतें. सांप्रत एका उडी-सरसें काय तें नव्वद योजनेंच उल्लंघून जाण्याचें माझें सामर्थ्य आहे. परंतु एवढ्यानें ह्या कार्याची सिद्धि होणार नाहीं."

ह्यानंतर ज्ञानी अंगद महाकपि जांबवानाचें म्हणणें मान्य करून म्हणाला, "मीहि प्रचंड शंभर योजनें उडून जाईन; परंतु फिरून परत येण्याला माझे अंगीं सामर्थ्य राहील किंवा नाहीं ह्याची खात्री वाटत नाहीं."

ह्यावर संभाषण करण्यामध्यें निपुण असलेला जांबवान वानरश्रेष्ठ अंगदाला म्हणाला, "हे ऋक्षवानरश्रेष्ठा, गमनाविषयीं तुझें सामर्थ्य किती आहे, हें मीं जाणीत आहें. तूं शंभर अथवा हजार योजनेंहि जाऊन परत येण्यास समर्थ आहेस; परंतु असें करणें योग्य नाहीं. कारण बा अंगदा, दुसऱ्यांना पाठवि-णारा जो स्वामी, त्यालाच इतरांनीं पाठविणें योग्य नाहीं. हे वानरश्रेष्ठा, हा सर्व वानरसमुदाय तुझा सेवक आहे. स्वामी ह्या नात्यानें असलेला तूं आम्हांला

भार्येच्या स्थानीं आहेस. अर्थात्, जिवंत जीव आहे, तोंपर्यंत पतीनें ज्याप्रमाणें भार्येचें रक्षण करणें योग्य आहे, त्याप्रमाणें आम्ही सर्व वानरांनीं जिवंत जीव आहे, तोंपर्यंत तुझें रक्षण करणें योग्य आहे. हे शत्रुदमना, स्वामी हाच सैन्याचा आधार आहे. तें कार्य सिद्धीस जाण्याला मुख्य आधार तूंच आहेस. तस्मात्, हे अंगदा, भार्येप्रमाणें आम्हांला तुझें सर्वदा रक्षण केलें पाहिजे. कोणत्याहि गोष्टीचें मूळ रक्षण करून ठेविलें पाहिजे, असा कार्यवेत्त्या पुरुषांचा न्याय आहे. कारण मूळ जर कायम असेल, तर इतर सर्व किरकोळ गोष्टी सिद्धीस जातात. तस्मात् हे अमोघपराक्रमी अंगदा, बुद्धि आणि पराक्रम ह्यांनीं संपन्न असलेला तूंच आमचा गुरु असून गुरुपुत्रहि आहेस; आणि म्हणूनच तुझा आश्रय धरून आम्ही कोणतीहि गोष्ट सिद्धीस नेण्यास समर्थ आहों."

ह्याप्रमाणें महाबुद्धिमान जांबवान अंगदाशीं भाषण करून स्वस्थ बसला असतां, वालिपुत्र अंगदानें त्याला उत्तर केलें, "मी जर गेलों नाहीं, तर समुद्र उल्लंघून जाण्यास समर्थ असा दुसरा कोणीहि वानरश्रेष्ठ नाहीं. तेव्हां पुनरपि हें प्रयोपवेशनच आम्हांला करणें भाग येईल. कारण, त्या विचारी वानरराज सुग्रीवाची आज्ञा आपल्या हातून शेवटास गेली नाहीं, तर प्राणांचें रक्षण होण्याचा संभव मला दिसत नाहीं; आणि लंकेमध्यें जरी मी गेलों, तरी पुनरपि परत येण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें प्राण रक्षण होईल, असें मला वाटत नाहीं. सारांश एखाद्यावर कृपा करण्याविषयीं आणि एखाद्यावर अत्यंत क्रुद्ध होण्याविषयीं तो सुग्रीव समर्थ आहे. तेव्हां त्याच्या आज्ञेचें उल्लंघन करून आपण किष्किंधा नगरींत गेलों असतां, आपला घात हा होणारच. तात्पर्य हें समुद्रउल्लंघनरूप कार्य सिद्धीस जाईल, अशा रीतीनें तूंच अनुभवी असल्यामुळें कांहीं उपाय शोधून काढावास, हें योग्य आहे."

ह्याप्रमाणें अंगदानें त्या वीर वानरश्रेष्ठ जांबवानाला सांगितलें असतां, जांबवानानें अंगदाशीं उत्कृष्ठ भाषण केलें. तो म्हणाला, "हे वीरा, तुझ्या ह्या कार्यांत कांहीं कमी पडणार नाहीं. हें कार्य जो सिद्धीस नेणार आहे, तो हा मी आतांच सांगतों."

ह्याप्रमाणें अंगदाला सांगितल्यानंतर जिच्यामध्यें अनेक लक्ष वीर आहेत अशी ती खिन्न झालेली वानरसेना अवलोकन करून, उडी मारणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ म्हणून कसोटीला उतरलेल्या, आणि एकांत स्थलाचा आश्रय करून स्वस्थ बसलेल्या वानरश्रेष्ठ हनुमानाशीं वानरवीर जांबवान भाषण करूं लागला.

# सर्ग सहासष्टावा.

## हनुमंताला प्रेरणा.

(हनुमानाचें जन्मवृत्त.)

जांबवान म्हणाला:—"वीरश्रेष्ठा हनुमंता, तूं सर्व शास्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असतांना एकांताचा आश्रय करून स्वस्थ बसला आहेस, आणि वानरांच्या कर्तव्यासंबंधानें कांहींच भाषण करीत नाहींस, हें काय? अरे, तेज आणि बल ह्यांच्या योगानें तूं वानरराज सुग्रीव आणि राम-लक्ष्मण ह्यांची बरोबरी करणारा आहेस. काश्यपाचा पुत्र जो महाबलाढ्य वैतनेय गरुड ज्याप्रमाणें सर्व पक्ष्यांमध्यें श्रेष्ठ आहे, त्याप्रमाणें तूं सर्वोत्तम म्हणून विख्यात आहेस. तो महापराक्रमी व महाबलाढ्य गरुड भुजंगांना उचलून सागर ओलांडून जात असतांना मी अनेक वेळां पाहिला आहे; आणि त्याच्या पंखांचे ठिकाणीं जें सामर्थ्य आहे, तेंच सामर्थ्य तुझ्या बाहूंच्या ठिकाणीं आहे. तस्मात्, पराक्रम आणि तेज ह्यांसंबंधानें तूं त्या गरुडापेक्षां कमी नाहींस. हे वानरश्रेष्ठा, बल, बुद्धि, तेज आणि धैर्य हीं तुझे ठिकाणीं असल्यामुळें, सर्व प्राण्यांमध्यें श्रेष्ठ असलेला तूं समुद्रोल्लंघनाविषयीं कां बरें सज्ज होत नाहींस? अप्सरांमध्यें श्रेष्ठ आणि पुंजिकस्थला ह्या नांवानें विख्यात अशी जी अप्सरा होती, तीच केसरी वानराची अंजना ह्या नांवाची पत्नी होती. ती रूपानें सर्व पृथ्वींत अप्रतिम असून त्रैलोक्यामध्यें विख्यात होती. बा हनुमाना, ऋषींच्या शापामुळें तिला जरी वानरीचा जन्म प्राप्त झाला होता, तरी त्या वानरजन्मामध्येंहि तिला स्वेच्छेप्रमाणें रूप धारण करण्याचें सामर्थ्य होतें. महात्म्या कुंजर नामक वानराधिपतीची ती कन्या एकदां मनुष्यरूप धारण करून पर्जन्यकाळच्या मेघांप्रमाणें दिसत असलेल्या पर्वतशिखरावर संचार करीत होती. रूप आणि यौवन ह्यांच्या योगानें ती झळकत होती. अद्भुत पुष्पें आणि भूषणें तिनें धारण केलीं होतीं, आणि ती पैठणी नेसली होती. ह्याप्रमाणें ती विशालनयना पर्वतशिखरावर असतांना, आरक्तवर्ण दिशांनीं युक्त व शुभ असें तिचें पीत वस्त्र हळू हळू वायूनें उडविलें; आणि नंतर तिच्या चांगल्या घट्ट व गरगरीत मांड्या, पुष्ट आणि एकमेकाला लागलेले स्तन व आकृतीनें उत्कृष्ठ आणि दिसण्यांतहि सुंदर असें मुख त्यानें अवलोकन केलें. जिचा जघनप्रदेश विस्तृत आहे, जिचा मध्यभाग कृश आहे आणि जिचे सर्व अवयव उत्कृष्ठ आहेत, अशा त्या स्त्रीला अवलोकन करितांक्षणीं वायु

मदनानें अतिशयच मोहित झाला. इतकेंच नव्हे, परंतु आपल्या दीर्घ बाहूंनीं त्यानें तिला आलिंगनहि दिलें. मदनानें ज्याचें सर्व शरीर अगदा व्याप्त झालें आहे, अशा वायूनें त्या निर्दोष स्त्रीच्या ठिकाणीं आपलें तेज स्थापन केलें. तेव्हां ती पतिव्रता स्त्री गोंधळून गेली, आणि म्हणाली, 'माझें हें पातिव्रत्य भ्रष्ट करण्याची कोण इच्छा करीत आहे?' हें अंजनेचें भाषण श्रवण करून वायु म्हणाला, "हे सुंदरी, मी तुझा घात करीत नाहीं. तूं मनामध्यें भय बाळगूं नको. हे यशस्विनी, तुला आलिंगन देऊन ज्या अर्थीं मीं मानसिक भोगाच्याच योगानें तुझ्या ठिकाणीं आपलें तेज ठेविलें आहे, त्या अर्थीं तुला वीर्यवान आणि बुद्धिमान पुत्र होईल. तो पुत्र महावीर्यवान, महातेजस्वी, महाबलाढ्य व महापराक्रमी होऊन मार्ग उल्लंघून जाण्यांत आणि उडी मारण्यांत माझी बरोबरी करील."

जांबवान पुढें म्हणतोः—"हे महावानरा, ह्याप्रमाणें वायूनें तुझ्या मातेला सांगितलें असतां ती संतुष्ट झाली, आणि गुहेमध्यें ती तुला प्रसवली. नंतर महावनामध्यें सूर्य उदयाचलास आलेला पाहतांक्षणीं, हें फळ आहे असें समजून तें तुज बालाला घेण्याची इच्छा झाली. आणि उडी मारून तूं तें घेण्याकरितां स्वर्गामध्यें गेलास. अरे, तीनशें योजनें जरी तूं उडी मारून अंतरिक्षांत गेला होतास, आणि रवीच्या तेजानें जरी ग्रस्त झाला होतास, तरी वायूच्या सामर्थ्यामुळें तुला ग्लानि आली नाहीं. तूं अंतरिक्षामध्यें प्राप्त झाला आहेस, असें अवलोकन करून, तुझ्या तेजानें क्रुद्ध झालेल्या इंद्रानें तुझ्या शरिरावर वज्र फेंकिलें. तेव्हां पर्वताच्या उच्च शिखरावर तुझा डावा हनु म्हणजे गुडघा मोडला, आणि म्हणूनच तेव्हांपासून 'हनुमान' असें तुझें नांव लोकांनीं ठेविलें. तदनंतर तुला वज्रप्रहार झाल्याचें पाहून गंध वाहाणारा वायु स्वतः अत्यंत क्रुद्ध झाला, आणि त्रैलोक्यामध्यें संचार करीनासा झाला. तेव्हां त्रैलोक्य क्षुब्ध झालें असतां भुवनाधिपति सर्व देव अगदीं घाबरून गेले, आणि क्रुद्ध झालेल्या वायूला प्रसन्न करून घेऊं लागले. बा अमोघ पराक्रमी हनुमाना, ह्याप्रमाणें देवानीं वायूला प्रसन्न करून घेतलें असतां, 'समरांगणामध्यें शस्त्राच्या योगानें तुझा वध होणार नाहीं' असा ब्रह्मदेवानें तुला वर दिला. त्याचप्रमाणें वज्रप्रहार झाला असतांहि तुला कांहींएक इजा झाली नाहीं, असें अवलोकन करून इंद्राचें मन प्रसन्न झालें, आणि 'तूं इच्छामरणी होशील' असा त्यानें तुला उत्कृष्ठ वर दिला. सारांश, भयंकर पराक्रम करणारा तूं केसरीचा क्षेत्रज पुत्र असून वायूचा औरस पुत्र आहेस, व तेजानेंहि त्याची बरोबरी करणारा आहेस. वत्सा,

आम्ही आज मेल्यासारखेच आहों, आणि सांप्रत आम्हांमध्यें दक्षता व पराक्रम ह्यांनीं संपन्न असलेला दुसरा वानरराज सुग्रीवच कीं काय असा तूं आहेस. बा हनुमाना, त्रिविक्रमावतारसमयीं मीं पर्वत, वनें व अरण्यें ह्यांसहवर्तमान पृथ्वीला एका सपाट्यासरशा एकवीस प्रदक्षिणा केल्या होत्या, व त्या वेळेला देवांच्या आज्ञेवरून आम्हीं पुष्कळ ओषधी जमा केल्या होत्या. त्यांच्याच योगानें समुद्रमंथन करून देवांना अमृत प्राप्त झालें. सारांश, त्या वेळीं आमचें सामर्थ्य मोठें होतें; परंतु आतां मी वृद्ध झालों असून माझ्या अंगीं पराक्रम मुळींच राहिला नाहीं. सांप्रत काळीं आम्हांमध्यें तूंच सर्वगुणसंपन्न आहेस. तस्मात्, हे पराक्रमी हनुमाना, स्वतःचे अंगीं जें काय बल असेल, तें तूं प्रकट कर. उडी मारणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ तूंच आहेस, आणि सर्व वानरसेना तुझें सामर्थ्य अवलोकन करण्यास उत्सुक झाली आहे. तस्मात्, हे वानरश्रेष्ठा, ऊठ, आणि महासागर उल्लंघन कर. हनुमाना, सर्व प्राण्यांपेक्षां तुझी गति अधिक आहे. बाबारे, सर्व वानर खिन्न होऊन बसले आहेत. आतां तूं कां बरें यांचा अंत पहातोस? हे महावेगवान हनुमाना, विष्णूनें ज्याप्रमाणें तीन पावलें टाकिलीं, त्याप्रमाणें तूं आतां गतीचें अवलंबन कर."

ह्याप्रमाणें वानरश्रेष्ठ जांबवानानें हनुमानाला प्रेरणा केली असतां, स्वतःच्या वेगासंबंधानें खात्री असलेल्या त्या वायुपुत्र कपीनें त्या वानरवीराच्या सेनेला हर्ष उत्पन्न करीत करीत प्रचंड रूप धारण केलें.

## सर्ग सदुसष्टावा.

### समुद्रोल्लंघनाची तयारी.

(हनुमंताचें भाषण.)

शंभर योजनें समुद्र उल्लंघून जाण्याकरितां वृद्धिंगत होऊं लागलेल्या, आणि वेगावेगानें एकाएकीं अंतरिक्ष व्याप्त करूं लागलेल्या त्या वानरश्रेष्ठ हनुमानाला अवलोकन करितांक्षणीं दुःखाचा एकदम त्याग करून ते वानर हर्षयुक्त झाले, आणि गर्जना करून महाबलाढ्य हनुमानाची स्तुति करूं लागले. आनंदित व विस्मित झालेले ते वानर त्रैलोक्य व्याप्त करण्याकरितां उद्युक्त झालेल्या त्रिविक्रमावतारधारी नारायणाकडे पाहूं लागलेल्या लोकांप्रमाणें सर्व बाजूंनीं

त्याच्याकडे पाहूं लागले. वानर हनुमानाची स्तुति करूं लागले असतां, तो महाबलाढ्य हनुमान जास्त जास्तच वाढूं लागला, आणि हर्षानें शेंपूट आपटूं लागला असतां, त्याचें सामर्थ्य अधिकाधिकच वृद्धिंगत होऊं लागलें. सारांश, वृद्ध वृद्ध वानरश्रेष्ठ त्याची स्तुति करूं लागले असतां तेजानें व्याप्त होणाऱ्या त्या हनुमानाचें रूप अनुपम झालें. पर्वताच्या उघड्या गुहेमध्यें सिंह ज्याप्रमाणें जांभया देऊं लागतो, त्याप्रमाणें तो वायूचा औरस पुत्र हनुमान त्या वेळीं जांभया देऊं लागला. तेव्हां त्याचें मुख पेटलेल्या भट्टीप्रमाणें शोभूं लागलें, आणि तो स्वतः धूमरहित अग्नीप्रमाणें दिसूं लागला. नंतर शरिरावर रोमांच उठलेला तो हनुमान वानरांमधून उठला आणि वृद्ध वानरांना अभिवंदन करून म्हणाला, " आकाशामध्यें संचार करणारा वायु अतर्क्य, बलाढ्य, गमनशील व पर्वतशिखरें फोडून टाकणारा असून अग्नीचा सखा आहे; आणि त्या शीघ्र वेगानें युक्त व शीघ्रगामी महात्म्या वायूचा मी औरस पुत्र असून उडी मारण्यांत त्याची बरोबरी करणारा आहें. गगनचुंबित मेरु पर्वताला कोठेंहि न थांबतां एकदम हजारों प्रदक्षिणा करण्यास मी समर्थ आहें. बाहूंच्या वेगामुळें सागर क्षुब्ध करून टाकून त्याच्या योगानें पर्वत, नद्या व सरोवरें ह्यांसहवर्तमान सर्व जगत् बुडवून टाकण्याचें माझ्या अंगीं सामर्थ्य आहे. माझ्या मांड्यांच्या व पोटऱ्यांच्या वेगानें वरुणालय समुद्र मर्यादेचें अतिक्रमण करून जाईल, आणि त्यांतील मोठमोठे मकर क्षुब्ध होऊन जातील. आकाशामध्यें उड्डाण करणाऱ्या सर्पभक्षक पक्षिराज गरुडापेक्षां एकदम हजारोपट गमन करण्यास मी समर्थ आहें. किरणसमुदायांनीं युक्त असलेला उज्ज्वल सूर्य उदयाचलापासून निघाल्यानंतर अस्ताचलाला जाण्याचे पूर्वींच मी तेथून जाऊन त्याला स्पर्श करण्यास समर्थ आहें. इतकेंच नव्हे, परंतु सूर्याला स्पर्श केल्यानंतर पुनरपि भूमीपर्यंत येऊन तिला स्पर्श न करितां मोठ्या प्रचंड वेगानें मी पुनरपि सूर्याला स्पर्श करण्यास समर्थ आहें. आकाशामध्यें दिसणाऱ्या सर्व ग्रहनक्षत्रादिकांचें उल्लंघन करण्यास मी समर्थ आहें, आणि वेळ पडली असतां सागर शुष्क करून पृथ्वीहि विदीर्ण करणारा मी आहें. मी वानर उड्या मारूं लागलों असतां, पर्वतांचें चूर्ण करून टाकीन, आणि उडी मारितां मारितां आपल्या मांड्यांच्या वेगानें महासागरालाहि मागोमाग ओढून नेईन. मी आज आकाशमार्गानें उड्डाण करूं लागलों असतां, लता व वृक्ष ह्यांचीं नानाप्रकारचीं पुष्पें माझ्या मागोमाग येऊं लागतील; आणि असें होऊं लागलें असतां आकाशामध्यें असलेल्या स्वातीच्या मार्गाप्रमाणें माझा मार्ग

दिसूं लागेल. वानरहो, सर्व प्राणी भयंकर रूप धारण करणाऱ्या मला आज मार्गामध्यें संचार करीत असतांना, आकाशामध्यें उड्डाण करीत असतांना आणि समुद्राच्या पैलतीरावर उतरत असतांना अवलोकन करतील. मी आज आकाश व्याप्त करून जाऊं लागलों असतां, आकाश ग्रस्त करणारा प्रचंड मेरु पर्वतच कीं काय असा तुम्हांला दिसेन. मी मन स्वस्थ करून उड्डाण करूं लागलों असतां, मेघ उडवून देईन, पर्वत कंपित करीन आणि सागर शुष्क करून टाकीन. हें सामर्थ्य गरुडाचे ठिकाणीं, माझ्या अंगीं अथवा वायूपाशींच आहे. मी उडी मारिली असतां माझ्या मागोमाग येणारा गरुडाशिवाय अथवा महाबलाढ्य वायूशिवाय दुसरा कोणीहि मला दिसत नाहीं. मेघापासून निघालेल्या विद्युल्लतेप्रमाणें एका निमेषामध्यें मी निराधार आकाशांत एकदम उडून जाईन. मी सागराचें उल्लंघन करूं लागलों असतां, तीन पावलांनीं त्रैलोक्य व्याप्त करण्यास उद्युक्त झालेल्या विष्णूप्रमाणें माझें रूप होईल. तुम्हीं आनंदित व्हा. मी सीतेचा शोध लावीन. कारण, माझ्या बुद्धीला तसें वाटत असून माझ्या मनाचाहि कल तसाच दिसत आहे. वेगामध्यें वायूची व गरुडाची बरोबरी करणारा मी एकदम दहा हजार योजनेंहि उडीसरसा निघून जाईन, असें मला वाटतें. वज्रपाणि इंद्राच्या अथवा स्वयंभू ब्रह्मदेवाच्या हातांत जर अमृत असेल, तर मी आपला पराक्रम गाजवून तें एकाएकीं येथें घेऊन येईन, आणि कदाचित् लंकाहि उपटून चालता होईन, असें मला वाटतें."

ह्याप्रमाणें तो अतुल तेजस्वी वानरश्रेष्ठ हनुमान गर्जना करीत असतांना, तेथें असलेले सर्व वानर आनंदित व विस्मित होऊन त्याच्याकडे पाहूं लागले; आणि जातभाईंच्या दुःखाचा परिहार करणारें तें त्याचें भाषण श्रवण करून वानराधिपति जांबवानाला फारच हर्ष झाला. तो म्हणाला, "बा वेगयुक्त वीरा, हे वायुनंदना केसरीपुत्रा, त्वां जातभाईंचें प्रचंड दुःख नाहींसें केलें. तुझा मनोरथ सिद्धीस जाण्याकरितां येथें जुळलेले मुख्य मुख्य मंगलप्रिय वानर तुझें मंगल करितील. ऋषींचा प्रसाद, वानरवृद्धांचा आशीर्वाद आणि गुरुजनांची कृपा यांच्या योगानें तूं महासागर उल्लंघून जाशील. तूं परत येईपर्यंत आम्ही अगदीं एका पायावर तुझी वाट पहात उभे राहूं. सर्व वानरांचे प्राण तुझ्यावर अवलंबून आहेत."

तदनंतर वानरश्रेष्ठ हनुमान त्या वनवासी वानरांना म्हणाला, "उड्डाण करीत असतांना वेगानें माझी बरोबरी करणारा जगतामध्यें कोणीहि नाहीं. शिलासमुदायांनीं युक्त असलेल्या ह्या महेंद्र पर्वताचीं हीं शिखरें मोठीं मोठीं

असून अचल आहेत. नानाप्रकारच्या वृक्षांनीं व्याप्त आणि धातुसमुदायांनीं सुशोभित असलेल्या ह्या महेंद्र पर्वताच्या शिखरावर मी वेगानें गमन करीन. कारण, तेथून शंभर योजनें जरी उडी मारिली, तरी हीं प्रचंड शिखरें मी उडी मारीत असतांना माझा वेग सहन करितील."

### महेंद्र पर्वतावर आरोहण.

असें सांगितल्यानंतर तो वायुतुल्य व वायुपुत्र शत्रुनाशक हनुमान त्या महेंद्र नामक श्रेष्ठ पर्वतावर आरूढ झाला. तो पर्वत नानाप्रकारच्या पुष्पांनीं व्याप्त झालेला होता. तेथील तृणयुक्त प्रदेशावर मृगांनीं वास्तव्य केलेलें होतें. लता व पुष्पें ह्यांनीं तो गजबजलेला होता, आणि नेहमीं प्रफुल्लित व फलयुक्त असणाऱ्या वृक्षांनीं तो भरून गेलेला होता, सिंह व व्याघ्र ह्यांनीं तो युक्त होता. मत्त गजांनीं त्याचा आश्रय केलेला होता. मदमत्त पक्षिगणांनीं तो नादित करून टाकिलेला होता, आणि झऱ्यांच्या योगानें तो गजबजून गेलेला होता. असो. तो इंद्रतुल्य पराक्रमी, महाबलाढ्य व उन्नत वानरश्रेष्ठ हनुमान महेंद्र पर्वताच्या मोठमोठ्या शिखरांवरून संचार करूं लागला. सिंहाचा तडाखा बसला असतां मोठा मत्त गज ज्याप्रमाणें गर्जना करितो, त्याप्रमाणें त्या महात्म्यानें आपल्या बाहूंनीं तो महापर्वत आवळून धरिला असतां प्राण्यांच्या द्वारानें तो आक्रोश करूं लागला. इतकेंच नव्हे, परंतु हनुमानानें तो पर्वत आवळून धरितांक्षणीं त्याच्यावरील पाषाणसमुदाय अस्ताव्यस्त पडले, मृग व गज अगदीं त्रस्त होऊन गेले, मोठमोठे वृक्ष कंपित होऊं लागले, आणि शेवटीं त्या पर्वतापासून जलप्रवाहहि वाहूं लागले. पान आणि विषयोपभोग ह्यांविषयीं अत्यंत आसक्त असलेलीं गंधर्वांचीं अनेक जोडपीं, उड्डाण करणारे पक्षी, आणि विद्याधरांचेहि समुदाय त्या पर्वतावरील मोठमोठीं शिखरें सोडून जाऊं लागलीं, मोठमोठे भुजंग दडून बसूं लागले, आणि त्या महापर्वतावरील शिखरें व शिला ह्यांचेंहि पतन होऊं लागले. बिळांतून अर्धवट बाहेर निघून सुस्कारे टाकूं लागलेल्या भुजंगांच्या योगानें तो पर्वत पताकांनीं युक्त असल्यासारखा दिसूं लागला. त्रासानें गोंधळून गेलेले ऋषि त्या पर्वताला सोडून जाऊं लागले असतां तो पर्वत प्रचंड अरण्यांत तांड्यांतून चुकलेल्या मार्गस्थाप्रमाणें खिन्न दिसूं लागला. असो. चलाख आकृतीनें युक्त आणि शत्रुपक्षीय वीरनाशक असा जो महापराक्रमी, विचारी, वेगवान आणि वानरश्रेष्ठ हनुमान, त्याचें मन स्वस्थ ठेऊन लंकेचें स्मरण केलें.

# श्रीवाल्मीकिरामायण.

## सुंदरकांड.

### सर्ग पहिला.

#### समुद्रोल्लंघन.

रावणानें हरण करून नेलेल्या सीतेचें वसतिस्थान हुडकून काढण्याकरितां चारण ज्या मार्गानें संचार करीत असतात, त्या आकाशमार्गानें त्या शत्रुनाशक हनुमानानें जाण्याचें मनांत आणिलें. ज्याचें मस्तक आणि कंठ हीं उन्नत होतीं, आणि दुष्कर व ज्यांत कोणाचेंहि साहाय्य होण्याचें संभवनीय नाहीं, असें कार्य करण्यास उद्युक्त झालेला तो वानर वृषभाप्रमाणें शोभूं लागला. प्रथम वैदूर्य रत्नासारखा ज्याचा वर्ण आहे, अशा कोमलतृणयुक्त आणि म्हणूनच जलाप्रमाणें मृदु असलेल्या प्रदेशावरून तो महाबलाढ्य वीर अनायासें संचार करूं लागला. जातां जातां तो हनुमान पक्ष्यांना भय उत्पन्न करूं लागला. वक्षःस्थलाच्या योगानें वृक्ष बरोबर घेऊन जाऊं लागला, आणि मदमत्त झालेल्या सिंहाप्रमाणें असंख्य मृगांचा वध करूं लागला. जातां जातां त्या श्रेष्ठ पर्वता-वर हनुमंताला एक सपाट प्रदेश लागला. तो नील, आरक्त, गुलाबी, शुभ्र, कृष्ण आणि पद्मतुल्य रंगांच्या स्वतःसिद्ध निर्मल धातूंच्या योगानें भूषित असून यथेष्ठ रूप धारण करणारे आणि परिवारासहवर्तमान असलेले देवतुल्य यक्ष, किन्नर, गंधर्व आणि पन्नग ह्यांनीं वारंवार त्याचें सेवन केलेलें होतें. आसमंता-द्भागीं उत्तम उत्तम गजांनीं युक्त असलेल्या त्या सपाट प्रदेशावर तो वानरश्रेष्ठ हनुमान उभा राहिला असतां, सरोवरामध्यें स्थित असलेल्या गजाप्रमाणें तो शोभूं लागला. त्या प्रदेशावर गेल्यानंतर प्रथमतः सूर्य, इंद्र, वायु, ब्रह्मदेव आणि इतरहि भूतें ह्यांना हात जोडून नंतर त्यानें पुढें जाण्याचें मनांत आणिलें. प्राङ्मुख होऊन स्वतःचा जनक जो वायु त्याला उद्देशून हनुमानानें हात जोडिलें, आणि नंतर तो कुशल हनुमान दक्षिण दिशेस जाण्याकरितां वृद्धिंगत

झाला. वानरश्रेष्ठांनीं उत्सुकतेनें ज्याला अवलोकन केलें आहे, आणि ज्यानें समुद्रांतून तरून जाण्याचा निश्चय केला आहे, असा तो हनुमान पर्वदिवशीं वृद्धिंगत होणाऱ्या समुद्राप्रमाणें रामाच्या अभ्युदयाकरितां वृद्धिंगत झाला. ज्याला कांहीं प्रमाणच नाहीं, असें प्रचंड शरीर धारण करून समुद्र उल्लंघन करण्यास प्रवृत्त झालेला तो वानर, हातांनीं व पायांनीं त्या पर्वताला पीडा देऊं लागला. ह्याप्रमाणें समुद्र उल्लंघन करण्यास उद्युक्त झाल्या कारणानें हनुमानाच्या अंगांत आवेशाचा संचार झाल्यामुळें, तो सहज संचार करीत असतांनाच पीडित झालेला पर्वत एकाएकीं क्षणभर हालूं लागला; आणि प्रफुल्लित अग्रांनीं युक्त असलेल्या वृक्षांवरील सर्व पुष्पें त्या पर्वतानें एका क्षणांत पाडून टाकिलीं. ह्याप्रमाणें वृक्षांवरून सुगंधि पुष्पांच्या राशी वाऱ्यानें चोहोंकडे पसरल्या असतां, सर्व बाजूंनीं तो पर्वत पुष्पांच्या योगानें व्याप्त झाल्यामुळें पुष्पमयच दिसूं लागला. इतकेंच नव्हे, परंतु महावीर्यवान हनुमानाच्या योगानें तो पर्वत दबूं लागला असतां, मत्त गजाच्या गंडस्थलांतून ज्याप्रमाणें मदाचा स्राव होऊं लागतो, त्याप्रमाणें त्या पर्वतांतून उदकाचा स्राव होऊं लागला; आणि पीतवर्ण, कृष्णवर्ण आणि श्वेतवर्ण जलप्रवाह त्यांतून निघूं लागले. हनुमानाच्या योगानें पीडित होऊं लागलेल्या त्या पर्वतापासून मनःशिलेसहवर्तमान मोठमोठ्या विस्तीर्ण शिला बाहेर पडूं लागल्या; आणि म्हणूनच मध्यभागीं ज्वालेनें युक्त असलेल्या अग्नीच्या धुराच्या लोटासारखा तो दिसूं लागला. त्या महावानराच्या योगानें पर्वताला पीडा होऊं लागली असतां, त्या पर्वतावर चोहोंकडे गुहांतून असलेल्या प्राण्यांनाहि पीडा होऊं लागली; आणि तेहि विकारयुक्त शब्दांनीं गर्जना करूं लागले. पर्वताला पीडा होऊं लागल्यामुळें एकाएकीं श्वापदांनीं ह्याप्रमाणें प्रचंड गर्जना केली असतां, दिशा आणि उपवनें ह्यांसहवर्तमान सर्व पृथ्वी त्या ध्वनीनें दुमदुमून गेली. स्पष्ट स्वस्तिक चिन्हें ज्यांवर आहेत, अशा विशाल मस्तकांतून नाग भयंकर अग्नि बाहेर टाकूं लागले, आणि दांतांच्या योगानें शिलांना दंश करूं लागले. ह्याप्रमाणें क्रुद्ध झालेल्या त्या विषयुक्त नागांनीं मोठमोठ्या शिलांना दंश केला असतां, त्या शिलाहि अग्नीच्या योगानें प्रदीप्त होऊन जळूं लागल्यामुळें त्यांचे हजारों तुकडे होऊं लागले. त्या पर्वतावर जे कांहीं विषघ्न औषधिगण उत्पन्न झाले होते, तेहि नागांचें विष शमन करण्यास समर्थ झाले नाहींत. ब्रह्मराक्षसप्रभृति महाभूतें ह्या पर्वताचे तुकडे तुकडे उडवीत आहेत, असें समजून बिचारे भयभीत झालेले विद्याधरहि स्त्रीगणांसहवर्तमान त्या पर्वता-

वरून आकाशमार्गानें निघून गेले. पानभूमीवर असलेलीं सुवर्णाचीं आसनें, सुवर्णपात्रें, दुसरे ठिकाणीं असलेलींहि मोठीं मोठीं मूल्यवान भांडीं, सुवर्णमय उदकपात्रें, नानाप्रकारचे लेह्य व भक्ष्य पदार्थ, नानाप्रकारचीं मांसें, वृषभचर्माच्या तयार केलेल्या ढाली आणि सोन्याच्या मुठी लाविलेल्या तरवारी हें सर्व टाकून देऊन कंठामध्यें माला धारण केलेले, रंगीबेरंगी फुलें व उट्या शरीरांवर असलेले आणि कमलतुल्य नेत्रांनीं युक्त असलेले मत्त विद्याधर आकाशमार्गानें चालते झाले. तेव्हां चंद्रहार, तोरड्या, बाजुबंद, गोठ वगैरे अलंकार धारण केलेल्या आणि गालांतल्या गालांत हंसत असलेल्या विद्याधर-स्त्रियाहि एकाएकीं विस्मयचकित झाल्या, आणि आकाशामध्यें आपापल्या पतींच्या शेजारीं जाऊन उभ्या राहिल्या.

असो. 'हा महावेगवान पर्वतप्राय वायुपुत्र हनुमान समुद्र उल्लंघून जाण्यास उद्युक्त झाला आहे. सारांश, रामाकरितां आणि वानरांकरितां दुष्कर कर्म करण्यास उद्युक्त झालेला हा हनुमान जाण्यास अशक्य असलेल्या समुद्राच्या पलीकडील तीराला जाण्याची इच्छा करीत आहे.' अशा प्रकारचीं आकाशामध्यें संचार करणाऱ्या तपस्व्यांचीं भाषणें कानावर आल्यानंतर विद्याधर खालीं पाहूं लागले, तों त्या पर्वतावर असलेला तो अतर्क्य देह धारण करणारा वानरश्रेष्ठ त्यांच्या दृष्टीस पडला. तेजानें अग्नितुल्य असलेल्या त्या हनुमानानें आपलें अंग हालवून रोम हालविले, व प्रचंड मेघाप्रमाणें अतिशय मोठी गर्जनाहि केली. पक्षिराज गरुड ज्याप्रमाणें सर्पाला वरचेवर उचलून खालीं टाकीत असतो, त्याप्रमाणें आरंभापासून एकसारखें वर्तुळ आणि रोमांनीं व्याप्त असलेलें आपलें शेंपूट वारंवार उचलून तो भूमीवर आपटूं लागला. ह्याप्रमाणें त्याचें तें पृष्ठभागीं असलेलें अत्यंत वेगयुक्त शेंपूट वारंवार भूमीवर आदळूं लागलें असतां, तें गरुडाच्या तावडींत सांपडलेल्या मोठ्या भुजंगाप्रमाणें दिसूं लागलें. अशा रीतीनें शेपूट खालीं वर केल्यानंतर मोठमोठ्या अडसरांसारखे असलेले हात त्या वीरानें पर्वतावर ठेविले, आणि वर अवसान घेतल्यामुळें कटिप्रदेशाचे ठिकाणीं कृश बनून त्यानें आपले पाय संकुचित केले. नंतर त्या वीर्यवान व भव्य हनुमानानें खांद्याजवळ आपले हात संकुचित करून कंठप्रदेशाचे ठिकाणीं मानहि संकुचित केली. नंतर आपल्या अंगीं असलेलें तेज, शरीर, बल आणि वीर्य हें सर्व कांहीं त्यानें एकत्र केलें. नंतर दूरचा मार्ग अवलोकन करण्याकरितां त्यानें आपली दृष्टि जरा वर केली, आणि आकाशाकडे पहात

पहात हृदयामध्यें प्राणवायूंचा निरोध केला. पर्वतावर पाय घट्ट ठेवून व कान संकुचित करून उडी मारण्यास तयार झालेला तो महाबलाढ्य कपिराज वानरांना म्हणाला, ‘ ज्या प्रमाणें रामानें सोडलेला बाण वायुगतीनें जाईल, त्याप्रमाणें मी रावणाच्या लंका नगरीमध्यें जाईन, आणि तेथें जनककन्या सीता माझ्या दृष्टीस पडली नाहीं, तर याच वेगानें मी स्वर्गाला चालता होईन; परंतु स्वर्गांतहि प्रयत्न करून जर सीता माझ्या अवलोकनांत आली नाहीं, तर राक्षसराज रावणाला मी बांधून आणीन, आणि सर्वस्वी कृतकार्य होऊन सीतेसहवर्तमान परत येईन, अथवा रावणासहवर्तमान लंकाच उपटून घेऊन येईन. ’

ह्याप्रमाणें वानरांना सांगून दुसरें तिसरें कांहींएक मनामध्यें न आणितां, तो कपिश्रेष्ठ वेगानें उडाला; आणि उड्डाण करण्यांत स्वतःला गरुडाप्रमाणें मानूं लागला. हनुमान वेगानें उड्डाण करूं लागला असतां, त्याच्या वेगामुळें त्या पर्वतावरील वृक्षहि आपापल्या सर्व शाखा एकत्र करून सर्व बाजूंनीं उड्डाण करूं लागले. ह्याप्रमाणें मत्त टिट्टिभ पक्ष्यांनीं युक्त असलेले प्रफुल्लित वृक्ष आपल्या प्रचंड वेगानें बरोबर नेतनेत निर्मल आकाशामध्यें हनुमानानें उड्डाण केलें. दूर प्रदेशाला निघालेल्या आपल्या बंधूच्या मागोमाग ज्याप्रमाणें बांधव जात असतात, त्याप्रमाणें हनुमानाच्या मांड्यांच्या वेगामुळें जमीन उखळून बाहेर निघालेले वृक्ष एक मुहूर्तपर्यंत त्याच्या मागोमाग गेले. अथवा राजाच्या मागोमाग ज्याप्रमाणें सैन्यें जातात, त्याप्रमाणें मांड्यांच्या वेगामुळें उपटून बाहेर आलेले साल व इतरहि मोठमोठे वृक्ष त्या हनुमानाच्या मागोमाग चालते झाले. ह्याप्रमाणें उत्कृष्ठ रीतीनें ज्यांच्या अग्रशाखा प्रफुल्लित झाल्या आहेत, असे असंख्य वृक्ष हनुमानाच्या बरोबर चालते झाले असतां, पर्वताकृति बनलेल्या त्या हनुमानाची मुद्रा आश्चर्यकारक दिसूं लागली. हलकेसलके वृक्ष तर शेवटपर्यंत त्याच्याबरोबर निघून गेलेच, परंतु खैर वगैरेसारखें जे कांहीं जड जड वृक्ष होते, ते तेवढे शेवटपर्यंत बरोबर न जातां, इंद्राच्या भीतीमुळें समुद्रामध्यें बुडून जाणाऱ्या पर्वताप्रमाणें, जातां जातां वरुणालयरूप क्षीरसमुद्रांत पडून बुडून गेले. कळ्या व किंचित् उमललेलीं पुष्पें ह्यांसहवर्तमान पूर्णपणें विकास पावलेल्या पुष्पांनीं व्याप्त झालेला तो मेघतुल्य हनुमान, काजव्यांनीं व्याप्त झालेल्या पर्वतासारखा शोभूं लागला, आणि मित्राला पोहोंचविण्याकरितां बरोबर गेलेले इतर मित्र ज्याप्रमाणें मध्यें जलप्रवाह आला असतां परत फिरतात, त्याप्रमाणें ते प्रफुल्लित वृक्ष त्याच्या वेगाच्या तडाक्यांतून

सुटल्यावर, समुद्राचें उदक मध्यंतरी आल्याबरोबर आपलीं पुष्पें टाकून देऊन उदकामध्यें गडप्प झाले. त्या महावानराच्या वेगवायूनें वृक्षांपासून सुटलेलीं नानाप्रकारचीं अद्भुत पुष्पें फारच हलकीं असल्यामुळें सागरावरच पडून राहिलीं, आणि वृक्ष मात्र आंत बुडून गेले. असो. तो उड्डाण करणारा हनुमान नानाप्रकारच्या सुगंधि पुष्पसमुदायांच्या योगानें विद्युद्गणविभूषित मेघांप्रमाणें दिसूं लागला; आणि त्याच्या वेगामुळें वृक्षांपासून निघालेल्या पुष्पांनीं आच्छादित झालेलें तें समुद्राचें उदक, उदय पावलेल्या रमणीय ताऱ्यांच्या योगानें जसें आकाश शोभूं लागतें, तसें शोभूं लागलें. हनुमानानें उड्डाण केलें असतां आकाशामध्यें असलेले व बोटें पसरलेले त्याचे हात पर्वतशिखरापासून निघालेल्या पंचमुखी नागाप्रमाणें दिसूं लागले; आणि तो अंतरिक्षामध्यें असलेला महाकपि अधोमुख झाला असतां तरंगसमुदायांनीं भरलेला महासागरच पिऊन टाकण्यास उद्युक्त झाल्यासारखा दिसे, आणि ऊर्ध्वमुख झाला असतां आकाशच गट्ट करण्याच्या बेतांत असल्यासारखा भासे. आकाशमार्गानें संचार करणाऱ्या त्या हनुमानाचे विद्युल्लतेप्रमाणें तेजस्वी असलेले नेत्र पर्वतावर लागलेले दोन वणवेच कीं काय असे भासूं लागले. आसमंताद्भागीं प्रभामंडलानें युक्त असलेले त्या कपिश्रेष्ठ हनुमानाचे पिंगट वर्णाचे प्रचंड डोळे आकाशांत असलेले चंद्र-सूर्यच कीं काय असे दिसूं लागले. संधिकालीन आकाशानें युक्त असलेलें सूर्यमंडल ज्याप्रमाणें आरक्तवर्ण दिसूं लागतें, त्याप्रमाणें ताम्रवर्ण नासिकेच्या योगानें त्याचें मुखहि ताम्रवर्ण दिसूं लागलें. तो वायुपुत्र हनुमान आकाशामध्यें उड्डाण करीत असतांना, अग्रभागीं आकडी वळून उभारलेलें त्याचें पुच्छ अंतरिक्षांत उभारिलेल्या इंद्रध्वजांप्रमाणें शोभूं लागलें. पुच्छमंडलानें आणि शुक्लवर्ण दंष्ट्रांनीं युक्त असलेला तो महाबुद्धिमान वायुपुत्र प्रभामंडलानें युक्त असलेल्या सूर्यासारखा दिसूं लागला. खाणींतून काढिलेल्या गैरिक धातूंच्या विशाल शिलेनें ज्याप्रमाणें एखादा पर्वत दिसत असतो, त्याप्रमाणें अत्यंत ताम्रवर्ण असलेल्या ढुंगणाच्या योगानें तो महाकपि हनुमान शोभूं लागला. तो वानरश्रेष्ठ समुद्र उल्लंघन करूं लागला असतां, त्याच्या खाकांमध्यें सांपडलेला वायु मेघाप्रमाणें गर्जना करूं लागला. आकाशामध्यें उत्तर दिशेकडून निघालेली इतर लहान लहान उल्कांनीं व्याप्त झालेली उल्का ज्याप्रमाणें पडतां पडतां दृष्टीस पडते, त्याप्रमाणें तो पुच्छयुक्त वानर दिसूं लागला. पूर्ण वृद्धिंगत झालेला गज मध्यभागीं बांधल्या जाणाऱ्या रज्जूच्या योगानें जसा शोभूं लागतो, तसा गमन कर-

णारा सूर्यच कीं काय असा दिसत असलेला तो दीर्घ कपि कटिप्रदेशाला गुंडाळि-लेल्या वस्त्राच्या योगानें शोभूं लागला. शरीर ऊर्ध्वभागीं असल्यामुळें, आणि अधोभागीं सागरामध्यें स्वतःचें प्रतिबिंब पडलें असल्यामुळें, तो कपि वायूच्या तडाक्यांत सांपडलेल्या नौकेप्रमाणें दिसूं लागला. समुद्रावरील ज्या ज्या प्रदेशा-वर तो महाकपि गेला, तो तो प्रदेश त्याच्या शरीरवेगानें उन्मादयुक्त झाल्या-सारखा दिसूं लागला. तो अतिवेगवान महाकपि आपल्या पर्वतप्राय वक्षः-स्थलाच्या योगानें समुद्रांतील तरंगसमुदायांना ताडन करीत करीत समुद्र उल्लंघन करूं लागला. त्या महाकपीच्या गतीनें उत्पन्न केलेला प्रचंड वायु आणि मेघमंडलांतील बाहेर पडलेला वायू ह्या उभयतांनीं भयंकर गर्जना करणाऱ्या सागराला अतिशय कंपित करून सोडिलें. समुद्रांतील मोठमोठ्या लाटा उंच उंच होण्यास कारणीभूत होणारा तो श्रेष्ठ कपि, पृथ्वी आणि आकाश आहेत, ह्यापेक्षांहि जास्त जास्त पृथक् करीतच कीं काय समुद्र उल्लंघून जाऊं लागला. महासागरामध्यें मेरु आणि मंदार ह्या पर्वताप्रमाणें उसळूं लागलेल्या प्रचंड लाटा मोजीत मोजीतच कीं काय तो महावेगवान हनुमान सागर ओलांडून जाऊं लागला. त्या हनुमानाच्या वेगानें समुद्रांतून उसळलेलें आणि मेघमंडळापर्यंत उंच गेलेलें जल आकाशामध्यें असतांना शरदृतूंतील विशाल मेघाप्रमाणें दिसूं लागलें. वस्त्र दूर केलें असतां प्राण्यांचीं शरीरें ज्याप्रमाणें उघडीं दिसतात, त्याप्रमाणें त्या हनुमानाच्या वेगानें समुद्रांतून उसळून वर आलेले तिमिसंज्ञक जलचर प्राणी, सुसरी, मत्स्य आणि कूर्म उघडे दिसूं लागले. आकाशांतून तो कपिश्रेष्ठ जाऊं लागलेला अवलोकन करून, हा गरुड पक्षीच जात आहे कीं काय, असें समुद्रांतील भुजंगांना वाटूं लागलें. दहा योजनें रुंद आणि तीस योजनें लांब असलेली त्या वानरश्रेष्ठ हनुमानाची छाया वेगामुळें फारच मनोहर दिसत होती. तो वायुपुत्र आकाशांतून जाऊं लागला असतां, समुद्रामध्यें पडलेली आणि त्याच्या बरोबर जाणारी त्याची ती छाया श्वेतवर्ण अभ्रांनीं युक्त झालेल्या मेघपंक्तीप्रमाणें शोभूं लागली. तो अत्यंत तेजस्वी व धिप्पाड महाकपि निराधार आकाशांतून जात असतां पक्षयुक्त पर्वतच कीं काय असा शोभूं लागला. ज्या मार्गानें वेगावेगानें तो बलाढ्य कपिश्रेष्ठ जात होता, त्या मार्गानें तो समुद्र, मेघांना हनुमानाचा धक्का बसत असल्या कारणानें त्या-पासून होणाऱ्या जलस्रावामुळें एकदम कृत्रिम पर्जन्ययंत्रांतून पडणाऱ्या जल-

---

१ राजेरजवाड्यांच्या बागांतून नानाप्रकारचीं क्रीडास्थानें केलेलीं असतात, आणि ह्या

धारांनीं युक्त झाल्यासारखा दिसत होता. पक्षिगणांच्या मार्गानें पक्षिराज गरुडच जात आहे कीं काय अशा रीतीनें गमन करणारा तो हनुमान वायूप्रमाणें आपल्याबरोबर मेघसमुदायांना ओढून नेऊं लागला. श्वेतवर्ण, आरक्तवर्ण, नीलवर्ण आणि पाटलवर्ण अशीं मोठमोठीं अभ्रें तो ओढून नेऊं लागला असतां, तीं वायूच्या योगानें आकृष्ट होत असल्यासारखीं दिसूं लागलीं; आणि वारंवार मेघसमुदायामध्यें प्रविष्ट होणारा व वारंवार त्यांतून बाहेर पडणारा तो कपि फिरून फिरून मेघांनीं आच्छादित होणाऱ्या व त्यांतून बाहेर पडणाऱ्या चंद्राप्रमाणें दिसूं लागला.

असो. ह्याप्रमाणें आकाशमार्गानें सत्वर उड्डाण करून जात असलेल्या त्या वानराला अवलोकन करून देव, गंधर्व व दानव ह्यांनीं त्या हनुमानावर पुष्पवृष्टि केली. आकाशमार्गानें गमन करणाऱ्या त्या वानराधिपतीला सूर्यानें ताप दिला नाहीं, आणि रामाचें कार्य सिद्धीस जावें, एतदर्थ वायूनेंहि श्रमपरिहार होण्याकरितां त्याची सेवा केली. आकाशमार्गानें उड्डाण करून जात असलेल्या त्या हनुमानाची ऋषी स्तुति करूं लागले, आणि देवगंधर्वहि त्या वानराची प्रशंसा करण्याकरितां गायन करूं लागले. नाग, यक्ष आणि नानाप्रकारचे राक्षस हेहि सर्वजण कपिश्रेष्ठ हनुमान क्लेशरहित आहे, असें अवलोकन करून एकदम त्याची स्तुति करूं लागले.

### समुद्राचा विचार.

असो. आकाशामध्यें उड्डाण करीत असतांना, इक्ष्वाकुकुलाचा सत्कार करण्याची इच्छा धरणारा सागर आपल्याशीं विचार करूं लागला कीं, " मीं जर वानरराज हनुमानाला सहाय्य केलें नाहीं, तर ज्यांना म्हणून वाणी आहे, त्या सर्व प्राण्यांच्या निंदेस मी पात्र होईन. इक्ष्वाकुकुलाधिपति सगरपुत्रानें मला वाढविलें आहे, आणि हा इक्ष्वाकुवंशजालाच मदत करणारा आहे. तस्मात्, हा थकून जाणें योग्य नाहीं. ह्यास्तव, ह्या कपीला विश्रांति घेतां येईल, अशी व्यवस्था केली पाहिजे. कारण माझे ठिकाणीं ह्यानें विश्रांति घेतली असतां अवशिष्ट राहिलेल्या मार्गाचें आक्रमण हा सहज करील "

### समुद्राचें मैनाक पर्वताला सांगणें.

असा विचार केल्यानंतर आपल्या उदकामध्यें आच्छादित होऊन राहि-

---

अनेक क्रीडास्थानांमध्यें, ज्यांत वरच्या बाजूला हजारें बसविलेल्या पाण्याच्या नळया नेल्या असून इच्छेस येईल तेव्हां कृत्रिम पर्जन्य पाडितां येण्याची व्यवस्था केलेली असते, असेंहि एखादें क्रीडास्थान असतें.

लेल्या सुवर्णमय पर्वतश्रेष्ठ मैनाकाला तो समुद्र म्हणाला, "महात्म्या देवराजानें तुला ह्या ठिकाणीं पातालनिवासी असुरगणांचा निरोध करण्याकरितां अडसर म्हणून ठेविला आहे. आणि त्याप्रमाणें देवराज इंद्राला ज्यांचें वीर्य माहीत झालें आहे, व जे फिरून फिरून वर येण्याची इच्छा करीत असतात, त्या राक्षसांच्या अतर्क्य पातालस्थानाच्या द्वाराचा निरोध करून तूं राहिला आहेस. हे पर्वता, बाजूंना, ऊर्ध्वभागीं आणि अधोभागीं वृद्धिंगत होण्याचें तुझ्या अंगीं सामर्थ्य आहे. तस्मात् मी तुला सांगतों, तूं वर ये, म्हणजे हा कपिश्रेष्ठ तुझ्या प्रदेशावर प्राप्त होईल. हा भयंकर कर्मे करणारा हनुमान रामकार्य करण्याचा उद्देश मनांत धरून आकाशामध्यें उड्डाण करून गेला आहे. तस्मात्, ह्या वानराच्या श्रमांकडे लक्ष्य देऊन त्वां उठावें, हें बरें."

### हनुमंताला मैनाकदर्शन.

हें समुद्राचें भाषण श्रवण केल्यावर मोठमोठ्या वृक्षांनीं व लतांनीं व्याप्त झालेला तो सुवर्णमय मैनाक पर्वत उदकांतून सत्वर वर आला. सागराचें उदक भेदून वर आलेला तो पर्वत अतिशय उंच झाला असतां, मेघाचा भेद करून बाहेर पडणाऱ्या उज्ज्वलकिरणयुक्त सूर्याप्रमाणें दिसूं लागला. सारांश, सागरानें आज्ञा केली असतां उदकानें आच्छादित झालेल्या त्या महात्म्या मैनाकानें एका मुहूर्तामध्यें आपलीं शिखरें प्रकट केलीं. तो पर्वत सुवर्णमय शिखरांनीं युक्त होता. तीं शिखरें उदयाचलाप्रमाणें गगनचुंबित होतीं, आणि किन्नर व महोरग हे त्यांचे ठिकाणीं वास्तव्य करीत होते. शस्त्राप्रमाणें श्यामवर्ण असलेलें आकाश त्या पर्वतापासून निघालेल्या सुवर्णमय शिखरांनीं व्याप्त झाल्यामुळें सुवर्णासारखें तेजस्वी दिसूं लागलें, आणि झळकूं लागलेल्या त्या महातेजस्वी सुवर्णमय शिखरांच्या योगानें तो श्रेष्ठ पर्वतहि शेंकडों सूर्यांसारखा दिसूं लागला.

### मैनाकाचें भाषण.

असो. आपल्यापुढें एकाएकीं समुद्रामध्यें उद्भवलेल्या त्या मैनाक पर्वताला अवलोकन केल्यावर, हें एक विघ्नच उत्पन्न झालें आहे, असा हनुमानाचा पक्का ग्रह झाला. म्हणूनच वायु ज्याप्रमाणें मेघाला उडवून लावितो, त्याप्रमाणें त्या अत्यंत वेगवान महाकपीनें समुद्रांतून अतिशय वर आलेल्या त्या मैनाक पर्वताला वक्षःस्थलाच्या योगानें खालीं पाडिलें. ह्याप्रमाणें त्या कपीनें पर्वतश्रेष्ठ मैनाकाला खालीं पाडिलें असतां, त्या वानराचा वेग त्याला समजून आल्यामुळें

तो मैनाक पर्वत हर्षयुक्त होऊन गर्जना करूं लागला. इतकेंच नव्हे, परंतु मनाला हर्ष वाटून प्रसन्न झालेला तो पर्वत पुनरपि वर आला, आणि मनुष्यरूप धारण करून आपल्या शिखरावर स्थित झाल्यानंतर अंतरिक्षामध्यें असलेल्या त्या वीर कपीला म्हणाला, " हे वानरश्रेष्ठा, तूं हें दुर्घट कर्म केलें आहेस. ह्याकरितां माझ्या शिखरावर तूं खुशाल उतरून विश्रांति घे, आणि मग पुढें जा. रामाच्या कुलामध्यें उत्पन्न झालेल्या सगरांनीं समुद्राला वाढविलें आहे, आणि म्हणून तो सागर रामहिताविषयीं उद्युक्त झालेल्या तुझा आदरसत्कार करीत आहे. कारण, एखाद्यानें आपल्यावर उपकार केला असतां त्याच्यावर प्रत्युपकार करावा, हा सनातन धर्म आहे. ह्यास्तव त्या उपकाराकरितां प्रत्युपकाराची इच्छा करणाऱ्या ह्या समुद्राचा तुझ्याकडून मान राहणें योग्य आहे. 'शंभर योजनें उल्लंघून जाण्याचा उद्देश मनांत धरून ह्या कपीनें आकाशामध्यें उड्डाण केलें आहे. तेव्हां तुझ्या शिखरांचे ठिकाणीं विश्रांति घेतल्यावर अवशिष्ट राहिलेल्या मार्गाचें ह्यानें आक्रमण करावें ' म्हणून तुझ्याकरितां ह्यानें मला बहुमानानें विनंति केली आहे. तस्मात् हे वानरश्रेष्ठा, तूं जरा स्वस्थ रहा, आणि माझे ठिकाणीं विश्रांति घेऊन मग पुढें जा. सारांश, हीं सुगंधि व स्वादिष्ट असलेलीं अनेक प्रकारचीं मुळें, कंद व फळें सेवन करून विश्रांति घेतल्यानंतर त्वां पुढें जावें. शिवाय हे वानरश्रेष्ठा, तुझ्याशीं आमचा संबंधहि आहे. मोठमोठे गुण तुझे अंगीं असल्यामुळें तूं त्रैलोक्यामध्यें प्रख्यात आहेस. हे वायुपुत्रा, हे वानरश्रेष्ठा, उड्डाण करणारे जे कांहीं वेगवान वानर आहेत, त्यांमध्यें तूं अग्रगण्य आहेस, असें मी समजतों. धर्माची अपेक्षा धरणाऱ्या विचारी पुरुषाला साधारण अतिथिहि खरोखर पूज्य आहे, मग तुझ्यासारख्याची तर गोष्ट कशाला पाहिजे ? हे वानरश्रेष्ठा, तूं देवांमध्यें वरिष्ठ असलेल्या महात्म्या वायूचा पुत्र असून वेगानें त्याची बरोबरी करणारा आहेस; आणि तुज धर्मवेत्त्या पुत्राची पूजा झाली असतां वायूचीहि पूजा झाल्यासारखें होणार आहे. तस्मात्, तूं मला पूज्य आहेस. ह्याविषयीं आणखीहि एक कारण तूं श्रवण कर. बा हनुमाना, पूर्वीं कृतयुगामध्यें पर्वत पक्षयुक्त होते, आणि वेगवान गरुड पक्ष्याप्रमाणें ते सर्व दिशांस गमनहि करीत असत. एकदां ते उड्डाण करून गेले असतां, ऋषींसहवर्तमान देवगण आणि इतरहि प्राणी ह्यांना त्यांच्या पडण्याची शंका येऊन भय उत्पन्न झालें. तेव्हां सहस्रनयन इंद्र क्रुद्ध झाला, आणि वज्राच्या योगानें त्यानें पर्वतांच्या पक्षांचे लक्षावधि तुकडे करून टाकिले. शेवटीं तो क्रुद्ध झालेला देवराज वज्र उगारून माझ्याकडेहि

आला असतां, महात्म्या वायूनें मला एकाएकीं आकाशांत उडवून दिलें, आणि ह्या समुद्रामध्यें टाकिलें. अशा रीतीनें संपूर्ण शरीर व पक्ष ह्यांसहवर्तमान तुझ्या पित्यानें माझें रक्षण केलें. ह्यामुळें मी तुला मान देत आहें, आणि म्हणूनच तूं मला मान्य आहेस. हे वानरश्रेष्ठा, तुझ्याशीं हा माझा संबंध फारच महत्त्वाचा आहे. तेव्हां ज्या अर्थी असा प्रकार आहे, त्या अर्थी ह्या प्रत्युपकाररूप कार्याविषयीं तूं प्रसन्न मनानें समुद्राचा व माझा मनोरथ परिपूर्ण कर. तात्पर्य, हे वानरश्रेष्ठा, श्रम परिहार करून तूं माझ्या सत्काराचा स्वीकार कर. मी तुझ्या दर्शनामुळें संतुष्ट झालों आहें. आणि वायुसंबंधामुळें माझें म्हणणें मान्य करणेंच तुला यथार्थ आहे, तस्मात्, तूं एवढा माझा मनोरथ परिपूर्ण कर."

ह्याप्रमाणें मैनाकानें सांगितलें असतां तो महाकपि त्या पर्वतश्रेष्ठाला म्हणाला, "मी संतुष्ट झालों आहें, आणि तूंहि माझा सत्कार केला आहेस. आतां तुझ्या म्हणण्याप्रमाणें मला वेळ मोडितां येत नाहीं, ह्याबद्दल तूं क्रोध करूं नको. माझी कार्य करण्याची वेळ थोडी आहे, दिवसहि जात चालला आहे, आणि येथें मध्यंतरी थांबावयाचें नाहीं, म्हणून मीं प्रतिज्ञा केली आहे."

असें म्हणून त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें पर्वताला हातानें स्पर्श केला, आणि हंसल्यासारखें करीत करीत पुनरपि आकाशाचें अवलंबन करून तो वीर्यवान हनुमान पुढें चालता झाला. पर्वत आणि समुद्र ह्यांनीं ह्याप्रमाणें बहुमानपूर्वक त्याला अवलोकन केलें, त्याचा सत्कार केला आणि योग्य आशीर्वादांनीं त्याचें अभिनंदनहि केलें. नंतर पर्वत व महासागर ह्यांना सोडून त्या हनुमानानें उंच उड्डाण केलें. आपल्या पित्याच्या मार्गाचें ह्याप्रमाणें अवलंबन करून तो निर्मल आकाशामध्यें गमन करूं लागला. नंतर पहिल्यापेक्षांहि उंच उड्डाण करून त्या पर्वताकडे पहात पहात तो निराधार वायुपुत्र वानरश्रेष्ठ चालता झाला. तेव्हां हनुमानाचें अत्यंत दुष्कर असें तें दुसरें कर्म पाहून सर्व देव, सिद्ध आणि महर्षी त्याची स्तुति करूं लागले. मनोहर मध्यभागानें युक्त असलेल्या त्या सुवर्णमय मैनाक पर्वताचें तें उत्थानरूप कर्म पाहून सहस्रनयन इंद्रासहवर्तमान तेथें असलेले देवहि संतुष्ट झाले. नंतर बुद्धिमान इंद्र उत्कृष्ठ मध्यप्रदेशानें युक्त असलेल्या त्या पर्वतश्रेष्ठाला संतोषामुळें हास्यपूर्वक म्हणाला, "हे सुवर्णमय पर्वतराजा, मी तुझ्यावर अत्यंत संतुष्ट झालों आहें. मी तुला अभय देतों. हे विनयसंपन्न, तूं खुशाल चालता हो. शंभर योजनेंपर्यंत आकाशमार्गानें जाण्यास उद्युक्त झालेला आणि जातां जातां श्रमलेला हनुमान निर्भय असतांनाहि, त्याला भीति उत्पन्न

झाली असेल, असें समजून तूं त्याला फारच मोठें साहाय्य केलेंस. ह्यामुळें मी तुझ्यावर संतुष्ट झालों आहें. दशरथपुत्र रामाच्याच हिताकरितां हा कपि चालला आहे, आणि ह्याचा यथाशक्ति सत्कार करण्यास तूं उद्युक्त झाल्यामुळें मलाहि अतिशय संतुष्ट केलें आहेस."

देवराज इंद्र संतुष्ट झाला आहे, असें पाहून त्या पर्वतश्रेष्ठाला फारच हर्ष झाला. इंद्रानें 'तुला अभय आहे' असा वर दिल्यानंतर तो मैनाक पर्वत पूर्वींप्रमाणेंच जलामध्यें मग्न झाला, आणि हनुमानहि त्याच्याशीं बोलण्याकरितां क्षणभर थांबून सागराचें उल्लंघन करून पुढें चालला.

तदनंतर गंधर्वांसहवर्तमान देव, सिद्ध आणि महर्षी तेजानें सूर्याप्रमाणें असलेल्या सुरसा नामक नागमातेला म्हणाले, "हा भव्य वायुपुत्र समुद्रावरून जात आहे, त्याला तूं एक क्षणभर विघ्न कर. सारांश कराल, दंष्ट्रा आणि पिंगटवर्ण नेत्र ह्यांनीं युक्त असें अत्यंत भयंकर पर्वतप्राय राक्षसरूप धारण करून व आकाशाला स्पर्श करण्यासारखें मुख मोठें करून तूं ह्याला विघ्न आण. आम्हांला ह्याचें बल आणि विशेषतः ह्याचा पराक्रम जाणण्याची इच्छा आहे. तेव्हां युक्ति योजून हा तुला जिंकणार किंवा तुझ्यापुढें जेरीस येणार, हें काय होतें, तें पाहूं."

सुरसादर्शन.

अशा प्रकारें देवांनीं आदरपूर्वक तिची विनंति केली असतां त्या सुरसा देवीनें विकृत, विरूप व सर्वांना भय उत्पन्न करणारें असें राक्षसरूप धारण केलें; आणि आकाशमार्गानें जाणाऱ्या हनुमानाचा मार्ग आडवून धरून त्याला ती म्हणाली, "ईश्वरानें तुज वानरश्रेष्ठाला माझें भक्ष्य नेमिलें आहे. ह्यास्तव, मी तुला भक्षण करणार! ह्या माझ्या मुखामध्यें तूं प्रविष्ट हो. कारण, जो समोर येईल, तो माझ्या मुखामध्यें प्रविष्ठ होईल, म्हणून विधात्यानें मला हा पूर्वीं वरच देऊन ठेविला आहे."

याप्रमाणें बोलत असतां आपलें विशाल मुख पसरून ती सुरसा सत्वर त्या वायुपुत्राच्या पुढें उभी राहिली; परंतु सुरसेनें त्याच्याशीं असें भाषण केल्यावर प्रसन्न मुद्रेनें तो हनुमान तिला म्हणाला, "राम नामक दशरथपुत्र, भ्राता लक्ष्मण आणि भार्या विदेहराजकन्या ह्यांसहवर्तमान दंडकारण्यामध्यें प्रविष्ठ झाला होता. राक्षसांशीं वैर बांधून राहिलेला तो राम मायावी मृगाचा वध करण्याविषयीं आसक्त झाला असतां, त्याची यशस्विनी भार्या सीता रावणानें हरण करून नेली आहे. तिच्या समीप रामाच्या आज्ञेवरून मी दूत जात आहें.

तस्मात् हे रामप्रदेशवासिनी, रामाच्या कार्याला मदत करणें, हेंच तुला योग्य आहे. अथवा माझी सुटका तुला करणेंच नसेल, तर सीतेला आणि उदार कृत्य करणाऱ्या रामाला अवलोकन करून मी तुझ्या मुखाकडे परत येईन, हें मी तुला प्रतिज्ञेवर खरें सांगून ठेवितों."

याप्रमाणें हनुमानानें विनंति केली असतां यथेष्ठ रूप धारण करणारी ती सुरसा त्याला म्हणाली, "माझ्या तावडींतून सुटून कोणीहि जाणार नाहीं, हा तर मला वर मिळालेला आहे."

असें सुरसा सांगत असतांनाहि तो हनुमान पुढें जाऊं लागला. तेव्हां हनुमानाचें बल किती आहे, हें पाहाण्याची इच्छा धरून नागमाता त्याच्या तोंडाकडे पाहून म्हणाली, "हे वानरश्रेष्ठा, आतां माझ्या मुखामध्यें प्रवेश करून नंतर तूं चालता हो. कारण विधात्यानें मला हा पूर्वीं वरच दिलेला आहे."

असें म्हणून त्या नागमातेनें तत्क्षणीं आपलें प्रचंड मुख पसरिलें, आणि ती मारुतीपुढें उभी राहिली. परंतु ह्याप्रमाणें सुरसा त्याला बोलली असतां वानरश्रेष्ठ हनुमान क्रुद्ध होऊन तिला म्हणाला, "तर मग ज्या मुखानें तूं मला सहन करशील, तें आपलें मुख एकदां हवें तेवढें पसर."

ह्याप्रमाणें तो हनुमान क्रुद्ध होऊन दहा योजनें लांब असलेल्या त्या सुरसेला म्हणाला, आणि स्वतःहि दहा योजनें मोठा झाला; परंतु सुरसेनें आपलें मुख वीस योजनें मोठें केलें. तेव्हां दीर्घ जिव्हेनें युक्त, अत्यंत भयंकर आणि नरकाच्याच उपमेला योग्य असें तें त्या सुरसेचें पसरलेलें मुख अवलोकन करून त्या वायुपुत्रानें आपलें शरीर लहान केलें. इतकेंच नव्हे, परंतु तो तत्क्षणीं अगदीं अंगुष्ठाएवढा झाला. नंतर तो महाबलाढ्य व भव्य हनुमान तिच्या मुखामध्यें प्रविष्ठ होऊन व पुनरपि बाहेर पडून अंतरिक्षामध्यें स्थित झाल्यावर म्हणाला, "अहो दाक्षायणि, नमो नमः! आपल्या म्हणण्याप्रमाणें मी आपल्या मुखामध्यें प्रविष्ठ झालों होतों! आतां जिकडे विदेहराजकन्या सीता आहे, तिकडे मी जातों. आपल्याला मिळालेला वर खरा झाला!"

अशा प्रकारें राहुमुखापासून मुक्त झालेल्या चंद्राप्रमाणें आपल्या मुखांतून पार पडलेल्या त्या वानराला अवलोकन केल्यावर सुरसा देवी आपलें नेहमींचें रूप धारण करून त्याला म्हणाली, "हे वानरश्रेष्ठा, कार्यसिद्धीकरितां तूं आतां खुशाल जा, आणि महात्म्या रघुवंशज रामाशीं सीतेचा समागम करून दे."

असो. हनुमानाचें अत्यंत दुष्कर असें हें तिसरें कर्म आढळून आल्यावर ‘ शाबास, शाबास ! ’ म्हणून सर्वांनीं त्याची प्रशंसा केली. जलधारा, पक्षी, संगीताचार्य, गंधर्व आणि इंद्रधनुष्य ह्यांनीं युक्त; सिंह, गज, व्याघ्र, पक्षी आणि उरग हीं वाहनें ज्यांना लाविलेलीं आहेत, अशा दाटीदाटीनें चाललेल्या निर्मल विमानांनीं भूषित; वज्र व विद्युल्लता ह्यांच्या आघाताप्रमाणें ज्यांचा स्पर्श भयंकर अशा अग्नीनें शोभित; पुण्यवान आणि महाभाग्यवान अशा स्वर्ग जिंकिलेल्या लोकांनीं अधिष्ठित; देवांकडे एकसारखें हव्य नेणाऱ्या अग्नीनें आश्रित; ग्रह, नक्षत्रें, चंद्र, सूर्य आणि तारांगण ह्यांनीं विभूषित; महर्षिगण, गंधर्व, नाग आणि यक्ष ह्यांनीं व्याप्त; अलग, निर्मल व विश्वाला आश्रयभूत; विश्वावसु नामक गंधर्वराजानें सेवित; देवराजाच्या गजांनीं व्याप्त; मंगलावह; चंद्रसूर्यांचा मार्ग; जीवलोकावर बांधिलेली ब्रह्मनिर्मित निर्मल चांदणी; वीरांनीं वारंवार सेवित; आणि विद्याधरगणांनीं व्याप्त अशा वायुमार्गरूप आकाशांतून तो वायुपुत्र हनुमान वायूप्रमाणें मेघसमुदाय आकर्षण करीत करीत गरुडासारखा चालता झाला ! रक्तवर्ण, पीतवर्ण, श्वेतवर्ण आणि कृष्णागुरुतुल्यवर्ण अशीं मोठमोठीं अभ्रें वायुपुत्र हनुमानाच्या मागोमाग त्याच्या वेगामुळें जातांना झळकूं लागलीं. पुनः पुनः मेघजालामध्यें प्रविष्ट होत असतांना आणि फिरून फिरून बाहेर पडत असतांना तो हनुमान पर्जन्यकालीं मेघपटलांत वारंवार प्रविष्ट होणाऱ्या व पुनरपि त्यांतून बाहेर निघणाऱ्या चंद्राप्रमाणें शोभूं लागला, व सर्व ठिकाणांहून दृष्टीस पडणारा तो वायुपुत्र पक्षयुक्त पर्वतराजच कीं काय असा लोकांना भासत असतांना निराधार आकाशाचेंच अवलंबन करून राहिला. असो.

### सिंहिकेचा वध.

अशा प्रकारें आकाशांतून उड्डाण करणाऱ्या त्या हनुमानाला अवलोकन केल्यावर यथेष्ठ रूप धारण करणारी सिंहिका नामक अतिवृद्ध राक्षसी मनामध्यें विचार करूं लागली कीं, “ बराच काल लोटल्यानंतर आज आपणाला भोजन मिळणार आहे. कारण पुष्कळ दिवसांनीं हा मोठा प्राणी माझ्या तावडींत सांपडला आहे. ”

असा मनामध्यें विचार करून त्या सिंहिका राक्षसीनें त्या हनुमानाची छाया पकडली. तेव्हां छाया आकृष्ट होत असतांना तो मनामध्यें म्हणाला, “ मला एकाएकीं ओढ लागली असून माझा पराक्रमहि एकदम कुंठित झालेला आहे,

व ह्यामुळें सागरामध्यें उलट दिशेच्या वाऱ्यानें जशी नौकेची स्थिति होते, तशी माझी स्थिति झाली आहे."

असें चिंतन करून तो कपि बाजूला आणि खालीं वर पाहूं लागला असतां, समुद्रामध्यें वर आलेला एक मोठाच प्राणी त्याच्या दृष्टीस पडला ! तेव्हां कराल वदनानें युक्त असलेली ती राक्षसी आढळल्यावर मारुती मनामध्यें म्हणाला, अद्‌भुत आकारानें युक्त, महावीर्यवान आणि छायेच्या योगानें वस्तु ग्रहण करण्यास समर्थ असा जो प्राणी वानरराजानें मला सांगितला होता, तो हाच असावा, ह्यांत संशय नाहीं. ह्याप्रमाणें छायाकर्षणाचा अनुभव आल्यामुळें त्या बुद्धिमान कपीनें त्या सिंहिकेला ओळखिलें, आणि पर्जन्यकाळीं वृद्धिंगत होणाऱ्या मेघाप्रमाणें प्रचंड शरिरानें युक्त असलेला तो कपि वृद्धिंगत होऊं लागला. तेव्हां वृद्धिंगत होणारें त्या महाकपीचें शरीर अवलोकन करून त्या सिंहिकेनें पाताल आणि आकाश ह्यांतील मध्यभागासारखें असलेलें आपलें मुख पसरिलें, आणि मेघपंक्तीप्रमाणें गर्जना करीत करीत ती त्या वानराकडे धावली.

ह्याप्रमाणें ती हनुमानाच्या अंगावर धावून गेली असतां तिचें तें अक्राळविक्राळ अजस्र मुख अवलोकन करून, तिचा नखशिखांत देह आणि मर्मस्थानें हीं त्या बुद्धिमान महाकपीनें निरखून पाहिलीं. नंतर आपला देह अतिशय संकुचित करून त्या वज्रदेही महाकपीनें तिच्या अक्राळविक्राळ मुखामध्यें उडी घातली. ह्याप्रमाणें तिच्या मुखामध्यें तो कपि बुडून जाऊं लागला असतां, पौर्णिमेचे दिवशीं राहूनें ग्रस्त होत असलेल्या चंद्राप्रमाणें सिद्धचारणांनीं त्याला अवलोकन केलें. तिच्या मुखामध्यें प्रविष्ट झाल्यानंतर गतीनें मनाच्या उड्डाणाची बरोबरी करणारा तो वानर तीक्ष्ण नखांनीं तिच्या मर्मस्थानांचे लचके काढून वेगावेगानें बाहेर पडला !

असो. सुदैव, धैर्य आणि प्रसंगावधान ह्यांच्या योगानें अशा प्रकारें तिचा वध करून तो जितेंद्रिय कपिश्रेष्ठ पुनरपि वेगावेगानें वृद्धिंगत होऊं लागला, व हनुमानानें जिचें काळीज काढून नेलें आहे, अशी ती सिंहिका राक्षसी समुद्रामध्यें त्याच्या हातूनच मरण पावली. कारण तिचा वध करण्याकरितांच ब्रह्मदेवानें हनुमानाला उत्पन्न केलें होतें. वानरानें मारिलेली आणि म्हणूनच एकाएकीं पडलेली ती सिंहिका अवलोकन करून आकाशामध्यें संचार करणारे प्राणी त्या वानरश्रेष्ठाला म्हणाले, " हे उड्डाण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ हनुमाना, आज ह्या मोठ्या राक्षसीचा वध केला, हें त्वां एक प्रचंडच कृत्य केलें. आतां

तूं आपला मनोरथ निर्विघ्नपणें सिद्धीस ने. हे वानराधिपते, धैर्य, प्रसंगावधान, मति आणि दक्षता हे चार गुण तुझ्याप्रमाणें ज्याचे ठिकाणीं असतात, तो उपस्थित झालेल्या कार्यासंबंधानें कधींहि पंचाइतींत पडत नाहीं"

### त्रिकुटाचलीं गमन.

ह्याप्रमाणें स्तुतीस पात्र असलेल्या त्या कपीची हातीं घेतलेल्या कार्याला अनुमोदन देऊन त्यांनीं प्रशंसा केली असतां तो गरुडाप्रमाणें आकाशाचें अवलंबन करून पुढें चालला; आणि जवळ जवळ पलीकडच्या तीराशीं पोहोंचल्यावर तो चोहोंकडे दृष्टि फेंकूं लागला असतां शंभर योजनांचे शेवटीं एक वनस्पति त्यानें अवलोकन केली. आकाशामध्यें उड्डाण करीत असतांनाच त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें नानाप्रकारच्या वृक्षांनीं भूषित असें एक बेट आणि मलयसंज्ञक पर्वतसंबंधीं उपवनें पाहिलीं. सागर, समुद्रतीरावरील प्रदेश, त्या प्रदेशावरील वृक्ष आणि नद्यांचीं मुखें हींहि त्यानें अवलोकन केलीं. तदनंतर मोठ्या मेघासारखें आणि म्हणूनच जसें कांहीं आकाश व्याप्त करणारें असें आपलें शरीर अवलोकन करून तो जितेंद्रिय वीर मनामध्यें विचार करूं लागला असतां, 'माझी शरीरवृद्धि आणि वेग अवलोकन करितांक्षणींच राक्षस आश्चर्यबुद्धीनें मला पाहण्यास उत्सुक होतील' असें त्याला वाटलें. तेव्हां वासनेच्या तावडींत सांपडल्यामुळें प्राप्त झालेला मोह नाहींसा झाला असतां जीवन्मुक्त योगी ज्याप्रमाणें जीवब्रह्मैक्यानुरूप स्वभावाचें अवलंबन करितो, त्याप्रमाणें तें आपलें पर्वतप्राय शरीर संकुचित करून हनुमान स्वाभाविक शरिराचें अवलंबन करून राहिला. सारांश, बलीचें वीर्य हरण करणारा श्रीहरि ज्याप्रमाणें तीन पावलें टाकिल्यावर वृद्धिंगत केलेलें शरीर संकुचित करून राहिला, त्याप्रमाणें हनुमानहि आपलें रूप संकुचित करून व स्वाभाविक वानररूपाचें अवलंबन करूं लागला.

असो. समुद्रतीराला जाऊन पोहोंचल्यानंतर, त्या श्रेष्ठ पर्वताच्या शिखरावर असलेली लंका अवलोकन करून व आपलें अतिप्रचंड रूप सोडून देऊन तो कपि पशुपक्ष्यांना त्रस्त करीत करीत त्या पर्वतावर येऊन उतरला. ह्याप्रमाणें दानव आणि पन्नाग ह्यांनीं युक्त असून मोठमोठ्या तरंगसमुदायांनीं भरून गेलेल्या सागराचें स्वपराक्रमानें उल्लंघन करून पर्वतशिखरावर उतरल्यानंतर महासागराच्या पैलतीरीं अमरावतीप्रमाणें असलेली लंका त्यानें अवलोकन केली.

# सर्ग दुसरा.

## लंकादर्शन.

हनुमान त्या त्रिकूटाचलाच्या शिखरावर जाऊन पोहोंचल्यानंतर वृक्षांपासून निघालेल्या पुष्पवृष्टीचा हनुमानावर सर्व बाजूंनीं वर्षाव झाला असतां, त्या ठिकाणीं तो वीर्यवान कपि पुष्पमयच बनून गेला. तो महापराक्रमी भव्य हनुमान एकदम शंभर योजनें समुद्र उल्लंघून जरी गेला होता, तरी त्याला थकवा मुळींच आलेला नव्हता; आणि म्हणूनच त्याचा श्वासोछ्वासहि पूर्वींपेक्षां अधिक वेगानें चालू झाला नव्हता. इतकेंच नव्हे, तर ‘ योजनांचीं अशीं मी पुष्कळ शतकें उल्लंघन करून जाण्यास समर्थ आहें, मग परिमित शंभर योजनेंच असलेल्या समुद्राच्या पैलतीराची कथा काय ! ’ असाहि विचार त्याच्या मनामध्यें चाललाच होता.

असो. वीर्यवानांमध्यें श्रेष्ठ आणि उड्डाण करणाऱ्यांमध्येंहि वरिष्ठ असा तो वेगवान वानर त्या पर्वतशिखरावर उतरून लंकेकडे निघाला. कोमल तृणांनीं युक्त असलेले नीलवर्ण प्रदेश आणि मध, सुगंध व वृक्ष ह्यांनीं युक्त असलेलीं वनें अवलोकन करीत करीत मध्यमार्गानें तो जाऊं लागला. प्रथमतः त्या त्रिकुटाचलावर तो वायुपुत्र बसला असतांना वनें, उपवनें आणि पर्वतशिखरावर असलेली लंका हीं त्यानें अवलोकन केलीं. तात्पर्य सुरू, प्रफुल्लित पांगारे, खर्जूर, चार, ईडलिंब, कुडे, केवडे, वाघंटीं, सुगंधयुक्त कळंब, सांतवण, असाणा, कांचन, प्रफुल्लित कण्हेर आणि त्याचप्रमाणें पुष्पभारांनीं व कळ्यांनीं भरलेले, पक्ष्यांनीं व्याप्त झालेले, आणि वायूमुळें चंचल अग्रांनीं युक्त झालेले इतरहि वृक्ष; हंस व कारंडव पक्ष्यांनीं आणि नानाप्रकारच्या कमलांनीं व्याप्त असलेल्या वापी; नानाप्रकारचे रमणीय क्रीडापर्वत, सर्व ऋतूंमध्यें पुष्पांनीं व फलांनीं युक्त असलेल्या नानाप्रकारच्या वृक्षांनीं गजबजून गेलेले अनेक प्रकारचे जलाशय व मनोहर उपवनें त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें अवलोकन केलीं. नंतर रावणानें संरक्षण केलेल्या लंकेसमीप तो भव्य हनुमान जाऊन पोहोंचला. ती लंका अनेक प्रकारच्या कमलांनीं भरलेल्या खंदकांनीं भूषित झालेली होती. आंत सीतेला हरण करून आणून ठेविलें असल्यामुळें, त्या रावणानें सभोंवती संचार करणाऱ्या प्रचंड धनुर्धारी राक्षसांच्या

योगानें तिचें संरक्षण केलें होतें. सुवर्णप्राकारानें ती रम्य महानगरी व्याप्त झालेली होती, आणि शरदृतूंतील मेघाप्रमाणें दिसत असलेल्या पर्वतप्राय गृहांनीं ती युक्त होती. मोठमोठ्या शुभ्रवर्ण रस्त्यांनीं ती नगरी व्याप्त झालेली होती, शेंकडों वाड्यांनीं गजबजून गेलेली होती, पताका आणि ध्वज ह्यांच्या योगानें सुशोभित झालेली होती आणि लतागणांनीं भूषित केलेल्या सुवर्णमय दिव्य तोरणांनीं शृंगारिलेली होती.

अशा प्रकारची ती लंका, अमरावती नगरी अवलोकन करणाऱ्या इंद्राप्रमाणें हनुमानानें अवलोकन केली. विश्वकर्मानें निर्माण केलेली आणि राक्षसाधिपति रावणानें संरक्षण केलेली ती लंका आकाशमध्यें उडतच आहे कीं काय, असें त्याच्या दृष्टीस पडलें. किल्ले व तट हा जिचा कटिप्रदेश आहे, सागर आणि वनें हीं जिचीं वस्त्रें आहेत, शतघ्नी व शूल हे जिचे केश आहेत, आणि मोठमोठे वाडे हीं जिचीं कर्णभूषणें आहेत, अशी ती विश्वकर्म्यानें जशी कांहीं मनाच्याच योगानें निर्माण केलेली लंका अवलोकन केल्यावर, तिच्या उत्तर द्वाराशीं जाऊन तो महावीर विचार करूं लागला. कैलासस्थाना-प्रमाणें उंच असलेलें तें उत्तर द्वार जसें कांहीं गगनचुंबित दिसत होतें, आणि उंच उंच असलेल्या उत्कृष्ट गृहाच्या योगानें जसें कांहीं आकाशालाच धारण करून राहिल्यासारखें दिसत होतें.

हनुमंताचे स्वगत विचार.

असो. सर्पांनीं भरून गेलेली गुहाच कीं काय अशा रीतीनें घोर राक्षसांनीं भरून गेलेली ती लंका, तिच्यांतील कडेकोट बंदोबस्त, तिच्या भोंवती असलेला सागर आणि भयंकर शत्रु रावण इतकीं लक्ष्यांत आणून हनुमान आपल्याशींच विचार करूं लागला. तो म्हणाला, " वानर जरी येथें आले, तरी त्यांचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं. कारण, युद्ध करून लंका जिंकणें देवांनाहि शक्य नाहीं. पर्वतावरील सपाट प्रदेशावर असलेल्या ह्या रावणरक्षित दुर्गम लंकेमध्यें येऊन सुद्धां अत्यंत महापराक्रमी राम करणार काय ? राक्षसांचे ठिकाणीं साम, दान व भेद ह्यांपैकीं कसलीच सोय नाहीं; आणि त्यांच्याशीं युद्ध करूनहि कांहीं उपयोग होईलसें दिसत नाहीं. वालिपुत्र अंगद, नील, मी व विचारी राजा सुग्रीव ह्या काय त्या बलाढ्य चार वानरांचीच गति येथें होण्यासारखी आहे. असो. तूर्त आधीं विदेहराजकन्या सीता जिवंत आहे किंवा नाहीं ह्याचा

शोध केला पाहिजे. त्या जनककन्येला अवलोकन केल्यानंतर मग तेथेंच जो काय विचार करावयाचा तो करूं."

असें ठरवून त्या पर्वताच्या शिखरावर स्थित असलेल्या त्या कपिश्रेष्ठानें रामाच्या अभ्युदयासंबंधानें सुमारें एक मुहूर्तपर्यंत विचार केला. तो म्हणाला, "ह्या रूपानें राक्षसांच्या नगरीमध्यें माझा प्रवेश होणें शक्य नाहीं. कारण, बलाढ्य व क्रूर राक्षसांनीं हिचें रक्षण केलेलें आहे. महातेजस्वी, महावीर्यवान आणि बलाढ्य जे राक्षस, त्या सर्वांना फसवून मला सीतेचा शोध लाविला पाहिजे. चक्षुरिंद्रियाला अगोचर आणि कृत्यामुळेंच अनुपमेय असें रूप धारण करून हातीं घेतलेलें मोठें कृत्य सिद्धीस नेण्याकरितां लंका नगरीमध्यें रात्रीं प्रवेश करणें मला उचित दिसतें."

असा विचार केल्यानंतर देवदैत्यांनाहि जिच्यावर हल्ला करितां येणार नाहीं, अशा प्रकारची ती लंका नगरी अवलोकन करून आणि वारंवार सुस्कारे टाकून हनुमान विचार करूं लागला, "दुरात्म्या राक्षसाधिपति रावणाच्या स्वतः दृष्टीस न पडतां जनककन्या मैथिली कोणत्या उपायानें माझ्या दृष्टीस पडेल ? उदार अंतःकरणानें युक्त असलेल्या रामाचें कार्य न बिघडतां एकांतामध्यें एकट्या सीतेशीं माझ्या एकट्याची कशी भेट होईल ? सूर्योदय झाला असतां ज्याप्रमाणें अंधकार नाहींसा होतो, त्याप्रमाणें अयोग्य दूताचें अवलंबन केल्यामुळें देश व काल विरुद्ध झाल्या कारणानें जवळ जवळ सिद्धीस गेलेलीं कार्यें नाहींतशीं होत असतात. कार्याकार्याविषयीं स्वामीनें मंत्र्यांसहवर्तमान जरी एकादा विचार निश्चित केला असला, तरी अयोग्य दूताशीं गांठ पडल्यावर त्या विचारापासून कांहींएक निष्पन्न होत नाहीं. कारण शहाणपणाच्या घमेंडींत असणारे दूत स्वामीकार्यांचा घात करितात. तेव्हां काय केलें असतां कार्यविघात होणार नाहीं, कसें वागलें असतां बुद्धिभ्रंश होणार नाहीं ? आणि कोणता उपाय योजिला असतां मीं केलेलें हें समुद्राचें उल्लंघन व्यर्थ होणार नाहीं ? मी राक्षसांच्या दृष्टीस पडलों असतां, रावणाच्या नाशाची इच्छा करणाऱ्या महात्म्या रामाचें हें कार्य व्यर्थ होईल. राक्षसांच्या समजण्यांत न येतां राक्षसरूपानें मला कोठें राहातां येणें शक्य नाहीं, मग दुसरें रूप धारण करून राहातां येण्याची गोष्ट पाहिजे कशाला ! कोणाच्या समजण्यांत न येतां वायूलाहि ह्या ठिकाणीं संचार करितां येणार नाहीं, असें मला वाटतें. कारण भयंकर कर्म करणाऱ्या राक्षसांना अज्ञात असें

कांहीं नाहीं. मी स्वतःच्याच रूपाचें अवलंबन करून जर दिवसा येथें राहीन, तर माझा नाश होईल, आणि स्वामीकार्याचाहि विघात होईल. तस्मात्, लघुत्वाचें अवलंबन करून मी स्वतःच्याच रूपानें रामाचें कार्य सिद्धीस नेण्याकरितां रात्रीं लंकेमध्यें जाईन. जिच्यामध्यें प्रवेश होणें अत्यंत दुर्घट आहे, अशा या रावणाच्या नगरीमध्यें रात्रीं प्रवेश करून आंतील सर्व घरांमध्यें जाईन, आणि जनककन्या सीता अवलोकन करीन."

ह्याप्रमाणें निश्चय केल्यावर वैदेहीच्या दर्शनाविषयीं उत्सुक झालेला तो वीर सूर्यास्ताची वाट पाहूं लागला.

सूर्यास्त झाल्यावर हनुमंतानें आपला देह अगदीं संकुचित केला, व विचित्र रूप धारण करणारा तो हनुमान अगदीं मांजराएवढा झाला. नंतर रात्र पडल्याबरोबर सत्वर उडी मारून तो प्रशस्त अशा मोठमोठ्या मार्गांनीं युक्त असलेल्या त्या रम्य नगरीमध्यें प्रविष्ठ झाला. मोठमोठ्या वाड्यांच्या रांगांनीं ती नगरी लांबलचक झालेली होती, आणि सुवर्णतुल्य स्तंभांनीं व सुवर्णसदृश जाळ्यांनीं ती गंधर्वनगरासारखी दिसत होती. अशा प्रकारची सात सात, आठ आठ मजली हवेल्यांनीं युक्त असलेली ती प्रचंड नगरी त्या हनुमानानें अवलोकन केली. सुवर्णभूषित आणि स्फटिकांनीं व्याप्त अशा अनेक प्रकारच्या स्थलांमुळें त्या लंकेंतील राक्षसांचीं घरें सुशोभित झालेलीं होतीं. इतकेंच नव्हे, परंतु राक्षसांच्या घरांच्या द्वारांसमीप जीं सुवर्णमय अद्भुत तोरणें होतीं, त्यांनीं तर सर्व बाजूंनीं भूषित असलेल्या त्या लंकेला प्रभामयच करून सोडिलेलें होतें.

अशा प्रकारें विचित्र आकारांनीं युक्त असलेली ती अतर्क्य लंका अवलोकन करून, एवढ्या मोठ्या नगरीमध्यें सीतेचा शोध कसा लागणार, असें मनांत येऊन तो खिन्न झाला; आणि अद्भुत नगरी दृष्टीस पडल्यामुळें तो आनंदित झाला. जिकडे तिकडे सफेती दिल्यामुळें शुभ्र आणि एकमेकांशीं खेटून राहिलेल्या सात सात मजली वाड्यांच्या रांगा जीमध्यें आहेत, उत्तम प्रकारच्या सुवर्णजालांनीं व तोरणांनीं जी युक्त आहे, आणि रावणाच्या बाहुबलानें सुरक्षित असूनहि भयंकर सामर्थ्ययुक्त राक्षसांनींहि ज्या नगरीचें विशेष रक्षण केलेलें आहे, अशा त्या प्रख्यात नगरीमध्यें हनुमानानें प्रवेश केला. इतक्यांत हनुमानाला साहाय्य करण्याकरितांच कीं काय, हजारों किरणांनीं युक्त असलेला आणि स्वतः तारांगणांचे मध्यभागीं असून तारांगणांच्या योगानें झळकत असलेला चंद्रहि चंद्रिकारूप छताच्या योगानें लोकांना व्याप्त करून

वर येऊं लागला. तेव्हां शंखासारखी ज्याची प्रभा आहे, दुग्ध अथवा कमल-तंतु ह्यांप्रमाणें ज्याचा वर्ण आहे, आणि सरोवरांत पोहणाऱ्या हंसाप्रमाणें जो भासत आहे, असा चंद्र त्या वानरवीरानें अवलोकन केला.

## सर्ग तिसरा.

### रात्रीं लंकेंत प्रवेश.

उंच उंच शिखरांनीं युक्त, आणि म्हणूनच लोंबत असलेल्या मेघांप्रमाणें दिसणाऱ्या त्या लंब नामक पर्वतावर धैर्य धरून राहिलेला तो बुद्धिमान व महाबलाढ्य कपिश्रेष्ठ रात्रीं लंकेमध्यें प्रविष्ठ झाला. ती लंका रावणानें रक्षिलेली असून रमणीय वनें व उदक ह्यांची तिच्यामध्यें समृद्धि होती. शरदृतूंतील मेघांप्रमाणें असलेल्या गृहांच्या योगानें तिला शोभा आलेली होती. सागराप्रमाणें तिच्यामध्यें घोष चाललेला होता. समुद्रावरील वायु तिच्यामध्यें वहात होता. अलका नगरीप्रमाणें उत्तम रीतीनें पोषण केलेल्या सैन्यानें तिचें रक्षण केलेलें होतें. मुख्य मुख्य द्वारांतून सुंदर मत्त गज ठेविलेले होते. शुभ्रवर्ण द्वारांनीं व तोरणांनीं ती युक्त होती. सर्पांनीं व्याप्त झालेल्या भोगवती नगरीप्रमाणें ती शुभ नगरी सुरक्षित होती. विद्युल्लतेनें युक्त असलेल्या मेघांनीं ती गजबजलेली होती. तारांगणांनीं ती युक्त होती. प्रचंड वायूचा शब्द तिच्यामध्यें सुरू होता. सुवर्णमय प्रचंड प्राकारानें अमरावती नगरीप्रमाणें ती परिवेष्टित होती, आणि लहान लहान घंटांचा घोष ज्यांमध्यें आहे, अशा पतकांनीं ती भूषित झालेली होती.

अशा प्रकारच्या त्या लंकेसमीप जातांक्षणीं, आनंदित झालेला तो हनुमान एकदम तिच्या भोंवतीं असलेल्या तटावर जाऊन बसला. आणि सर्व बाजूंनीं ती नगरी अवलोकन करितांक्षणीं चकित झाला. वैदूर्य रत्नांच्या देवडया ज्या-मध्यें बांधिलेल्या आहेत, अशीं सुवर्णमय द्वारें त्या नगरीला होतीं. हिरे, स्फटिक आणि मोत्यें त्यांना लाविलेलीं होतीं, रत्नखचित फरशांनीं तीं भूषित झालेलीं होतीं, उत्कृष्ठ सुवर्णाचे गज त्यांतून बसविलेले होते, त्यांचे ऊर्ध्वप्रदेश रौप्य-मय असल्यामुळें निर्मल व शुभ्र होते. वैदूर्य रत्नांच्या जिन्यांनीं तीं युक्त होतीं. त्यांतील मध्यप्रदेश धूलिरहित असून स्फटिकांनीं तयार केलेला होता, आणि मनोहर सभास्थानांनीं युक्त, क्रौंच व मयूर या पक्ष्यांच्या

शब्दानें नादित व राजहंसांनीं आश्रित अशा शुभ गृहांनीं ती भूषित झालेली होती. असो. नृत्यगीतसंबंधीं वाद्यें व भूषणें ह्यांच्या घोषामुळें सर्व बाजूंनीं नादित झालेली, आणि म्हणूनच अलकापुरीप्रमाणें असलेली ती लंका नगरी आकाशामध्यें उड्डाण करूनच राहिली आहे कीं काय, अशी अवलोकन करून हनुमानाला हर्ष झाला, आणि तो आपल्याशीं विचार करूं लागला. " उगारलेलीं आयुधें हातांमध्यें तयार ठेवून असलेल्या रावणसैन्यांनीं जिचें रक्षण केलेलें आहे, अशा ह्या लंका नगरीवर दुसऱ्याचा एकाएकीं हल्ला होणें शक्य नाहीं. कुमुद, अंगद, महाकपि सुषेण, मैंद आणि द्विविद ह्यांचा फार तर मोठ्या संकटानें ह्या नगरीमध्यें प्रवेश होईल; आणि विशेष आयास न पडतां, दर्भाच्या पेऱ्याप्रमाणें ज्याचे लोम आहेत, असा जो सूर्यपुत्र कपिश्रेष्ठ वानर त्याची आणि माझी मात्र ह्या नगरीमध्यें गति होणारी आहे. "

ह्याप्रमाणें विचार केल्यानंतर महापराक्रमी रामाचा व लक्ष्मणाचा पराक्रम मनामध्यें आणून तो आनंदित झाला. रत्नखचित प्राकाररूप वस्त्रांनीं युक्त, गोठे व गृहें ह्या कर्णभूषणांनीं संपन्न, आणि तोफा ठेवण्याचे बुरूज ह्या स्तनांनीं युक्त असलेली तरुण स्त्रीच कीं काय अशी ती नगरी त्याला भासली.

### लंकादेवतेचें दर्शन व तिचा पराजय.

तदनंतर तो वानरश्रेष्ठ आंत प्रवेश करूं लागला असतां, स्वतःचें म्हणजे अधिष्ठात्र्या देवतेचें रूप धारण करून त्या नगरीनें त्याची भेट घेतली. सारांश त्या वानरश्रेष्ठ हनुमानाला अवलोकन करून ती रावणरक्षित लंका स्वतःच उठली, आणि अक्राळ विक्राळ मुद्रा धारण करून त्या वीर हनुमानाच्या पुढें येऊन उभी राहिली. इतकेंच नव्हे, परंतु प्रचंड गर्जना करीत करीत ती त्याला म्हणाली, " हे वनचरा, तूं कोण आणि कोणत्या कार्याकरितां येथें आला आहेस, हें मला जिवंत आहेस, तोंच काय तें खरें खरें सांग. अरे वानरा, सर्व बाजूंनीं रावणाच्या सैन्यांनीं रक्षिलेल्या ह्या लंकेमध्यें तुझा प्रवेश होणें खरोखर शक्य नाहीं. "

हें भाषण ऐकून वीर हनुमान लंकादेवतेला म्हणाला, " तूं जें मला विचारीत आहेस, तें मी काय तें तुला खरेंखरें सांगेन; परंतु हे क्रूरे, भयंकर नेत्रांनीं युक्त अशी तूं कोण ह्या नगरीच्या द्वाराशीं उभी राहिली आहेस, आणि कशाकरितां तूं क्रोधानें माझी निर्भर्त्सना करीत आहेस, हें आधीं मला कळूं दे. "

हनुमानाचें हें भाषण श्रवण करितांच यथेष्ठ रूप धारण करणारी ती लंका क्रुद्ध झाली, आणि कठोर शब्दांनीं त्या वायुपुत्राला म्हणाली, "मी स्वतः अजिंक्य उसून महात्म्या राक्षसाधिपति रावणाच्या आज्ञेचें परिपालन करणारी आहें. त्याच्याच आज्ञेनें ह्या नगरीचें मी रक्षण करीत आहें. तस्मात्, माझी अवज्ञा करून ह्या नगरीमध्यें तुझा प्रवेश होणें शक्य नाहीं. आज तूं माझ्या हातुन वध पावशील, आणि येथें गतप्राण होऊन निद्रा करशील. वानरा, मी स्वतःच लंका नगरी आहें, आणि सर्व बाजूंनीं मीं आपलें रक्षण करीत आहें."

लंकादेवतेचें हें भाषण श्रवण केल्यावर तो वानरश्रेष्ठ तिचा पराजय करण्याविषयीं उद्युक्त झाला, आणि दुसरा पर्वतच कीं काय अशा रीतीनें तो तेथें अचल होऊन राहिला. नंतर अक्राळविक्राळ स्त्रीरूप धारण केलेल्या त्या लंकादेवतेकडे पाहून तो धैर्यवान व विचारी हनुमान तिला म्हणाला, "बुरूज, तट व वेशी ह्यांसहवर्तमान लंका नगरी अवलोकन करावी, एवढ्याकरितां मी येथें आलों आहें. आणि ती अवलोकन करण्याविषयीं मला फार उत्कंठा लागली आहे. सारांश, ह्या लंकेमध्यें असलेलीं वनें, उपवनें, अरण्यें आणि श्रेष्ठ श्रेष्ठ गृहें अवलोकन करण्याकरितां माझें येथें आगमन झालें आहे."

हें त्या हनुमानाचें भाषण श्रवण करून लंकादेवी पुनरपि कठोर शब्दांनीं त्याला म्हणाली, "हे दुर्बुद्धे, हे वानराधमा, मला जिंकल्यावांचून राक्षसाधिपति रावणानें रक्षिलेली ही नगरी आज तुझ्या दृष्टीस पडणें शक्य नाहीं."

वानरश्रेष्ठ हनुमान त्या निशाचरीला म्हणाला, "हे भद्रे, मी आपला ही नगरी अवलोकन करून आल्या मार्गानें निमूटपणें परत जाईन."

असें हनुमानानें सांगितल्यानंतर त्या लंकेनें भयंकर गर्जना केली, आणि वेगावेगानें त्या वानरश्रेष्ठ हनुमानाला तिनें एक चपराक लगावली. ह्याप्रमाणें लंकेनें त्याला अतिशय जोरानें ताडण केलें असतां, त्या वीर्यवान वायुपुत्रानें फारच मोठी गर्जना केली. नंतर क्रोधानें व्याप्त झालेल्या त्या हनुमानानें डाव्या हाताची मूठ वळून 'ही स्त्री आहे' असें समजून विशेष क्रोध न आणितां तिला एक तडाका दिला; परंतु त्या प्रहाराच्या योगानें ती अक्राळविक्राळ मुद्रेनें युक्त असलेली निशाचरी विव्हल झाली, आणि एकाएकीं भूमीवर पडली. तेव्हां आपल्या मुष्टिप्रहारानें भूमीवर पडलेल्या त्या लंकेला अवलोकन केल्यावर, ती स्त्री आहे असें मनांत येऊन त्या तेजस्वी हनुमानाच्या अंतःकरणामध्यें दया उत्पन्न झाली. इतक्यांत अत्यंत उद्विग्न झालेली ती लंका गर्व

सोडून देऊन स्फुंदत स्फुंदत हनुमंताला म्हणाली, "हे महापराक्रमी वानरश्रेष्ठा, प्रसन्न हो, आणि माझें रक्षण कर. हे सौम्या, सत्त्वशील असलेले महाबलाढ्य पुरुष शास्त्रमर्यादेला अनुसरून चालत असतात. हे महाबलाढ्य वीरा, मी स्वतः लंका नगरी असून तूं माझा पराजय केलेला आहेस. हे वानराधिपते, हें तथ्य मी तुला कथन करीत आहें, तें तूं श्रवण कर. पराक्रमानें जेव्हां कोणी वानर तुझा पराजय करील, तेव्हां राक्षसांना भय प्राप्त झालें आहे असें तूं समज. स्वतः ब्रह्मदेवानें मला असें वरदान दिलें होतें. तो ब्रह्मदेवानें ठरविलेला सत्य समय आज तुझ्या भेटीमुळें प्राप्त झाला आहे. त्याचें उल्लंघन होणें शक्य नाहीं. सारांश, सीतेच्या निमित्तानें दुरात्म्या रावणाचा आणि त्याबरोबर सर्व राक्षसांचा विनाशकाल आला आहे. तस्मात् वानरश्रेष्ठा, ह्या रावणरक्षित नगरीमध्यें तूं प्रवेश कर; आणि जीं जीं कार्यें ह्या नगरीमध्यें उरकून घेण्याची तुझी इच्छा असेल, तीं सर्व तीं तूं उरकून घे. तात्पर्य, मुख्य मुख्य राक्षसांनीं संरक्षण केलेल्या परंतु शापग्रस्त झालेल्या ह्या शुभ नगरीमध्यें प्रवेश कर, आणि हवा तिकडे जाऊन साध्वी जनककन्येला तूं आपल्या इच्छेप्रमाणें खुशाल शोधून काढ."

## सर्ग चौथा.

### हनुमंताचें नगरपरिभ्रमण.

यथेष्ठ रूप धारण करणाऱ्या त्या श्रेष्ठ लंका नगरीला स्वपराक्रमानें जिंकिल्यावर तो महातेजस्वी, महाधैर्यवान व महावीर्यवान कपिश्रेष्ठ रात्रीं भलत्याच द्वारानें प्राकारावर उडी मारून गेला, आणि लंकेमध्यें प्रविष्ठ झाला. ह्याप्रमाणें लंका नगरीमध्यें जरी त्यानें प्रवेश केला, तरी वानरराज सुग्रीवाचें हित करणाऱ्या त्या हनुमानानें प्रथमतः[1] डावा पाय लंकेमध्यें ठेविला. कारण ह्या

---

[1] प्रयाणकाले स्वगृहप्रवेशे विवाहकालेपि च दक्षिणाङ्घ्रिम् ।
कृत्वाग्रतः शत्रुपुरप्रवेशे वाम निदध्याच्चरणं नृपालयम् ॥

( प्रयाणसमयीं स्वगृहीं प्रवेश कर्तव्य असतांना, आणि विवाहार्थ गमन करितेवेळीं उजवा पाय पुढें टाकून जावें; परंतु राजवाड्यांत अथवा शत्रूच्या नगरामध्यें प्रवेश कर्तव्य असल्यास डावा पाय पुढें टाकावा. )

रीतीनें ठेविलेला तो वामपाद शत्रूंच्या मस्तकींच ठेविल्यासारखा होता. रात्रीं तो धैर्यवान वायुपुत्र हनुमान लंकेमध्यें प्रविष्ठ झाल्यानंतर वर आंथरिलेल्या पुष्पांनीं सुशोभित झालेल्या राजमार्गाचें अवलंबन करून चालला असतां मेघांच्या योगानें ज्याप्रमाणें आकाश रम्य दिसतें, त्याप्रमाणें वज्र, अंकुश इत्यादि आयुधांचीं चित्रें ज्यांत काढिलेलीं आहेत, आणि रत्नखचित खिडक्यांनीं जीं विभूषित झालेलीं आहेत, अशा गृहांच्या योगानें ती नगरी त्याला रमणीय भासूं लागली. कमलांचा व स्वस्तिकांचा आकार ज्यांना दिलेला आहे, अशा शुभ्र मेघसदृश, चित्रविचित्र व शुभ राक्षसगणांच्या गृहांनीं आणि सर्व बाजूंनीं अत्यंत विभूषित अशा वर्धमानसंज्ञक आकारांनीं युक्त असलेल्या गृहांनीं ती नगरी झळकत होती. रामकार्याकरितां संचार करणाऱ्या व वानरराज सुग्रीवाचें हित करणाऱ्या त्या भव्य वानरानें चित्रविचित्र पुष्पभूषणांनीं युक्त असलेली ती नगरी अवलोकन करून तिचें अभिनंदनहि केलें. नंतर ह्या घरावरून त्या घरावर जातां जातां कपिश्रेष्ठ हनुमानानें नानाप्रकारच्या आकृतींनीं युक्त असलेलीं घरें ठिकठिकाणीं अवलोकन केलीं; आणि मंद्र, मध्य व तार ह्या स्वरांनीं भूषित असलेलें मनोहर गायनहि त्यानें श्रवण केलें. स्वर्गांतील अप्सराच कीं काय अशा दिसत असलेल्या व मदनानें व्याकुळ झालेल्या स्त्रियांच्या तोरड्यांचा व कमरपट्ट्यांचा शब्द त्याच्या कानावर येऊं लागला. जिन्याच्या पायऱ्यांवरून खालीं घरंगळत जाणाऱ्या भूषणांचे ध्वनी, मोठमोठ्या लोकांच्या घरांमध्यें चाललेली टाळ्यांची गर्जना आणि ठिकठिकाणीं होत असलेले सिंहनाद त्याच्या कानावर येऊं लागले. राक्षसांच्या गृहांमध्यें अध्ययन करीत असलेल्यांचे मंत्र त्याला ऐकूं येऊं लागले, आणि वेदाध्ययनाविषयीं रत असलेले राक्षसहि त्याच्या दृष्टीस पडूं लागले. मोठमोठ्यानें गर्जना करून रावणाची प्रशंसा करणारे राक्षसहि त्याच्या अवलोकनांत आले. राजमार्ग व्याप्त करून राहिलेलें प्रचंड राक्षससैन्य त्याच्या दृष्टीस पडलें. मधल्या चौकामध्यें राक्षसांचे अनेक हेरहि कांहीं जटा धारण करून, कांहीं दीक्षा घेऊन, कांहीं मस्तकें मुंडून आणि कांहीं गोचर्म व कृष्णाजिन परिधान करून संचार करीत असतांना त्यानें पाहिले. कांहीं दर्भमुष्टिरूप आयुधें हातांत घेतलेले, कांहीं अग्निकुंडरूप आयुधांनीं युक्त असलेले, कांहीं कूट व मुद्गर हीं आयुधें हातीं घेतलेले, कांहीं दंडरूप आयुधें धारण केलेले, कांहीं एकाक्ष, कांहीं एकवर्ण, कांहीं स्फुरण पावणाऱ्या एका स्तनानें युक्त, कांहीं दिसण्यांत अक्राळविक्राळ, कांहीं फाटकीं वस्त्रें नेसलेले, कांहीं भयंकर अवयवांनीं युक्त

असलेले, कांहीं खुजे, कांहीं धनुर्धारी, कांहीं खड्पाणी, कांहीं बंदुका व मुसळें हीं आयुधें धारण करणारे, कांहीं परिघसंज्ञक उत्तम आयुधें हातांत घेतलेले, कांहीं चित्रविचित्र कवचांनीं झळकत असलेले, कांहीं विशेष स्थूल नसलेले, कांहीं विशेष कृश नसलेले, कांहीं विशेष उंच नसलेले, कांहीं विशेष ठेंगणे नसलेले, कांहीं विशेष गौरवर्ण नसलेले, कांहीं विशेष कृष्णवर्ण नसलेले, कांहीं विशेष कुबडे नसलेले, कांहीं कुरूप, कांहीं अनेक रूपें धारण केलेले, कांहीं सुरूप, कांहीं चांगले तेजस्वी, कांहीं ध्वज घेतलेले, कांहीं पताका घेतलेले आणि कांहीं नानाप्रकारचीं आयुधें धारण केलेले असे राक्षस त्यानें अवलोकन केले. शक्ति आणि वृक्ष हीं आयुधें, पट्टे, वज्र, गोफणी आणि पाश हातांमध्यें धारण केलेले राक्षस त्या महाकपि हनुमानानें अवलोकन केले. तसेंच माला धारण केलेले, अंगाला उटी लाविलेले, उत्कृष्ठ उत्कृष्ठ अलंकारांनीं भूषित झालेले, नानाप्रकारचे वेष घेतलेले, इच्छेप्रमाणें संचार करणारे आणि तीक्ष्ण शूल व वज्र धारण करणारे असेहि अनेक महाबलाढ्य राक्षस त्यानें पाहिले. रावणाच्या अंतःपुराचे समीप त्या राक्षसाधिपतीच्या हुकमानें लक्ष्यपूर्वक मधल्या चौकाचें रक्षण करणारें एक लक्ष सैन्य त्यानें पाहिलें. हें स्थान अवलोकन केल्यानंतर उत्कृष्ठ सुवर्णमय तोरणांनीं युक्त, आणि पर्वताच्या माथ्यावर असलेलें राक्षसाधिपतीचें प्रख्यात गृह त्यानें अवलोकन केलें. श्वेतकमलांनीं भूषित झालेल्या खंदकांनीं व कोटांनीं तें अगदीं परिवेष्ठित झालेलें आहे, असें त्या महाकपि हनुमानाच्या नजरेस आलें. तदनंतर स्वर्गतुल्य, दिव्य ध्वनींनीं नादित, घोड्यांच्या खेंकाळण्यांनीं नादयुक्त, अश्वरथांखेरीज दुसरींहि अद्भुत वाहनें, विमानें, अश्वाएवढाले शुभ्र गज, शुभ्र मेघसमुदायाप्रमाणें दिसत असलेले व शृंगारिलेले चौदंती हत्ती व मत्त पशुपक्षी ह्यांनीं भरलेले, मनोहर द्वारांनीं युक्त व अत्यंत वीर्यवान असलेल्या हजारों राक्षसांनीं रक्षण केलेलें जें त्या राक्षसाधिपतीचें सुरक्षित गृह, त्यांत हनुमान वानरानें प्रवेश केला. गृहामध्यें प्रवेश केल्यानंतर तो रावणाच्या अंतःपुरामध्येंहि गेला. त्या अंतःपुराभोंवतीं हेम व जांबूनद ह्या दोन प्रकारच्या सुवर्णाचा एक तट बांधिलेला होता. त्याचा ऊर्ध्वभाग मोठमोठ्या मूल्यवान मोत्यांनीं व हिऱ्यांनीं भूषित केलेला होता, आणि उत्कृष्ठ कृष्णागुरु व चंदन ह्यांच्या योगानें त्याचें पूजन केलें होतें.

# सर्ग पांचवा.

## सीतेचा शोध करणें.

तदनंतर तारांगणांच्या व आकाशाच्या मध्यभागीं आलेला, एकसारखी चंद्रिका प्रकट करणारा आणि सूर्यामुळें प्रकाशयुक्त किरणांनीं संपन्न असलेला चंद्र गोठ्यामध्यें भ्रमण करणाऱ्या मत्त वृषभाप्रमाणें त्या विचारी हनुमानानें अवलोकन केला. सारांश, लोकांच्या मानसिक दुःखांचा नाश करणारा, महासागराला वृद्धिंगत करणारा आणि सर्व भूतांना प्रकाशित करणारा चंद्र आकाशाचे मध्यभागीं येत असलेला त्यानें अवलोकन केला. भूमीवर मंदर पर्वताचे ठिकाणीं जी शोभा दिसते, रात्रीं सागराचे ठिकाणीं जी दृष्टीस पडते आणि त्याचप्रमाणें उदकामध्यें कमलांचे ठिकाणीं जी अवलोकनांत येते ती, शोभा मनोहर चंद्राचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येऊं लागली. रुप्याच्या पिंजऱ्यामध्यें असलेला हंस जसा शोभतो, मंदर पर्वताच्या गुहेंत राहिलेला सिंह जसा दिसतो, आणि मदमत्त गजावर आरूढ झालेला वीर जसा चमकतो, तसा आकाशांत असलेला चंद्र झळकूं लागला. ज्याचीं शिंगें तीक्ष्ण आहेत, आणि ज्याचें वशिंड मोठें आहे असा बैल, उन्नत शिखरांनीं युक्त असलेला श्वेतवर्ण महापर्वत, अथवा दंतांना सुवर्णभूषण घातलेला हत्ती जसा शोभतो, तसा परिपूर्ण कलंकरूप हरिणश्रृंगांनीं युक्त असलेला चंद्र शोभूं लागला. शीतोदकबिंदुरूप पंक म्हणजे अर्थात् धुकें ज्यांत नाहीं, अशा निर्मल आकाशामध्यें प्राप्त झालेला भगवान चंद्र फारच शोभूं लागला. कारण, सूर्याच्या किरणसंक्रमणानें त्यानें पृथ्वीवरील अंधकाररूप पंक नाहींसा केला होता, आणि आकाशसंप्राप्ति असल्यामुळें त्याच्यावरील कृष्णचिन्ह स्पष्ट चमकत होतें. गुहेच्या बाहेर येऊन झोकांत उभा राहिल्यामुळें जसा सिंह शोभूं लागतो, प्रचंड रणभूमीमध्यें आलेला गजेंद्र जसा दिसतो, आणि राज्यावर आलेला नरेंद्र जसा चमकूं लागतो, तसा सूर्यप्रकाश प्राप्त झालेला चंद्र झळकूं लागला. प्रकाशयुक्त चंद्र वर आल्यामुळें गृहांतील अंधकार ज्यानें नाहींसा केला आहे, राक्षसांचे मांसभक्षणरूप दोष ज्यानें वृद्धिंगत केले आहेत, आणि विलासिनी स्त्रियांच्या मनांतील वल्लभविषयक किल्बिष ज्यानें नाहींसें केलें आहे, असा सुखसमाधानभूत पूज्य रात्रिसमय फारच मनोहर दिसूं लागला. श्रवणेंद्रियाला सुखावह असे तंतुवाद्यांचे ध्वनि सुरू झाले. स्त्रिया पतींशीं अगदीं संमिलित होऊन निद्रा घेऊं लागल्या, आणि अत्यंत आश्चर्यकारक

व भयंकर वर्तन करणारे निशाचरहि विहार करण्यास प्रवृत्त झाले. ऐश्वर्यानें व मद्यपानानें मत्त झालेले लोक ज्यामध्यें आहेत, रथ, अश्व व चांगल्या चांगल्या बैठकी ह्यांनीं जीं गजबजून गेलेलीं आहेत, लोकांची ज्यांत अतिशय गर्दी झालेली आहे, आणि विरश्रीनें जीं व्याप्त झालेलीं आहेत, अशीं राक्षसांचीं गृहें त्या बुद्धिमान हनुमानाच्या दृष्टीस पडूं लागलीं. मत्त झालेले राक्षस एकमेकांशीं जोराजोरानें उत्तरें प्रत्युत्तरें करूं लागले, आपले लठ्ठ दंड एकमेकांसमोर थोपटूं लागले, उन्मत्त भाषणें करूं लागले आणि एकमेकांची निर्भर्त्सनाहि करूं लागले. राक्षस एकमेकांच्या वक्षःस्थलावर प्रहार करूं लागले, हस्तादि अवयव स्त्रियांवर टाकूं लागले, चित्रविचित्र रूपें धारण करूं लागले, आणि प्रचंड धनुष्यें आकर्षण करूं लागले. कांहीं राक्षसस्त्रिया अंगांना उट्या लावूं लागल्या, कांहीं पुनरपि निद्रा घेऊं लागल्या, मनोहर रूपानें व मुखानें युक्त असलेल्या अशा कांहीं हसूं लागल्या, आणि दुसऱ्या कांहीं क्रुद्ध होऊन सुस्कारे टाकूं लागल्या. असें सर्व त्या हनुमानाच्या दृष्टीस पडूं लागलें. फुस्कारे टाकीत असलेल्या सर्पांच्या योगानें ज्याप्रमाणें सरोवरें शोभूं लागतात, त्याप्रमाणें मुसमुसणाऱ्या वीरांच्या योगानें गर्जना करणाऱ्या महावीरांच्या योगानें, आणि अत्यंत पूज्य अशा बिभीषण-प्रभृति महासज्जनांच्या योगानें ती लंका नगरी शोभूं लागली. त्या लंका नगरी-मध्यें बुद्धि हा ज्यामध्यें मुख्य गुण आहे, ज्यांचें भाषण मनोहर आहे, जे श्रद्धाळु आहेत, आणि जगतामध्यें जे मुख्य आहेत, असें नानाप्रकारचीं रूपें व मनोहर नांवें धारण करणारे राक्षस हनुमानानें अवलोकन केले. आपल्या अंगांत असलेला जो सामर्थ्यगुण, त्याला अनुरूप म्हणजे आपणासारखे समर्थ, बहुगुणसंपन्न व सुस्वरूप असे राक्षस अवलोकन करून हनुमानाला आनंद झाला, आणि कांहीं राक्षस जरी विरूप होते, तरी तेजानें झळकूं लागल्यामुळें त्याला ते सुस्वरूप भासूं लागले. तदनंतर उत्कृष्ट अलंकार वगैरे धारण करण्यास योग्य, नेत्रकटाक्षादि शुद्ध हावभावांनीं युक्त, अंतःकरणानें उदार, नक्षत्रांप्रमाणें सुस्वरूप, आणि प्रियांचे ठिकाणीं व मद्यांचे ठिकाणीं आसक्त अशा त्या राक्षसांच्या स्त्रियाहि त्यानें अवलोकन केल्या. सुस्वरूपानें अगदीं जशा कांहीं जळत असलेल्या, लज्जेनें व्याप्त झालेल्या, पक्षी ज्याप्रमाणें पक्षिणींना आलिंगन देतात, त्याप्रमाणें पतींना गाढ आलिंगन दिलेल्या आणि हर्षानें व्याप्त झालेल्या अशा कांहीं स्त्रिया मध्यरात्रीचे सुमारास त्यानें अवलोकन केल्या. आपापल्या वाड्यांच्या गच्च्यां-वरून बसलेल्या, इतकेंच नव्हे परंतु पतींना पराकाष्ठेच्या प्रिय असल्यामुळें

त्यांच्या अंकावर अत्यंत सुखानें बसलेल्या, भर्तृसेवारूप धर्माचरणाविषयीं तत्पर असलेल्या आणि मदनानें ग्रस्त झालेल्या अशा दुसऱ्याहि कांहीं विवाहित स्त्रिया त्या बुद्धिमान हनुमानानें अवलोकन केल्या. कांहीं स्त्रिया वरचें अंग उघडें टाकिलेल्या, कांहीं सुवर्णरेषेप्रमाणें तेजस्वी व सडपातळ असलेल्या, कांहीं स्वरूपानें उत्तम असलेल्या, कांहीं सुवर्णासारख्या कांतीनें युक्त असलेल्या, कांहीं चंद्रासारख्या आल्हादकारक वर्णानें युक्त असलेल्या, कांहीं प्रियांचा वियोग झालेल्या, आणि कांहीं मनोहर देहकांतीनें युक्त असलेल्या स्त्रिया हनुमानानें अवलोकन केल्या. तदनंतर मनाप्रमाणें सुंदर पति मिळाल्यामुळें अत्यंत प्रीतियुक्त होऊन आपापल्या प्रिय पतींशीं रममाण होणाऱ्या, पुष्पांच्या योगानें रमणीय दिसूं लागलेल्या, घरामध्यें आनंदानें असलेल्या आणि आपापल्या पतींना अत्यंत मनोहर वाटणाऱ्या अशाहि कांहीं स्त्रिया त्या कपिश्रेष्ठ हनुमानानें अवलोकन केल्या. चंद्रासारख्या तेजस्वी मुखपंक्ति, उत्कृष्ठ पापण्यांनीं युक्त असलेल्या मनोहर नेत्रांच्या वक्र पंक्ति आणि विद्युल्लतांच्या मनोहर समुदायाप्रमाणें झळकत असलेल्या भूषणांच्या पंक्ति त्या हनुमानानें अवलोकन केल्या. परंतु विधात्यानें मनाच्याच योगानें उत्पन्न केलेली, परम कुलीन, धर्ममार्गानें चालणाऱ्या राजकुलामध्यें उत्पन्न झालेली आणि चांगल्या ठिकाणीं उगवलेल्या प्रफुल्लित वेलीप्रमाणें शोभत असलेली कृशोदरी सीता त्याच्या दृष्टीस पडली नाहीं. सनातन पातिव्रत्यधर्मानें चालणारी, रामाचें चिंतन करणारी, रामविषयक वासनेनें युक्त असलेली, भर्त्याच्या उदार मनामध्यें खिळून राहिलेली, उत्कृष्ठ स्त्रियांपेक्षांहि नेहमीं अधिक असलेली, वियोगतापानें पीडित झालेली, अश्रूंनीं कंठ दाटून आलेली, पूर्वीं रामचंद्रासमीप असतांना उत्कृष्ठ भूषणांना पात्र आणि म्हणूनच उत्तम अलंकारांनीं भरलेल्या कंठानें युक्त असलेली, मनोहर पापण्या व मधुर स्वर ह्यांनीं युक्त असून मयूरीप्रमाणें वनामध्यें वास्तव्य करण्यास प्रवृत्त झालेली, पतीचा वियोग झाला असल्यामुळें अभ्रानें अस्पष्ट झालेल्या चंद्रलेखेप्रमाणें दिसत असलेली, धुळीनें भरलेल्या सुवर्णरेषेप्रमाणें भासत असलेली, क्षत पडल्यामुळें वर्द्धिंगत झालेल्या बाणजन्य व्रणाप्रमाणें रामाला दुःखदायक झालेली आणि वायूच्या योगानें लवलेली सुवर्णरेषाच कीं काय अशी दृष्टोत्पत्तीस येऊं लागलेली प्रजाधिपति रामाची पत्नी सीता जेव्हां पुष्कळ वेळ शोध करूनहि दृष्टीस पडेना, तेव्हां हनुमान दुःखाकूल होऊन एकाएकीं जसा कांहीं मंद झाल्यासारखा दिसूं लागला.

# सर्ग सहावा.

## रावणगृहदर्शन.

यथेष्ट रूप धारण करणारा तो चलाख हनुमान स्वेच्छेनें सात सात मजली हवेल्या हिंडतां हिंडतां सर्व लंका फिरला. हिंडतां हिंडतां तो भव्य हनुमान, सूर्यासारख्या तेजस्वी आणि म्हणूनच उज्ज्वल अशा प्राकारानें परिवेष्टित असलेल्या राक्षसाधिपति रावणाच्या गृहासमीप गेला, आणि सिंहांनीं रक्षण केलेल्या महावनाप्रमाणें भयंकर राक्षसांनीं रक्षण केलेलें तें गृह अवलोकन करितां करितां सीतेला शोधून काढण्याविषयीं तो कपिश्रेष्ठ पुनरपि चळवळ करूं लागला. रुप्यानें मढविलेल्या व सुवर्णानें भूषित केलेल्या अद्भुत तोरणांनीं, आश्चर्यकारक चौकांनीं आणि मनोहर द्वारांनीं तें गृह युक्त होतें. गजारूढ झालेला महात, कधींहि थकवा न येणारे शूर, आणि अप्रतिहत गतीनें युक्त असलेले रथवाहक अश्व हे त्या गृहासमीप होते. सिंह व व्याघ्र ह्यांच्या चर्मांनीं आच्छादित, घंटांच्या योगानें घोषयुक्त, आणि हस्तिदंती सोन्याचीं व रुप्याचीं चित्रें धारण करणारे नानाप्रकारचे रथ एकसारखे तेथून हिंडत होते. असंख्य रत्नांनीं तें व्याप्त झालेलें होतें. उत्कृष्ट आसनांनीं तें भूषित झालेलें होतें. मोठमोठे रथखाने त्याच्या भोंवतीं बांधलेले होते,आणि महारथी तेथें सर्वदा वास्तव्य करीत होते प्रेक्षणीय व अत्यंत सुंदर अशा नानाप्रकारच्या हजारों पशुपक्ष्यांच्या योगानें तें सर्व बाजूंनीं भरलेलें होतें. हद्दीचें रक्षण करणाऱ्या नम्र राक्षसांनीं तें सुरक्षित होतें, आणि मुख्य मुख्य उत्कृष्ट स्त्रियांनीं तें सर्व बाजूंनीं गजबजून गेलेलें होतें. तें राक्षसाधिपति रावणाचें गृह उत्कृष्ट भूषणांच्या ध्वनीमुळें समुद्रासारखी गर्जनाच करीत आहे कीं काय असें भासत होतें. त्यांतील स्त्रीरत्नें आनंदित झालेलीं होतीं. छत्रचामरादि प्रसिद्ध राजचिन्हांनीं आणि मुख्य मुख्य उत्कृष्ट चंदनांनीं तें संपन्न होतें. सिंहांनीं व्याप्त झालेल्या महावनाप्रमाणें तें महाजनांनीं व्याप्त झालेलें होतें. तेथें नौबदी झडत होत्या. मृदंगाची थाप एकसारखी सुरू होती. शंखांचा घोष दुमदुमून राहिलेला होता. पर्वदिवशीं यज्ञाकरितां त्यांत सोमरस तयार करण्यांत येत असे. नेहमीं त्याचें अर्चन होत असे, आणि राक्षस सर्वदा त्याची पूजा करीत असत. महात्म्या रावणाच्या त्या प्रचंड गृहामध्यें मोठमोठ्या रत्नांचें सामान भरलेलें होतें, आणि समुद्राप्रमाणें तें गंभीर दिसत असून समुद्राप्रमाणें ध्वनिहि त्यांत चालू होता.

अशा प्रकारचें तें गृह हनुमानानें अवलोकन केलें असतां हें लंकेचें भूषणच आहे, असें त्या महाकपीला वाटलें, आणि तो रावणाच्या त्या घराजवळूनच संचार करूं लागला. तदनंतर ह्या घरावरून ह्या घरावर त्या रीतीनें राक्षसांचे वाडे, घरें आणि बागा हें सर्व पाहाण्याकरितां तो हनुमान निर्भयपणें लंकेमध्यें संचार करूं लागला. प्रथमतः त्या महावेगवान हनुमानानें प्रहस्त नामक राक्ष-साच्या घरावर उडी मारिली. नंतर महापार्श्व नामक राक्षसाच्या घरावर उड्डाण केलें. नंतर कुंभकर्णाच्या मेघतुल्य घरावर उडी मारून त्या महाकपीनें बिभीषणाच्या घरावर उड्डाण केलें. नंतर महोदर, विरूपाक्ष, विद्युज्जिव्ह व विद्युन्माली ह्यांच्या घरावर उडया टाकीत टाकीत तो महावेगवान कपि शेवटीं बहुदंष्ट्र, शुक व महाबुद्धिमान सारण ह्यांच्याहि घरांवरून उड्या टाकीत चालला. त्याचप्रमाणें तो वानरसेनाधिपति हनुमान इंद्रजिताच्या घरावर गेला, आणि नंतर जंबुमाली व सुमाली ह्यांच्याहि घरांवर त्या वानरश्रेष्ठानें उड्डाण केलें. त्याचप्रमाणें रश्मिकेतु, सूर्यशत्रु आणि वज्रकाय ह्यांच्या घरावर उड्या टाकून गेल्यानंतर धूम्राक्ष, संपाति, विद्युद्रूप, भीम, घन व विघन ह्यांच्याहि घरांवर त्या वायुपुत्रानें उड्डाण केलें. नंतर शुकनाभ, चक्र, शठ, कपट, ऱ्हस्वकर्ण, दंष्ट्र, लोमश, युद्धोन्मत्त, मत्त, ध्वजग्रीव, सादी, विद्युज्जिव्ह, द्विजिव्ह, हस्तिमुख, कराल, विशाल आणि शोणिताक्ष ह्यांच्याहि घरांवर तो वायुपुत्र हनुमान क्रमा-क्रमानें उड्डाण करीत गेला. त्या त्या मोठया मूल्यवान घरांवर गेल्यानंतर त्यानें त्या समृद्ध राक्षसांची संपत्ति अवलोकन केली. ह्याप्रमाणें वरकड सर्व बाजूंनीं हिंडल्यानंतर तो तेजःपुंज हनुमान राक्षसाधिपति रावणाच्या घराकडे आला.

नंतर संचार करितां करितां त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें, रावणाचें शयनस्थान असलेल्या रक्षण करीत विकृत मुद्रांनीं युक्त अशा राक्षसी अवलोकन केल्या. त्याचप्रमाणें त्या राक्षसाधिपतीच्या गृहामध्यें शूल, मुद्गर, शक्ति व तोमर हीं आयुधें धारण करणारे नानाप्रकारचे दुसरेहि राक्षसींचे समुदाय त्यानें अव-लोकन केले. तदनंतर आयुधें उगारून सज्ज असलेले मोठमोठे धिप्पाड राक्षस, आरक्तवर्ण, श्वेतवर्ण व पांढुरक्या रंगाचे महावेगवान अश्व, आणि कुलीन, रूपवान, गजशिक्षेमध्यें शिकविलेले, युद्धामध्यें ऐरावताची बरोबरी करणारे, शत्रूकडील गजांचा नाश करणारे, शत्रूसैन्याचा घात करणारे, मदस्राव चालला असल्यामुळें वृष्टि करणाऱ्या मेघांप्रमाणें अथवा जलस्रावांनीं युक्त असलेल्या पर्वतांप्रमाणें भासणारे, मेघांप्रमाणें गर्जना करणारे व समरांगणामध्यें

शत्रूंना जिंकण्यास अशक्य असे गज त्या गृहामध्यें त्यानें अवलोकन केले. त्याचप्रमाणें सुवर्णाचे अलंकार घातलेल्या हजार सेना त्यानें तेथें अवलोकन केल्या. सुवर्णालंकारांच्या समुदायांनीं गजबजून गेलेल्या आणि बालसूर्याप्रमाणें उज्ज्वल दिसत असलेल्या नानाप्रकारच्या पालख्या राक्षसाधिपति रावणाच्या गृहामध्यें त्या वायुपुत्र कपीनें अवलोकन केल्या. त्याचप्रमाणें चित्रें काढिलेले दिवाणखाने ज्यात आहेत अशीं गृहें, अद्भुत लतागृहें, क्रीडास्थानें, क्रीडे-करितां काष्ठांचे तयार केलेले पर्वत, रम्य असें रतिगृह आणि दिवसा विहार करण्याचें स्थल त्या राक्षसाधिपति रावणाच्या निवासस्थानामध्यें त्यानें अवलोकन केलें. सारांश, मंदरपर्वत समान, मयूर पक्ष्यांच्या निवासस्थानांनीं गजबजलेले, ध्वजदंडांनीं व्याप्त झालेलें, अनंत रत्नांच्या समुदायांनीं भरलेलें, सभोंवतीं द्रव्य-भांडारांचा समूहच कीं काय असें भोंवताळून भासणारें, पुण्यवानांनीं आच-रिलेल्या तपश्चर्येचें फलच कीं काय असें अनुभवाला येणारें, आणि कुबेराच्या गृहाची बरोबरी करणारें तें उत्कृष्ट गृह त्यानें अवलोकन केलें. रत्नांचा प्रभाव व रावणाचें तेज ह्यांच्या योगानें तें गृह, किरणांच्या योगानें शोभणाऱ्या सूर्याप्रमाणें शोभूं लागलें. शय्या, आसनें आणि स्वच्छ पात्रें हीं सर्व सुवर्णमयच त्या वानर-सेनाधिपतीनें तेथें अवलोकन केलीं. शेवटीं मद्य व आसव ह्यांच्यायोगानें आर्द्र, रत्नपात्रांनीं गजबजलेले, कुबेराच्या गृहाप्रमाणें विस्तीर्ण व मनोहर, तोर-ड्यांचा ध्वनि, कमरपट्ट्यांचा शब्द आणि मृदंगावर झडत असलेल्या थापांचा नाद ह्यांच्या योगानें व इतरहि घोषयुक्त वाद्यांच्या योगानें नादित, प्रासादसमु-दायांनीं युक्त, शेंकडों उत्कृष्ट स्त्रियांनीं भरून गेलेलें आणि विस्तीर्ण चौकांनीं युक्त असलेलें असें जें प्रचंड गृह, त्यामध्यें हनुमानानें प्रवेश केला.

# सर्ग सातवा.

### पुष्पक विमानदर्शन.

वैदूर्यरत्नखचित सुवर्णाच्या खिडक्या ज्यांत बसविलेल्या आहेत, आणि ज्यामध्यें पक्ष्यांचे समुदाय आहेत, असा तो गृहसमुदाय, पर्जन्यकालांतील विद्यु-ल्लतेनें व पक्षिसमुदायानें युक्त असलेल्या प्रचंड मेघजालाप्रमाणें त्या बलाढ्य वानरानें अवलोकन केला. उत्कृष्ट शंख, आयुधें व धनुष्यें ह्यांच्या योगानें शोभ-णाऱ्या नानाप्रकारच्या गृहपंक्ति आणि त्याचप्रमाणें पर्वततुल्य उंच उंच घरांवर

असलेल्या मनोहर व विशाल गच्चा त्यानें अवलोकन केल्या. नानाप्रकारच्या संपत्तींनीं झळकत असलेलीं, देवदैत्यांनाहि अत्यंत मान्य असलेलीं, कोणत्याहि दोषांनीं व्याप्त नसलेलीं व रावणानें स्वतःच्या बलानें संपादिलेलीं गृहें त्या वानरानें अवलोकन केलीं. लंकाधिपति रावणाचीं जीं गृहें हनुमानानें अवलोकन केलीं, त्यांची रचना प्रयत्नपूर्वक चांगल्या रीतीनें केलेली होती. प्रत्यक्ष मयासुरानें निर्माण केलेलीं आहेत कीं काय अशीं तीं अद्भुत दिसत होतीं, आणि ह्या भूतलावरील सर्व गुणांनीं तीं संपन्न होतीं.

नंतर मेघासारखें उन्नत, सुवर्णासारखें उज्ज्वल, मनोहर, अप्रतिम, मुख्य गृहांमध्यें उत्कृष्ट व आपल्या सामर्थ्याला अनुरूप असें एक राक्षसाधिपति रावणाचें गृह त्यानें अवलोकन केलें. वैभवानें झळकत असलेलें, अनेक प्रकारच्या रत्नांनीं भरलेलें, अनेक वृक्षांच्या पुष्पांनीं व्याप्त झालेलें आणि पुष्पपरागांनीं व्याप्त झालेल्या पर्वतशिखरांप्रमाणें दिसत असलेलें तें गृह, भूतलावर पाडिलेला स्वर्गच कीं काय असें भासत होतें. स्त्रीरत्नामुळें देदीप्यमान असलेलें तें वैभवसंपन्न गृह विद्युल्लतांनीं झळकत असलेल्या मेघाप्रमाणें, अथवा श्रेष्ठ श्रेष्ठ हंस पक्ष्यांनीं युक्त असलेल्या आकाशांतील उत्कृष्ट विमानाप्रमाणें दिसत होतें. नंतर अनेक धातूंनीं चित्रविचित्र झालेल्या पर्वत शिखराप्रमाणें अथवा गृह व चंद्र ह्यांच्या योगानें सुशोभित झालेल्या आकाशाप्रमाणें, किंवा अनेक वर्णांनीं युक्त व मनोहर मेघाप्रमाणें आश्चर्यकारक असलेलें असें बहुरत्नखचित पुष्पक विमान त्यानें अवलोकन केलें. त्या विमानांतील भूमि पर्वतपंक्तीनें भरून काढिलेली होती. आंतील रत्नमय पर्वत तशाच प्रकारच्या वृक्षसमुदायांनीं भरलेले होते. ते वृक्ष पुष्पसमूहांनीं भरून काढिलेले होते, आणि तीं पुष्पेंहि पराग व पाकळ्या ह्यांनीं भरून काढिलेलीं होतीं. आंतील गृहें शुभ्रवर्ण केलेलीं होतीं. पुष्करिणी उत्कृष्ट पुष्पांनीं युक्त केलेल्या होत्या. त्यांतील कमलें केसरांनीं भरलेलीं होतीं, आणि अद्भुत वनें व सरोवरेंहि त्यामध्यें होतीं.

तें रत्नप्रभांच्या योगानें झळकत होतें, आणि उत्कृष्ठ गृहांनाहि मागें टाकणारें होतें. त्या विमानांत वैदूर्य रत्नाचे, रुप्याचे आणि पोंवळ्याचे पक्षी केलेले होते. नानाप्रकारच्या द्रव्यांनीं नानाप्रकारचे भुजंग बनविलेले होते, आणि दिसण्यांत खरोखरीचेच असे शुभ अवयवांनीं युक्त असलेले अश्वहि त्यांत करून बसविलेले होते. पोंवळें व सुवर्ण ह्यांचीं पुष्पें ज्यांच्या पंखांमध्यें आहेत, लीलेनें ज्यांनीं आपले वक्र पंख संकुचित केलेले आहेत, आणि ज्यांचे पंख उत्कृष्ठ

असून कामोद्दीपक असल्यामुळें मदनाचे प्रत्यक्ष पंखच कीं काय असे भासत आहेत, अशा प्रकारचे उत्कृष्ठ चंचूंनीं युक्त असलेले पक्षी तेथें केलेले होते. लक्ष्मीच्या अभिषेकाकडे ज्यांची योजना झालेली आहे, असे कमलकेसरांनीं व उत्कृष्ठ शुंडांनीं युक्त असलेले व कमलपत्रें शुंडेमध्यें घेतलेले गज त्या विमानामध्यें होते. त्याचप्रमाणें आपल्या उत्कृष्ठ हातांमध्यें जिनें कमलें धारण केलेलीं आहेत, अशी लक्ष्मी देवीहि तेथें बनविलेल्या कमलयुक्त सरोवरामध्यें केलेली होती.

ह्याप्रमाणें मनोहर गुहांनीं युक्त असलेला पर्वतच कीं काय, अथवा वसंत ऋतूमध्यें रम्य कंदरांनीं युक्त असलेला अत्यंत सुगंधि सुंदर वृक्षच कीं काय, अशा त्या सुशोभित गृहासमीप जाऊन हनुमान विस्मित झाला. नंतर रावणानें आपल्या बाहुबलानें रक्षण केलेल्या त्या मान्य नगरीमध्यें उड्या टाकीत टाकीत तो संचार करूं लागला असतां, पतीच्या गुणांचें एकसारखें स्मरण होत असल्यामुळें क्षुब्ध, अतिदुःखित व अत्यंत मान्य अशी जनककन्या सीता जेव्हां त्याच्या दृष्टीस पडेना, तेव्हां तो दुःखित झाला. तदनंतर नानाप्रकारांनीं ज्याचें अंतःकरण संस्कृत झालेलें आहे, आणि ज्याच्या मनाला चांगलें वळण लागलेलें आहे, असा तो सन्मार्गवर्ती महात्मा हनुमान अतिशय लक्ष्य लावून संचार करीत असतांनाहि जनककन्या जेव्हां त्याच्या दृष्टीस पडेना, तेव्हां त्याच्या मनाला फारच दुःख झालें.

## सर्ग आठवा.

### पुष्पकविमानाची शोभा.

तो बुद्धिमान वायुपुत्र त्या रावणाच्या गृहासमीप बसला असतांना, त्या गृहामध्यें एक मोठें विमान त्यानें अवलोकन केलें. तें विमान उत्कृष्ठ उत्कृष्ठ रत्नानीं व्याप्त होतें, आणि उत्कृष्ठ सुवर्णाच्या खिडक्या त्यांत केलेल्या होत्या. अप्रतिम चित्रांनीं वगैरे सुशोभित केलेलें, विश्वकर्म्यानें स्वतः निर्माण केलेलें आणि आकाशगामी वायुमार्गामध्यें लटकत असलेलें तें विमान सूर्याच्या मार्गाचें चिन्हच होऊन राहिलें होतें. प्रयत्नपूर्वक केलेलें, अमूल्य रत्नें नसलेलें आणि उत्कृष्ठ गुण ज्यांत नाहींत, असें त्यांत कांहींएक नव्हतें. त्यांत ज्या विशेष गोष्टी

१ (झाडाच्या) डोल्यांनीं.

होत्या, त्यांचा देवांचे ठिकाणींहि अभावच होता. तप आणि समाधि ह्यांच्या योगानें प्राप्त झालेल्या पराक्रमानें तें विमान रावणानें संपादन केलें होतें. आंत बसणाराच्या मनास वाटेल त्या प्रदेशांत संचार करण्यास तें समर्थ होतें; त्या दिव्य विमानामध्यें नानाप्रकारच्या रचना केलेल्या होत्या, आणि असलेल्या सर्व कांहीं विशेष गोष्टी त्यामध्यें बनविलेल्या होत्या. यजमानाच्या इच्छेप्रमाणें तें शीघ्र गमन करणारें होतें. पापी जनांना तें प्राप्त होणें अशक्य होतें. गमनामध्यें तें वायूची बरोबरी करणारें होतें. महात्मे, अत्यंत संपन्न, कीर्तिमान व अत्यंत सुखी अशा पुण्यवान लोकांनाच मिळण्यास तें पात्र होतें. विशिष्ट गतीचें अवलंबन करून तें विमान राहिलेलें होतें. आकाशरूप विशेष प्रदेशामध्यें तें ठेविलेलें होतें. आश्चर्यकारक वस्तूंच्या समुदायाचें तें एक भांडारच होतें. नानाप्रकारच्या दालनांनीं तें भूषित केलेलें होतें. तें पाहाणाऱ्याचें मन रमविणारें होतें. शरदृतूंतील चंद्राप्रमाणें तें निर्मल होतें; आणि आश्चर्यकारक वस्तूंनीं भरलेलें पर्वताचें शिखरच कीं काय असें तें भासत होतें. कुंडलांच्या योगानें ज्यांचीं मुखें सुशोभित झालेलीं आहेत, आणि पापणीहि न हालणारे असे विशाल व तारवटलेले डोळे ज्यांचे आहेत, अशा प्रकारचे बहुभक्षक, महावेगवान, आकाशगामी व निशाचर असे हजारों भूतगण त्याचे वाहक होते.

असो. वानरवीरांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या हनुमानानें अशाप्रकारचें उत्कृष्ट पुष्पक विमान जें तेथें अवलोकन केलें, तें वसंत ऋतूंतील शोभेपेक्षांहि दिसण्यांत मनोहर होतें; आणि वसंत ऋतूंतील पुष्पसमुदायांच्या योगानें त्याची आकृति तर फारच सुंदर झालेली होती.

## सर्ग नववा.

### अंतःपुरदर्शन.

लंकेच्या मध्यभागीं असलेलें आणि गृहसमुदायांनीं व्याप्त झालेलें जें मोठें गृह, त्यामध्यें निर्मल आणि विस्तीर्ण असें एक उत्कृष्ट गृह वायुपुत्र हनुमानानें अवलोकन केलें. तें गृह राक्षसाधिपति रावणाचें असून अनेक राजवाड्यांनीं घेरिलेलें होतें. त्या प्रचंड गृहाची रुंदी अर्धें योजन असून लांबी एक योजन होती. दीर्घ नेत्रांनीं युक्त असलेली विदेहराजकन्या सीता शोधण्याकरितां

शत्रुनाशक हनुमान चोहोंकडे फिरला. तेव्हां फिरतां फिरतां राक्षसांचेंच ज्यामध्यें वास्तव्य आहे, अशीं उत्तम उत्तम घरें तो हनुमान टिपीत चालला असतां शेवटीं राक्षसाधिपति रावणाचेंहि तें घर त्याला लागलें. चार, तीन व दोन दांतांनीं युक्त असलेले गज जरी तेथें भरलेले होते, तथापि त्या घरांत खेचाखेच झालेली नव्हती. हातामध्यें आयुधें सज्ज ठेवून राक्षस त्याचें रक्षण करीत होते. राक्षसजातीय भार्या आणि पराक्रमानें जिंकून आणिलेल्या राजकन्या ह्यांच्या योगानें तें रावणाचें गृह व्याप्त झालेलें होतें. सारांश नक्र, मकर, तिमिंगिल व इतरहि मत्स्य ह्यांनीं व्याप्त, वायुवेगानें क्षुब्ध आणि भुजंगांनीं युक्त अशा सागराप्रमाणें तें दिसत होतें. कुबेर, चंद्र आणि गरुड ह्यांचे ठिकाणीं जी शोभा आहे. ती मनोहर शोभा कधींहि नष्ट न होतां रावणाचें घरीं नित्य होती. लंकेंतील राक्षसांच्या गृहांमध्यें असलेली संपत्ति राजा कुबेर, यम आणि वरुण ह्यांच्या संपत्तीप्रमाणें होती. इतकेंच नव्हे, तर किंबहुना जास्तहि होती. त्या गृहाचे मध्यभागीं उत्कृष्ठ रीतीनें तयार केलेलें आणि अनेक मत्त गजांनीं युक्त असलेलें असें विमान वायुपुत्र हनुमानानें अवलोकन केलें. तें पुष्पक नामक विमान सर्व रत्नांनीं भूषित झालेलें होतें; तें दिव्य विमान पूर्वी विश्वकर्म्यानें स्वर्गामध्यें ब्रह्मदेवाकरितां तयार केलेलें होतें. तें विमान ब्रह्मदेवापासून कुबेराला पराकाष्ठेच्या तपश्चर्येनें प्राप्त झालें होतें. परंतु राक्षसाधिपति रावणानें तर तें पराक्रमानें कुबेराला जिंकूनच प्राप्त करून घेतलेलें होतें. लांडगे ज्यावर काढिलेले आहेत, अशा सोन्यारुप्यांच्या उत्कृष्ठ स्तंभांनीं तें विमान झळकत असून कांतीनें जसें कांहीं पेटलेलेंच होतें. मेरुमंदरतुल्य गगनचुंबित अद्भूत गृहांनीं आणि शुभ अशा विहारगृहांनीं तें विमान सर्व बाजूंनीं अलंकृत केलेलें होतें. विश्वकर्म्यानें उत्तम रीतीनें तयार केलेलें तें विमान सूर्य व अग्नि ह्यांच्याप्रमाणें तेजस्वी असलेल्या सुवर्णमय व स्फटिकमय जाळ्यांनीं व खिडक्यांनीं युक्त होतें. सोन्याचे जिने त्यांत केलेले होते. सुंदर आणि श्रेष्ठ अशा बसावयाच्या जागा त्यांत तयार केलेल्या होत्या, इंद्रनील, महानील व इतर श्रेष्ठ श्रेष्ठ रत्नें ह्यांच्याहि जागा त्यांत बनविलेल्या होत्या. नानाप्रकारचीं पोंवळीं, महामूल्यवान रत्नें व निरुपम मोत्यें ह्यांच्या योगानें तयार केलेल्या फरशीनें तें विमान झळकत होतें. आरक्तवर्ण आणि सुवर्णवर्ण अशा अत्यंत सुगंधि चंदनानें तें युक्त असून बालसूर्याप्रमाणें तेजस्वी होतें.

असो. अशा प्रकारच्या त्या दिव्य विमानामध्यें तो महाकपि आरूढ झाला,

आणि दिव्य व मूर्तिमान वायुच कीं काय अशा रीतीनें सर्व प्रदेशांत व्याप्त होऊन राहिलेला पान, भक्ष्य व अन्न एतद्विषयक गंध सर्व बाजूंनीं घेऊं लागला. ज्याप्रमाणें एखादा बंधु दुसऱ्या आपल्या उत्कृष्ट बंधूला हांक मारीत असतो, त्याप्रमाणें तो गंध त्या महावीर्यवान हनुमानाला 'इकडे ये' म्हणून जिकडे रावण होता, तिकडे जसा कांहीं हांकच मारूं लागला. सारांश, त्या दिव्य गंधामुळें रावणाचें शयनगृह येथेंच कोठें तरी असावें, अशी हनुमानानें अटकळ केली. तदनंतर तो हनुमान तेथून निघाला असतां, उत्कृष्ठ स्त्रीप्रमाणें प्रिय असलेल्या अत्यंत रमणीय व विशाल अशा त्या रावणाच्या कल्याणकारक दिवाणखान्याकडे त्याचें लक्ष्य गेलें. त्या दिवाणखान्याला रत्नांचे जिने विशेष रीतीनें केलेले होते. सुवर्णजालामुळें त्याला शोभा आलेली होती. स्फटिकांच्या योगानें त्यांतील भूमि मढविलेली होती. मध्यें मध्यें हस्तिदंत, मोत्यें, हिरे, पोंवळीं, रौप्य व सुवर्ण ह्यांचीं चित्रें बसविलेलीं होतीं. रत्नस्तंभांनीं तो भूषित असून इतरहि पुष्कळ स्तंभांच्या योगानें त्याला सुशोभित केलेलें होतें. सरळ, एकसारखे, अतिशय उंच आणि सर्व बाजूंनीं भूषित अशा स्तंभांनीं तो दिवाणखाना युक्त असल्यामुळें, अतिशय उंच पक्षांच्या योगानें तो स्वर्गलोकीं जाण्यासच निघाला आहे कीं काय, असा भासत होता. पृथ्वीवरील वस्तूंचीं रूपें हें चिन्ह ज्याच्यावर काढिलेले आहे, असा एक मोठा गालिचा, राष्ट्रें व गृहें ह्यांनीं युक्त असलेल्या त्या पृथ्वीसारख्या विस्तीर्ण दिवाणखान्यामध्यें पसरलेला होता. मत्त पक्ष्यांनीं तो नादित झालेला होता. दिव्य गंधाचा त्यांत जिकडे तिकडे घमघमाट सुटलेला होता. मोठमोठ्या मूल्यवान बैठकी त्यांत घातलेल्या होत्या. राक्षसाधिपति रावण त्यांत होता, वस्तुतः हंस पक्ष्याप्रमाणें शुभ्र व निर्मल असूनहि, कृष्णागुरूचा धूप जळत असल्यामुळें तो धूम्रवर्ण बनलेला होता; आणि पत्रें व पुष्पें ह्यांची तेथें समृद्धि असल्यामुळें वसिष्ठांच्या चित्रविचित्र वर्ण गायींप्रमाणें त्याची कांति उत्कृष्ठ झालेली होती. आंत असणाऱ्याच्या देहाची कांति उत्कृष्ठ करून त्याच्या मनाला आनंद देणारा, त्याचा शोक नाहींसा करणारा आणि वैभवाची दिव्य खाणच कीं काय असा भासणारा तो दिवाणखाना होता. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध ह्या उत्कृष्ठ पांच विषयांच्या योगानें हनुमानाचीं पांचहि ज्ञानेंद्रियें त्या रावणरक्षित दिवाणखान्यानें मातेप्रमाणें तृप्त केलीं असतां, 'हा का स्वर्गलोक आहे? का देवलोक आहे? किंवा इंद्राची अमरावती नगरी आहे? अथवा ही कांहीं पराकाष्ठेची गंधर्व-

माया आहे!' असें त्याला वाटूं लागलें. तदनंतर अट्टल जुगाऱ्यांनीं जिंकिल्यामुळें विचार करीत बसलेल्या जुगाऱ्यांप्रमाणें तेथें असलेले सुवर्णदीप त्यानें अवलोकन केलें; आणि दीपांचा प्रकाश, रावणाचें तेज व भूषणांच्या प्रभा यांच्या योगानें तो दिवाणखाना त्याला जसा कांहीं पेटलेलाच भासूं लागला. नंतर अनेक वर्णांचीं वस्त्रें व माला धारण करून नानाप्रकारचे वेष व भूषणें धारण केलेल्या हजार उत्कृष्ठ स्त्रिया गालिचावर निजलेल्या त्याच्या दृष्टीस पडल्या. मध्यरात्रीचा समय झाला असल्यामुळें, रात्रीं क्रीडा करून श्रमलेल्या आणि मद्यपान व निद्रा यांच्या अधीन झालेल्या त्या स्त्रियांना गाढ झोंप लागली होती. यामुळें त्यांच्या नुपूरप्रभृति भूषणांचा ध्वनि अगदीं बंद पडला असल्या कारणानें, शब्दरहित हंस व भ्रमर ज्यामध्यें आहेत, अशा प्रचंड पद्मवनाप्रमाणें तो स्त्रीसमुदाय शोभत होता. मारुतीनें पाहिलें, तो त्या उत्कृष्ठ स्त्रियांचीं मुखें कमलगंधानें युक्त होतीं. कांहींचे नेत्र अर्धवट मिटलेले असून तीं ग्लानि आल्यासारखीं दिसत होतीं, आणि कांहींचे नेत्र पूर्णपणें मिटलेले होते. त्या मुखांचें कमलाशीं साम्य दिसून आल्यामुळें, प्रफुल्लित कमलांची ज्याप्रमाणें मत्त भ्रमर वारंवार इच्छा करीत असतात, त्याप्रमाणें ते एकसारखे ह्या मुखकमलांची इच्छा करीत आहेत, असेंहि त्या महाकपीला वाटूं लागलें; आणि गुणांमध्येंहि तीं कमलांचीच बरोबरी करणारीं आहेत, असें त्या हनुमानाचें मत झालें.

असो. शरदृतूमध्यें निर्मल झालेलें नभोमंडल ज्याप्रमाणें तारागणांनीं सुशोभित दिसतें, त्याप्रमाणें त्या रावणाची ती शयनशाला त्या स्त्रियांच्या योगानें सुशोभित झालेली होती. नक्षत्राधिपति श्रीमान चंद्रमा तारांच्या योगानें व्याप्त झाला असतां, जसा शोभतो तसा तो राक्षसाधिपति रावण त्या स्त्रियांनीं परिवेष्टित झाला असल्यामुळें शोभूं लागला. पदरीं कांहीं पुण्यांश शिल्लक असल्यामुळें, ज्या तारा आकाशापासून च्युत होत असतात, त्याच ह्या सर्व एकत्र जमलेल्या आहेत, असें त्या वानराला वाटलें. कारण त्या ठिकाणीं ज्या स्त्रिया होत्या, त्यांची देहकांति, रूप आणि उज्ज्वलताहि उत्कृष्ठ कांतीनें युक्त असलेल्या मोठ्या तारांप्रमाणें फारच स्पष्ट रीतीनें झळकत होती. पान आणि गायनप्रभृति क्रीडा चालल्या असतांना निद्रेनें घेरून गेलेल्या त्या स्त्रियांचे केश आणि भव्य माला इकडे तिकडे उडवल्या असून, त्यांच्या अंगांवरील उत्तमोत्तम भूषणेंहि अस्ताव्यस्त झालेलीं होतीं. कांहीं उत्कृष्ठ स्त्रियांचे तिलक नाहींतसे झाले होते. कांहींच्या पायांतील तोरड्या गळून गेलेल्या होत्या, आणि कांहींच्या

कंठांतील हारहि बाजूला पडले होते. कांहींच्या गळ्यांतील मोत्यांचे हार तुटलेले होते. कांहींचीं वस्त्रें गळालेलीं होतीं, आणि कमरपट्टे अस्ताव्यस्त झाले असल्यामुळें, भार वाहून थकलेल्या घोड्यांप्रमाणें कांहीं अस्ताव्यस्त लोळत पडल्यासारख्या दिसत होत्या, कांहींचीं कुंडलें जाग्यावर नव्हतीं. कांहींच्या माळा चुरगळून तुटून गेलेल्या होत्या ह्यामुळें गजेंद्रांनीं तुडविलेल्या महावनांतील प्रफुल्लित लतांप्रमाणें त्या दिसत होत्या. चंद्राच्या लहान मोठ्या किरणांप्रमाणें ज्यांची प्रभा आहे, असे कांहीं स्त्रियांचे वर आलेले मोत्यांचे हार त्या स्त्रियांच्या स्तनांमध्यें निद्रिस्थ झालेल्या हंसांप्रमाणें शोभूं लागले. दुसऱ्या स्त्रियांच्या वैदूर्यरत्नमाला स्तनांच्या मध्यभागीं आल्या असल्यामुळें बदकांप्रमाणें दिसत होत्या. इतर स्त्रियांच्या कंठांतील सोन्याचे पदर चक्रवाक पक्ष्यांप्रमाणें दिसत होते. हंस, कारंडव आणि चक्रवाक ह्या पक्ष्यांनीं सुशोभित झालेल्या नद्या ज्याप्रमाणें वाळवंटामुळें झळकत असतात, त्याप्रमाणें त्या स्त्रिया कटिप्रदेशामुळें चकमत होत्या. घुंगुरांप्रमाणें ज्यांचे डोळे मिटलेले आहेत, अशा त्या स्त्रिया निद्रिस्थ झालेल्या नद्याच कीं काय अशा दिसत होत्या. कारण सुवर्णरूप असंख्य कमलांनीं, स्वप्नविषयक सुरतक्रीडारूप मकरांनीं, आणि कांतिरूप तीरांनीं त्या युक्त होत्या. कांहीं स्त्रियांच्या कोमल अवयवांचे ठिकाणीं आणि कांहींच्या स्तनाग्रांचें ठिकाणीं गडबडीमध्यें उठलेले भूषणांचे ओरखडेहि उत्कृष्ट भूषणांप्रमाणेंच शोभूं लागले. कांहींच्या वस्त्रांचे पदर मुखांतील वायूनें कांपित होत असल्यामुळें मुखाच्या वरवर वारंवार उडतच राहिलेले होते. ह्यामुळें रावणभार्यांच्या मुखांसमीप नानाप्रकारच्या सुवर्णतंतूंनीं बनविलेल्या वस्त्रांच्या उत्कृष्ट तेजस्वी पताकाच फडफडत आहेत कीं काय असे ते वस्त्राचे पदर झळकूं लागले. उत्कृष्ट कांतीनें युक्त असलेल्या कांहीं स्त्रियांचीं कुंडलें मुखवायूच्या संपर्कामुळें हालूं लागून हळू हळू वाजूं लागलीं. त्यांच्या मुखांतून बाहेर पडणारा निःश्वास शर्करासवाच्या गंधानें युक्त असून स्वभावतःच सुगंधि व सुखावह होता. तो रावणाची सेवा करीत होता. सारांश, त्यांच्या मुखापासून निघालेला सुगंधि व सुखावह वायु रावणाकडे जात होता. मद्यपानाचा मद आणि निद्रा ह्यांनीं घेरून गेलेल्या कांहीं रावणस्त्रिया रावणाचींच मुखें आहेत, असें समजून वारंवार आपल्या सवतीच्या मुखांचा वास घेऊ लागल्या, रावणाचे ठिकाणीं मन अतिशयच आसक्त झाले असल्यामुळें सर्वस्वी परतंत्र बनलेल्या त्या उत्कृष्ट स्त्रियाहि, सवतींनीं आपल्या मुखांचा

वास घेतल्यामुळें क्रुद्ध न होतां त्या सवतींचें प्रियच करूं लागल्या. तात्पर्य, त्याहि निद्रेनें व मद्यपानजन्य मदानें घेरिल्या असल्यामुळें, रावणच आपल्या मुखाचा वास घेत आहे, असें समजून उलट त्या सवतीच्या मुखांचा वास घेऊं लागल्या. त्या सवतीहि रावणच आपल्या मुखांचा वास घेत आहे, असें समजूं लागल्या. गोठ, तोडे वगैरे अलंकार धारण केलेल्या दुसऱ्या कांहीं तरुण स्त्रिया उशाला हात घेऊन तेथें निजल्या होत्या, आणि कांहीं उशाखालीं वस्त्रें घेऊन निजल्या होत्या. एक दुसरीच्या वृक्षस्थलावर शयन करीत आहे, तिचा हात उशाशीं घेऊन दुसरीच कोणी निजली आहे. एक दुसरीच्या मांडीवर डोकें ठेवून झोंप घेत आहे, आणि तिच्याहि स्तनांवर पडून दुसरी शयन करीत आहे. अशा रीतीनें एकमेकींच्या माड्यांवर, बरगड्यांवर, कमरेवर आणि पाठीवर मस्तक ठेवून पडलेल्या त्या स्त्रिया मद व रावणासंबंधीं प्रेम ह्यांच्या अधीन झाल्या असल्यामुळें एकमेकींच्या अंगांवर पडल्या होत्या. एकमेकींच्या अंगसंगामुळें आनंदित होणाऱ्या त्या अत्यंत सुंदर स्त्रिया हातांनीं एकमेकींना आलिंगन देऊन तेथें शयन करीत होत्या. एकमेकींच्या हस्तरूप दोऱ्यांनीं ग्रथित झालेली ती स्त्रियांची माला, सूत्रामध्यें ग्रथित केलेली पुष्पमाला मत्त भ्रमरांनीं युक्त झाली असतां जशी शोभते, तशी शोभूं लागली. रावणाच्या स्त्रियांचा तो समुदाय, वैशाखामध्यें वायूच्या संपर्कामुळें प्रफुल्लित झालेल्या लतांच्या वनाप्रमाणें दिसत होता. कारण, एकमेकींचा संबंध झाला असल्यामुळें, माळी ज्याप्रमाणें माला गुंफितो, त्याप्रमाणें त्या स्त्रियांची एक मालाच गुंफिल्यासारखी दिसत होती त्यांच्या अंगावरील भूषणसमुदाय हेच त्या वनांतील परस्पर संलग्न झालेल्या पुष्पराशींप्रमाणें दिसत होते. वल्लभांच्या स्कंधांभोंवती त्यांनीं आपल्या भुजांचें आलिंगन दिलें असल्यामुळें, वृक्षाला वेष्टण करून राहिलेल्या लतांप्रमाणें त्या शोभत होत्या, आणि एकमेकींचे केशपाश एकमेकींवर पडले असल्यामुळें, भ्रमरांनीं भरून गेलेल्या लतांप्रमाणें त्या भासत होत्या. त्या स्त्रियांचीं भूषणें वगैरे जरी प्रथम योग्य ठिकाणीं चांगल्या रीतीनें व्यवस्थित घातलेलीं होतीं, तरी त्या निद्रेच्या वगैरे अधीन झाल्यामुळें भूषणें, अवयव आणि माला हिच्या कोणत्या आणि तिच्या कोणत्या, हें स्पष्टपणें ठरविणें अशक्य झालें होतें. रावण सुखानें निजला असतांना त्या दिवाणखान्यामध्यें जळत असलेले सुवर्णदीप हे, डोळ्यांचें पातें न लववितां त्या नानाप्रकारच्या कांतीनें युक्त असलेल्या स्त्रियांकडे पहात बसलेले कांहीं पुरुषच आहेत कीं काय, असें भासूं लागलें.

राजर्षी, विप्र, दैत्य, गंधर्व आणि राक्षस ह्यांच्या कन्या मदनाधीन होऊन त्या रावणाच्या भार्या झालेल्या होत्या. युद्धाची इच्छा धरणाऱ्या रावणानें त्यांपैकीं पुष्कळ स्त्रिया युद्धामध्यें हरण करून आणिलेल्या होत्या, आणि मदनानेंच मोहित झाल्यामुळें कांहीं तरुणी स्त्रिया आपोआप त्याच्याकडे आलेल्या होत्या. सारांश, रावण जरी सामर्थ्यवान होता, तरी त्यांतील कांहीं तरुणी स्त्रिया त्यानें बलात्कारानें आणिलेल्या नसून ऐश्वर्यप्रभृति गुण त्याचे अंगीं असल्यामुळें त्याला त्या आपोआपच प्राप्त झालेल्या होत्या. प्रथमतः दुसऱ्यानें स्वीकारिलेली अशी एकहि स्त्री त्यांमध्यें नसून, श्रेष्ठ रामालाच पात्र अशा जनककन्या सीतेवांचून दुसऱ्याची इच्छा करणारीहि स्त्री तेथें दुसरी कोणी नव्हती.

असो. कुलीन नसलेली, कुरूप, दुःशील, उत्तम भूषणें, वस्त्रें वगैरे नसलेली, हलक्या मनाची आणि वल्लभाला अप्रिय अशी एकहि स्त्री त्या रावणाची भार्या नव्हती. त्या स्त्रिया अवलोकन केल्यानंतर सद्बुद्धि वानराधिपति हनुमानाच्याहि प्रथम मनांत आलें कीं, "ह्या प्रचंड राक्षसराज रावणाच्या भार्या आहेत. तेव्हां रामाच्या धर्मपत्नीला जर ह्यांच्याचप्रमाणें रावणाचा उपभोग घडत असेल, तर मात्र ह्या रावणाचें चांगलेंच झालें म्हणावयाचें. कारण रावणानें आपल्या पत्नीचा उपभोग घेतला, असें रामाला कळल्याबरोबर ती मेली, असें समजून राम तिच्याविषयीं उदासीन राहील. आणि तसें झालें असतां अर्थात्च रावणाचा वध त्याच्या हातून होणार नाहीं." हा विचार येतो न येतो तोंच, "लंकाधिपति महात्म्या रावणानें मायिक रूप धारण करून जरी सीतेच्या संबंधानें अपहार करण्याचें निंद्य अनार्य कर्म केलें आहे, तरी गुणांनीं सीता इतर स्त्रियांपेक्षां निःसंशय अधिक आहे, आणि म्हणूनच रावणाचा तिला उपभोग घडण्याचा संभव नाहीं" असें त्याला वाटलें; आणि त्याप्रमाणें त्याचा निश्चयहि झाला.

## सर्ग दहावा.

### रावणदर्शन.

त्या दिवाणखान्यामध्यें हनुमान पाहूं लागला असतां दिव्यस्थानतुल्य असा एक पलंग ठेवण्याचा उत्कृष्ठ चौरंग त्याच्या दृष्टीस पडला. तो चौरंग स्फटि-

काचा असून रत्नांनीं भूषित केलेला होता. त्या चौरंगावर स्त्रियांचे मोठमोठे मूल्यवान पलंग ठेविलेले होते. त्या पलंगांचे अवयव हस्तिदंती व सुवर्णाचे असे चित्रयुक्त केलेले असून वैदूर्यप्रभृति रत्नें जडलेलीं मोठमोठीं मूल्यवान आस्तरणेंहि त्यांच्यावर घातलेलीं होतीं. त्या चौरंगावर एका बाजूला दिव्य माळांनीं सुशोभित आणि चंद्रासारखें आल्हादकारक श्वेतवर्ण छत्र हनुमानानें अवलोकन केलें. नंतर त्याच चौरंगावर एके ठिकाणीं एक उत्कृष्ठ पलंग त्याच्या दृष्टीस पडला. तो सुवर्णानें मढविलेला होता. त्याची प्रभा अग्नीप्रमाणें होती, आणि अशोकपुष्पांच्या मालांनीं तो युक्त होता. हातांमध्यें चौऱ्या घेऊन स्त्रिया त्या पलंगासभोंवतीं वारीत उभ्या राहिल्या होत्या. नानाप्रकारच्या सुगंधांनीं तो पलंग युक्त होता, आणि उत्कृष्ठ प्रकारच्या धूपानें तो धूपविलेला होता. उत्कृष्ठ आस्तरणें त्यावर पसरिलेलीं होतीं. लोंकरीचीं वस्त्रें आणि अजिनें ह्यांनीं तो व्याप्त झालेला होता, आणि उत्कृष्ठ पुष्पांच्या मालांनीं तो सर्व बाजूंनीं सुशो-भित केलेला होता. त्या पलंगावर शयन करीत असलेला रावण त्यानें अवलो-कन केला. तो मेघासारखा दिसत होता. देदीप्यमान व उज्ज्वल कुंडलें त्यानें धारण केलेलीं होतीं. त्याचे नेत्र आरक्त वर्ण होते व बाहु दीर्घ होते. सुवर्णतंतूंनीं निर्माण केलेलीं वस्त्रें त्यानें परिधान केलेलीं असल्यामुळें, आणि रक्तवर्ण सुगंधि चंदन त्याच्या अंगाला चोपडिला असल्यामुळें, विद्युल्लतेसहवर्तमान असलेल्या आकाशांतील संध्याकाळच्या आरक्तवर्ण मेघाप्रमाणें तो दिसत होता. तो यथेष्ठ रूप धारण करणारा व सौंदर्यसंपन्न असून दिव्य भूषणांनीं व्याप्त झाला असल्यामुळें, वृक्षसमुदाय आणि झुडपें ह्यांनीं युक्त असलेला मंदर पर्वतच गाढ झोपीं गेलेला आहे कीं काय, असा दिसत होता. उत्कृष्ठ भूषणांनीं तो भूषित झालेला असून सुरतक्रीडा करून श्रांत झालेला होता. राक्षसकन्यांना तो प्रिय असून राक्षसांनाहि सुखावह होता. त्यानें मद्यपान केलें असून व सुरतक्रीडा करून तो स्वस्थ पडला होता.

अशा प्रकारें उज्ज्वल पलंगावर निद्रिस्थ झालेला आणि भुजंगाप्रमाणें निः-श्वास टाकीत असलेला तो रावण त्याच्या दृष्टीस पडला खरा; पण त्याच्या जवळ जातांच तो वानरश्रेष्ठ अत्यंत उद्विग्न झाला, आणि अति भयभीत झाल्या-प्रमाणें तो एकदम दूर झाला. नंतर एका जिन्यावर चढून व त्याच्या मधल्या पायरीवर बसून तो महाकपि मत्त होऊन पडलेल्या त्या राक्षसाकडे पाहूं लागला. मत्त गज नेहमीं ज्याच्या संनिध असतो, अशा प्रचंड जलप्रवाहाप्रमाणें तें शयन

करणाऱ्या राक्षसाधिपति रावणाचें शुभ शयनस्थान शोभत होतें. महात्म्या राक्षसाधिपति रावणाचे इंद्रध्वजतुल्य असे पसरिलेले हात सुवर्णबाहुभूषणांनीं युक्त झालेले त्या हनुमानानें अवलोकन केले. युद्धामध्यें ऐरावत गजाच्या दंताग्रांनीं पडलेल्या क्षतांच्या खुणा त्यांच्यावर होत्या. इंद्राच्या वज्रामुळें त्याच्या पुष्ट स्कंधावर ओरखडे उठलेले होते. विष्णूच्या सुदर्शन चक्रामुळें पडलेल्या क्षतांच्याहि खुणा त्यांच्यावर होत्या. ते बाहु जात्याच पुष्ट असून स्कंधासारखे व उत्कृष्ठ होते. त्या बाहूंचें ठिकाणीं बल असून त्यांचे स्नायुहि दृढ होते. त्यांचीं नखें व अंगुष्ठ सुलक्षणांनीं युक्त होते. उत्कृष्ठ उत्कृष्ठ आंगठ्या त्या हातांत घातलेल्या होत्या. आच्छादित असलेल्या त्या बाहूंचा आकार अडसरांप्रमाणें असून गजशुंडेप्रमाणें ते वर्तुल होते. शुभ्र शय्येवर पसरले असल्यामुळें ते पंचमुखी नागांप्रमाणें दिसत होते. सशाच्या रक्ताप्रमाणें अत्यंत लाल, अतिशयच गार आणि फारच सुगंधि अशा महामूल्यवान चंदनाची उटी त्यांना लाविलेली असून उत्तम प्रकारचे अलंकार त्यांवर घातलेले होते. उत्कृष्ठ स्त्रियांचा आलिंगनादि संपर्क त्यांना झालेला होता. उत्तम उत्तम सुगंध त्यांना लाविलेले होते, आणि यक्ष, पन्नग, गंधर्व, देव व दानव ह्यांना ते भय उत्पन्न करणारे होते.

असो. अशा प्रकारचे त्या रावणाचे शय्येवर असलेले बाहु मंदर पर्वताच्या गुहेमध्यें अंगाला उटी लावून निद्रिस्थ झालेल्या महासर्पांप्रमाणें त्या कपीनें अवलोकन केले. सर्व गुणांनीं परिपूर्ण असलेल्या उभयतां बाहूंच्या योगानें तो पर्वततुल्य राक्षसाधिपति रावण शिखरांच्या योगानें शोभणाऱ्या मंदर पर्वताप्रमाणें शोभत होता. आम्रगंधाप्रमाणें आणि उंडीच्या वासाप्रमाणें त्याच्या शरिराला सुवास येत होता. उत्कृष्ठ बकुलाप्रमाणें त्याचा श्वास सुगंधि होता; आणि षड्रसांनीं युक्त असलेल्या उत्तम अन्नाचा व मद्याचा गंध त्याचे ठिकाणीं येत होता. त्या शयन करीत असलेल्या राक्षसाधिपति रावणाच्या मुखांतून निघालेला निःश्वास जसा कांहीं तें अंतःपुर भरूनच टाकीत होता. त्याचे मस्तकीं मोत्यें व रत्नें जडल्यामुळें चित्रविचित्र बनलेला आणि तो रावण निद्रावस्थेंत असल्यामुळें अस्ताव्यस्त झालेला सुवर्णाचा मुकुट झळकत होता. पुष्ट, रुंद आणि विशाल असें त्याचें वक्षःस्थल रक्तचंदनानें चोपडिलेले असून उत्कृष्ठ हारानें झळकत होतें. आरक्तवर्ण नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या रावणानें नेसलेला पांढरा पीतांबर अस्ताव्यस्त झालेला होता, आणि महामूल्यवान अशा पीतवर्ण उत्तरीय वस्त्रानें तो अगदीं गुरफटून गेलेला होता. उडदाच्या राशीप्रमाणें असलेला आणि भुजंगा-

प्रमाणें फों फों करीत शय्येवर पडलेला तो रावण गंगेच्या अगाध उदकामध्यें निद्रिस्थ झालेल्या गजाप्रमाणें शोभत होता. चारी दिशांस ठेविलेल्या चार सुवर्णदीपांचा प्रकाश त्याच्यावर पडत असल्यामुळें, विद्युल्लतांच्या समुदायांनीं सर्व अवयव प्रकाशित झालेल्या मेघांप्रमाणें तो दिसत होता. भार्या ज्याला प्रिय आहेत, आणि ज्याचें शरीर फारच मोठें आहे, अशा त्या रावणाच्या पायाशीं असलेल्या त्याच्या भार्याहि त्या हनुमानानें अवलोकन केल्या. त्याचप्रमाणें त्या राक्षसाधिपतीच्या गृहामध्यें चंद्राप्रमाणें तेजस्वी मुखानें युक्त, श्रेष्ठ कुंडलें व भूषणें धारण केलेल्या आणि कधींहि न कोमेजणारीं पुष्पभूषणें घातलेल्या देवकन्या त्या वानरसेनाधिपति हनुमानानें अवलोकन केल्या. नृत्य आणि वाद्यें ह्यांमध्यें निपुण, आणि श्रेष्ठ भूषणें धारण करणाऱ्या अशा रावणाच्या प्रिय स्त्रिया त्या राक्षसाधिपतीच्या हातांवर आणि मांड्यांवर शयन करीत पडलेल्या हनुमानानें अवलोकन केल्या. हिरे आणि वैदूर्य मणि ज्यांत बसविलेले आहेत, अशीं स्त्रियांचीं सुवर्णकुंडलें आणि रावणाच्या हातांतील बाहुभूषणें हीं दोन्हीं स्त्रियांच्या कानापाशींच हनुमानानें अवलोकन केलीं. त्यांच्या चंद्रतुल्य मुखांनीं आणि अद्भुत शुभ कुंडलांनीं तो मंचक तारांगणांनीं झळकणाऱ्या आकाशाप्रमाणें झळकत होता. सुरतक्रीडाविषयक व्यायाम झाल्यामुळें श्रमलेल्या त्या राक्षसाधिपतीच्या कृशोदरी स्त्रिया ठिकठिकाणीं निद्रिस्थ पडल्या होत्या. ब्रह्मदेवानें जिचे सर्व अवयव उत्कृष्ठ रीतीनें रचिलेले होते, अशी एक नृत्य करण्याविषयीं तत्पर असलेली उत्कृष्ठ स्त्री मनोहर असे हावभाव करितां करितांच झोंपी गेलेली होती. हातांमध्यें वीणा घेऊन निद्रिस्थ झालेली एक स्त्री, महानदीमध्यें जिचीं पुष्पें व पानें अस्ताव्यस्त पडलीं आहेत, अशी कमलिनीच नावेचा आश्रय करून राहिली आहे कीं काय, अशा प्रकारें दिसत होती. खाकेमध्यें मंडुक वाद्य तसेंच असून झोंपी गेलेली दुसरी एक कृष्णनयना स्त्री आपलें लहान मूल कुशींत घेऊन निजलेल्या पुत्रवत्सल स्त्रीप्रमाणें भासत होती. जिचे सर्व अवयव मनोहर असून स्तन उत्कृष्ठ आहेत, अशी एक स्त्री पुष्कळ दिवसांनीं गांठ पडल्यामुळें प्रियाला गाढ आलिंगन देऊन शयन करणाऱ्या कामिनीप्रमाणें डग्गा कवटाळून शयन करीत होती. विषयोपभोगाची इच्छा झालेली कामिनी स्त्री ज्याप्रमाणें अत्यंत प्रिय अशा आपल्या वल्लभाला कवटाळून झोंपी जाते, त्याप्रमाणें कोणी एक कमललोचना स्त्री वीणा कवटाळून निद्रिस्थ झाली होती. ज्याप्रमाणें एखादी स्त्री आपल्या वल्लभासहवर्तमान शयन करीत पडलेली असते,

त्याप्रमाणें दुसरी एक नृत्यामध्यें निष्णात असलेली व वर्तनानें शुद्ध असलेली स्त्री शेजारीं सतार घेऊन शयन करीत पडलेली होती. सुवर्णाप्रमाणें उज्ज्वल, मृदु आणि पुष्ट अशा अवयवांच्या योगानें मृदंग कवटाळून धरून मदानें डोळे तारवटून गेलेली दुसरी एक स्त्री निद्रा घेत पडली होती. जिच्या स्वरूपाला नांव ठेवण्यास कोठेंहि जागा नाहीं, व जिचें उदर कृश आहे, अशी एक मदमत्त झालेली स्त्री खाकेमध्यें असलेलें पणव वाद्य दोन्ही हातांनीं कवटाळून धरून झोंप घेत होती. पाठीशीं एक डिंडिम वाद्य बांधून व दुसरें एक डिंडिम वाद्य पुढें कवटाळून धरून एक स्त्री शयन करीत होती. ती पाठीशीं तरुण पतीला घेऊन व पुढें लहान मूल घेऊन निद्रा करीत असलेल्या स्त्रीप्रमाणें दिसत होती. कमलपत्राप्रमाणें जिचे नेत्र विशाल आहेत, अशी एक मदमोहित झालेली स्त्री आडंबर वाद्याला बाहूंचें घट्ट आलिंगन देऊन निजलेली होती. आपलें जलपात्र झोंपेमध्यें अंगावर सांडून दुसरी एक स्त्री तेथें शयन करीत पडली होती. ती वसंत ऋतूमध्यें टवटवी येण्याकरितां पाणी शिंपडून ठेविलेल्या चित्रविचित्र पुष्पांच्या मालेप्रमाणें दिसत होती. निद्रेनें घेरिलेली आणि पूर्ण चंद्राप्रमाणें आल्हादकारक मुख व कमलपत्राप्रमाणें विशाल नेत्र ह्यांनीं युक्त असलेली एक स्त्री दुसऱ्याच एका सुंदरीला कवटाळून निद्रिस्थ झाली होती. कामुक स्त्रिया ज्याप्रमाणें आपल्या कामुक पतींना दृढ आलिंगन देऊन निद्रा घेत असतात, त्याप्रमाणें नानाप्रकारचीं वाद्यें कवटाळून धरून उत्कृष्ट स्त्रिया तेथें निद्रा घेत होत्या.

असो. नंतर त्यांच्या शय्यांपासून दुसरीकडे पसरिलेल्या एका शुभ शय्येवर शयन करीत असलेली ती रूपवती मुख्य स्त्री त्या हनुमानानें अवलोकन केली. मोत्यें आणि रत्नें ह्यांनीं युक्त असलेल्या भूषणांनीं उत्कृष्ट रीतीनें भूषित झालेली, आपल्या कांतीच्या योगानें त्या उत्कृष्ट गृहाला जशी कांहीं शोभा आणीत असलेली, सुवर्णाप्रमाणें उज्ज्वल, गौरवर्ण, पतीला प्रिय, अंत:पुराची मालकीण, रूपानें सुंदर व अलंकारांनीं भूषित होऊन शयन करीत असलेली ती मंदोदरी अव-लोकन करितांक्षणीं तिचें रूप व यौवन ह्यांवरून त्या महापराक्रमी वायुपुत्र हनुमानाचा ‘ ही सीता असावी ’ असा तर्क झाला; आणि त्यामुळें त्या वानर-सेनाधिपति हनुमानाला मोठा हर्ष होऊन तो मनामध्यें प्रसन्नहि झाला. सारांश, वानरांना योग्य असा आपला जातिस्वभाव दर्शविण्यास उद्युक्त झालेला तो हनुमान आपलें पुच्छ आपटूं लागला, त्याचें चुंबन घेऊं लागला, मनामध्यें आनंदित

होऊन क्रीडा करूं लागला, गाऊं लागला, इकडे तिकडे धावाधाव करूं लागला, आणि खांबावर चढून फिरून जमिनीवरहि उड्या मारूं लागला.

## सर्ग अकरावा.

### पानभूमिवर्णन.

तदनंतर तर्क सोडून देऊन तो महाकपि हनुमान स्वस्थ राहिला, आणि सीतेसंबंधानें मनामध्यें दुसरीच एक चिंता करूं लागला. ‘रामाचा वियोग झाला असल्यामुळें सीतेला गाढ झोंप लागणें शक्य नाहीं, व भोग्य वस्तूंचा उपभोग घेणें, अलंकार धारण करणें आणि मद्यपानाचें सेवन करणें ह्याहि गोष्टी तिच्या हातून घडणें शक्य नाहींत. शिवाय देवाधिपति जरी झाला, तरी रामावांचून दुसऱ्या पुरुषाचें अवलंबन तिच्या हातून कधींहि होणार नाहीं. कारण देवांमध्येंहि रामाची बरोबरी करणारा कोणी नाहीं.’

असा विचार मनांत आणून ‘ही कोणी तरी दुसरी असावी’ असा त्यानें निश्चय केला, आणि सीतेच्या दर्शनाकरितां उत्सुक झालेला तो वानरश्रेष्ठ पुनरपि त्या पानभूमीवर इकडे तिकडे संचार करूं लागला. तेव्हां कांहीं स्त्रिया सोंगट्या वगैरे खेळून, कांहीं गाऊन व कांहीं नृत्य करून, श्रमल्यामुळें आणि कांहीं मद्यपानाच्या मदानें घेरून टाकिल्यामुळें निद्रिस्थ झालेल्या त्यानें पाहिल्या. त्याचप्रमाणें मृदंग, मुरज व चेलिका हीं वाद्यें वाजवीत वाजवीत बसल्या असतांनाच झोंपी गेलेल्या स्त्रिया आणि तशाच मोठमोठ्या रुजाम्यांवर निद्रिस्थ झालेल्या दुसऱ्याहि कांहीं स्त्रिया त्यानें अवलोकन केल्या. सारांश, झोंपेमध्यें एकमेकींच्या सौंदर्यासंबंधानें बोलत असून योग्य रीतीनें गायनाचा अर्थ बोलून दाखविणाऱ्या, स्थल व काल ह्यांना अनुरूप असें योग्य भाषण करणाऱ्या आणि उत्कृष्ठ रीतीनें सुरतक्रीडा करणाऱ्या व अलंकारांनीं भूषित झालेल्या हजार स्त्रिया त्या पानभूमीवर असल्याचें त्या वानरसेनाधिपति हनुमानानें अवलोकन केलें. त्याचप्रमाणें एकमेकींच्या सौंदर्याविषयीं झोंपेमध्यें वादविवाद करणाऱ्या अशा दुसऱ्याहि एक हजार श्रेष्ठ तरुणी स्त्रिया झोंप घेत पडलेल्या त्यानें दुसरीकडे अवलोकन केल्या. ह्या ज्या स्त्रिया वानरसेनाधिपति हनुमानानें अवलोकन केल्या, त्या स्थल व समय ह्यांना उचित असें योग्य भाषण करणाऱ्या व सुरतक्रीडेनंतर गाढ

झोंप लागलेल्या त्यानें अवलोकन केल्या. हत्तिणींनीं परिवेष्टिलेला महागज ज्याप्रमाणें अरण्यामध्यें शोभतो, त्याप्रमाणें तो राक्षसाधिपति रावण त्या स्त्रियांनीं परिवेष्टित झाला असल्यामुळें शोभत होता. त्या राक्षसाधिपति महात्म्या रावणाच्या गृहामध्यें त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें अवलोकन केलेली पानभूमि सर्व भोग्य पदार्थांनीं युक्त होती. मृग, महिष आणि वराह ह्यांचीं मांसें त्या पानभूमीमध्यें वेगळीं वेगळीं ठेविलेलीं त्यानें अवलोकन केलीं. त्याचप्रमाणें विस्तीर्ण सुवर्णपात्रांमध्यें कोणीहि न उष्टावितां ठेविलेले मयूर व कुक्कट त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें अवलोकन केले. तसेंच सचळखार व दहीं घालून तयार केलेले वराह; वाध्रीणस[1] शल्य, मृग आणि मयूर ह्यांचीं मांसें हनुमानानें तेथें पाहिलीं. सरड, नानाप्रकारचे बोकड, अर्धवट खाल्लेले ससे, महिष शिजवून तयार केलेले एकशल्य व छेद ह्या नांवांचे मासे, आणि बरेवाईट लेह्य, पेय व भोज्य पदार्थ त्यानें तेथें अवलोकन केले. जिव्हाजाड्य नाहींसें करणारा लवणरस व आम्लरस ज्यांमध्यें आहेत, असे नानाप्रकारचे रागखांडवें[2], अस्ताव्यस्त पडलेल्या भारी किंमतीच्या मोठमोठ्या तोरड्या व बाहुभूषणें, आणि पानपात्रांतून पडलेलीं नानाप्रकारचीं फळें यांच्या योगानें पुष्पांची आरास केलेल्या त्या भूमीला अधिकच शोभा आलेली होती. उत्तम प्रकारें तयार केलेल्या शय्या व आसनें ठिकठिकाणीं ठेविलेलीं असल्यामुळें, ती पानभूमि अग्नीवांचून प्रदीप्त झाल्यासारखी दिसत होती. नानाप्रकारचे पदार्थ ज्यांत मिश्र केलेले आहेत, आणि उत्तम प्रकारचे मसाले घालून जीं तयार केलेलीं आहेत, अशीं पटाईत आचाऱ्यांनीं शिजविलेलीं मांसें त्या पानभूमीमध्यें वेगळीं वेगळीं ठेविलेलीं होतीं. नानाप्रकारच्या दिव्य व स्वच्छ सुरा, तयार केलेल्या सुरा आणि साखरेपासून, मधापासून, पुष्पापासून व फलांपासून तयार केलेलीं आसवें त्या ठिकाणीं ठेविलेलीं होतीं. नानाप्रकारचीं द्रव्यें घालून तयार केलेले व वेगवेगळे ठेविलेले अनेक प्रकारचे स्वच्छ अरगजे आणि नानाप्रकारच्या आकृतींनीं युक्त असलेलीं पुष्पें ह्यांच्या योगानें ती भूमि व्याप्त झाल्यामुळें शोभत होती. सुवर्णकलश, स्फटिकपात्रें आणि दुसरेहि सुवर्णमय कमंडलु ह्यांच्या योगानें ती पानभूमि आच्छादिलेली

---

१ कृष्णग्रीवो रक्तशिराः श्वेतपक्षो विहङ्गमः । स वै 'वाध्रीणसः' प्रोक्तः ॥

२ सितामध्वादिमधुरो द्राक्षादाडिमजो रसः । विरलश्चेत्कृतो रागः सान्द्रश्चेत्खाण्डवः स्मृतः

खडीसाखर, मध वगैरे पदार्थ घालून मधुर केलेला द्राक्षें व डाळिंबें यांचा रस पातळ असल्यास त्याला ' राग ' असें म्हणतात, आणि घट्ट असल्यास त्याला 'खांडव' असें म्हणतात.

होती. सोन्यारुप्याच्या कुंभांतून प्रतिबिंबित झालेली, आणि पेय द्रव्यांच्या योगानें उत्कृष्ठ झालेली ती भूमि वानरश्रेष्ठ हनुमंतानें अवलोकन केली. नानाप्रकारच्या आकृतींनीं युक्त असलेलीं सोन्याचीं व हिऱ्याचीं मद्यपात्रें मद्यानें भरलेलीं त्या महाकपि हनुमानानें तेथें अवलोकन केलीं. कांहीं ठिकाणीं अर्धवट प्यालेलीं कांहीं ठिकाणीं सर्व पिऊन टाकिलेलीं, आणि कांहीं ठिकाणीं मुळींच न प्या-लेलीं मद्यपात्रें त्यानें अवलोकन केलीं. त्याचप्रमाणें कांहीं ठिकाणीं नानाप्रकारचे भक्ष्य पदार्थ, कांहीं ठिकाणीं वेगळीं वेगळीं ठेविलेलीं पेय द्रव्यें, व कांहीं ठिकाणीं अर्धवट पिऊन टाकिलेलीं पेयें अवलोकन करीत करीत तो संचार करूं लागला. ह्या ठिकाणीं स्त्रियांच्या पुष्कळ शय्या मोकळ्याच पडलेल्या होत्या. कांहीं श्रेष्ठ श्रेष्ठ स्त्रिया एकमेकींना कवटाळून निजल्या होत्या. निद्रेनें घेरून टाकिल्यामुळें कोणी एक स्त्री दुसरीचेंच वस्त्र हिसकावून घेऊन व तें पांघरून तिच्या शय्येवर जाऊन निजलेली होती. वाऱ्याची मंदमंद झुळुक लागत आहे कीं काय अशा रीतीनें त्या स्त्रियांच्या शरिरांवरील वस्त्रें व चित्रविचित्र पुष्पें ह्यांच्या श्वासवायूच्या योगानें किंचित् हालत होतीं. शीत चंदन, मद्य, मध, नानाप्रकारच्या माला आणि नानाप्रकारचीं पुष्पें यांचा अनेक प्रकारचा सुवास ठिकठिकाणीं अनेक मार्गांनीं नेऊन पोहोंचविणारा वायु तेथें वहात होता. ह्यामुळें पुष्पक विमानामध्यें स्नानाला योग्य अशा चंदनाचा व धूपांचा सुगंध व्याप्त होऊन राहिलेला होता. त्या राक्षसा-च्या निवासस्थानामध्यें कांहीं स्त्रिया श्यामवर्ण होत्या, कांहीं गौरवर्ण होत्या, कांहीं कृष्णवर्ण होत्या, आणि कांहीं तरुणी स्त्रियांची कांति सुवर्णाप्रमाणें होती. मदनानें व्याप्त करून टाकिलेलें त्या स्त्रियांचे रूप त्या निद्रेच्या अधीन झाल्या-मुळें, गाढ निद्रा लागलेल्या कमलिनीचें रूप जसें दिसावें, तसें दिसत होतें.

ह्या प्रकारें रावणाचें अंत:पूर त्या महातेजस्वी हनुमान कपीनें अगदीं झाडून अवलोकन केलें; परंतु जनककन्या सीता तेथें त्याच्या कोठेंच दृष्टीस पडली नाहीं. ह्याप्रमाणें तो महाकपि हनुमान त्या स्त्रियांकडे पाहूं लागला असतां, धर्माविषयीं भयभीत होऊन त्याला मोठीच शंका आली, व तो मनांत म्हणाला, "धर्मानें वागणाऱ्या व कुलीन अशा ज्या परस्त्रिया निद्रिस्थ असलेल्या मीं पाहिल्या, त्या ह्या माझ्या पाहाण्याच्या योगानें खरोखर माझा अतिशय धर्म-लोप होईल. बरें, आज माझ्या दृष्टीच्या आटोक्यांत नुसत्या परस्त्रियाच आल्या आहेत, असेंहि नसून परस्त्रियांचा स्वीकार करणारा हा अतिपापी रावणहि येथें माझ्या दृष्टीस पडला आहे." असा विचार मनामध्यें तो आणीत आहे

तोंच, संदेहरहित सिद्धांत समजण्याकडे ज्याच्या चित्ताची प्रवृत्ति आहे, अशा त्या विवेकी हनुमानाच्या मनामध्यें पुनरपि दुसरा एक विचार आला; आणि त्याच्या योगानें बऱ्यावाईटाविषयीं त्याच्या मनाची खात्री झाली. तो म्हणाला, " निः-शंकपणें पडलेल्या ह्या सर्व रावणस्त्रिया मीं हव्या तशा पाहिल्या खऱ्या; परंतु ह्या पाहाण्यामुळें माझ्या मनामध्यें कांहींएक विकार उत्पन्न झालेला नाहीं. बऱ्या-वाईट स्थितीमध्यें कोणत्याहि इंद्रियाची प्रवृत्ति होण्याला मन हेंच कारण आहे; आणि तें माझें मन तर अगदीं स्वस्थ आहे. स्त्रीसमुदायाशिवाय दुसऱ्या ठिकाणीं मला विदेहराजकन्येचा शोध लागणें शक्य नाहीं. कारण, शोधण्याचा प्रसंग आला असतां नेहमीं स्त्रियांचेच ठिकाणीं स्त्रिया आढळून येत असतात. ज्या प्राण्याची जी जाति असेल, त्याच जातीचा आश्रय करून तो प्राणी राहात असतो. तस्मात्, नाहींशा झालेल्या स्त्रीचा शोध मृगींमध्यें लागणें शक्य नाहीं. ह्यास्तव शुद्ध मनानें मीं हें रावणाचें अंतःपूर सर्व धुंडाळून काढिलें आहे; परंतु येथें कोठेंहि जनककन्या दृष्टीस पडत नाहीं. "

असो. तो वीर्यवान हनुमान सीतेला पाहूं लागला असतां देवकन्या, गंधर्व-कन्या आणि नागकन्या त्याच्या अवलोकनांत आल्या; परंतु जनककन्या कोठें त्याच्या आढळण्यांत आली नाहीं. ह्याप्रमाणें उत्कृष्ठ स्त्रिया अवलोकनांत येऊन सीता जेव्हां त्याच्या दृष्टीस पडेना, तेव्हां तो वीर ती पानभूमि सोडून दुसरी-कडे जावयास उद्युक्त झाला.

## सर्ग बारावा.

### हनुमंताचा उद्वेग.

त्या रावणाच्या गृहामध्यें असलेला तो हनुमान सीतेच्या दर्शनाविषयीं उत्सुक होऊन रात्रीं ज्यामध्यें वसति करण्यांत येते, अशा आश्चर्यकारक लता-गृहामध्यें गेला; परंतु मनोहर मुद्रेनें युक्त असलेली ती सीता त्याच्या दृष्टीस पडली नाहीं. ह्याप्रमाणें रघुनंदन रामाची ती प्रिया जेव्हां त्याच्या दृष्टीस पडेना, तेव्हां तो महाकपि मनांत म्हणाला, " ज्या अर्थी मिथिलराजकन्या सीता मी शोधीत असतांनाहि माझ्या दृष्टीस पडत नाहीं, त्या अर्थी ती निः-संशय जिवंतच नाहीं. उत्कृष्ठ पतिव्रतामार्गाचें अवलंबन करणारी आणि स्वतः-

ष्या शीलाचें रक्षण करण्याविषयीं दक्ष असलेली ती साध्वी खरोखर दुष्ट कर्म करणाऱ्या त्या रावणानें मारून टाकिली असावी; अथवा मुद्रेनें कुरूप, अक्राळ-विक्राळ, निस्तेज आणि प्रचंड मुख व दीर्घ आणि विरूप नेत्र ह्यांनीं युक्त असलेल्या त्या रावणाच्या स्त्रिया अवलोकन करून ती जनककन्या भीतीनेंहि मृत्यु पावली असेल. समुद्राचें उल्लंघन करून येण्याचा जो मीं पराक्रम केला, तो सीतेचें दर्शन न झाल्यामुळें निष्फल झाला असून वानरांसहवर्तमान हिंडल्या-मुळें ठरलेली मुदत टळूनहि बरेच दिवस झाले आहेत. तेव्हां आतां सुग्रीवाच्या समीप माझें गमन होणें शक्य नाहीं. कारण,तो वानर बलाढ्य असून त्याची शिक्षाहि फारच कडक आहे. सर्व अंतःपूर अवलोकन केलें, आणि सर्व राक्षसस्त्रियाहि मीं अवलोकन केल्या; तथापि साध्वी सीता दृष्टीस पडत नसल्यामुळें माझे श्रम व्यर्थ झाले आहेत. मी तेथें गेल्यावर सर्व वानर एकत्र जुळून मला काय बरें विचारतील ? 'हे वीरा, तूं तेथें जाऊन काय केलेंस, हें आम्हांला सांग' असेंच विचारतील. पण ती जनककन्या सीता जर माझ्या दृष्टीस पडलीच नाहीं, तर मी तरी त्यांना काय सांगूं ? सारांश, विनाकारण मुदत टळून गेल्या-मुळें मला आतां निःसंशय अन्नपानाचा त्याग करूनच प्राण सोडिला पाहिजे. समुद्राचें मीं उल्लंघन केलें; परंतु तेथें परत गेल्यावर एकत्र जुळलेले वानर मला काय म्हणतील ? तो वृद्ध जांबवान काय म्हणेल ? आणि अंगद तरी काय म्हणेल ? छेः ! पण असा खेद करणें उपयोगीं नाहीं. उत्साह धरणें हेंच ऐश्वर्याचें मूळ आहे; आणि उत्साह हेंच उत्कृष्ठ सुखाचें कारण आहे. तस्मात्, जेथें मीं त्या निर्दोष राजकन्येचा शोध केला नाहीं, तेथें तिला मी पुनरपि शोधीन. सर्व गोष्टींची प्रवृत्ति होण्याला उत्साह हेंच एक नेहमींचें कारण आहे; आणि प्राणी जें कांहीं कर्म करीत असतो, तेंहि उत्साहामुळेंच सफल होत असतें. तस्मात्, उत्साहकारक अशा उत्कृष्ठ यत्नाचें अवलंबन करून रावणानें रक्षण केलेले जे प्रदेश मीं अवलोकन केलेले नाहींत, ते मी आतां शोधून काढीन. पानशाला शोधिल्या, पुष्पगृहें पाहिलीं, चित्रशाळा हुड-किल्या आणि क्रीडागृहेंहि अवलोकन केलीं. इतकेंच नव्हे, परंतु गृहांतील आरामस्थानांचे मार्ग व पुष्पकादि विमानेंहि सर्व प्रकारें धुंडाळून पाहिलीं."

असा विचार करून तो पुनरपि सीतेचा शोध करण्यास उद्युक्त झाला. तळघरें, चिरेबंदी वाडे आणि स्वैरक्रीडा करण्याकरितां घर सोडून जवळच तयार केलेलीं दुसरीं घरें ह्यांवर उंच उंच उड्या मारून, पुनरपि खालीं येऊन,

उभा राहून, कोठें कोठें पुनः पुनः जाऊन, दारें उघडून, खिडक्या लावून, आंत शिरून, बाहेर पडून, उड्या टाकून व उडया मारून सर्व प्रदेशावर त्या महाकपि हनुमानानें संचार केला. रावणाच्या अंतःपुरांतील तर चार बोटें सुद्धां जागा, जेथें तो हनुमान गेलेला नाहीं, अशी शिल्लक राहिली नाहीं. किल्ल्यांतील मार्ग, मोठमोठ्या वृक्षांचे पार, खंदक आणि पुष्करिणी हें सर्व कांहीं त्यानें अवलोकन केलें. कुरूप आणि अक्राळविक्राळ अशा नानाप्रकारचीं रूपें धारण करणाऱ्या राक्षसी त्यानें पाहिल्या; परंतु त्या ठिकाणीं ती सीता त्याच्या कोठेंहि दृष्टीस पडली नाहीं. रूपानें जगतामध्यें अप्रतिम अशा विद्याधरांच्या उत्कृष्ठ स्त्रिया हनुमानाच्या पहाण्यांत आल्या; परंतु रघुवंशज रामाला आनंद देणारी ती सीता त्याला आढळली नाहीं. उत्कृष्ठ कटिप्रदेशांनीं आणि पूर्णचंद्राप्रमाणें आल्हादकारक मुखांनीं युक्त असलेल्या नागकन्या तेथें हनुमानाच्या दृष्टीस पडल्या; परंतु ती जनककन्या त्याच्या दृष्टोत्पत्तीस आली नाहीं. त्याचप्रमाणें राक्षसाधिपति रावणानें नागांना जिंकून बलात्कारानें हरण करून आणिलेल्या दुसऱ्या नागकन्याहि त्या हनुमानाच्या अवलोकनांत आल्या; परंतु ती जनककन्या सीता त्याला आढळली नाहीं. ह्याप्रमाणें त्या आजानुबाहू महापराक्रमी वायुपुत्र हनुमानाला उत्कृष्ठ स्त्रिया दिसत असूनहि जेव्हां ती सीता त्याच्या दृष्टीस पडेना, तेव्हां तो खिन्न झाला. वानराधिपतींचा उद्योग व सागराचें उल्लंघन व्यर्थ झाल्याचें अवलोकन करून पुनरपि तो चिंताक्रांत झाला.

## सर्ग तेरावा.

### उद्विग्न हनुमंताचे विचार.

तो वेगवान वानरसेनाधिपति हनुमान विमानावरून तटावर गेला असतां, मेघांमध्यें असलेल्या विद्युल्लतेप्रमाणें शोभूं लागला; परंतु रावणाचीं गृहें हिंडूनहि जेव्हां जनककन्या सीता त्याच्या दृष्टीस पडेना, तेव्हां तो कपि आपल्याशीं म्हणाला, “ रामाचें प्रिय करण्याकरितां लंका मीं बहुतेक धुंडाळून काढिली, परंतु सर्व उत्कृष्ठ अवयवांनीं युक्त असलेली ती विदेहराजकन्या सीता कोठें माझ्या दृष्टीस पडत नाहीं. तळीं, तडाग, सरोवरें, ओढे, नद्या, नदीतीरांवरील वनें आणि दुर्गम पर्वत अशी सर्व पृथ्वी मीं धुंडाळून काढिली; परंतु जनक-

कन्या सीता माझ्या दृष्टीस पडली नाहीं. गृध्रराज संपातीनें सीता रावणाच्या गृहामध्यें नेली, म्हणून सांगितलें आहे; परंतु ती दृष्टीस पडत नाहीं, हें काय ! विदेहवंशाशीं संबद्ध असलेली मिथिलाधिपति जनकराजाची कन्या सीता अनाथ झाल्यामुळें जरी रावणानें बलात्कारानें हरण करून नेली आहे, तरी ती त्याचें अवलंबन करून राहील, हें तर असंभवनीयच आहे. मला वाटतें, सीतेला घेऊन तो राक्षस आकाशमार्गानें सत्वर जाऊं लागला असतांना, रामबाणांचें त्याला भय वाटल्यामुळें त्याच्या हातून ती कोठें तरी मार्गामध्यें पडली असावी. अथवा सिद्धांनीं सेवित अशा आकाशमार्गानें रावण सीतेला हरण करून नेत असतांना सागराकडे पाहून त्या साध्वीनें प्राण सोडिला असावा. नाहीं तर रावणाच्या मांड्यांचा वेग, त्याच्या हातांचें आवळणें ह्यांच्या योगानें त्या विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या साध्वीला मृत्यु आला असावा ! रावण समुद्राचें उल्लंघन करून जात असतांना त्याच्या हातून सुटण्याकरितां तडफडत असलेली ती राजकन्या सीता खरोखर समुद्रांत पडली असावी. किंवा आपलें शील रक्षण करणाऱ्या त्या बिचारीला ह्या क्षुद्र रावणानें कदाचित् खाऊनहि टाकिलें असेल ! अथवा ज्यांचा हेतु दुष्ट आहे, अशा ह्या राक्षसाधिपतीच्या भार्यांनींच त्या कृष्णनयना सुशील सीतेचा कदाचित् फन्ना उडविला असेल ! अथवा पिंजऱ्यांत ठेविलेली सारिका ज्याप्रमाणें एकसारखी भाषण करीत असते, त्याप्रमाणें रावणाच्याच गृहामध्यें कोठें तरी गुप्त ठिकाणीं ठेवलेली ती बाला ‘ राम राम ’ म्हणून एकसारखा कंठशोष करून घेत असेल. छेः ! कमलपत्रांप्रमाणें विशाल नेत्रांनीं युक्त असलेली ती सुंदरी ज्या अर्थीं जनकाच्या कुलामध्यें उत्पन्न झालेली आहे, आणि रामाची पत्नी आहे, त्या अर्थीं ती रावणाला कोठून वश होणार ! भार्या ज्याला प्रिय आहे, अशा रामाला जनककन्या सीता कोठें असेल, परंतु पत्ता लागत नाहीं. अथवा ती नाहींशीं झाली आहे, किंवा ती मृत झाली आहे, असें निवेदन करणेंहि योग्य नाहीं. खरें खरें वर्तमान निवेदन करूं लागलों, तर त्यांतहि दोष आहे. निवेदन न केलें तरी दोष आहे ! तेव्हां आतां करावें कसें ? मला तर बिकट प्रसंग दिसत आहे. ”

असा विचार करून आपण हातीं घेतलेल्या कार्याची अशा प्रकारें स्थिति झाली असतांना, कालाला अनुरूप आणि योग्य असें काय होईल ह्याविषयीं हनुमान पुनरपि विचार करूं लागला. तो आपल्याशीं म्हणतो, “ सीतेला अवलोकन केल्यावांचून मी जर येथून वानरराज सुग्रीवाच्या नगरीमध्यें गेलों,

तर त्या जाण्यामध्यें पुरुषार्थ तो काय? सागराचें हें मीं केलेलें उल्लंघन, लंकेमध्यें केलेला प्रवेश आणि राक्षसांचें दर्शन हें सर्वच व्यर्थ होईल. मी किष्किंधा नगरीमध्यें गेल्यावर एकत्र जमलेले वानर, सुग्रीव अथवा ते दशरथपुत्र रामलक्ष्मण मला म्हणतील काय? ककुत्स्थकुलोत्पन्न रामाकडे जाऊन 'सीता माझ्या दृष्टीस पडली नाहीं' असें कठोर भाषण जर मीं त्याच्याशीं केलें, तर तो प्राण सोडील. कठोर, भयंकर, असह्य, उग्र आणि इंद्रियांना संताप देणारें असें सीतेसंबंधीं दुर्भाषण ऐकिल्यावर तो प्राण ठेवणार नाहीं. विपन्नावस्थेंत सांपडून मृत्यु पावलेल्या त्या रामाला अवलोकन केल्यावर त्याचे ठिकाणीं अत्यंत अनुरक्त असलेला विचारी लक्ष्मणहि प्राण सोडील. आपले भ्राते नाहींतसे झाल्याचें ऐकून भरतहि मरून जाईल. भरत मेल्याचें पाहून शत्रुघ्नहि जीव ठेवणार नाहीं. पुत्र मृत झाल्याचें अवलोकन करून कौसल्या, सुमित्रा व कैकेयी ह्या त्यांच्या माता निःसंशय प्राणत्याग करतील. रामाची तशी अवस्था झाल्याचें पाहून कृतज्ञ व सत्यवचनी वानरराज सुग्रीव प्राण देईल; आणि त्याच्यानंतर खिन्न, क्षुब्ध, दीन, दुःखित आणि पतिशोकानें व्याप्त झालेली बिचारी रुमाहि जीविताचा त्याग करील. वालीच्या मृत्यूमुळें उत्पन्न झालेल्या दुःखानें व्याप्त होऊन शोकानें जर्जर झालेली आणि म्हणूनच मरणाच्या दारीं बसलेली राजपत्नी ताराहि इहलोक सोडून जाईल. मातापितरांचा नाश आणि सुग्रीवाचा मृत्यु ह्यांच्या योगानें कुमार अंगदहि आपल्या जीविताचा त्याग करील. राजाच्या मृत्यूमुळें उत्पन्न झालेल्या दुःखानें वानर व्याप्त होतील, आणि आपलीं डोकीं बडवून घेऊं लागतील. सौम्य भाषण करून, देणग्या देऊन आणि मानमान्यता राखून वानराधिपति यशस्वी सुग्रीवानें ज्यांचे लाड पुरविले आहेत, असे वानर प्राणत्याग करतील. वनें, पर्वत अथवा गुप्त स्थलें ह्यांमध्यें एकत्र जुळून श्रेष्ठ श्रेष्ठ वानर पुनरपि क्रीडा करितांना दृष्टीस पडतनासे होतील. कारण श्रेष्ठ वानरराजाच्या मरणामुळें पुत्र, स्त्रिया व अमात्य ह्यांसहवर्तमान सर्वहि दुःखाकुल होतील आणि पर्वताशिखरापासून सपाट अथवा विषम प्रदेशांवर उड्या घेतील. सारांश, वानर विषप्राशन करतील, गळ्याला फांस लावून घेतील, अग्नीमध्यें उड्या घालतील, उपवास करून प्राण सोडतील अथवा शस्त्रानें आपलीं मस्तकें तोडून टाकतील. तात्पर्य, मी तेथें गेलों असतां इक्ष्वाकुकुलाचा नाश आणि वानरांचा घात असा घोर अनर्थ प्राप्त होईल. तस्मात्, मी येथून किष्किंधा नगरीला परत जाणारच नाहीं, आणि सीता दृष्टीस पडल्या-

वांचून सुग्रीवाला तोंड दाखविणेंहि मला उचित होणार नाहीं. मी तिकडे न जातां येथेंच राहिलों, म्हणजे ते धर्मात्मे व महारथी राम-लक्ष्मण आणि वेगवान वानर आशेनें जीव धरून राहातील. ह्याकरितां जनककन्या जर दृष्टीस पडली नाहीं, तर वृक्षमूलाचा आश्रय करून मी आपला इकडेच वानप्रस्थ बनून राहीन. जितेंद्रिय राहून हातांत अथवा मुखांत येऊन पडलेल्या फलादिकांवर आपली उपजीविका करीत जाईन. अथवा फळें, मुळें व उदक ह्यांची जेथें समृद्धि आहे, अशा एखाद्या समुद्रतीरासमीप असलेल्या प्रदेशावर चिता रचून प्रज्वलित झालेल्या अग्नीमध्यें मी प्रवेश करीन. किंवा प्रायोपवेशनाचा संकल्प करून प्राण-त्याग करण्याकरितां मी बसलों असतां पक्षी व श्वापदें माझें शरीर भक्षण करून टाकतील. अथवा हाहि एक मरणाचा उपाय ऋषींना अभिमत आहे, असें मला वाटतें. ह्यास्तव जनककन्या जर माझ्या दृष्टीस पडली नाहीं, तर मी स्वस्थ मनानें उदकामध्यें उडी घालीन. कारण सीता जर माझ्या दृष्टीस पडली नाहीं, तर अक्षय, उत्कृष्ठ आणि चोहोंकडे गाजलेली माझी कीर्तिपरंपरा कायमचीच नाहींशी होणार. अथवा जितेंद्रिय राहून व वृक्षमूलाचा आश्रय करून मी येथें तपस्वीच बनून राहीन. कृष्णवर्ण नेत्रांनीं युक्त असलेली अशी सीता जर दृष्टीस पडली नाहीं, तर मी येथून परत जाणार नाहीं. त्या सीतेचा शोध लागल्या-शिवाय मी जर येथून परत जाईन, तर सर्व वानरांसहवर्तमान अंगद प्राणत्याग करील. छे ! प्राणत्याग करण्यामध्यें पुष्कळच दोष असून, पुरुष जिवंत राहिला असतां त्याचें कधीं तरी कल्याण होतें. तस्मात्, मी प्राण धारण करून राहीन. कारण पुरुष कायम राहिल्यास त्याला इष्ट असलेली गोष्ट कधीं तरी निःसंशय प्राप्त होतच असते."

ह्याप्रमाणें नानाप्रकारचें दुःख मनामध्यें आणूं लागलेला तो वानरश्रेष्ठ शोकां-तून पार पडेना. तथापि तसेंच धैर्य धरून तो आपल्याशींच म्हणाला, "चिंता नाहीं, सीतेचें हरण झालें आहेना ? खुशाल होऊं द्या ! मी ह्या महाबलाढ्य दशाननाचा वध करीन, म्हणजे सीतेबद्दल सूड तरी उगविल्यासारखें होईल. अथवा ह्या रावणाला समुद्रावरून फेंकून देऊन पशुपतीकडे ज्याप्रमाणें पशु नेतात, त्याप्रमाणें मी ह्याला रामाकडे घेऊन जाईन."

ह्याप्रमाणें सीतेचा शोध न लागल्यामुळें चिंताक्रांत झालेला तो वानर पुनरपि काळजी व दुःख ह्यांनीं मन व्याप्त झाल्यामुळें चिंता करूं लागला. "यशस्विनी रामपत्नी सीतेचा जोंपर्यंत शोध लागला नाहीं, तोंपर्यंत मी लंका नगरी वारंवार

शोधीन. सीता येथें खास आहे. ह्या संपातीच्या वचनावर विश्वास ठेवून मी जर जर रामाला येथें घेऊन आलों, आणि भार्या जर त्याच्या दृष्टीस पडली नाहीं, तर तो सर्व वानरांना दग्ध करून टाकील. तस्मात्, मी येथेंच नियमित आहाराचें अवलंबन करून व इंद्रियसंयमन करून राहीन. तेथें गेल्यावर माझ्याकरितां त्या सर्व वानरांचा नाश होणें योग्य नाहीं. मोठमोठ्या वृक्षांनीं युक्त असलेलें हें प्रचंड अशोकवन मी पहातों. हें मीं अद्यापि शोधिलेलें नाहीं. वसु, रुद्र, आदित्य, अश्विनीकुमार आणि मरुद्गण ह्यांना नमस्कार करून, राक्षसांचा शोक वृद्धिंगत करणारा मी अशोकवनांत जाईन; आणि तपश्चर्येनें प्रसन्न झालेल्या देवता ज्याप्रमाणें तपस्वी पुरुषाला तपाचें फल देत असतात, त्याप्रमाणें राक्षसांना जिंकून, इक्ष्वाकुकुलाला आनंद देणारी सीता मी रामाला अर्पण करीन."

ह्याप्रमाणें मुहूर्तपर्यंत विचार करून मन चिंताक्रांत झालेला तो महापराक्रमी वायुपुत्र हनुमान उठला आणि म्हणाला, "लक्ष्मणासहवर्तमान राम, ती देवी जनककन्या, रुद्र, इंद्र, यम, वायु, चंद्र, अग्नि आणि मरुद्गण ह्यांना नमस्कार असो." त्या शुभ अशोकवनामध्यें जाण्याचें ठरविल्यानंतर, पुढें काय करावयाचें त्याविषयीं तो वायुपुत्र आपल्याशीं म्हणाला, "सर्व संस्कारांनीं युक्त असें तें उत्कृष्ट अशोकवन वृक्षसमुदायांनीं व्याप्त असून खरोखर राक्षसांनीं भरलेलें असेल. ह्या वनामध्यें नेमिलेले रक्षक खरोखर वृक्षांचें रक्षण करीत आहेत, आणि भगवान वायुहि विशेष जोरानें येथें वहात नाहीं. रामाकरितां आणि रावणाकरितां मी हें आपलें शरीर संकुचित केलें आहे. ह्या ठिकाणीं ऋषिगणांसह सर्व देव माझा मनोरथ सिद्धीस नेवोत. त्याचप्रमाणें भगवान स्वयंभु ब्रह्मदेव, तपस्वी, देव, अग्नि, वायु, वज्रपाणी इंद्र, वरुण, चंद्र, सूर्य, महात्मे अश्विनीकुमार व सर्व मरुद्गण माझा यत्न सिद्धीस नेवोत. सर्व भूतें, भूताधिपति आणि माझ्या दृष्टीस न पडलेल्या अशा मार्गांतील देवता मला सिद्धी देतील. उन्नत नासिका, शुभ्र दंत, पवित्र हास्य, पद्मपत्रासारखे विशाल नेत्र आणि निर्मल चंद्रासारखी कांति ह्यांनीं युक्त असलेलें तें साध्वीचें मुख माझ्या केव्हां बरें दृष्टीस पडेल! क्षुद्र, नीच, दुष्ट आणि अत्यंत भयंकर असूनहि विश्वसनीय वेष धारण करणाऱ्या रावणानें बलात्कारानें हरण करून नेलेली बिचारी अबला आज कशी बरें माझ्या दृष्टीस पडेल!"

# सर्ग चौदावा.

## हनुमानाचें अशोकवनीं गमन.

अशा प्रकारें एक मुहूर्तपर्यंत विचार करून, आणि मनानें सीतेची भेट घेऊन तो हनुमान त्या रावणाच्या गृहापासून उडी मारून अशोकवनाचे भोंवतीं असलेल्या कोटावर गेला. प्राकारावर जाऊन तो महाकपि बसला असतां त्याच्या सर्वांगावर रोमांच उठले, आणि तेथून त्यानें वसंत ऋतूचे आरंभीं प्रफुल्लित झालेले नानाप्रकारचे वृक्ष म्हणजे साल, भव्य अशोक, प्रफुल्लित चंपक, उद्दालक, नागकेशर वृक्ष आणि आकृतीनें वानरींच्या मुखांसारखीं फळें धारण करणारे आम्रवृक्ष अवलोकन केले. नंतर प्रत्यंचेपासून सुटलेल्या बाणाप्रमाणें त्यानें शेंकडों लतांनीं व आंबरायांनीं युक्त असलेल्या त्या बागेंत उडी मारिली. ह्याप्रमाणें त्या आश्चर्यकारक अशोकवनामध्यें प्रवेश केल्यानंतर, त्या बलाढ्य हनुमानानें तें वन अवलोकन केलें. तें पक्षिगणांनीं नादित झालेलें होतें. रौप्यवर्ण आणि सुवर्णवर्ण वृक्षांनीं तें सर्व बाजूंनीं व्याप्त झालेलें होतें. आश्चर्यकारक असून अद्भुत वृक्षसमुदायांनीं आणि पशुसमुदायांनीं व पक्ष्यांनीं तें युक्त होतें, आणि उदय पावलेल्या सूर्याप्रमाणें तें झळकत होतें. त्याचप्रमाणें पुष्पफलांनीं युक्त असलेल्या नानाप्रकारच्या वृक्षांनीं तें युक्त असून मत्त भृंग व कोकिल त्यांत नेहमीं वास्तव्य करीत होते. त्यांतील लोक सर्वदा आनंदित होते. मत्त झालेल्या मयूरांनीं तें नादित झालेलें होतें. नानाप्रकारच्या पक्ष्यांनीं तें युक्त होतें, आणि मदमत्त झालेल्या इतरहि पशुपक्ष्यांनीं तें व्याप्त होतें.

असो. त्या ठिकाणीं निर्दोष आणि सौंदर्यसंपन्न अशा त्या राजकन्येचा शोध करूं लागला असतां स्वस्थ निजलेल्या पक्ष्यांची त्यानें झोंप मोडिली; आणि पक्षिगण उड्डाण करूं लागले असतां, त्यांच्या पंखांच्या वायूनें ताडित झाल्यामुळें वृक्षांपासून अनेक वर्णांच्या व नानाप्रकारच्या पुष्पवृष्टि होऊं लागल्या. तेव्हां पुष्पांनीं भरून गेलेला तो वायुपुत्र हनुमान पुष्पमय पर्वताप्रमाणें त्या अशोकवनांत शोभूं लागला. वनामध्यें येऊन सर्व दिशांस धावाधाव करूं लागलेल्या त्या कपीला अवलोकन केल्यावर, वनांतील सर्व प्राणी, तो वसंत ऋतुच वानररूपानें आला असावा, असें मानूं लागले. त्याच्या धावाधावीमुळें वृक्षांपासून पडलेल्या नानाप्रकारच्या पुष्पांनीं व्याप्त झालेली तेथील भूमि अलंकार घातलेल्या तरुणी स्त्रीप्रमाणें चमकूं लागली. तो बलाढ्य कपि संचार करूं लागला असतां-

त्याच्या वेगानें अतिशय कंपित झालेले वृक्ष चित्रविचित्र पुष्पांचा वर्षाव करूं लागले. अग्रांचीं पानें झडून जाऊन पुष्पें व फलेंहि ज्यांचीं झडून गेलेलीं आहेत, असे तेथील वृक्ष, जुगारींत हरल्यामुळें वस्त्रें व भूषणें काढून ठेविलेल्या जुगाऱ्यांप्रमाणें दिसूं लागले. फलांनीं भरलेले ते उत्कृष्ठ वृक्ष वेगवान हनुमानाच्या योगानें कंपित झाले असतां त्यांनीं एकदम पुष्पांचा, पानांचा व फलांचा त्याग केला. वायुपुत्र हनुमानानें कंपित केलेले ते सर्व वृक्ष पक्षिगणांनींहि शून्य झाल्यामुळें त्यांचीं नुसतीं खोडेंच तेथें दिसू लागलीं. पर्जन्यकालामध्यें वायु ज्याप्रमाणें आपल्या वेगानें अभ्रपटलें उडवून देतो, त्याप्रमाणें मोठमोठ्या लतांचीं झांकरें आपल्या वेगाच्या योगानें त्या कपीनें उडवून दिलीं. त्या वनामध्यें संचार करितां करितां रौप्यमय, सुवर्णमय व रत्नमय मनोहर स्थलें त्या कपीनें अवलोकन केलीं. त्याचप्रमाणें नानाप्रकारच्या आकृतींनीं युक्त, उत्कुष्ठ उदकानें परिपूर्ण, ठिकठिकाणीं मोठमोठ्या मूल्यवान रत्नांच्या पायऱ्यांनीं युक्त अशा वापीहि त्यानें अवलोकन केल्या. त्या वापींतील वाळू मोत्यांची व पोंवळ्यांची होती. आंतील फरशी स्फटिकाची होती. तीरावरील चित्रविचित्र सुवर्णवृक्षांनीं त्यांना शोभा आलेली होती. प्रफुल्लित झालेले नानाप्रकारचे कमलसमुदाय त्यांमध्यें होते. चक्रवाक पक्ष्यांच्या योगानें त्यांना मोठी शोभा आलेली होती. जलकाक, हंस व सारस ह्या पक्ष्यांच्या ध्वनीनें त्या नादित झालेल्या होत्या. वृक्षयुक्त, दीर्घ आणि अमृततुल्य उदकानें परिपूर्ण अशा पवित्र नद्यांनीं सभोंवती त्या व्याप्त होत्या. शेंकडो लता त्यावर पसरिलेल्या होत्या. कल्पवृक्षांच्या पुष्पांनीं त्या आच्छादिलेल्या होत्या. नानाप्रकारच्या झांकरांनीं त्यांतील उदक आच्छादिलेलें होतें, आणि त्यांत मधून मधून नेवतीचींहि पुष्पें होतीं.

तदनंतर मोठमोठ्या शिखरांनीं युक्त असा विचित्रकूट पर्वत वानरश्रेष्ठ हनुमानानें तेथें अवलोकन केला. तो दिसण्यांत मेघासारखा असून शिखरांच्या योगानें सर्व बाजूंनीं व्याप्त झालेला होता. त्याच्यावर जिकडे तिकडे शिलागृहें असून नानाप्रकारच्या वृक्षांनीं तो आच्छादिलेला होता. तो जगतामध्यें रम्य होता. रागारागानें प्रियाच्या अंकावरून उठून भूमीवर शयन करीत पडलेल्या प्रियेप्रमाणें त्या पर्वतापासून निघालेली एक नदी त्या कपीनें अवलोकन केली. ज्यांचीं अग्रें उदकामध्यें गेलेलीं आहेत, अशा तीरस्थ वृक्षांनीं सुशोभित असलेली ती नदी, पतीवर क्रुद्ध होऊन जाऊं लागल्यामुळें प्रिय बांधव जिचें निवारण करीत आहेत, अशा तरुणी स्त्रीप्रमाणें दिसत होती. वृक्षाग्रांची वगैरे

आडकाठी असल्यामुळें त्या नदीचें उदक कोठें परत फिरल्यासारखें झालें होतें. त्यामुळें प्रथमतः रागावून निघालेली, परंतु मागून प्रसन्न झाल्यावर पतिसंनिध आलेली स्त्रीच कीं काय अशी ती नदी त्या महाकपीला दिसली. त्या पर्वता-समीपच नानाप्रकारच्या पक्षिगणांनीं युक्त असलेलीं सरोवरें त्या कपिश्रेष्ठानें अवलोकन केलीं. त्याचप्रमाणें शीत जलानें परिपूर्ण अशी एक तयार केलेली वापीहि त्यानें तेथें अवलोकन केली. त्या वापीला उत्कृष्ठ रत्नांच्या पायऱ्या केलेल्या होत्या. मोत्यांच्या वाळूनें ती सुशोभित झालेली होती. नानाप्रकारच्या पशुसमुदायांनीं ती मनोहर दिसत होती. सभोंवतीं असलेल्या चित्रविचित्र वनांनीं ती युक्त होती. विश्वकर्म्यानें निर्माण केलेल्या प्रचंड राजवाड्यांनीं व कृत्रिम वनांनींहि ती सर्व बाजूंनीं भूषित झालेली होती. तेथें जे कांहीं वृक्ष होते, ते सर्व पुष्पांनीं व फलांनीं भरलेले होते. त्यांचा आकार छत्राप्रमाणें होता. त्या सर्वांनाहि खालीं मोठमोठे रुप्याचे पार बांधिलेले असून त्यांवर सोन्याचे पार बांधिलेले होते. असंख्य लतावेलींनीं व असंख्य पत्रांनीं आच्छादित, आणि सभोंवतीं सुवर्णमय पारांनीं परिवेष्ठित असा एक सुवर्णवर्ण शिंशपा[1] वृक्ष त्या महाकपीनें अवलोकन केला. त्याचप्रमाणें भूप्रदेश, पर्वतावरील जलप्रवाह आणि अग्नीसारखे उज्ज्वल असे दुसरेहि सुवर्णवृक्ष त्यानें अवलोकन केले. मेरु पर्वताच्या प्रभेप्रमाणें असलेल्या त्या वृक्षांच्या प्रभेमुळें तो महाकपि आपलें शरीर सर्व बाजूंनीं सुवर्णमयच आहे, असें समजूं लागला. साहजिक फलांप्रमाणें लहान लहान घंटा ज्यांना आहेत, असे सुवर्णवृक्षसमुदाय वायूनें कंपित आणि म्हणूनच शेंकडों घंटानादांनीं युक्त झालेले अवलोकन करून त्याला आश्चर्य वाटलें. कारण ते सुवर्णमय वृक्षगण मनोहर असून प्रफुल्लित अग्रें आणि कोमल अंकुर व पल्लव ह्यांनींहि युक्त होते.

असो. पर्णांनीं आच्छादिलेल्या त्या शिंशपा वृक्षावर तो महावेगवान हनुमान आरूढ झाला, आणि मनामध्यें म्हणाला, "रामदर्शनाविषयीं उत्सुक आणि म्हणूनच दुःखाकुल व संतप्त झालेली विदेहराजकन्या सीता स्वेच्छेनें इकडे तिकडे हिंडतां हिंडतां कदाचित् ह्या बाजूला आलेली माझ्या दृष्टीस पडेल. त्या दुरात्म्या रावणाची ही अशोकवनिका अत्यंत रम्य असून चंदन, चंपक व बकुल वृक्ष ह्यांनीं भूषित आहे. हिच्यामध्यें द्विजगणांनीं आश्रय केलेलें असें हें रम्य सरोवरहि आहे. तस्मात्, ती राजपत्नी जानकी निःसंशय ह्या सरोवराकडे

[1] शिसवा.

येईल. रामाला सर्वदा प्रिय परंतु सांप्रत त्याचा वियोग झालेली ती राजपत्नी जानकी वनामध्यें संचार करण्यांत निरढावली असल्यामुळें निःसंशय इकडे येईल. सारांश, हरिणाच्या बछड्याप्रमाणें जिचे नेत्र आहेत, अशी ती रामाच्या चिंतेनें अत्यंत कृश झालेली जानकी, आपल्या शोधार्थ कोणी आलें आहे कीं काय, हें पाहाण्याकरितां तरी आज ह्या वनांत या ठिकाणीं येईल. मनोहर नेत्रांनीं युक्त, वनवासाविषयीं तत्पर, महापराक्रमी व रामाच्या शोकामुळें संतप्त झालेली ती सीता देवी वनामध्यें संचार करणारी असल्यामुळें नित्य इकडे येत असेल. ती जनकाची कन्या साध्वी रामभार्या पूर्वी नेहमीं वनामध्यें संचार करणाऱ्या मृगपक्ष्यादिकांना पाहाण्याची इच्छा करीत असेल. संध्याकाळचें कर्म करण्याचें मनांत आणून त्याकरितां ती श्रेष्ठ स्त्री जानकी ह्या पवित्र उदकानें युक्त असलेल्या नदीवर निःसंशय येईल. राजाधिराज रामाची जी प्रियपत्नी, तिला योग्य अशी ही शुभ अशोकवनिका आहे. चंद्राप्रमाणें आल्हादकारक जिचें मुख आहे, अशी ती देवी सीता जर जिवंत असेल, तर ह्या शीतजलानें भरलेल्या नदीप्रत अवश्य येईल."

राजपत्नीला शोधण्याकरितां अशोकवनिकेमध्यें गेलेला महात्मा हनुमान, पानांनीं गच्च भरलेल्या प्रफुल्लित शिंशपा वृक्षामध्यें दडून बसून मनामध्यें ह्याप्रमाणें विचार करून पाहूं लागला, तों तेथील सर्व कांहीं त्याच्या दृष्टीस पडलें.

## सर्ग पंधरावा.

### सीतादर्शन.

शिंशपा वृक्षावर बसून इकडे तिकडे दृष्टि फेंकीत असलेला तो हनुमान मैथिलीचा शोध लावण्याकरितां खालीं पाहूं लागला असतां, ती सर्व भूमि त्यानें अवलोकन केली. कल्पलतांनीं युक्त असलेल्या वृक्षांनीं त्या भूमीला शोभा आलेली होती. दिव्य गंध आणि रस ह्यांनीं युक्त असून सर्व बाजूंनीं शृंगारिलेली होती. मृग आणि पक्षी ह्यांनीं ती गजबजून गेलेली असून नंदन वनाप्रमाणें दिसत होती. कोकिल पक्ष्यांच्या शब्दानें ती दुमदुमून गेलेली असून मोठमोठ्या इमारती व वाडे ह्यांची तेथें गर्दी झालेली होती. अनेक प्रकारच्या सुवर्णकमलांनीं युक्त असलेल्या वापींच्या योगानें ती सुशोभित झालेली होती.

अनेक प्रकारचीं आसनें व आस्तरणें तेथें घातलेलीं होतीं. पुष्कळ मजल्यांच्या गृहांनीं ती युक्त होती. सर्व ऋतूंतील मनोहर पुष्पांनीं व प्रफुल्लित वृक्षांनीं ती युक्त असून, प्रफुल्लित अशोक वृक्षांच्या कांतीमुळें तिची प्रभा सूर्यासारखी दिसत होती. अशोकपुष्पांच्या योगानें ती जशी कांहीं प्रदीप्त झाल्यासारखीच भासत होती. त्या भूमीवरील वृक्ष हे पक्ष्यांच्या योगानें वारंवार पानें व खांद्या ह्यांनीं रहित होत होते. कारण, पुष्पें ज्यांना कर्णभूषणाप्रमाणें शोभा देत होतीं, असे शेंकडो अद्भुत पक्षी वारंवार तेथील वृक्षांवर येऊन बसत असल्यामुळें त्यांचीं पानें व शाखा आच्छादून जात असत. मुळें व पुष्पें ह्यांनीं युक्त असलेले शोकनायक अशोक वृक्ष, पुष्पसमुदायांचा ज्यांना अतिशय भार झालेला आहे, आणि म्हणूनच भूमीला जे स्पर्श करीत आहेत, असे प्रफुल्लित कर्णिकार वृक्ष, आणि प्रफुल्लित पलाश वृक्ष ह्यांनीं युक्त असलेला तो प्रदेश त्यांच्या प्रभेमुळें सर्व बाजूंनीं जसा कांहीं पेटल्यासारखाच दिसत होता. उंडणी, सांतवण, चाफा आणि भोंकरी असे मुळें खोल गेलेले पुष्कळच प्रफुल्लित वृक्ष तेथें शोभत होते. कांहीं सुवर्णासारखे उज्ज्वल, कांहीं अग्नीच्या ज्वालेसारखे देदीप्यमान आणि कांहीं कज्जलतुल्य असे हजारों अशोक वृक्ष त्या ठिकाणीं होते. दिव्य, अचिंत्य आणि मनोहर शोभेनें युक्त असें एक उपवन त्या अशोकवनामध्यें हनुमंताच्या दृष्टीस पडलें. तें देवांचें उपवन नंदन व कुबेराचें अद्भुत उपवन चैत्ररथ ह्यांनाहि मागें टाकणारें होतें. पुष्परूप ज्योतिर्गणांनीं तें युक्त असल्यामुळें दुसरें आकाशच कीं काय, असें दिसत होतें. पुष्परूप शेंकडों रत्नांनीं युक्त असल्यामुळें तें अद्भुत वन पांचवा सागरच कीं काय असें भासत होतें. मधुर गंध आणि सार्वकालिक पुष्पें ह्यांनीं युक्त असलेल्या वृक्षांनीं तें उपवन अगदीं खेचिलेलें होतें. नानाप्रकारच्या ध्वनींनीं युक्त असलेल्या मृगसमुदायांनीं व पक्ष्यांनीं तें उपवन रम्य झालेलें होतें. अनेक प्रकारचे सुगंध त्यांत सुटलेले होते. उत्कृष्ठ गंधांनीं तें युक्त असून मनोहर होतें, आणि सुगंधांनीं भरून गेलें असल्यामुळें तें दुसरा पर्वतराज गंधमादनच कीं काय, असें भासत होतें.

असो. त्या अशोकवनिकेमध्यें जवळच एक चिरेबंदी भव्य वाडा हनुमंताच्या दृष्टीस पडला. मध्यें असलेल्या सहस्र स्तंबांच्या आधारानें तो राहिलेला होता. कैलास पर्वताप्रमाणें तो श्वेतवर्ण होता. पोंवळ्याचे जिने त्यांत केलेले होते. शुद्ध सुवर्णाच्या भुया त्यांत केलेल्या होत्या. कांतीनें झळकत असल्यामुळें तो डोळे दिपवीत होता, आणि निर्मल असून उंच असल्यामुळें आकाश विदीर्णच

करीत आहे कीं काय, असा तो दिसत होता. तदनंतर राक्षसींनीं परिवेष्ठित, मलिन वस्त्र परिधान केलेली, उपवासानें कृश झाल्यामुळें शुक्लपक्षाच्या आरंभीं असणाऱ्या निर्मल चंद्रकलेप्रमाणें भासत असलेली, आणि वारंवार दुःखाचे सुस्कारे टाकीत असलेली दीन सीता लांबून त्याच्या दृष्टीस पडली! धुराच्या लोटानें व्याप्त झालेल्या अग्नीची ज्वाला ज्याप्रमाणें सुंदर प्रभेनें युक्त असूनहि सरासरीच दृष्टोत्पत्तीस येत असते, त्याचप्रमाणें मनोहर कांतीनें युक्त असलेल्या त्या सीतेचें रूपहि सरासरीच मारुतीला ओळखूं येत होतें. उत्कृष्ट प्रकारचें एक जीर्ण पीत वस्त्र तिनें परिधान केलेलें होतें; व अंगावर विशेषसे अलंकार नसल्यामुळें ती पंकयुक्त आणि कमलरहित कमलिनीप्रमाणें दिसत होती. रावणानें पीडित, दुःखसंतप्त आणि अतिशय क्षीण झालेली ती बिचारी सीता मंगलतुल्य केतूनें पीडित झालेली रोहिणीच कीं काय अशी दिसत होती. तिचें मुख अश्रूंनीं भरून गेलेलें होतें. ती दीन असून उपवासामुळें कृश झालेली होती; आणि एकसारखी शोक व काळजी करीत असून ती अनाथ झालेली सीता नेहमीं अतिशय दुःख करीत होती. प्रिय असलेलें कोणीच दृष्टीस न पडतां राक्षसस्त्रियांचा समुदायच काय तो तिच्या दृष्टीस पडत असल्यामुळें मृगांच्या कळपांतून चुकून श्वानसमूहानें परिवेष्ठित झालेल्या हरिणीप्रमाणें तिची स्थिति झाली होती. पाठीवरून कटिप्रदेशापर्यंत लोंबत असलेली तिची मोकळी वेणी नीलवर्ण नागाप्रमाणें दिसत असल्यामुळें पर्जन्यकालानंतर नीलवर्ण वनपंक्तीच्या योगानें शोभणाऱ्या भूमीप्रमाणें शोभत होती. सुखोपभोगास योग्य असूनहि दुःखसंतप्त, संकटाचा पूर्वीं अनुभव नसलेली, विशाल नेत्रांनीं युक्त आणि पूर्वीपेक्षां फारच कृश व मलिन झालेली ती दृष्टोत्पत्तीस आल्यावर 'ही सीताच असावी' असा कांहीं संदेहनाशक गोष्टीवरून त्यानें तर्क केला. स्वेच्छेप्रमाणें रूप धारण करणारा तो रावण तिला घेऊन चालला असतांना ती ज्याप्रमाणें दृष्टीस पडली, तशा प्रकारची ही स्त्री दिसत आहे, असा हनुमानानें तर्क केला. ती देवी उत्कृष्ट भिवया, पूर्णचंद्राप्रमाणें मुख आणि सुंदर व वर्तुल स्तन ह्यांनीं युक्त असून आपल्या प्रभेनें सर्व दिशा प्रकाशित करीत होती. इंद्रनील मण्यांच्या कंठभूषणाचे प्रभेनें तिचा कंठ नीलवर्ण दिसत होता; तिचे ओठ पिकलेल्या तोंडलाप्रमाणें लाल दिसत होते. तिचा बांधा उत्कृष्ट होता. कमलपत्रांप्रमाणें विस्तीर्ण नेत्रांनीं युक्त असून मदनाच्या रतीप्रमाणें ती सीता दिसत होती. पूर्णचंद्राच्या प्रभेप्रमाणें ती सर्व

जगताला प्रिय होती. तिच्या शरिराची काठी सडपातळ असून जितेंद्रिय तापसी-प्रमाणें ती भूमीवर बसलेली होती. नागराजाच्या पत्नीप्रमाणें ती भयभीत होऊन एकसारखे सुस्कारे टाकीत होती. प्रचंड व वृद्धिंगत झालेल्या शोक-जालांत सांपडल्या कारणानें धुराच्या लोटांत सांपडलेल्या अग्नीच्या ज्वालेप्रमाणें ती निस्तेज दिसत होती. ती जणूं अर्थाविषयीं संदेह असलेली स्मृति, अन्यायानें हरण करून आणिलेली संपत्ति, नास्तिकबुद्धीनें हाणून पाडिलेली श्रद्धा, निष्फल झालेली आशा, विघ्नानें वेरून टाकिलेली सिद्धि, रागद्वेषादिकांनीं कलुषित झालेली बुद्धि अथवा केवळ असत्याचें अवलंबन करून दिलेल्या दूषणानें हाणून पाडि-लेली कीर्तिच कीं काय अशी दिसत होती! रामाच्या सेवेला अंतरल्यामुळें ती दु:खित झालेली होती. राक्षसगणांनीं ती त्रस्त करून सोडिलेली होती. हरिणा-च्या छाव्याप्रमाणें मनोहर नेत्रांनीं युक्त असलेली ती अबला इकडे तिकडे पहात होती. अश्रुजलानें परिपूर्ण, कृष्णवर्ण व कुटिल पापण्यांनीं युक्त व अप्रसन्न अशा मुखानें ती युक्त असून वारंवार सुस्कारे टाकीत होती. अंगाला मळ व चिखल लागला असल्या कारणानें, शृंगार घालण्यास योग्य असूनहि शृंगाररहित असल्या-मुळें ती कृष्णवर्ण मेघांनीं आच्छादिलेल्या चंद्राच्या प्रभेप्रमाणें दीन दिसत होती.

असो. अभ्यास नसल्यामुळें फारच शिथिल झालेल्या विद्येप्रमाणें अस्ता-व्यस्त झालेल्या त्या सीतेला अवलोकन करून आपण ऐकिलेली सीता हीच आहे किंवा काय, असा मारुतीला संशय आला; परंतु पदच्छेदादि संस्कारानें रहित आणि विवक्षित अर्थाशिवाय अन्यार्थाची वाचक असलेली उक्ति ज्या-प्रमाणें मोठ्या कष्टानें ध्यानांत येते, त्याप्रमाणें शृंगाररहित असलेल्या त्या सीतेची मोठ्या कष्टानें हनुमानाला ओळख पटली. सारांश, विशाल नेत्रांनीं युक्त अस-लेल्या त्या निर्दोष राजकन्येला अवलोकन करून प्रमाणांनीं निश्चय करणाऱ्या हनुमानानें 'ही सीताच असावी' असा तर्क केला. विदेहराजकन्येच्या अंगावरील जीं भूषणें रामानें कथन केलीं होतीं, तींच शरिराला शोभा देणारीं भूषणें तेथें हनुमानाच्या दृष्टीस पडलीं. तेव्हां तो मनांत म्हणाला, "उत्तम रीतीनें तयार केलेलीं कुंडलें, चांगले डौलदार काप आणि हिरे व पोंवळीं बस-विल्यामुळें चित्रविचित्र दिसत असलेलीं हस्तभूषणें फार दिवस साफसूफ केलीं नसल्यामुळें जरी श्यामवर्ण झालेलीं आहेत, तरी आकार तसाच कायम असल्या-मुळें रामानें जीं सांगितलीं तींच हीं आहेत, असें मला वाटतें. रामानें सांगित-ल्यापैकीं मार्गामध्यें जीं भूषणें पडून गेलीं आहेत, तीं माझ्या दृष्टीस पडत

नाहींत; परंतु मार्गामध्यें सीतेच्या अंगावरून जीं गळून पडलेलीं नाहींत, तीं हींच ह्याविषयीं संशय नाहीं. सुवर्णतंतूंनीं निर्माण केलेल्या वस्त्राप्रमाणें सीतेचें गळून पडलेलें पीतवर्ण व शुभ उत्तरीय वस्त्र वृक्षाला अडकलेलें त्या वेळीं वानरांनीं अवलोकन केलें होतें; आणि त्याचप्रमाणें हिनेंच टाकिलेलीं मोठमोठीं ध्वनियुक्त उत्कृष्ठ भूषणेंहि भूतलावर पडलेलीं त्यांनीं पाहिलीं होतीं. हिनें नेसलेलें हें वस्त्र धारण करून पुष्कळ दिवस झाल्यामुळें जरी ह्याची फारच दुर्दशा झालेली आहे, तरी ह्याचा वर्ण जवळ जवळ त्याच्याचसारखा असून आम्हांला सांपडलेल्या त्या दुसऱ्या वस्त्राप्रमाणेंच हें शोभत आहे. दृष्टीचे आड झाली असतांहि जी साध्वी रामाच्या मनांतून नाहींशी होत नाहीं, तीच ही सुवर्णवर्ण शरिरानें युक्त असलेली रामाची प्रिय पत्नी होय. जिच्याकरितां कारुण्य, आनृशंस्य, शोक आणि मदनबाधा ह्या चोहोंनीं राम संतप्त झाला आहे, तीच ही. तिला दुसऱ्यानें दुःख दिलें, म्हणून कारुण्यानें तो संतप्त झाला आहे. आपल्या आश्रयाला ती असूनहि तिचें रक्षण झालें नाहीं, म्हणून आनृशंस्यबुद्धीनें ( आश्रिताचें संरक्षण करावें ह्या बुद्धीनें ) त्याला कांहीं सुचेनासें झालें आहे. आपली धर्मपत्नी नष्ट झाली, म्हणून शोकानें तो क्षुब्ध झाला आहे, आणि आपली प्रियाच नाहींशी झाली, म्हणून पूर्वीं तिच्यासहवर्तमान अनुभविलेल्या विषयभोगाचें एकसारखें स्मरण होत असल्यामुळें उत्पन्न झालेल्या मदनाच्या योगानें त्याला फारच ताप झालेला आहे. कृष्ण नेत्रांनीं युक्त असलेली ही त्या रामाचीच पत्नी असून रामाचें व त्याच्या पत्नीचें रूप आणि लहानमोठ्या अवयवांचेंहि सौंदर्य हीं अगदीं एकसारखींच आहेत. ह्या देवीचें मन त्याचे ठिकाणीं आसक्त झालेलें असून त्याचें मन हिचे ठिकाणीं खिळून गेलेलें आहे, आणि म्हणूनच त्याच्यावांचून ही व हिच्यावांचून तो धर्मात्मा मुहूर्तभरहि जिवंत राहाणें मला अशक्य दिसत आहे. हिचा वियोग झाला असूनहि शोकानें मृत्युमुखीं न पडतां रामानें आपला देह धारण केला, हें त्या प्रभूनें दुर्घट कर्म केलें. ”

ह्याप्रमाणें सीतेला अवलोकन केल्यावर वायुपुत्र आनंदित झाला, आणि रामाचें स्मरण करून त्या प्रभूची प्रशंसा करूं लागला.

# सर्ग सोळावा.

## सीतेची स्थिति पाहून मारुतीचा खेद.

प्रशंसेस पात्र असलेली ती सीता आणि गुणांच्या योगानें मनोहर असलेला राम ह्यांची प्रशंसा करून पुनरपि तो वानरश्रेष्ठ हनुमान चिंताक्रांत झाला. सीतेसंबंधानें क्षणभर विचार करितांक्षणीं त्या हनुमानाचे नेत्र अश्रूंनीं अगदीं भरून आले, आणि तो तेजस्वी असूनहि विलाप करूं लागला. तो म्हणाला, “गुरुजनांनीं सुशिक्षित केलेल्या लक्ष्मणाला गुरुपत्नी म्हणून मान्य असलेली सीता ही ज्या अर्थी दुःखानें त्रस्त झाली आहे, त्या अर्थीं कालाचें उल्लंघन होणें दुर्घट आहे, हीच गोष्ट खरी. राम आणि विचारी लक्ष्मण ह्या दोघांचाहि पराक्रम जाणीत असल्यामुळें ही देवी पर्जन्यकालीं क्षुब्ध होणाऱ्या गंगेप्रमाणें बेताबातानेंच क्षुब्ध झाली आहे. शील, वय, आचरण, कुल व लक्षणें ह्यांनीं रामाप्रमाणें असलेली ही विदेहराजकन्या रामालाच योग्य असून तोहि या कृष्णनयनेला अगदीं योग्य आहे.”

तदनंतर सर्व जगांतील सौंदर्यसंपन्न लक्ष्मीच कीं काय अशी ती तप्त सुवर्णासारख्या कांतीनें युक्त असलेली सीता अवलोकन केल्यावर हनुमानाला पुनरपि रामाचें स्मरण झालें आणि तो म्हणाला, “विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या ह्या सीतेकरितांच महाबलाढ्य वालीचा आणि वीर्यामध्यें रावणाची बरोबरी करणाऱ्या कबंधाचा वध झाला. इंद्रानें ज्याप्रमाणें शंबरासुराचा वध केला, त्याप्रमाणें रामानें वनामध्यें पराक्रम करून भयंकर पराक्रमी विराध राक्षसाचा समरांगणामध्यें हिच्याकरितां वध केला. भयंकर पराक्रम करणारे चौदा हजार राक्षस जनस्थानामध्यें अग्निज्वालेसारख्या तीक्ष्ण बाणांनीं रामाच्या हातून हिच्याकरितांच वध पावले. त्याचप्रमाणें आत्मवेत्त्या रामानें खर, महातेजस्वी दूषण आणि त्रिशिरा ह्यांचा निःपात केला; आणि जगद्विख्यात सुग्रीवालाहि वालीनें रक्षिलेलें वानराचें दुर्लभ ऐश्वर्य हिच्यामुळें प्राप्त झालें. ह्या विशालनयनेकरितांच नद व नद्या ह्यांचा अधिपति जो भव्य सागर त्याचें मी उल्लंघन करून ही नगरी अवलोकन केली. रामानें हिच्याकरितां केवळ समुद्रवलयांकित पृथ्वीच नव्हे—परंतु सर्व ब्रह्मांड जरी उलथें पालथें केलें, तरी सुद्धां योग्य आहे, असें मला वाटतें. त्रैलोक्याचें आधिपत्य आणि जनककन्या सीता ह्या दोहोंची जर तुलना करून पाहिली, तर त्रैलोक्याचें संपूर्ण राज्य सीतेच्या

पासंगालाहि पुरणार नाहीं. मिथिलाधिपति महात्म्या धर्मशील जनक राजाची अत्यंत पतिव्रता जी कन्या ती ही. नांगराच्या टोकानें डवचिलेल्या शेतामध्यें शेतांतील कमलपरागतुल्य अशा रज:कणांनीं व्याप्त असलेली ही सीता भूमीचा भेद करून निघाली. पुढें संग्रामामध्यें परत न फिरणाऱ्या, पराक्रमी आणि सुशील अशा दशरथाची ही यशस्विनी ज्येष्ठ स्नुषा झाली; आणि जगविख्यात कृतज्ञ व धर्मज्ञ रामाची ती ही प्रिय भार्या सांप्रत राक्षसस्त्रियांच्या तावडींत सांपडली आहे! भर्तृप्रेमाचें प्रबल प्रोत्साहन मिळाल्यामुळें दु:खांचा विचार न करितां सर्व भोग्य वस्तूंचा त्याग करून ती निर्जन वनामध्यें प्रविष्ट झाली. इतकेंच नव्हे, परंतु भर्त्याच्या शुश्रूषेविषयीं तत्पर राहून फलमूलांवर संतुष्ट राहूं लागलेल्या त्या सीतेला वनामध्येंहि घराप्रमाणें उत्कृष्ट आनंद वाटूं लागला. परंतु ती ही सुवर्णासारख्या शरीरकांतीनें युक्त व नेहमीं उत्कृष्ट हास्यपूर्वक भाषण करणारी सीता संकटें भोगण्यास पात्र नसतांनाहि सांप्रत यातना सहन करीत आहे! रावणानें जरी हिला हरण करून आणिली आहे, तरी ही शीलसंपन्न असल्यामुळें, एखादा तृषार्थ झालेला पुरुष ज्याप्रमाणें पाणपोई पाहण्याची इच्छा करीत असतो, त्याप्रमाणें रघुवंशज राम हिच्या दर्शनाची इच्छा करीत आहे. रामाला जर ही पुनरपि प्राप्त झाली, तर राज्यापासून भ्रष्ट झालेल्या राजाला ज्याप्रमाणें पुनरपि पृथ्वी प्राप्त झाल्यावर आनंद होतो, त्याप्रमाणें त्याला खरोखर आनंद होईल. चंदन, पुष्पमाला इत्यादि भोग्य वस्तूंनीं सोडिलेली आणि बंधुजनांचाहि वियोग झालेली ही सीता त्या रामाचा समागम होईल, या आशेवर देह धारण करीत आहे. ह्या राक्षसी, आणि पुष्पफलांनीं युक्त असलेले हे वृक्ष हिच्या दृष्टीस पडत नाहींत. एका रामाकडेच हिच्या चित्ताचें लय लागलेलें आहे, आणि त्यामुळें खरोखर केवळ रामालाच ही अवलोकन करीत आहे. अलंकारापेक्षांहि भर्ता हेंच हिचें उत्कृष्ट भूषण आहे, आणि म्हणूनच त्या भर्त्याचा वियोग झालेली ही सीता शोभेला पात्र असूनहि शोभत नाहीं. हिचा वियोग झाला असूनहि राम दु:खानें नष्ट न होतां देह धारण करीत आहे, हें खरोखर मोठें दुर्घट कृत्यच त्या प्रभूच्या हातून होत आहे. कारण अग्रांसहवर्तमान कृष्णवर्ण केशांनीं आणि कमलपत्रांसारख्या विशाल नेत्रांनीं युक्त असलेली ही सीता केवळ सुखालाच पात्र असून दु:खितहि झाली आहे, असें समजल्यामुळें माझ्याहि मनाला दु:ख झालें आहे. अरेरे! पृथ्वीसारखी क्षमा आणि कमलांसारखे नेत्र ह्यांनीं युक्त असलेल्या ज्या सीतेचें राम-लक्ष्मणांनीं रक्षण केलें,

तिचें रक्षण सांप्रत वृक्षाच्या मुळाशीं अक्राळविक्राळ मुद्रेनें युक्त असलेल्या राक्षसस्त्रिया करीत आहेत! हर हर!! थंडीचा कडाका पडल्यामुळें शोभारहित झालेल्या कमलिनीप्रमाणें पतीचा वियोग झालेल्या चक्रवाकीप्रमाणें दुःखपरंपरेनें गांजून गेलेल्या ह्या जनककन्येला सांप्रत शोचनीय स्थिति प्राप्त झाली आहे. पुष्पांच्या योगानें ज्यांच्या अग्रशाखा नम्र झालेल्या आहेत, असे हे अशोकवृक्ष आणि लंकेमध्यें शैत्याचा अभाव असल्यामुळें अतिशय प्रकाशमान होऊन राहिलेला व हजारों किरणांनीं युक्त असलेला चंद्र हे तिला अतिशयच दुःख देत आहेत."

अशा प्रकारचे विचार मनामध्यें आणून त्या वानरश्रेष्ठ, महाबलाढ्य व वेगवान हनुमानाला 'ही सीताच असावी' असें वाटलें; आणि ह्याच बुद्धीचें अवलंबन करून तो त्या शिंशपा वृक्षावर राहिला.

## सर्ग सतरावा.

### सीतेचें रक्षण करणाऱ्या राक्षसींचें वर्णन.

तदनंतर हंस पक्षी ज्याप्रमाणें नीलवर्ण उदकामध्यें जातो, त्याप्रमाणें निर्मल प्रभेनें युक्त असलेला व श्वेतकमलांच्या झुबक्याप्रमाणें दिसत असलेला चंद्र निर्मल आकाशामध्यें कांहींसा वर आला. आपल्या प्रभेच्या योगानें सीतेच्या शोधाला जशी कांहीं मदतच करीत असलेला तो निर्मल चंद्र शीत किरणांच्या योगानें वायुपुत्र हनुमानाची सेवा करूं लागला. चंद्र वर आल्यानंतर, पूर्ण चंद्रासारख्या आल्हादकारक मुखानें युक्त असलेली ती सीता हनुमंताच्या स्पष्ट दृष्टीस पडली. तेव्हां ओझ्यामुळें उदकामध्यें ज्याप्रमाणें नाव बुडून जाते, त्याप्रमाणें शोकभारानें ती सीता शोकसागरांत बुडूनच जात आहे कीं काय, अशी त्याला दिसली. प्रथमतः त्या वनांत गेल्यावर तो सीतेला पाहूं लागला असतां, भयंकर मुद्रेनें युक्त असलेल्या राक्षसीच लांब बसलेल्या त्याच्या दृष्टीस पडल्या. हनुमानानें ज्या राक्षसी अवलोकन केल्या, त्यांपैकीं कोणाला एकच डोळा, तर कोणाला एकच कान होता. कोणाचे कान वस्त्रांप्रमाणें पांघरितां येतील इतके लांब होते, तर कोणाला मुळींच नव्हते, आणि कोणाला शंकूप्रमाणें होते. त्याचप्रमाणें नाकाचीं भोंकेंच वर असल्यामुळें कोणाचा श्वासवायु मस्तकाकडेच चाललेला होता. कोणाचें मस्तक शरिराच्या मानानें फारच मोठें होतें, तर

कोणाची मानच अगदीं बारीक व लांब होती. कोणाचे केसच नाहींतसे झाले होते, तर कोणाला मुळींच नव्हते, आणि कोणी तर केसांच्या योगानें काळी घोंगडीच पांघरून बसल्यासारख्या दिसत होत्या. कोणाचे कान व कपाळ लांब होतें, तर कोणाचें उदर व स्तनच लांब होते. कोणाचा ओठ खालीं लोंबत होता, तर कोणाचा हनुवटीलाच जखडिलेला होता. त्याचप्रमाणें एकीचें मुखच दीर्घ होतें, तर दुसरीचे गुडघेच लांब होते. कोणी खुजी, तर कोणी ढांगळ. कोणी कुबडी, तर कोणी वांकडी. कोणी अगदींच ठेंगणी, तर कोणी भयंकर. कोणाचें वस्त्र वेडेंवांकडें, तर कोणाचे डोळेच पिंगट वर्णाचे, आणि कोणाची तर मुद्राच अक्राळविक्राळ. त्याचप्रमाणें कोणी छिन्नभिन्न अवयवांनीं युक्त, तर कोणी पिंगटवर्ण शरिरानें युक्त, आणि कोणी तर अगदींच काळ्या. कोणी तामसी, तर कोणी कलहप्रिय, आणि कोणी तर लोखंडाचे मोठमोठे शूल, कूट व मुद्गर धारण करणाऱ्या. कोणाचे तोंड डुकरासारखें, तर कोणाचें हरिणासारखें. कोणाचें वाघासारखें तर कोणाचें म्हशीसारखें. कोणाचें शेळीसारखें, तर कोणाचें कोल्ह्यासारखें. कोणाचें पाय हत्तीसारखे, तर कोणाचे उंटासारखे. कोणाचे घोड्यासारखे तर कांहींचीं तोंडेंच कबंध राक्षसाप्रमाणें आंत गेलेलीं. कांहींना एकेकच हात, तर कांहींना एकेकच पाय. कांहींचे कान गर्दभासारखे लांब, तर कांहींचे अश्वांप्रमाणें आंखूड ! त्याचप्रमाणें कांहींचे गाईसारखे, तर कांहींचे हत्तीसारखे, आणि कांहींचे सिंहासारखे. कांहींचें नाक अतिच प्रचंड, तर कांहींचा श्वासोच्छ्वासच आडवा. कांहीं मुळींच नासिकाहीन, तर कांहींचीं नाकें हत्तींच्या सोंडप्रमाणें मोठमोठीं, आणि कांहींचीं तर कपाळांवरच आलेलीं. कांहींचे पाय हत्तीसारखे लठ्ठ, तर कांहींचे फारच प्रचंड. कांहींचे गाईसारखे, तर कांहींचे शिखाकृति केसांनीं युक्त, आणि कांहींचें मस्तक व मान फारच प्रचंड. कांहींचें मुख व नेत्र फारच मोठे, तर कांहींच्या जिव्हा व मुखें फारच लांब. कांहींचें मुख शेळीसारखें, तर कांहींचें हत्तीसारखें. कांहींचें गायीसारखें, तर कांहींचें डुकरासारखें. कांहींचें मुख घोड्यासारखें, तर कांहींचें उंटासारखें, आणि कांहींचें गर्दभासारखें.

अशा प्रकारच्या भयंकर मुद्रेनें युक्त, तामसी, कलहप्रिय, भयंकर व धूम्रवर्ण केस आणि अक्राळविक्राळ मुद्रा धारण करणाऱ्या आणि दिसण्यांतहि भयंकर असून हातांमध्यें शूल व मुद्गर घेतलेल्या राक्षसी त्यानें अवलोकन केल्या. ज्यांचें दर्शनहि अंगावर कांटा आणणारें आहे, मांसानें व रक्तानें ज्यांचें शरीर चोप-

डिलेलें आहे, ज्यांना सुरा व मांस सर्वदा प्रिय आहे, ज्या सतत मद्यपान करीत आहेत आणि मांस व रक्त हेंच ज्यांचें खाद्य आहे, अशा त्या राक्षसस्त्रिया मोठमोठ्या शाखांनीं युक्त असलेल्या एका वृक्षाचे भोंवतीं गराडा देऊन बसल्या आहेत, असं वानरश्रेष्ठ हनुमानानें अवलोकन केलें. त्या वृक्षाचे खालीं ती दोष-रहित राजकन्या सीताहि त्या श्रीमान हनुमानानें अवलोकन केली. ती सीता शोकानें संतप्त झाली असल्यामुळें निस्तेज झाली होती. मळामुळें तिच्या केसांची गुंतागुंत झाली होती. पुण्यक्षय झाल्यामुळें आकाशांतून च्युत होऊन भूमीवर पडलेल्या तारेप्रमाणें ती भासत होती. पातिव्रत्यधर्मा-विषयीं ती विख्यात असून भर्त्याचें दर्शन तिला दुर्लभ झालें होतें. उत्कृष्ठ बाह्य अलंकार जरी तिच्या शरिरावर नव्हते, तरी भर्तृप्रेमानें ती भूषित झालेली होती. बंधुजनांचा तिला वियोग झालेला असून राक्षसाधिपति रावणानें तिला प्रतिबंधांत ठेविलेली होती; आणि त्यामुळें कळपांतून चुकलेली व बांधून ठेविलेली हत्तीणच सिंहाच्या अटकेंत आहे कीं काय. अशी ती भासत होती. पर्जन्यकाल संपल्यावर शरदृतूंतील अभ्रांनीं व्याप्त झालेल्या चंद्राप्रमाणें ती दिसत होती; आणि तिची कांति कमी झाली असून भर्त्याचा स्पर्श होत नसल्यामुळें रद्दी पडलेल्या विण्याप्रमाणें तिची अवस्था झाली होती असो. भर्त्याच्या हिता-विषयीं तत्पर, राक्षसांच्या अधीन होऊन राहाण्यास अयोग्य, शोकसागरांत निमग्न झालेली, अलंकाररहित असल्यामुळें पुष्परहित लतेप्रमाणें दिसत असलेली, आणि त्या राक्षसस्त्रियांनीं परिवेष्ठित असल्यामुळें क्रूर गृहांनीं घेरिलेल्या रोहिणी-प्रमाणें भासत असलेली ती सीता हनुमानानें त्या अशोकवनामध्यें अवलोकन केली. मळानें तिचें शरीर जरी लिप्त झालें होतें, तरी स्वाभाविक सौंदर्यानें भूषित असल्यामुळें ती पंकलिप्त कमलिनीप्रमाणें झळकत नाहीं, अशीहि दिसत नव्हती, आणि झळकत आहे अशीहि भासत नव्हती. हरिणाच्या बछड्या-प्रमाणें जिचे नेत्र आहेत, अशी ती सीता हनुमान वानरानें जेव्हां अवलोकन केली, तेव्हां एका जीर्ण व मलिन वस्त्रानें ती आच्छादिलेली होती. भर्त्याच्या पराक्रमाची आठवण असल्यामुळें तिचें अंतःकरण जरी निराश झालें नव्हतें, तरी त्या देवीची मुद्रा दीन झाली होती; आणि तिचें रक्षणहि तिच्या शीलानें झालें होतें. हरिणाच्या छाव्याप्रमाणें जिचे डोळे पाणीदार आहेत, अशी ती सीता जेव्हां हनुमानानें अवलोकन केली, तेव्हां ती भयभीत झालेल्या हरिणी-प्रमाणें आपल्याभोंवतीं पहात होती. आपल्या निश्वासांच्या योगानें संनिध

असलेल्या पल्लवयुक्त वृक्षांना ती जशी कांहीं दग्धच करून टाकीत होती; आणि शोकाची राशीच कीं काय, अथवा दुःखसागरांतून उसळलेली दुःखाची लाटच कीं काय अशी ती दिसत होती. सुव्यवस्थित अवयवांनीं युक्त, कृश आणि भूषणावांचूनहि शोभणारी ती मिथिलराजकन्या अवलोकन करून मारुतीला अनुपम हर्ष झाला. मदिरेप्रमाणें जिचे नेत्र आहेत, अशा त्या सीतेला अवलोकन करितांक्षणीं आनंदाश्रु ढाळून हनुमानानें रामाला नमस्कार केला. रामाला व लक्ष्मणाला नमस्कार केल्यानंतर सीतेच्या दर्शनामुळें आनंदित झालेला तो वीर्यवान हनुमान सूक्ष्म रूपाचें अवलंबन करून फांद्यांमध्येंच दडून राहिला.

## सर्ग अठरावा.

### रावणाचें अशोकवनीं आगमन.

ज्यांतील वृक्ष प्रफुल्लित झालेले आहेत, असें तें वन अवलोकन करितां करितां सीतेची उघडपणें भेट व्हावी, एतदर्थ राक्षसस्त्रियांना निद्रा यावी, म्हणून वाट पाहतां पाहतां ती रात्र अगदींच थोडी उरली; आणि षडंगवेद जाणणाऱ्या व श्रेष्ठ श्रेष्ठ क्रतु करणाऱ्या ब्रह्मराक्षसांचा वेदघोष उत्तररात्रीं त्याच्या कानीं येऊं लागला. नंतर मंगलवाद्यें आणि कानाला मधुर लागणारे इतरहि ध्वनि ह्यांच्या योगानें तो महाबलाढ्य व महापराक्रमी दशानन रावण जागा झाला, आणि जागृत होतांच सीतेचें चिंतन करूं लागला. मदनाच्या योगानें मदमत्त झालेल्या त्या राक्षसाचें मन तिच्याविषयीं अतिशयच आसक्त होऊन राहिलेलें होतें. आणि ह्यामुळें ती कामवासनाहि आंतल्या आंत दाबून टाकण्यास तो समर्थ नव्हता. नंतर सर्व भूषणांनीं युक्त आणि अनुपम वैभव धारण करणारा तो रावण सर्व प्रकारच्या पुष्पांनीं व फलांनीं भरलेल्या नानाप्रकारच्या वृक्षांनीं युक्त असलेल्या त्या अशोकवनामध्यें गेला. तें वन पुष्करिणींनीं व्याप्त झालेलें होतें. नानाप्रकारच्या पुष्पांनीं त्याला शोभा आलेली होती. अत्यंत अद्भुत आणि सर्वदा मत्त अशा पक्ष्यांच्या योगानें तें चित्रविचित्र झालेलें होतें, आणि दृष्टीला चकित करून टाकणाऱ्या नानाप्रकारच्या क्रीडाविषयक मृगांनीं तें भरलेलें होतें.

असो. अंतःपुरांतून उठून अशोकवनाचा मार्ग अवलोकन करीत करीत तो रावण रत्नखचित सोन्याच्या तोरणांनीं युक्त, नानाप्रकारच्या मृगगणांनीं व

पडलेल्या फळांनीं व्याप्त आणि एकसारख्या वृक्षपंक्तींनीं भरलेल्या अशा त्या अशोकवनामध्यें गेला. देवयोनींतील आणि गंधर्वयोनींतील स्त्रिया ज्याप्रमाणें इंद्र जाऊं लागला असतां त्याच्या मागोमाग जातात, त्याप्रमाणें शंभर स्त्रिया तो पुलस्त्यपौत्र राक्षसराज रावण निघाला असतां त्याच्या मागोमाग चालल्या. कांहींजणींनीं सोन्याचे दीप घेतले होते. कांहींनीं चौऱ्या घेतल्या होत्या. कांहींनीं पंखे घेतलेले होते. कांहीं सोन्याच्या झाऱ्यांमध्यें उदक घेऊन पुढें चालल्या होत्या. दुसऱ्या कांहीं वर्तुल आसनें घेऊन मागून चालल्या होत्या. पेय द्रव्यानें परिपूर्ण आणि रत्नमय असल्यामुळें झळकत असलेलें पात्र उजव्याच हातांत घेऊन एक त्याच्या मनाप्रमाणें वागणारी स्त्री त्याच्याबरोबर चालली होती. परिचंद्राप्रमाणें ज्याची प्रभा आहे, राजहंसाप्रमाणें ज्याचा वर्ण आहे, ज्याचा दंड सुवर्णाचा आहे, असें छत्र हातांत घेऊन दुसरी एक स्त्री त्याच्या मागोमाग चालली होती. निद्रेनें व मदानें ज्यांची दृष्टि व्याकुळ झाली आहे, अशा रावणाच्या उत्तम स्त्रिया मेघाच्या मागोमाग जाणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें आपल्या पतीच्या मागोमाग चालल्या होत्या. ज्यांचे हार व बाहुभूषणें स्थानभ्रष्ट झालीं आहेत, ज्यांची उटी चोळवटून गेलेली आहे, ज्यांचे केश लोंबत आहेत, ज्यांचें मुख घामानें डवडवलें आहे, निद्रेमुळें आणि मद कांहींसा शिल्लक असल्यामुळें ज्या गुंगतच आहेत, ज्यांचीं मुखें मनोहर आहेत, घामामुळें ज्यांच्या शरीरांवरील पुष्पें खराब झालीं आहेत, ज्यांचे केश पुष्पयुक्त व अस्ताव्यस्त झालेले आहेत, आणि ज्यांचे नेत्र मदिरेसारखे आहेत, अशा रावणाला प्रिय असलेल्या कांहीं स्त्रिया त्याच्या मागोमाग गेल्या. कामाचे अधीन झालेला त्यांचा तो महाबलाढ्य अविचारी पति, सीतेचे ठिकाणीं मन आसक्त झालें असल्यामुळें सावकाश व डुलत डुलत जाऊं लागला. इतक्यांत त्या उत्कृष्ट स्त्रियांच्या कमरपट्ट्यांचा आवाज व तोरड्यांचा शब्द हनुमंताच्या कानीं पडला, आणि लगेच तो अतुल पराक्रमी, महाबलाढ्य व सामर्थ्यवान रावण अशोकवनिकेच्या दाराशीं प्राप्त झाल्याचेंहि त्याच्या दृष्टीस पडलें. सुगंधि तेल ज्यांवर ओतिलें जात आहे, अशा पुढें धरिलेल्या अनेक मशालींचा सर्व बाजूंनीं रावणावर प्रकाश पडलेला होता. काम, गर्व आणि मद ह्यांनीं युक्त असलेल्या त्या रावणाचे नेत्र वक्र, ताम्रवर्ण व विशाल असून, चापाचा त्याग केलेला प्रत्यक्ष मदनच कीं काय असा तो दिसत होता. घुसळिलेल्या दुधाच्या फेंसाप्रमाणें शुभ्र व निर्मल पुष्पें आणि उत्तम मोत्यें लाविलेले व बाहुभूषणाला अडकलेलें असें आपलें उत्कृष्ठ वस्त्र तो

सावरीत होता. तो समीप आला असतां पानांनीं गच्च भरलेल्या एका फांदीवर लपून बसलेला आणि शेंकडों पानांनीं व पुष्पांनीं व्याप्त झालेला तो हनुमान 'हा कोण असावा' हें ओळखिण्याचा यत्न करूं लागला; परंतु तो वानरश्रेष्ठ हनुमान पाहूं लागला असतां रावणाच्या रूपवती व यौवनसंपन्न उत्कृष्ठ स्त्रिया त्याच्या दृष्टीस पडल्या. त्या सुरूप स्त्रियांनीं तो महाकीर्तिमान रावण परिवेष्ठित झालेला होता. असो. इतक्यांत मृग व पक्षी ह्यांनीं नादित, आणि स्त्रियांच्या क्रीडेकरितां तयार केलेल्या त्या वनामध्यें मद्यपानानें मत्त, अद्भुत अलंकार धारण केलेला आणि महाबलाढ्य असा शंकुकर्ण नामक राक्षस प्रविष्ट झाला. तारांच्या योगानें जसा चंद्रमा परिवेष्ठित झालेला असतो, तसा तो विश्वावस मुनींचा पुत्र रावण उत्कृष्ठ स्त्रियांनीं परिवेष्ठिलेला आहे, असें त्या शंकुकर्णाच्या दृष्टीस पडलें. इतक्यांत पूर्वीं नगरांत उत्कृष्ठ गृहामध्यें जो शयन करीत होता, तोच हा दुरात्मा रावण असें हनुमानानें ओळखिलें, आणि लगेच त्या महातेजस्वी वायुपुत्रानें फारच उंच फांदीवर उडी मारिली.

असो. तो बुद्धिमान हनुमान जरी महातेजस्वी होता, तरी त्या रावणाच्या तेजानें अगदींच दिपून गेला, आणि पानांनीं भरलेल्या अशा दुसऱ्या एका दृष्टोत्पत्तीस न येणाऱ्या शाखेचा आश्रय करून दडून बसला. इतक्यांत कृष्णवर्ण केश, सुंदर कटिप्रदेश, आणि कृष्णवर्ण नेत्रप्रांत ह्यांनीं युक्त असलेल्या त्या सीतेला पाहाण्याकरितां रावणहि अगदीं संनिध आला.

## सर्ग एकोणिसावा.

### विरहिणी सीतेचें वर्णन.

रावण समीप येतांक्षणींच तो त्या निर्दोष विदेह राजकन्येच्या दृष्टीस पडला. आणि उत्कृष्ठ अलंकार धारण केलेल्या, रूपवान व यौवनसंपन्न अशा त्या राक्षसाधिपतीला अवलोकन करितांक्षणीं ती सुंदरी वायूच्या तडाख्यांत सांपडलेल्या केळीप्रमाणें थरथर कांपूं लागली; आणि गुडघ्यांत मान घालून रडत बसली. रावणानें जेव्हां सीतेला पाहिलें, तेव्हां राक्षसस्त्रियांच्या समुदायांनीं तिचें संरक्षण केलें होतें; आणि महासागरामध्यें मग्न होऊं लागलेल्या नावेंतील लोकांप्रमाणें ती दुःखाकुल व दीन झालेली होती. उघड्या जमिनीवर बसली असल्यामुळें, मोडून भूमीवर

पडलेली वृक्षाची शाखाच की काय अशी ती भासत होती. तिच्या शरीरावरील अलंकार घालण्याचीं स्थानें मलानें भरून गेलेलीं होतीं. भूषणांना पात्र असूनहि ती भूषणरहित होती, आणि म्हणूनच पंकलिप्त कमलिनीप्रमाणें ती धड शोभतहि नव्हती, आणि धड विशोभितहि दिसत नव्हती आपला पति जो नृपश्रेष्ठ जगद्विख्यात राम, त्याच्याकडे चिंतनरूप अश्व जोडलेल्या मनोरथांच्या योगानें ती जात होती. तिचें मुख शुष्क झालें होतें. ती एकटीच रडत बसली होती. एकसारखें चिंतन व शोक करीत होती, आणि रामाचेच ठिकाणीं आसक्त असलेल्या त्या सीतेला दुःखांतून पार पडण्याची कांहीं अटकळच होत नव्हती. मंत्र्यांच्या तावडींत सांपडलेल्या नागराजाच्या भार्येप्रमाणें ती तडफडत होती. धूम्रवर्ण केतु ग्रहामुळें संतप्त होऊं लागलेली रोहिणीच कीं काय अशी ती भासत होती. आचारसंपन्न, सुशील, धार्मिक आणि सद्वर्तनानें युक्त अशा कुलामध्यें उत्पन्न होऊन तशाच प्रकारच्या कुलामध्यें तिचा पाणिग्रहणसंस्कारहि झाला असतांना, हीन कुलामध्यें उत्पन्न झालेल्या स्त्रीप्रमाणें तिची दशा झालेली होती. ती जणुं उतरती कळा लागलेली मोठी कीर्ति, मानखंडना झालेली प्रत्यक्ष श्रद्धा, क्षीण झालेली बुद्धि, भग्न झालेली आशा, विध्वंस करून टाकिलेली संपत्ति, हाणून पाडिलेली आज्ञा, उत्पातसमयीं प्रदीप्त झालेली दिशा, उलथून दिलेली देवपूजा, अंधकारानें चंद्रमंडळ ग्रस्त झालेली पौर्णिमेची रात्र, तुडवून टाकिलेली कमलिनी, शूरांचा वध झालेली सेना, अंधकारानें ग्रस्त केलेली सूर्याची प्रभा, आटून गेलेली नदी, पतितांनीं व्याप्त झालेली वेदि, शांत झालेली अग्नीची ज्वाला, जिचीं पानें व कमळें तोडिलेलीं आहेत, जिच्या सांनिध असलेले पक्षी उडवून लाविलेले आहेत, आणि हत्तींच्या सोंडांचे तडाके बसल्यामुळें जी अगदीं जर्जर झालेली आहे अशी कमलिनी, पतिशोकामुळें व्याकुल व शुष्क झाल्यामुळें दुसरीकडे पाणी काढून लाविलेली शुष्क नदी, अथवा अभ्यंगप्रभृति चांगले शरीरसंस्कार होत नसल्यामुळें कृष्णपक्षांतील रात्रच कीं काय अशी ती दिसत होती. ती फारच सुकुमार होती. तिचें रूप फारच मनोहर होतें. रत्नखचित गृहामध्यें राहाण्यासच ती योग्य होती. नुकतीच उपटून टाकिलेली व उन्हानें तापत असलेली कमलिनीच कीं काय अशी ती भासत होती. गजसमुदायाचें रक्षण करणाऱ्या गजेंद्राचा वियोग झाल्या कारणानें धरली जाऊन स्तंभाशीं डांबून टाकिल्यामुळें अत्यंत दुःखाकुल होऊन सुस्कारे टाकीत असलेल्या गजेंद्रभार्येप्रमाणें ती दिसत होती. एकच लांब वेणी असल्यामुळें, पर्जन्यकाल संपल्यानंतर नीलवर्ण वन-

पंक्तीच्या योगानें शोभणाऱ्या पृथ्वीप्रमाणें तिला अनायासें शोभा आलेली होती. उपवास, शोक, चिंता आणि भय ह्यांच्या योगानें त्या बिचारीचा आहारहि अल्प झाला असून ती क्षीण, कृश व दीन झालेली होती; आणि रघुकुलश्रेष्ठ रामाच्या हातून रावणाचा पराभव व्हावा, असें अगदीं मनापासून देवतेपाशीं ती दु:खाकुल झालेली सीता हात जोडून मागतच आहे कीं काय, अशी दिसत होती.

असो. उत्कृष्ठ पापण्यांनीं युक्त असलेले जिचे दीर्घ व स्वच्छ नेत्र ताम्रवर्ण झाले आहेत, जी स्वत: निर्दोष असून इकडे तिकडे पहात रडत बसली आहे, आणि रामाचे ठिकाणीं जी अतिशयच अनुरक्त आहे, अशा त्या मिथिलराजकन्या सीतेला रावण आपल्या वधाकरितां वश करूं लागला.

## सर्ग विसावा.

### रावणमुखें सीतेची मनधरणी.

राक्षसस्त्रियांनीं परिवेष्ठित असलेल्या त्या बिचाऱ्या आनंदरहित दीन सीतेला सहेतुक अशा मधुर शब्दांनीं रावण आपला अभिप्राय दर्शवूं लागला. तो म्हणाला, "सीते, तुझ्या मांड्या हत्तीच्या सोंडेप्रमाणें आहेत, परंतु तूं मला अवलोकन करून स्तन व उदर झांकितां झांकितां भीतीनें आपलें शरीर माझ्या मुळींच दृष्टीस न पडण्याची इच्छा करीत आहेस, हें काय? प्रिये, हे विशालनयने, हे सर्वांगसुंदरि, हे त्रैलोक्यमोहिनि, मी तुझी इच्छा करीत आहें. ह्यास्तव तूं मला बहुमान दे. सीते, माझ्यामुळें जें तुझे ठिकाणीं भय उत्पन्न झालें आहे, तें तूं सोडून दे. कारण, ह्या ठिकाणीं मनुष्य आणि यथेष्ट रूप धारण करणारे राक्षस ह्यांपैकीं कोणीहि नाहींत. अग भित्रे, बलात्कारानें परस्त्रिया हरण करणें आणि त्यांचा उपभोग घेणें, हा राक्षसांचा सर्वदा स्वधर्मच आहे, ह्यांत संशय नाहीं. परंतु मैथिलि, असें जरी आहे, तरी माझी इच्छा झाल्याशिवाय मी तुला स्पर्शहि करणार नाहीं. माझ्या शरिरामध्यें मदनाला वाटेल तशी विषयवासना प्रवृत्त करूं दे. हे देवि, ह्या ठिकाणीं भिण्याचें मुळींच कारण नाहीं. प्रिये, माझ्यावर विश्वास ठेवून तूं खऱ्या रीतीनें माझ्यावर प्रेम कर. अशी शोकाकुल होऊं नको. एक वेणी, भूमीवर शय्या, चिंता, मलिन वस्त्र आणि विनाकारण उपवास हीं तुझ्या कांहीं उपयोगीं पडणार नाहींत. हे जनककन्ये, चित्रविचित्र

पुष्पें, नानाप्रकारचें चंदन, अनेक प्रकारचे अगुरु, नानाप्रकारचीं वस्त्रें, दिव्य भूषणें, मोठमोठ्या किमतींचीं पेयें, शय्या, आसनें, गीत, नृत्य आणि वाद्य ह्यांची तूं माझा स्वीकार करून प्राप्ति करून घे. सुंदरि, तूं स्त्रियांमध्यें रत्न आहेस. तस्मात् असें करूं नको. तूं अंगावर अलंकार घाल. माझा स्वीकार केल्यावर तुला अशा प्रकारें अलंकाररहित राहाण्याची पाळी कोठून बरें येईल? उत्कृष्ट दशेला आलेलें हें तुझें यौवन व्यर्थ जात आहे; आणि जलप्रवाहांचें वाहाणारें उदक ज्याप्रमाणें फिरून परत येत नाहीं, त्याचप्रमाणें हें तुझें यौवन पुनरपि परत येण्याची आशा नाहीं. तस्मात्, तूं माझ्या म्हणण्याप्रमाणें विषयांचा उपभोग घे. सुंदरि, तुला निर्माण केल्यानंतर दिव्य रूपें उत्पन्न करणाऱ्या जगत्स्रष्टयानें तें काम सोडून दिलें, असें मला वाटतें. कारण, तुझ्या रूपाला दुसरी उपमाच नाहीं. हे वैदेहि, सौंदर्य आणि यौवन ह्यांनीं शोभत असलेल्या तुझी गांठ पडली असतां, प्रत्यक्ष ब्रह्मदेव जरी झाला, तरी कोण बरें क्षुब्ध झाल्यावांचून राहाणार आहे. हे चंद्रमुखि, तुझा कटिप्रदेश विशाल आहे, आणि जों जों मी तुझा अवयव पहात आहें, त्याचे त्याचे ठिकाणीं माझी दृष्टि अगदीं खिळून जात आहे. तस्मात् हे जनककन्ये, हें वेड सोडून दे, आणि तूं माझी भार्या हो. माझ्या उत्कृष्ट स्त्रिया जरी बहुत आहेत, तरी त्या सर्वांमध्यें माझी पट्टराणी तूंच हो. अग, त्रैलोक्यांतून जीं रत्नें मीं बलात्कारानें हरण करून आणिलेलीं आहेत, तीं सर्व मी तुला देतों, आणि आपलें राज्यहि अर्पण करितों. हे विलासिनि, नानाप्रकारच्या नगरसमुदायांनीं युक्त असलेली ही सर्व पृथ्वी जिंकून मी पाहिजे तर तुझ्याकरितां जनकाला अर्पण करीन. ह्या जगतामध्यें समरांगणांत माझ्याशीं युद्ध करणारा मला कोणी दिसत नाहीं. तस्मात्, युद्धामध्यें अप्रतिहत ठरलेल्या माझ्या अतिप्रचंड सामर्थ्याचा तूं एकदा विचार तर करून पाहा. अनेक वेळां मीं ध्वज उध्वस्त करून संग्रामामध्यें जिंकिलेले देवदैत्य माझ्यासमोर प्रतिपक्षी ह्या नात्यानें नुसते उभे राहाण्यासहि समर्थ नाहींत. तेव्हां तूं माझा स्वीकार कर, आणि उत्कृष्ठ प्रकारें आपलें शरीर भूषित कर. सारांश, आज तुझ्या शरिरावर तेजस्वी भूषणें लगटून राहोत. तुझें रूप मला फारच उत्कृष्ठ व अलंकार घालण्यास फारच योग्य दिसत आहे. तस्मात् हे सुंदरि, तूं माझ्या कृपेमुळें आपलें शरीर भूषित करून टाक. हे विनयसंपन्न सीते, इच्छेप्रमाणें तूं विषयांचा उपभोग घे. इच्छेस येईल तें पेय सेवन कर, आणि माझ्याशीं रममाण होऊन पृथ्वी अथवा संपत्ति तूं लोकांना

यथेष्ट दे. माझी इच्छा परिपूर्ण कर. धिटाईनें वागणाऱ्या मला तूं निःशंकपणें हवी ती आज्ञा कर, आणि माझ्या कृपेमुळें तुझा भाग्योदय होऊं लागला असतां, तुझ्या बांधवांचेहि मनोरथ परिपूर्ण होऊं दे. हे कल्याणि, हे यशस्विनि, तूं माझी पराक्रमादि समृद्धि आणि वैभव हीं पहा तर खरीं. हे भाग्यवति, वल्कलें परिधान करणाऱ्या रामाशीं तुला काय बरें कर्तव्य आहे ? विजयाचें साधनहि रामापाशीं कांहींएक उरलें नाहीं, व त्याच्यापाशीं संपत्तिहि नाहीं. इतकेंच नव्हे, परंतु तो वनचर व व्रतस्थ बनला असून भूमीवर शयन करीत आहे. तस्मात्, अशा अवस्थेमध्यें तो जिवंत राहाण्याचा तरी संभव आहे किंवा नाहीं, ही मला शंकाच आहे. बगळे ज्यांचे अग्रेसर आहेत, अशा कृष्णमेघांनीं आच्छादित झालेल्या चंद्रिकेप्रमाणें राक्षसस्त्रियांनीं आच्छादून टाकिलेल्या तुझें नुसतें दर्शन करून घेण्यासहि राम समर्थ होणार नाहीं, मग तुझ्या प्राप्तीची गोष्ट तर दूरच राहिली ! इंद्राच्या हस्तगत झालेली भार्या ज्याप्रमाणें हिरण्यकश्यपूला नारदमुनींच्या द्वारें प्रार्थना केल्यामुळें प्राप्त झाली, त्याप्रमाणें माझ्या हातून तुला प्राप्त करून घेण्यास राम समर्थ नाहीं. हे सुहास्यवदने, हे सुंदरि, हे चारुनयने, हे विलासिनि, गरुड ज्याप्रमाणें सर्पाला हरण करून नेतो, ह्याप्रमाणें तूं माझें मन हरण करीत आहेस. अंगानें सडपातळ, अलंकाररहित आणि जीर्ण पैठणी नेसलेल्या तुला अवलोकन करून स्वतःच्या स्त्रियांवर माझें मनच जाईनासें झालें आहे. जानकी, सर्वगुणसंपन्न अशा जितक्या स्त्रिया माझ्या अंतःपुरामध्यें वास्तव्य करीत आहेत, त्या सर्वांचें आधिपत्य तूं कर. हे कृष्णकेशयुक्त सीते, त्रैलोक्यांतील उत्कृष्ठ अशा ज्या स्त्रिया माझ्यापाशीं आहेत, त्या लक्ष्मीची सेवा करणाऱ्या अप्सरांप्रमाणें तुझी सेवा करतील. सुंदरि, कुबेरापाशीं जीं कांहीं उत्कृष्ठ रत्नें व नानाप्रकारचीं उत्कृष्ठ धनें आहेत, तीं सर्व, त्याचप्रमाणें त्रैलोक्यांतीलहि सर्व उत्कृष्ट वस्तु ह्यांचा तूं माझ्यासहवर्तमान खुशाल उपभोग घे. हे देवि, तप, बल, पराक्रम, धन, तेज आणि कीर्ति ह्यांपैकीं राम माझ्याशीं एकाहि गुणानें बरोबरी करणारा नाहीं. अग, माझ्यावर प्रेम करून तूं यथेष्ट विहार कर, क्रीडा कर, इच्छेप्रमाणें पान कर, भोग्य वस्तूंचा उपभोग घे, धनराशि देऊन टाक व पृथ्वीहि कोणाला अर्पण कर. असें झालें म्हणजे, तुझे बांधवहि तुझी भेट घेऊन आपले सर्व मनोरथ इच्छे-

१ 'श्रीमद्भागवताचें मराठी सुरस भाषांतर' या ग्रंथाचें पृष्ठ ३५० पहा.

प्रमाणें परिपूर्ण करून घेवोत. हे विनयसंपन्न सीते, प्रफुल्लित वृक्षसमुदाय एकसारखे ज्यांत आहेत, भ्रमरांनीं जीं युक्त आहेत, अशा समुद्रतीरावरील वनांमध्यें माझ्यासहवर्तमान तूं सुवर्णाच्या उज्ज्वल हारानें भूषित होऊन विहार कर."

## सर्ग एकविसावा.

### सीतेचें उत्तर.

त्या क्रूर राक्षसाचें तें भाषण श्रवण केल्यावर, दुःखाकुल झालेली सीता दीन वाणीनें आणि मोठ्या काकुलतीनें हळू हळू त्याच्याशीं बोलूं लागली. सारांश, दुःखाकुल झालेली, रडत असलेली भीतीनें कांपत असलेली व पतिव्रता असल्यामुळें पतीचेंच चिंतन करीत असलेली, राम समीप असतांना शुभ हास्य करणारी ती बिचारी सुंदरी सीता तृण आड धरून रावणाला म्हणाली, "तुझें मन माझ्यापासून निवृत्त होऊन स्वस्त्रियांचे ठिकाणीं प्रीतियुक्त होऊं दे. पापी पुरुष ज्याप्रमाणें ब्रह्मलोकप्राप्तीला योग्य होत नाहीं, त्याप्रमाणें तूं माझी इच्छा करण्याला योग्य नाहींस. मोठ्या कुलामध्यें जन्मास येऊन पुण्य कुलामध्यें प्राप्त झालेल्या मज पतिव्रतेच्या हातून निंद्य अकार्य होणार नाहीं."

ह्याप्रमाणें रावणाला सांगितल्यानंतर ती यशस्विनी त्याच्याकडे पाठ करून पुनः म्हणाली, "तुझी भोग्य भार्या मी नव्हें. मी परस्त्री आहें. पतिव्रता आहें. तेव्हां चांगल्या रीतीनें धर्माकडे दृष्टि देऊन तूं उत्तमोत्तम प्रकारानें आपलें आचरण ठेव. अरे निशाचरा, जशा तुझ्या स्त्रिया तुला संरक्षणीय आहेत, तशाच दुसऱ्याच्याहि आहेत. तस्मात्, जें आपणाला दुःख तेंच दुसऱ्याला दुःख असें समजून तूं स्वतःच्याच स्त्रीजनाचे ठिकाणीं रममाण हो. स्वस्त्रीचे ठिकाणीं असंतुष्ट, चंचल, क्षुब्ध इंद्रियांनीं युक्त व सज्जनांना तिरस्करणीय वाटणारी बुद्धि धारण करणारा जो पुरुष असतो, त्याच्या पराजयाला परस्त्रिया कारण होत असतात. ज्या अर्थीं तुझी बुद्धि सदाचाररहित व विपरीत दिसत आहे, त्या अर्थीं येथें कोणी सज्जनच नसावेत, अथवा ते असले तरी तूं त्यांची पर्वा करीत नसावास, असें मला वाटतें. तुझ्या बुद्धीचा ग्रह विपरीत झाला असल्यामुळें, दूरदर्शी लोकांनीं सांगितलेला हितकारक उपदेश तूं ऐकत नाहींस. ह्यामुळें राक्षसांचा नाश होईल. चांगला उपदेश ऐकणें ज्याच्या बुद्धीला

नीट दिसत नाहीं, व जो नेहमीं अन्याय करीत असतो, अशा राजाचें अवलंबन केलें असतां, ज्याप्रमाणें समृद्ध असलेलींहि राष्ट्रें व नगरें नाश पावतात, त्याचप्रमाणें तुझा आश्रय केल्यामुळें रत्नसमुदायांनीं व्याप्त झालेली ही लंका तुझ्या एकट्याच्या अपराधानें लवकरच नाश पावेल. रावणा, दूरवर विचार ज्याचे ठिकाणीं नसतो, आणि म्हणूनच स्वतःच्या कृत्यांनींच ज्याचा नाश होणें ठरलेलें असतें, त्या दुष्कर्मी पुरुषाचा घात झाला असतां सर्व प्राणी ज्याप्रमाणें आनंद मानीत असतात, त्याप्रमाणें 'ह्या क्रूराला हें संकट आलें ही मोठी सुदैवाचीच गोष्ट समजली पाहिजे,' असेंच तूं दुःख दिलेले सर्व लोक तुज दुष्कर्म्याला उद्देशून म्हणूं लागतील. ऐश्वर्याच्या योगानें अथवा धनाच्या योगानें माझें मन कोणालाहि वळवितां येणें शक्य नाहीं. कारण सूर्यापासून जशी प्रभा भिन्न नाहीं, तशीच मी रामापासून भिन्न नाहीं. त्या लोकनाथ रामाचा मान्य हात उशाशीं घेऊन एकदां शयन केल्यावर दुसऱ्या कोणाचाहि हात मस्तकाखालीं घेऊन मी कोठून बरें शयन करणार? ज्याप्रमाणें ब्रह्मविद्या ब्राह्मणालाच योग्य आहे, त्याचप्रमाणें ब्रह्मचर्यव्रतपूर्वक समावर्तन झाल्यावर यथाविधि माझें पाणीग्रहण केलेल्या त्या पृथ्वीपति रामाचीच मी योग्य भार्या आहें. तस्मात् रावणा, वनामध्यें वास्तव्य केलेल्या हत्तिणीची ज्याप्रमाणें गजेंद्राशीं गांठ घालून देणें योग्य आहे, त्याप्रमाणें तूं बऱ्या विचारानें दुःखाकूल झालेल्या माझी रामाशीं गांठ घालून दे. हें लंकास्थान सुरक्षित रहावें, आणि आपणाला भयंकर प्रतिबंध प्राप्त होण्याचा प्रसंग न यावा, अशी जर तुझी इच्छा असेल, तर ह्या पुरुषश्रेष्ठ रामाला मित्र करून घेणेंच तुला योग्य आहे. जगद्विख्यात राम सर्वधर्मवेत्ता असून शरणागतावर प्रेम करणारा आहे. तस्मात्, तुला जर जिवंत राहाण्याची इच्छा असेल, तर त्याच्याशीं तुझी मैत्री होऊं दे. शरणागतावर कृपा करणाऱ्या ह्या रामाला तूं प्रसन्न करून घे, आणि मनानें शुद्ध राहून तूं मला त्याच्या स्वाधीन कर. रघुवंशजश्रेष्ठ रामाचे स्वाधीन मला केल्यानें तुझें कल्याण होईल; आणि ह्या माझ्या सांगण्याचे विरुद्ध जर तूं वागूं लागलास, तर तुला पराकाष्ठेचें संकट प्राप्त होईल. इंद्राच्या हातून सुटलेलें वज्र अथवा प्रत्यक्ष मृत्युहि पुष्कळ दिवसपर्यंत कदाचित् तुझी उपेक्षा करील; परंतु तो लोकनायक राघव क्रुद्ध झाला असतां,तुझ्यासारख्याचा नाश केल्यावांचून कधींहि राहाणार नाहीं. इंद्रानें सोडिलेल्या वज्राच्या भयंकर घोषाप्रमाणें रामाच्या धनुष्याचा अतिप्रचंड शब्द तूं श्रवण करशील. उत्कृष्ट पेऱ्यांनीं व प्रदीप्त मुखांनीं युक्त

असलेल्या भुजंगाप्रमाणें दिसत असलेले, आणि राम-लक्ष्मणांच्या नांवांनीं चिन्हित झालेले बाण सत्वरच येथें तुझ्यावर येऊन पडतील. कंक पक्ष्यांच्या पिसांनीं युक्त असलेले बाण राक्षसांचा घात करण्याकरितां ह्या नगरींतील यत्किंचित्‌हि जागा मोकळी ठेवणार नाहींत. विनतापुत्र गरुड ज्याप्रमाणें वेगानें मोठमोठे सर्प सत्वर उचलून नेत असतो, त्याप्रमाणें राक्षसराजरूप मोठमोठे सर्प तो रामरूप गरुड ह्या नगरींतून वेगानें उचलून नेईल. तीन पावलें टाकून ज्याप्रमाणें विष्णूनें दैत्यांपासून उज्ज्वल लक्ष्मी हरण करून नेली, त्याप्रमाणें शत्रूंना जेरीस आणणारा माझा भर्ता तुझ्यापासून मला सत्वर घेऊन जाईल. रावणा, राक्षसांच्या सैन्याचा रामाच्या हातून वध होऊन जनस्थानांतील सर्व राक्षसस्थानें उध्वस्त झाल्यामुळें तूं शक्तिहीन झाल्यावरहि मला येथें हरण करून आणिलेंस, हें नीट केलें नाहींस. अरे अधमा, ते पुरुषश्रेष्ठ भ्राते वनामध्यें गेले असतांना त्यांच्या शून्य आश्रमामध्यें प्रवेश करून तूं मला तेथून घेऊन आलास, हें खरोखर वाईट केलें. अरे, वाघांच्या दृष्टीसमोर उभा राहाण्यास ज्याप्रमाणें क्षुद्र श्वान समर्थ होत नाहीं, त्याप्रमाणें राम लक्ष्मणांचा वास आल्यावर त्यांच्यासमोर उभा राहाण्यास तूं समर्थ होणार नाहींस. वज्रानें एक हात तुटून पडल्यानंतर वृत्रासुराचा शिल्लक राहिलेला दुसरा हात ज्याप्रमाणें युद्धामध्यें इंद्राच्या दोन हातांशीं टिकाव धरण्यास समर्थ झाला नाहीं, त्याप्रमाणें त्या राम-लक्ष्मणांशीं तुझें युद्ध सुरू झालें असतां, तुला साहाय्य करणारें तुझें सैन्य टिकाव धरणार नाहीं. ज्याप्रमाणें उदक अल्प असल्यास तें सूर्य आपल्या किरणांच्या योगानें सत्वरच हरण करितो, त्याप्रमाणें राम-लक्ष्मणांसहवर्तमान तो माझा नाथ बाणांच्या योगानें सत्वरच तुझे प्राण हरण करील. सारांश, कुबेराचें निवासस्थान जो कैलास पर्वत तेथें जरी तूं गेलास, किंवा वरुणराजाच्या सभेमध्यें जरी जाऊन बसलास, तरी विजेचा तडाका बसला असतां महावृक्ष ज्याप्रमाणें प्राण सोडितो, त्याप्रमाणें कालाचाच तडाका बसलेला तूं दाशरथि रामाची गांठ पडल्याबरोबर निःसंशय प्राण सोडशील."

# सर्ग बाविसावा.

## रावणाचा कोप आणि त्याचें अशोकवनांतून परावर्तन.

सीतेचें कठोर भाषण श्रवण केल्यावर राक्षसाधिपति रावण अप्रिय शब्दांनीं त्या प्रियदर्शना सीतेला म्हणाला, " पुरुष जों जों स्त्रियांचें सांत्वन करीत जातो, तों तों त्यांना तो आवडूं लागतो, असें जगतामध्यें दृष्टोत्पत्तीस येत असतें; परंतु मी जसजसें तुझ्याशीं प्रिय भाषण करीत आहें, तसतसा तुझ्या हातून माझा अनादरच होत आहे. रस्ता सोडून धावत सुटलेल्या अश्वांचें ज्याप्रमाणें चांगला सारथि संयमन करतो, त्या प्रमाणें तुझ्यासंबंधानें माझ्या मनामध्यें उत्पन्न झालेला काम क्रोधाचें संयमन करीत आहे. मनुष्यांचा कामच खरोखर क्रोधापेक्षां क्रूर आहे. कारण, अत्यंत क्रोध करण्यास योग्य अशाहि ज्या व्यक्तीचे ठिकाणीं तो बद्ध होऊन राहतो, त्या व्यक्तींविषयीं दया आणि प्रेम हीं खरोखर उत्पन्न होतात. सुंदरि, ह्या कारणामुळेंच, वधाला आणि तिरस्काराला पात्र असून ब्रह्मचर्याविषयीं व्यर्थ तत्पर असलेल्या तुझा मी घात करीत नाहीं. मैथिलि, जीं जीं कठोर भाषणें तूं माझ्याशीं करीत आहेस, त्यांबद्दल भयंकर रीतीनें तुझा वध करणेंच योग्य आहे. "

ह्याप्रमाणें त्या विदेहराजकन्येला सांगितल्यानंतर क्रोधावेशानें युक्त झालेला तो राक्षसाधिपति रावण पुनरपि तिला म्हणाला, "सुंदरि, वाट पहाण्याचीं जी कालमर्यादा मीं तुला सांगितली आहे, ती संपूर्ण होण्यास मला सुमारें दोन महिने पाळिले पाहिजेत. ह्या दोन महिन्यांनंतर तुला माझ्या शय्येवर आरोहण करणें भाग पडेल. अथवा दोन महिन्यांनंतरहि जर भर्ता ह्या नात्यानें तूं माझा स्वीकार केला नाहींस, तर माझ्या न्याहारीकरितां आचारी तुझे तुकडे तुकडे करून टाकतील."

अशा प्रकारें रावण सीतेची निर्भर्त्सना करूं लागला असतां, तेथें असलेल्या देवकन्यांच्या व गंधर्वकन्यांच्या मुद्रा फिरून गेल्या. त्या खिन्न झाल्या. त्या राक्षसानें सीतेला धमकी दिल्यानंतर दुसऱ्या देवकन्यांनीं व गंधर्वकन्यांनीं ओठांच्या योगानें, नेत्रांच्या योगानें व मुखांच्या योगानें तिला आश्वासन दिलें. त्यांनीं आश्वासन दिलें असतां, सदाचरण व पतीचें शौर्य ह्यांमुळें गर्वयुक्त परंतु रावणाला हितावह असें भाषण तिनें केलें. ती म्हणाली, " रावणा, ह्या नगरीमध्यें तुझें कल्याण करण्याविषयीं तत्पर असलेला असा कोणीहि पुरुष

खरोखर नाहीं. कारण, ह्या निंद्य कर्मापासून तुझें कोणी निवारणच करीत नाहीं. अरे, इंद्राच्या शचीप्रमाणें मज धर्मात्म्या रामाच्या पत्नीची प्रार्थना करण्याचें मनामध्येंहि आणणारा तुझ्याशिवाय त्रैलोक्यामध्यें दुसरा कोण बरें सांपडणार आहे? हे राक्षसाधमा, ज्याच्या तेजाला अंत नाहीं, अशा रामाच्या भार्येला उद्देशून ज्या अर्थी तूं पापाचा उच्चार केलेला आहेस, त्या अर्थी कोठें गेल्यानें तूं त्याच्या हातून सुटणार आहेस बरें? ज्याप्रमाणें मत्त गज आणि ससा ह्यांची वनामध्यें दुर्दैवानें प्रतिपक्षी ह्या नात्यानें एकत्र गांठ पडावी, त्याप्रमाणें सांप्रत प्रकार झालेला आहे. राम हा मत्त गजाप्रमाणें आहे, आणि नीचा, तूं सशाप्रमाणें आहेस. त्याच्या दृष्टीचे आटोक्यांत जोपर्यंत तूं गेला नाहींस, तोंपर्यंत त्या इक्ष्वाकुनाथाची येथें निंदा करितांना तुला लाज वाटत नाहीं, हें ठीक आहे; परंतु हे अनार्या, तूं माझ्याकडे निरखून पहात असतांना हे तुझे क्रूर, विकृत आणि कृष्णवर्ण व पिंगटवर्ण नेत्र अद्यापि कसे पडले नाहींत? अरे, मी त्या धर्मात्म्या रामाची पत्नी व दशरथाची स्नुषा असून माझ्याशीं अयोग्य भाषण करीत असतांना तुझ्या जिव्हेचे तुकडे तुकडे कसे होत नाहींत! रामाची आज्ञा नसल्यामुळें, आणि तपाचें परिपालन कर्तव्य असल्यामुळें, भस्म करण्यास समर्थ अशा पातिव्रत्यतेजाच्या योगानें मी तुझें भस्म करून टाकीत नाहीं. वस्तुतः त्या विवेकी रामाची जर मी भार्या आहें, तर तुझ्या हातून माझा अपहार होणें शक्यच नाहीं; परंतु तुझा वध व्हावा, एतदर्थ दैवानेंच हा प्रकार घडवून आणिला आहे, ह्यांत संशय नाहीं. सैन्यांच्या योगानें प्रबल झालेला तूं कुबेराचा भ्राता मोठा शूर पडलास, म्हणूनच मारीच राक्षसाच्या मायेनें रामाला दूर घालवून स्त्रीचौर्य करण्याचें शौर्य तुझ्या हातून घडलें!"

सीतेचें हें मर्मभेदक भाषण ऐकतांच तो रावण आपले उग्र डोळे वटारून तिच्याकडे पाहूं लागला. मोठमोठे हात व मस्तकें धारण करणारा तो भव्य रावण नीलमेघाप्रमाणें दिसत होता. त्याचा पराक्रम व चालण्याची ढब ही सिंहाप्रमाणें होती. त्याच्या जिव्हा प्रदीप्त झाल्या असून नेत्र उग्र दिसत होते. मुकुटाचा अग्रभागीं वर वर सरत असल्यामुळें तो अधिकच उंच दिसत होता. चित्रविचित्र पुष्पमाला व उट्या त्यानें सेवन केल्या होत्या. रक्तवर्ण पुष्पें आणि वस्त्रें त्यानें धारण केलीं असून उत्कृष्ठ सुवर्णाचीं बाहुभूषणें त्यानें घातलेलीं होतीं. मोठ्या कृष्णवर्ण कटिसूत्रानें तो चांगलाच बद्ध झाला असल्यामुळें, अमृत उत्पन्न करण्याकरितां वासुकि नामक भुजंगानें बद्ध झालेला मंदर पर्वतच कीं

काय, असा दिसत होता. शक्तीनें परिपूर्ण असलेल्या त्या आपल्या भुजांच्या योगानें तो पर्वतप्राय राक्षसाधिपति शिखरांच्या योगानें शोभणाऱ्या मंदर पर्वताप्रमाणें शोभत होता. बालसूर्याप्रमाणें तेजस्वी कुंडलांनीं तो भूषित झाला असल्यामुळें, आरक्तवर्ण पानें व पुष्पें धारण करणाऱ्या अशोकाच्या योगानें भूषित झालेला पर्वतच कीं काय असा दिसत होता. सर्व भोग्य पदार्थ जवळ असल्यामुळें तो रावण कल्पवृक्षतुल्य असून, अलंकार धारण केलेला असल्यामुळें जरी मूर्तिमान वसंत ऋतूप्रमाणें भासत होता, तरी स्मशानांतील प्रसिद्ध ठिकाणच्या वृक्षाप्रमाणें तो भयंकर होता. असो.

क्रोधानें ज्याचे डोळे लाल झाले आहेत, असा तो रावण भुजंगाप्रमाणें सुस्कारे टाकीत टाकीत सीतेकडे दृष्टि देऊन म्हणाला, "सूर्य ज्याप्रमाणें संधिकालीन अंधकाराचा नाश करितो, त्याप्रमाणें मर्यादा सोडून वागणाऱ्या दरिद्री रामाचें अवलंबन करणाऱ्या तुझा मी आज आपल्या सामर्थ्याच्या योगानें नाश करून टाकीन."

असें सीतेला सांगितल्यावर शत्रूला गर्भगळित करणाऱ्या त्या राजानें दिसण्यांतहि भयंकर असलेल्या त्या सर्व राक्षसस्त्रिया अवलोकन केल्या. कोणाला एकच नेत्र, कोणाला एकच कान, कोणाचे कान उत्तरीय वस्त्राप्रमाणें शरीर आच्छादन करितां येण्यासारखे विशाल, कोणाचे कान गायीसारखे, कोणाचे हत्तीसारखे, कोणाचे लांब, कोणी मुळींच कानाशिवाय, कोणाचे पाय हत्तीसारखे, कोणाचे अश्वासारखे, कोणाचे बैलासारखे, कोणाच्या पायाला कानाप्रमाणें पाळ्या फुटलेल्या, कोणाला एकच नेत्र, कोणाला एकच पाय, कोणाचे पाय स्थूल, कोणी मुळींच पायाशिवाय, कोणाच्या मस्तकाचें व मानेचें प्रमाण फारच मोठें, कोणाचे स्तन व उदर अतिशयच प्रचंड, कोणाचें मुख व नेत्र फारच मोठे, कोणाची जीभ व नखें फारच लांब, कोणी मुळींच नासिकाहीन, कोणाचें मुख सिंहासारखें, कोणाचें बैलासारखें आणि कोणाचें डुकरासारखें.

अशा प्रकारच्या त्या राक्षसस्त्रिया अवलोकन केल्यावर तो म्हणाला, "राक्षसस्त्रियांनो, जनककन्या सीता मला सत्वर वश होईल, अशा रीतीनें तुम्ही सर्व लवकर व्यवस्था करा. तुम्ही एकत्र जुळून तिला उपदेश करा, आणि प्रतिकूल व अनुकूल हे दोन्ही प्रकार ज्यामध्यें आहत, अशा सामदानप्रभृतिभेदक उपायांनीं अथवा दंड उभारूनहि तुम्ही तिचें मन वळवा."

असें त्यांना सांगून विषयवासना व क्रोध ह्यांनीं व्याप्त झालेला तो राक्षसराज पुनः पुनः जानकीला उद्देशून गर्जना करूं लागला. तेव्हां धान्यमालिनी

राक्षसी सत्वर त्याच्या जवळ गेली आणि त्याला आलिंगन देऊन म्हणाली, "हे महाराजा, तूं माझ्यासहवर्तमान क्रीडा कर. हे राक्षसाधिपते, कळकट व भिकारड्या अशा ह्या मानवी सीतेशीं तुला काय कर्तव्य आहे? हे महाराजा, आपल्या बाहुबलानें तूं ज्या सर्वोत्कृष्ट भोग्य वस्तु संपादन केल्या आहेस, त्यांचा हिचे ठिकाणीं व्यय करण्यास खरोखर अमरश्रेष्ठहि अनुमोदन देणार नाहींत. शिवाय निष्काम स्त्रीची इच्छा धरणाऱ्याचें शरीर मात्र संतप्त होत असून सकाम स्त्रीची इच्छा धरणाऱ्याला चांगला आनंद प्राप्त होत असतो."

ह्याप्रमाणें बोलून त्या राक्षसीनें त्याला तथून दूर सारिले असता, तो मेघतुल्य बलाढ्य रावण हंसत हंसत तेथून परत फिरला. पृथ्वी कंपित करीतच कीं काय, तो रावण तेथून निघाला, आणि उज्ज्वल सूर्याप्रमाणें तेजस्वी असलेल्या आपल्या गृहामध्यें प्रविष्ट झाला. तेव्हां देवकन्या, गंधर्वकन्या व नागकन्या ज्या त्याच्या भोंवतीं गराडा देऊन उभ्या होत्या, त्याहि त्याच्या बरोबर त्या श्रेष्ठ गृहामध्यें प्रविष्ठ झाल्या.

## सर्ग तेविसावा.

### राक्षशींचीं भाषणें.

ह्याप्रमाणें शत्रूंमध्ये हाहाकार करून टाकणारा तो रावण सीतेला बोलून आणि त्या सर्व राक्षसींना सांगून तेथून निघाला. तो जातांच भयंकर रूप धारण करणाऱ्या त्या राक्षसस्त्रिया सीतेकडे धावल्या. क्रोधानें व्याप्त झालेल्या त्या राक्षसस्त्रिया सीतेसमीप गेल्यानंतर फार कठोर वाणीनें तिला म्हणाल्या, "सीते, पुलस्त्यपौत्र व श्रेष्ठ असा जो महात्मा दशानन, त्याची भार्या होणें तुला बरें वाटत नाहीं हें नीट नव्हे.

तदनंतर क्रोधानें जिचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत अशी एक जटा नामक राक्षसी त्या सडपातळ सीतेला हांक मारून म्हणाली, "सहा प्रजापतींपैकीं पुलस्त्य म्हणून प्रसिद्ध असलेला हा ब्रह्मदेवाचा मानसपुत्र चौथा प्रजापति होय. कांतीनें प्रजापतीसारखा असून विश्रवा ह्या नांवानें प्रसिद्ध असलेला तेजस्वी महर्षि पुलस्त्याचा मानसपुत्र होय. हे विशालनयने, शत्रूंमध्यें हाहाकार उडवून देणारा हा रावण त्या पुलस्त्याचा पौत्र होय. तस्मात् त्या राक्षसराजाची

भार्या होणें तुला योग्य आहे. हे सर्वांगसुंदरि, मीं केलेला हा उपदेश तुला कां बरें संमत होत नाहीं ?"

तदनंतर मांजरासारखे जिचे डोळे आहेत, अशी हरिजटा नामक राक्षसी रागारागानें डोळे वटारून म्हणाली, "ज्यानें तेहेतीस कोटी देव आणि देवराज इंद्र ह्याचा पराभव केला, त्या राक्षसराज रावणाची भार्या होणें तुला योग्य आहे. वीर्यानें उचंबळत असलेला आणि संग्रामामध्यें कधींहि परावृत्त न होणारा जो शूर, बलाढ्य व वीर्यवान रावण, त्याची भार्या होणें तुझ्या मनांत कसें बरें येत नाहीं ? हा महाबलाढ्य राजा अतिशय मान्य असलेल्या आपल्या प्रिय भार्यांचा त्याग करून सर्वांमध्यें भाग्यानें थोर असलेल्या तुझाच स्वीकार करील. सहस्र स्त्रियांनीं परिपूर्ण आणि नानाप्रकारच्या रत्नांनीं सुशोभित असलेलें तें अंतःपुर सोडून देऊन रावण तुझाच परिग्रह करील."

ह्यानंतर विकटा नामक राक्षसी म्हणाली, "ज्या भयंकर पराक्रमी रावणानें नाग, गंधर्व आणि दानव समरांगणामध्यें जिंकिले, तो तुझ्या संनिध आला आहे. तस्मात्, अग चांडाळणी, सर्वगुणसंपन्न अशा महात्म्या राक्षसराज रावणाची भार्या होणें तुझ्या कसें बरें मनांत येत नाहीं ?"

तदनंतर दुर्मुखी नामक राक्षसी म्हणाली, "हे विशालनयने, ज्याला भिऊन जाऊन सूर्य प्रकाशत नाहीं, वायुहि वहात नाहीं, त्याला वश होऊन तूं कां बरें रहात नाहींस ? ज्याच्या भीतीनें वृक्ष पुष्पांचा वर्षाव करितात, ज्याला इच्छा झाली असतां पर्वत व मेघ जलस्राव करूं लागतात त्या राजाधिराजाची भार्या होण्याची बुद्धि तुला कां होत नाहीं ? हे देवि, हे भामिनी, खरोखर हितकर आणि उत्कृष्ठ असा उपदेश मी तुला केला आहे. ह्यास्तव, हे सुहास्यवदने, तूं हा उपदेश ऐक, नाहीं तर तूं कायम राहाणार नाहींस."

## सर्ग चोविसावा.

### राक्षसींची सीतेला धमकी.

तदनंतर अक्राळविक्राळ मुद्रांनीं युक्त असलेल्या त्या सर्व राक्षसस्त्रिया कठोर भाषणाला पात्र नसलेल्या त्या सीतेला उद्देशून कठोर व अप्रिय भाषण करूं लागल्या. त्या म्हणाल्या, "सर्व प्राण्यांचें मन वेधून टाकणाऱ्या आणि मोठ-

मोठ्या मूल्यवान शय्यांनीं युक्त असलेल्या अंतःपुरामध्यें वास्तव्य करणें तुला कां बरें संमत होत नाहीं? हे मानुषे, मनुष्याचीच भार्या होऊन रहाणें तुला उत्तम वाटत आहे; परंतु रामापासून तूं आपले मन निवृत्त कर. कारण, तुझ्या मनाप्रमाणें आतां पुनरपि रामाचा समागम तुला कधींहि होणार नाहीं. सारांश त्रैलोक्यांतील संपत्तीचा उपभोग घेणाऱ्या राक्षसाधिपति रावणाशीं भर्ता ह्या नात्यानें समागम करून तूं खुशाल क्रीडा कर. हे कल्याणि, हे सुंदरि, तूं स्वतः मानुषी असून, राज्यापासून भ्रष्ट व मनोरथ भग्न झाल्यामुळें दुःखित झालेल्या त्या मनुष्य रामाची तूं इच्छा करीत आहेस, हें नीट नाहीं."

हें त्या राक्षसस्त्रियांचें भाषण ऐकून सीतेचे नेत्र अश्रूंनीं भरून आले आणि ती म्हणाली, "तुम्ही एकत्र जुळून जो हा जगतामध्यें निंद्य ठरलेला उपदेश मला करीत आहां, तो पातकावह असल्यामुळें माझ्या मनामध्यें ठसत नाहीं. मनुष्यस्त्री राक्षसाची भार्या होणें योग्य नाहीं. तेव्हां तुम्ही सर्व मिळून पाहिजे तर मला खाऊन टाका. पण मी तुमचें म्हणणें ऐकणार नाहीं. दीन असो अथवा राज्यहीन असो, भर्ता हेंच माझें उपास्य दैवत आहे. तस्मात्, सूर्य-पत्नी सुवर्चला ज्याप्रमाणें सूर्याचे ठिकाणीं अनुरक्त असते, त्याप्रमाणें मी नेहमी त्या रामाचेच ठिकाणीं अनुरक्त आहे. ज्याप्रमाणें महाभाग्यवती शची इंद्राचें, अरुंधती वसिष्ठाचें, रोहिणी चंद्राचें, लोपामुद्रा अगस्त्याचें, सुकन्या[1] च्यवनाचे, सावित्री सत्यवानाचें, श्रीमती कपिलाचें, मदयंती[2] सौदासाचें, केशिनी[3] सगराचें अथवा भीमराजाची कन्या दमयंती निषधराज नलाचें अवलंबन करून राहिली. त्याप्रमाणें मी इक्ष्वाकुवंशजश्रेष्ठ रामाचेच अवलंबन करून राहिलेली आहे."

हें सीतेचे भाषण श्रवण करून त्या राक्षसस्त्रिया क्रोधानें व्याप्त झाल्या, आणि रावणाची त्यांना आज्ञा झाली असल्यामुळें कठोर भाषणांनीं तिची निर्भ-र्त्सना करूं लागल्या. असो. त्या राक्षसस्त्रिया सीतेला धमकी देऊं लागल्या असतां शिंशपा वृक्षावर कांहींएक न बोलतां दडून बसलेल्या हनुमानानें त्यांची भाषणें श्रवण केलीं. लटलट कांपत असलेल्या व सभोंवतीं बसलेल्या त्या राक्षसस्त्रिया क्रुद्ध होऊन तिच्याजवळ आल्या. आपले प्रदीप्त व दीर्घ ओंठ

---

१ श्रीमद्भागवताचें मराठी सुरस भाषांतर स्कंध ९ अध्याय ३ रा पहा.

२ श्रीमद्भगवताचें म. सु. भा. स्कं. ९ अ. ९ पहा.

३ श्रीमद्भगवताचें म. सु. भा. स्कं. ९ अ. ८ पहा.

एकसारख्या चाटूं लागल्या. नंतर त्या अत्यंत क्रुद्ध होऊन व हातामध्यें कुऱ्हाडी घेऊन म्हणाल्या, "राक्षसाधिपति रावण भर्ता होण्याइतकी हिची योग्यताच नाहीं!"

ह्याप्रमाणें भयंकर राक्षसस्त्रिया तिची निर्भर्त्सना करूं लागल्या असतां ती श्रेष्ठ स्त्री सीता अश्रू पुशीत पुशीत त्या शिंशपा वृक्षासमीप जाऊन उभी राहिली. तथापि, दीनवदन होऊन मलिन वस्त्र परिधान करणाऱ्या त्या कृश सीतेच्या भोंवतीं जमून त्या भयंकर राक्षसस्त्रिया तिची निर्भर्त्सना करूं लागल्याच.

शिंशपा वृक्षासमीप गेल्यानंतर भयंकर नेत्र, रागीटमुद्रा व खबदाडीला गेलेलें पोट ह्यांनीं युक्त असलेली विनता नामक अक्राळविक्राळ राक्षसी तिला म्हणाली, "सीते, झालें इतकें पुरें झालें. तूं भर्त्याविषयीं आपलें प्रेम दर्शविलेंस. हें कल्याणि, कोणतीहि गोष्ट अति झाली असतां ती संकटाला कारण होत असते. मैथिली, तुझें देव बरें करो. मनुष्यजातीला योग्य असें वर्तन तूं केलें आहेस. आतां मी तुझ्यावर संतुष्ट झालें आहें. ह्यास्तव तुझ्या हिताचें भाषण करणाऱ्या माझ्या सांगण्याप्रमाणें तूं वाग. देवराज इंद्राप्रमाणें पराक्रमी व शत्रूवर चाल करून जाणाऱ्या सर्व राक्षसाधिपति रावणाचा तूं भर्ता म्हणून अंगीकार कर. सारांश, दरिद्री व मनुष्य जो राम, त्याचा त्याग करून सरळ, दानशूर, आणि सर्वांशीं प्रिय भाषण करणाऱ्या रावणाचा तूं आश्रय कर. हे विदेहराजकन्ये, दिव्य अलंकारांनीं भूषित होऊन आणि दिव्य उटी अंगाला लावून तूं आजपासून सर्व लोकांची स्वामिनी हो. हे कल्याणि, अग्नीची ज्याप्रमाणें स्वाहा अथवा इंद्राची ज्याप्रमाणें शची त्याप्रमाणें तूं रावणाची भार्या हो. वैदेहि, तुला त्या कपाळकरंट्या मुमूर्षु रामाशीं काय कर्तव्य आहे? ह्या माझ्या सांगण्याप्रमाणें जर तूं न वागशील, तर ह्या क्षणींच आम्ही साऱ्या मिळून तुला खाऊन टाकूं."

ह्यानंतर जिचे स्तन खालीं लोंबत आहेत अशी एक मूठ उगारून सीतेला धमकी देत असलेली विकटा नामक क्रुद्ध राक्षसी म्हणाली, "अग महादुष्टे, दयेमुळें आणि आमचा स्वभाव गरीब पडल्यामुळें तुझीं पुष्कळच अयोग्य भाषणें ह्या वेळेपर्यंत आम्हीं सहन केलीं; परंतु काळाला योग्य व हितावह असा आमचा उपदेश जर तूं न ऐकशील, तर इतरांचें जेथें गमन होणेंहि दुर्घट आहे, अशा समुद्राच्या परतीराला तुला आणिलें असून रावणाच्या घोर अंतःपुरामध्यें तुला नेऊन ठेविलें आहे. इतकेंच नव्हे, परंतु रावणाच्या गृहामध्यें डांबून ठेविलेल्या तुझ्या पहाऱ्यावर आम्ही आहों. तस्मात्, साक्षात् इंद्रहि तुझें

रक्षण करण्यास समर्थ नाहीं, हें तूं पक्कें समजून ठेव. तुझ्या हिताची गोष्ट मी सांगत आहें, ती ऐक. अश्रु ढाळणें आतां पुरें झालें. ह्या शोकांत कांहीं अर्थ नाहीं. नेहमींचा दैन्यपणा सोडण्याची इच्छा असल्यास रावणाचे ठिकाणीं प्रेमबुद्धि धारण करून तूं आनंदित हो, आणि त्या रावण राजासहवर्तमान तूं खुशाल क्रीडा करीत रहा. स्त्रियांचें यौवन अशाश्वत आहे, असें आम्ही समजतों. तस्मात्, जोंपर्यंत तें कायम आहे, तोंपर्यंत तूं दुःख प्राप्त करून घेऊं नको. हे मदिरेक्षणे, राक्षसराज रावणासहवर्तमान तूं रम्य उद्यानांतून आणि पर्वतावरील उपवनांतून संचार कर. हे देवि, हजारों स्त्रिया तुझ्या आज्ञेंत राहतील. ह्यास्तव, सर्वराक्षसाधिपति रावणाचें तूं भर्ता म्हणून अवलंबन कर. मीं सांगितल्याप्रमाणें जर तूं वागली नाहींस, तर मी तुझें हृदय फाडून खाऊन टाकीन."

तदनंतर क्रूर मुद्रेनें युक्त अशी एक चंडोदरी नामक राक्षसी मोठा शूल फिरवीत फिरवीत म्हणाली, "हरणाच्या छाव्याप्रमाणें जिचे नेत्र आहेत, आणि भीतीमुळें जिचे स्तन कंपित होत आहेत, अशी ही स्त्री रावणानें हरण करून आणिलेली अवलोकन केल्यापासूनच मलाहि एक प्रबल इच्छा झाली आहे. सारांश, यकृत्, प्लीहा, वक्षःस्थल, शिराबंधनासहवर्तमान हृदय, मस्तक आणि इतरहि हिचे अवयव खाऊन टाकावे, अशी माझी इच्छा आहे."

तदनंतर प्रघसा नामक राक्षसी म्हणाली, "तुम्ही अशा बसलां काय ? ह्या दुष्टेचें नरडें आपण आंवळून टाकूं, आणि मग 'ती मनुष्यस्त्री मेली' म्हणून राजाला निवेदन करूं, म्हणजे 'तुम्ही खाऊन टाका' असें तो सांगेल, ह्यांत मुळींच संशय नाहीं."

तदनंतर अजामुखी नामक राक्षसी म्हणाली, "हिला प्रथम चिरा, आणि नंतर हिचे सर्व सारखे गोळे करा, म्हणजे आपण सर्वजणी वांटून घेऊं. मला हा वाद रुचत नाहीं. नानाप्रकारचीं पुष्पें आणि पुष्कळसें पेय लवकर घेऊन या."

तदनंतर दुसरी एक शूर्पणखा नामक राक्षसी म्हणाली, "अजामुखीनें जें सांगितलें, तेंच मला बरें दिसतें. सर्वदुःखविनाशक सुरा सत्वर आणवा, म्हणजे आपण ह्या मानुषमांसाचें सेवन करून निकुंभीला देवीपुढें नृत्य करूं."

ह्याप्रमाणें त्या देवकन्यातुल्य सीतेची अक्राळविक्राळ राक्षसस्त्रिया निर्भर्त्सना करूं लागल्या असतां ती धैर्य सोडून रडूं लागली.

---

# सर्ग पंचविसावा.

## सीतेचा उद्वेग.

ह्याप्रमाणें त्या क्रूर राक्षसी फारच कठोर व क्रूर भाषण करूं लागल्या असतां ती जनककन्या फार भिऊन गेली, आणि रडत रडत अस्पष्ट शब्दांनीं म्हणाली, "मनुष्यजातीची स्त्री राक्षसाची भार्या होण्यास समर्थ नाहीं. तुम्ही सर्व मिळून मला खुशाल खाऊन टाका. मी तुमचें म्हणणें ऐकणार नाहीं"

राक्षसस्त्रियांच्या मध्यें सांपडलेल्या, आणि जशी कांहीं रावणानेंच निर्भर्त्सना केली आहे कीं काय असें समजून शोकाकुल झालेल्या त्या देवकन्यातुल्य सीतेला मुळींच बरें वाटेना. वनामध्यें कळपांतून चुकलेल्या आणि लांडग्यांनीं भेडावून सोडिलेल्या हरिणीप्रमाणें भीतीनें आपलें शरीर संकुचित करूं लागलेली ती सीता फारच कांपूं लागली, शोकानें तिचें मन खिन्न होऊन गेलें, आणि ती अशोक वृक्षाच्या एका मोठ्या प्रफुल्लित शाखेचें अवलंबन करून भर्त्यासंबंधानें मनामध्यें चिंतन करूं लागली. नेत्रांतून चाललेल्या जलस्रावांनीं आपल्या स्तनांना स्नान घालीत असलेली ती सीता चिंतन करूं लागली असतांना तिचा शोक आवरेना. राक्षसस्त्रियांच्या भीतीनें त्रस्त झाल्यामुळें तिचें मुख निस्तेज झालें, आणि प्रचंड वाऱ्यामध्यें सांपडलेल्या केळीप्रमाणें लट्लट् हालतां हालतां ती शेवटीं भूमीवरहि पडली ! लट्लट् कांपत असलेल्या त्या सीतेची ती लांब व मोठी वेणी कंपित झाली असतां इकडे तिकडे चळवळ करणाऱ्या नागिणीप्रमाणें भासूं लागली. कोपानें त्या मैथिलीचें अंतःकरण अगदीं व्याप्त होऊन गेलें; ती शोकाकुल झाली. दुःखानें जर्जर झाल्यामुळें दीर्घ सुस्कारे टाकूं लागली, आणि अश्रू ढाळून विलापहि करूं लागली. "हे रामा, हे लक्ष्मणा, अहो सासूबाई, हे कौसल्ये, हे सुमित्रे," ह्याप्रमाणें दुःखाकुल झालेली ती सुंदरी शोक करूं लागली आणि म्हणाली, "स्त्रीला अथवा पुरुषाला वेळ आल्यावांचून मृत्यु दुर्लभ आहे, ही जी पंडितांनीं लिहून ठेवलेली म्हण, ती अगदीं खरी आहे. कारण रामाचा वियोग होऊन मी दुःखित झालें असतांना, आणि ह्या क्रूर राक्षसस्त्रियांनीं मला येथें गांजिलें असतांना—मुहूर्तभर कां होईना—मी जिवंत आहें ! मज कपाळकरंटीच्या पदरीं पुण्य अगदींच थोडें आहे. ह्यामुळें गच्च भरलेली नौका वायुवेगानें ताडित झाली असतां जशी समुद्रामध्यें नष्ट होऊन जाते, तशी मी अनाथाप्रमाणें नाहींशी होईन. तो जगत्प्रसिद्ध भर्ता माझे दृष्टीस पडत

नसून मी राक्षसस्त्रियांच्या तावडींत सांपडल्यामुळें खरोखर उदकाचे धक्के बसलेल्या तीराप्रमाणें शोकाच्या योगानें खचून जात आहें. कमलपत्रांप्रमाणें ज्याचे नेत्र विशाल आहेत, आणि सिंहासारखी ज्याची गति पराक्रमसूचक आहे, असा तो कृतज्ञ व प्रिय भाषण करणारा माझा नाथ ज्यांच्या दृष्टीस पडत असेल, ते धन्य आहेत. जालीम विष सेवन केल्यावर ज्याप्रमाणें जीवन दुर्लभ आहे, त्याचप्रमाणें त्या जगद्विख्यात रामाचा वियोग झालेल्या माझें जीवन दुर्लभ आहे. ज्या अर्थीं मला हें अत्यंत दारुण, घोर व प्रचंड दुःख प्राप्त झालें आहे, त्या अर्थीं माझ्या हातून जन्मांतरीं कसलें बरें महापातक घडलें आहे? प्रचंड शोकानें ग्रस्त झालेली मी आतां जीविताचा त्याग करण्याची इच्छा करीत आहें. कारण मी राक्षसस्त्रियांच्या प्रतिबंधांत असल्यामुळें रामाची भेट मला होत नाहीं. आपल्या इच्छेप्रमाणें ज्या अर्थीं जीविताचाहि त्याग करितां येणें शक्य नाहीं, त्या अर्थीं खरोखर मनुष्यपणाला आणि त्याचप्रमाणें परतंत्रतेला धिक्कार असो!"

## सर्ग सव्विसावा.

### सीतेचा वैताग.

जिच्या मुखावर अश्रू आलेले आहेत, अशी ती जनककन्या ह्याप्रमाणें बोलतां बोलतां खालीं मान घालून विलाप करूं लागली. पिशाचादिकांनीं झपाटिल्याप्रमाणें, पित्ताचा अतिरेक वगैरे झाल्यामुळें मत्त झाल्याप्रमाणें आणि मनाला भ्रांति झाल्याप्रमाणें शोक करीत असलेली ती सीता भूतलावर लोळूं लागली. ती म्हणाली, "इच्छेप्रमाणें रूप धारण करणाऱ्या मारीच राक्षसानें राघवाला मोह पाडिल्यामुळें रावणानें माझे हाल हाल करून मी आक्रोश करीत असतांना बलात्कारानें मला येथें आणिलें. मी राक्षसस्त्रियांच्या तावडींत सांपडलें असून भयंकर रीतीनें माझी निर्भर्त्सना चालली आहे; आणि मी अत्यंत दुःखाकूल झालें असून चिंताक्रांत होऊन बसलें आहें. ह्यामुळें आतां मला जगावेसें वाटत नाहीं. राक्षसस्त्रियांमध्यें महारथी रामावांचून ज्या अर्थीं मी वास्तव्य करीत आहें, त्या अर्थीं जीविताशीं, संपत्तीशीं आणि भूषणांशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. खरोखर माझें हें हृदय अगदीं पाषाणाचें तरी आहे, अथवा अजरामर तरी आहे; म्हणूनच तें दुःखानें विदीर्ण होत नाहीं. त्या रामाचा वियोग झाला असतां मुहूर्तभर सुद्धां

मला जिवंत रहाणें योग्य नसतांना, पाप्याप्रमाणें उपजीविका करून मी जिवंत राहिलें आहें. तस्मात् , मज असाध्वी दुष्टेला धिक्कार असो! निशाचराला डाव्या पायानेंहि मी कधीं स्पर्श करणार नाहीं, मग रावणाची इच्छा कोठून करणार? आपण कोण हें रावण जाणीत नाहीं, आणि आपल्या कुलाची ह्यांत अपकीर्ति होत आहे, हेंहि त्याला समजत नाहीं. कारण तो आपल्या दुष्ट स्वभावाला अनुसरून राक्षसस्त्रियांच्या द्वारानें मला वश करून घेण्यांची इच्छा करीत आहे. हे राक्षसस्त्रियांनो, तुमच्या या बडबडीचा उपयोग काय? मी छिन्नभिन्न झालें असतां, माझे तुकडे तुकडे झाले असतां, मी भाजून गेलें असतां अथवा पेटलें असतांहि रावणाचा स्वीकार करणार नाहीं. राघव प्राज्ञ, कृतज्ञ, दयाळू आणि सद्वर्तनी म्हणून प्रसिद्ध आहे; परंतु आज माझें भाग्य नाहींसें झाल्यामुळेंच कीं काय कोण जाणें, तो निर्दय झाला आहे अशी मला शंका येते! जनस्थानामध्यें ज्या एकट्यानें चौदा हजार राक्षसांचा नाश केला, तो आज मला कां घेऊन जात नाहीं. समुद्रामध्यें असलेली ही लंका इतरांना खुशाल अजिंक्य असो; परंतु रामबाणांची गति येथें कुंठित होणार नाहीं. राम महापराक्रमी असतां राक्षसानें हरण करून नेलेल्या आपल्या प्रिय भार्येला घेऊन जात नाहीं, ह्याचें कारण काय बरें असावें? मी येथें आहें, हें त्या लक्ष्मणाच्या ज्येष्ठ भ्रात्याला ठाऊकच नाहीं, अशी मला शंका येते. कारण जाणून बुजून तो तेजस्वी राम एवढा अपमान कसा सहन करील? राक्षसानें मला हरण करून नेलें, म्हणून ज्याला रामाकडे जाऊन सांगतां आलें असतें, त्या गृध्रराज जटायूचाहि रावणानें वध केला. माझ्यावर अनुग्रह करण्याकरितां स्वतः वृद्ध असतांनाहि जटायूनें रावणाचा वध करण्याविषयीं तत्परता दर्शविली, हें त्यानें मोठेंच कृत्य केलें! मी येथें विद्यमान असल्याचें जर राघवाला समजेल, तर आजच्या आजच तो क्रुद्ध राम बाणांच्या योगानें सर्व जगत् राक्षसशून्य करून टाकील. इतकेंच नव्हे, परंतु तो लंका नगरी जाळून टाकील, महासागर दग्ध करील आणि ह्या नीच रावणाची कीर्ति व नांवहि नष्ट करून टाकील. असें झालें म्हणजे ज्याप्रमाणें मी येथें रडत बसलें आहें, त्याप्रमाणें पतीचा वध झालेल्या राक्षसस्त्रियांच्या घरोघर माझ्यापेक्षांहि अधिक रडारड होईल, ह्यांत संशय नाहीं. लंकेचा शोध लावून लक्ष्मणासहवर्तमान राम राक्षसांचा नाश करील; परंतु मी येथें आहें, हें त्याला समजावें कसें? बाकी शत्रु त्या राम-लक्ष्मणांच्या दृष्टीस पडला असतां, एक मुहूर्तभरहि जिवंत राहणार नाहीं. थोड-

क्याच कालामध्यें राम-लक्ष्मण लंका जिंकून टाकितील. तिच्यांतील मार्ग धुरानें व्याप्त होऊन जातील. गृध्रपक्ष्यांच्या समुदायांनीं ती भूषित होईल, आणि लवकरच ती स्मशानासारखी दिसूं लागेल. सारांश, थोडक्याच कालांत माझा हा मनोरथ सिद्धीस जाणार आहे. आणि तुम्हां सर्वांच्या ह्या विपरीत बुद्धीचा परिणाम मला नीट दिसत नाहीं. लंकेमध्यें जीं अशुभ चिन्हें दिसत आहेत, त्यांवरून पाहूं गेलें असतां थोडक्याच काळानें ही लंका निस्तेज होऊन जाईल. खरोखर राक्षसाधिपति पापी रावणाचा वध होऊन ही अजिंक्य लंका वैधव्य प्राप्त झालेल्या तरुण स्त्रीप्रमाणें शुष्क होऊन जाईल. आज आनंदकारक उत्सवसमारंभांनीं भरलेली आणि राक्षसांनीं युक्त असलेली ही लंका, अधिपति वध पावला असतां विधवा स्त्रीप्रमाणें शोचनीय होऊन जाईल. खरोखर ह्या लंकेमध्यें घरोघर शोकाकुल झालेल्या आणि म्हणूनच रडूं लागलेल्या राक्षस-कन्यांचा ध्वनि लवकरच माझ्या कानीं येईल. रामबाणांच्या योगानें ह्या लंका-नगरींतील राक्षसश्रेष्ठांचा वध होईल, ही निस्तेज होईल, आणि दग्ध होऊन अंधकारानें भरून जाईल; परंतु आरक्तवर्ण प्रांतांनीं युक्त असलेले ज्याचे नेत्र आहेत, अशा त्या शूर रामाला मी राक्षसाच्या घरीं विद्यमान असल्याचें जर समजेल, तर ह्या सर्व गोष्टी घडणार! ह्या दुष्ट व अधम रावणानें जी मला मुदत सांगितली होती, ती भरण्याचा हा समय तर येऊन ठेपला. दुष्ट राक्ष-सानें ठरवून ठेविलेला तो माझा मृत्यु आतां मात्र प्राप्त झालाच. कारण, पाप-कर्म करणाऱ्या राक्षसांना करण्यास अयोग्य म्हणून कांहीं ठाऊकच नसतें. सांप्रत जो हा परस्त्रीहरणरूप अनर्थ झाला आहे, त्या अनर्थापासून मोठा उत्पात होईल. कारण, हे मांसभक्षक राक्षस धर्म मुळींच जाणीत नाहींत. तो राक्षस निःसंशय माझी न्याहारीकडे योजना करील. तस्मात् अशी संकटांत सांपडलेली मी, ज्याचें दर्शनहि प्रिय आहे, अशा त्या रामावांचून आतां कसें बरें करूं? ज्याचे नेत्रप्रांत आरक्त वर्ण आहेत, असा राम दृष्टीस पडत नसल्यामुळें अत्यंत दुःखित झालेली मी पतीवांचून सत्वरच यमधर्माला अवलोकन करीन. रामाला आणि त्या लक्ष्मणालाहि मी जिवंत असल्याचें ठाऊक नाहीं. कारण त्यांना जर समजलें असतें, तर सर्व पृथ्वीमध्यें माझा शोध केल्यावांचून ते कधीं न राहते. खरोखर, माझ्याच शोकामुळें तो वीर राम भूतलावर देह टाकून येथून देवलोकीं चालता झाला आहे. माझ्या कमलनयन वीर रामाला अवलोकन करणारे देव, गंधर्व, सिद्ध आणि महर्षी धन्य आहेत! अथवा त्या विवेकी,

धर्मनिष्ठ व परमात्म्या राजर्षीला माझें कांहीं प्रयोजनच उरलें नसावें. दृष्टीसमोर असलेल्या मनुष्याचे ठिकाणीं प्रेम कायम असतें, तेंच मनुष्य दृष्टीआड झालें असतां त्याच्यासंबंधानें प्रेम कायम राहात नाहीं; परंतु सांप्रत असेंहि म्हणतां येणार नाहीं. कारण, कृतघ्न पुरुष दृष्टीआड झालेल्या मनुष्यावरील प्रेम नाहींसें करितात, तसें राम करणार नाहीं. कदाचित् माझे ठिकाणीं पतीनें माझी उपेक्षा करण्यासारखे कांहीं दोषहि असतील; अथवा उत्कृष्ठ वस्तूंनाच पात्र असलेल्या रामाचा ज्या अर्थी मला वियोग झाला आहे, त्या अर्थी माझें भाग्यच संपलें म्हणावयाचें. त्या महात्म्या रामाशिवाय जगण्यापेक्षां, निर्दोष वर्तनानें युक्त असलेल्या त्या शूर शत्रुनाशक रामाचे हातून मरण येणेंच मला श्रेयस्कर आहे. अथवा वनामध्यें वास्तव्य करणारे व हिंडणारे ते पुरुषश्रेष्ठ भ्राते वनामध्यें शस्त्रांचा त्याग करून फलमूलांवर उपजीविका करणारे बनले असतील. तेव्हां त्याहि आपला मनोरथ सिद्धीस जाण्याचा संभव नाहीं; किंवा दुरात्म्या राक्षसाधिपति रावणानें त्या शूर भ्रात्या राम-लक्ष्मणांचा कपटानें वधहि करविला असेल. तस्मात् अशा प्रसंगीं मला मरणच बरें वाटत आहे; परंतु ह्या पराकाष्ठेच्या दुःखामध्यें माझा मृत्यु नेमिलेला नाहीं. ज्यांना प्रिय आणि अप्रिय हीं दोन्हीं नाहींत, ते महात्मे, सत्यनिष्ठ, जितेंद्रिय व महाभाग्यवान मुनि खरोखर धन्य आहेत. प्रिय वस्तूचा वियोग झाला असतां ज्यांना दुःख होत नाहीं, आणि अप्रिय गोष्ट प्राप्त झाली असतां, ज्यांना अधिक कांहीं होत नाहीं, व म्हणूनच प्रिय आणि अप्रिय ह्या दोन्ही गोष्टींपासून जे अलग असतात, त्या महात्म्यांना नमस्कार असो. सारांश, आत्मवेत्त्या प्रिय रामानेंच त्याग केल्यामुळें दुष्ट रावणाच्या अधीन झालेली मी प्राणत्यागच करीन."

## सर्ग सत्ताविसावा.

### त्रिजटेचें स्वप्न.

ह्याप्रमाणें सीतेनें राक्षसस्त्रियांशीं कठोर भाषण केलें असतां त्या क्रोधानें व्याप्त झाल्या, आणि त्यांपैकीं कांहीं दुरात्म्या रावणाला तें सांगण्याकरितां गेल्या. तदनंतर दिसण्यांतहि भयंकर अशा दुसऱ्या राक्षसस्त्रिया सीतेच्या समीप आल्या, आणि परिणामीं अनर्थावह होणारें व एकाच अर्थाचें असें कठोर भाषण पुनरपि

तिच्याशीं करूं लागल्या. त्या म्हणाल्या, "दुष्टे सीते, तुझा हेतु वाईट आहे. ह्यास्तव आज ह्या राक्षसस्त्रिया आतांच्या आतांच हें तुझें मांस खुशाल भक्षण करतील."

ह्याप्रमाणें त्या दुष्ट राक्षसींनीं सीतेला धमकी दिलेली पाहून त्रिजटा नामक वृद्ध समंजस राक्षसी त्यांना म्हणाली, "दुष्ट राक्षसस्त्रियांनो, तुम्ही आपल्यालाच खाऊन टाका. जनकाची प्रिय कन्या आणि दशरथाची प्रिय स्नुषा जी सीता, तिला भक्षण करणें, तुमच्या हातून होणार नाहीं. कारण, शरीरावर रोमांच उठविणारें असें एक भयंकर स्वप्न राक्षसांच्या नाशाचें व हिच्या भर्त्याच्या अभ्युदयाचें सूचक असें मीं आज अवलोकन केलें."

ह्याप्रमाणें त्रिजटेनें सांगितलें असतां क्रोधानें व्याप्त झालेल्या त्या सर्व राक्षसस्त्रिया भयभीत होऊन तिला म्हणाल्या, "रात्रीं तुला कशा प्रकारचें स्वप्न पडलें, तें तूं आम्हांला सांग."

हें त्या राक्षसस्त्रियांचें भाषण ऐकून त्रिजटा म्हणाली "सहस्र अश्वांनीं युक्त आणि हस्तिदंतमय अशा आकाशगामीं दिव्य शिबिकेमध्यें राम आरूढ झाला आहे, श्वेतवर्ण पुष्पें आणि वस्त्रें त्यानें धारण केलेलीं आहेत, लक्ष्मण त्याच्या बरोबर आहे, असें मी आज स्वप्नामध्यें अवलोकन केलें. त्याचप्रमाणें श्वेतवर्ण वस्त्रांनीं आच्छादिलेली सीता सागरानें परिवेष्टिलेल्या श्वेतपर्वतावर आरूढ झालेली मी आज स्वप्नामध्यें अवलोकन केली. सूर्याशीं संगत होणाऱ्या प्रभेप्रमाणें ती रामाशीं युक्त झालेली होती. त्याचप्रमाणें पुनरपि मोठ्या पर्वतप्राय चौदंती गजावर लक्ष्मणासहवर्तमान बसलेला राम झळकत आहे, असें मीं अवलोकन केलें. त्याचप्रमाणें स्वतः-च्या तेजानें देदीप्यमान असलेले आणि शुभ वस्त्रें व पुष्पें धारण केलेलें सूर्य-तुल्य राम-लक्ष्मण सीतेसमीप उभे आहेत, असेंहि मीं पाहिलें. तदनंतर आकाशा-मध्यें असलेल्या त्या श्वेतपर्वताच्या अग्रभागीं भर्त्यानें जिला अंकावर घेतलें आहे, अशी जानकी गजाच्या स्कंधावर आरूढ झालेली मीं पाहिली. तदनंतर कमला-सारख्या नेत्रांनीं युक्त असलेली ती सीता हातांनीं चंद्रसूर्यांना झाडीत अस-ल्याचेंहि मीं अवलोकन केलें. नंतर ते राजकुमार राम-लक्ष्मण व विशालनयना सीता हीं ज्यावर आरूढ झालीं आहेत, असा तो गज लंकेवर उभा असल्याचें मीं अवलोकन केलें, श्वेतवर्ण आठ वृषभ ज्याला जोडिले आहेत, अशा रथावर श्वेतवर्ण पुष्पें व वस्त्रें धारण केलेला राम लक्ष्मणसहवर्तमान आरूढ होऊन येथें आलेला मीं अवलोकन केला. तदनंतर अमोघ पराक्रमी व वीर्यवान पुरुष श्रेष्ठ राम हा भ्राता लक्ष्मण आणि सीता ह्यांसहवर्तमान सूर्याप्रमाणें उज्ज्वल

असलेल्या दिव्य पुष्पक विमानामध्यें आरूढ होऊन व उत्तर दिशेला अनुलक्षून निघालेला मीं पाहिला. रावण तांबड्या कण्हेराच्या माळा घालून आरक्तवर्ण वस्त्र परिधान केलेला, अंगाला तेल चोपडून श्मश्रु करविलेला आणि मत्त होऊन तेल पीत असलेला मीं अवलोकन केला. रावण पुष्पक विमानापासून पृथ्वीवर पडलेला मीं आज अवलोकन केला. त्याचप्रमाणें त्याचें मुंडण केलेलें असून त्यानें कृष्णवस्त्रें परिधान केलेलीं आहेत. एक स्त्री त्याला ओढून नेत आहे, असेंहि मीं अवलोकन केलें. आरक्तवर्ण पुष्पें धारण करून व आरक्तवर्ण उटी लावून गर्दभ जोडिलेल्या रथावर तो आरूढ झाला आहे. त्याचें मन व इंद्रियें भ्रांतिग्रस्त झालीं असून तो तेल पीत आहे, हंसत आहे व नृत्य करीत आहे, असेंहि मीं अवकोलन केलें. तसाच तो राक्षसाधिपति गर्दभावर आरूढ होऊन दक्षिण दिशेस जात असलेला पुनरपि स्वप्नामध्यें माझ्या दृष्टीस पडला. शिरच्छेद होऊन भयानें मोहित झालेला रावण गर्दभावरून भूमीवर पडला. तेथून लगबगीनें उठून तो अतिशय भ्रांतिग्रस्त झाला. तो भयभीत व मदमत्त झाला असेंहि मीं अवलोकन केलें. उन्मत्त, दिगंबर आणि हवें तितकें अभद्र भाषण बोलणारा असा तो रावण दुर्गंधि, दु:सह, घोर, नरकतुल्य आणि मळ व चिखल यांनीं युक्त असलेल्या अंधकारामध्यें सत्वर प्रविष्ट होऊन त्यांत गडप झाल्याचेंहि मीं अवलोकन केलें. त्याचप्रमाणें दक्षिण दिशेस निघालेला तो रावण चिखलानें भरलेल्या डबक्यांत प्रविष्ट झाल्याचें मीं पाहिलें. जी आरक्तवर्ण वस्त्र नेसली आहे व जिचें शरीर चिखलानें भरलेलें आहे, अशी एक कृष्णवर्ण तरुण स्त्री रावणाच्या गळ्याला फांस लावून दक्षिण दिशेस त्याला ओढून नेत आहे, असें माझ्या दृष्टोत्पत्तीस आलें. ह्याप्रमाणें महाबलाढ्य कुंभकर्णहि स्वप्नामध्यें माझ्या दृष्टीस पडला. रावणाच्या सर्व पुत्रांचें मुंडण केलें असून त्यांच्या अंगावर तेल शिंपडलेलें आहे, असेंहि मीं पाहिलें. रावण सूकरावर, इंद्रजित शिशुमारसंज्ञक जलचर प्राण्यावर आणि कुंभकर्ण उंटावर आरूढ होऊन दक्षिण दिशेस गेल्याचें मीं अवलोकन केलें. एक बिभीषण मात्र श्वेतवर्ण छत्रांनीं युक्त असून चार सचिवांसहवर्तमान आकाशमार्गानें गमन करणाऱ्या विमानामध्यें आरूढ झालेला मीं अवलोकन केला. त्याच्या भोंवतीं गायन व वादन ह्यांच्या ध्वनींनीं युक्त असलेला एक प्रचंड समाजहि मीं अवलोकन केला. आरक्तवस्त्रें आणि आरक्तवर्ण पुष्पें धारण करून तेल पीत असलेल्या राक्षसांची ही रम्य लंका नगरी गोपुरें व तोरणें मोडून जाऊन अश्व,

रथ व गज ह्यांसहवर्तमान सागरामध्यें पडलेली मीं अवलोकन केली. तेल पिऊन सर्व राक्षसस्त्रिया मत्त झाल्या आहेत, आणि भस्मानें रुक्ष झालेल्या ह्या लंकेमध्यें उच्च स्वरानें हंसत आहेत, असेंहि मीं अवलोकन केलें. हे सर्व कुंभकर्णप्रभृति राक्षसश्रेष्ठ आरक्तवर्ण वस्त्र नेसून शेणखळयाच्या डबक्यांत शिरलेले मीं अवलोकन केले. तस्मात् राक्षसींनो, तुम्ही दूर व्हा. पहा—राघव आतां सीतेला लवकरच प्राप्त करून घेणार असून अतिशय संतप्त झाल्यामुळें तो राक्षसांसहवर्तमान तुमचाहि वध करील. वनवासामध्येंहि बरोबर असलेल्या त्याच्या प्रिय व बहुमत भार्येची तुम्हीं निर्भर्त्सना केल्याचें अथवा तिला धमकी दिल्याचें त्या राघवाला सहन होणार नाहीं. तस्मात्, आतां क्रूर भाषणें बंद करून सौम्य भाषणच केलें पाहिजे. इतकेंच नव्हे, परंतु वैदेहीची आपण क्षमाहि मागितली पाहिजे, हें मला बरें दिसतें. दुःखामध्यें असतांनाहि जिच्यासंबंधानें अशा प्रकारचें स्वप्न दृष्टीस पडत आहे, ती सर्व दुःखांपासून मुक्त होत असते, आणि तिचा सर्वोत्कृष्ठ मनोरथ परिपूर्ण होत असतो. अग, तुम्हीं जरी हिची निर्भर्त्सना केली आहे, तरी आतां क्षमा मागा. हिच्याशीं कुत्सित भाषण करण्याची इच्छा धरून कांहींएक उपयोग नाहीं. रघुवंशज रामापासून राक्षसांना घोर भय उपस्थित झालें आहे, हें तुम्ही पक्कें समजा. अग, हिला नमस्कार करून तुम्ही हिची क्षमा मागाल, तर ही तुमचें मोठ्या भयापासून संरक्षण करील. शिवाय विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या ह्या सीतेच्या अवयवांचे ठिकाणीं सूक्ष्म सुद्धां दुश्चिन्ह मला आढळत नाहीं. सारांश, दुःखाचा उपभोग घेण्यास योग्य नसलेल्या आणि स्वप्नामध्यें विमानांत आरूढ होऊन माझ्या दृष्टोत्पत्तीस आलेल्या ह्या सीतेच्या शरीराचे ठिकाणीं दुःखाचा परिणाम कांहींएक झालेला नसून फक्त स्नान वगैरे नसल्यामुळें देहाच्या कांतींत मात्र वैगुण्य दिसत असल्याची मला शंका येत आहे. वैदेहीचा मनोरथ लवकरच सिद्धीस जाणार असून राक्षसाधिपतीचा नाश आणि राघवाचा जय ह्या गोष्टीहि अगदीं जवळच येऊन पोहोंचल्या आहेत, असें मला दिसतें."

त्रिजटा पुढें सांगते, "अग, ह्या सीतेचा श्रेष्ठ मनोरथ सिद्धीस गेल्याचें श्रवण करण्याची पाळी आपणांला लवकरच येणार आहे, असेंहि एक चिन्ह मला दिसत आहे. कमलपत्राप्रमाणें विशाळ असलेला तिचा डावा डोळा स्फुरण पावत असल्याचें माझ्या दृष्टोत्पत्तीस येत आहे. वर्तनानें सरळ असलेल्या ह्या वैदेहीचा वामबाहु किंचित् रोमांचयुक्त झाला असून एकाएकीं स्फुरण पावत आहे.

त्याचप्रमाणें गजशुंडेप्रमाणें असलेली हिची उत्कृष्ट डावी मांडी स्फुरण पावत आहे. त्यामुळें तो राम येऊन पुढें उभा राहिल्याचेंच जसें कांहीं सुचवीत आहे. पक्षी वृक्षशाखेवरील आपल्या घरट्यांमध्यें जाऊन जसें कांहीं वारंवार उत्कृष्ठ व सौम्य शब्द करीत आहेत. आनंदित होऊन वारंवार मनोरथसिद्धिसूचक वाणीचा उच्चार करणारे ते पक्षी, राघवाचें दर्शन घेण्याविषयीं सीतेला जशी कांहीं प्रेरणाच करीत आहेत. ”

ह्याप्रमाणें त्रिजटेनें सांगितलें असतां लज्जेनें युक्त असलेली ती बाला पतिविजयासंबंधानें आनंदित झाली, आणि “ त्रिजटेचें बोलणें जर खरें होईल, तर मी तुमचें रक्षण करीन ” असें त्या राक्षसींना म्हणाली.

## सर्ग अठ्ठाविसावा.

### सीतेचा प्राण देण्याविषयीं निश्चय.

असो. राक्षसाधिपति रावणाचें तें अप्रिय भाषण ऐकून दुःखाकुल झालेली सीता वनामध्यें सिंहांनीं घेरून टाकिलेल्या गजेंद्रकन्येप्रमाणें त्रस्त होऊन गेली. राक्षसस्त्रियांच्या कचाटयांत सांपडलेली आणि रावणानें शब्दांनीं अतिशय धमकी दिलेली ती भित्री, निर्जन अरण्यामध्यें सोडून दिलेल्या अल्पवयी कन्येप्रमाणें विलाप करूं लागली. ती म्हणाली, “ अशा प्रकारें निर्भर्त्सना होत असून— क्षणभर कां होईना—मी पापिणी ज्याअर्थी जिवंत राहात आहें, त्याअर्थी अकालीं मृत्यु प्राप्त होत नाहीं, असें जें जगतामध्यें सज्जन म्हणत असतात, तें अगदीं खरें आहे. सुखाला मुकलेल्या आणि अपार दुःखानें भरलेल्या ह्या माझ्या हृदयाचे ज्या अर्थीं वज्राचा तडाका बसलेल्या पर्वताप्रमाणें हजारों तुकडे होऊन जात नाहींत, त्या अर्थीं हें खरोखर बळकट आहे. ज्याचें दर्शनहि दुःखदायक आहे, अशा ह्या रावणाच्या हातून जर माझा वध व्हावयाचाच आहे, तर ह्या प्रसंगीं आत्मघाताचाहि मला खरोखर दोष लागणार नाहीं. कारण ब्राह्मणाच्या हातून वध पावलेला आणि आत्मघातकी ह्या उभयतांनाहि अग्निसंस्काराचा अधिकार नसल्यामुळें, ब्राह्मणकुलामध्यें जन्मास आलेल्या रावणाच्या हातून वध पावण्यापेक्षां आत्मघात करून घेणें ह्यांत वाईट तें काय ? द्विजेतराला वेद देणें ज्याप्रमाणें द्विजाला शक्य नसतें, त्याप्रमाणें मी आपलें प्रेम ह्याला समर्पण

करण्यास समर्थ नाहीं. तो जगन्नाथ राम रावणाची मुदत भरण्यापूर्वी जर न येईल, तर गर्भामध्यें असलेल्या रोगरूप प्राण्याचे ज्याप्रमाणें शस्त्रवैद्य तुकडे तुकडे करून टाकितो, त्याप्रमाणें राक्षसाधिपति दुष्ट रावण तीक्ष्ण बाणांनीं खरोखर माझ्या अवयवांचे तुकडे तुकडे करून टाकील. पुष्कळ दिवसपर्यंत रामवियो-गानें आधींच दुःखित झालेल्या मला वधदुःखहि भोगावें लागणार आहे. कारण हे मुदतीचे दोन महिने लवकरच संपून जातील, आणि राजाला त्रास दिल्यामुळें वधाला पात्र झालेल्या व म्हणूनच प्रतिबंधांत ठेविलेल्या चोराचा ज्याप्रमाणें रात्र संपल्यावर वध होत असतो, त्याप्रमाणें माझाहि निःसंशय वध होईल. हे रामा, हे लक्ष्मणा, हे सुमित्रे, हे राममाते, हे माझ्या मातांनो, वाद-ळाच्या तडाक्यांत सांपडलेली नौका ज्याप्रमाणें महासागरामध्यें भग्न होऊन जाते, त्याप्रमाणें ही मी भाग्यहीन स्त्री मरण पावणार ! विद्युल्लतेच्या तेजानें ज्याप्रमाणें दोन श्रेष्ठ सिंहांचा वध व्हावा, त्याप्रमाणें मृगरूप धारण करणाऱ्या त्या राक्षसानें त्या बलाढ्य राजपुत्रांचा खरोखर माझ्याकरितां वध केला असून त्यांना फाडून टाकिलें आहे ! आर्यपुत्र राम आणि लक्ष्मण ह्या उभयतांचाहि ज्याच्या योगानें मज मूढ स्त्रीला वियोग झाला, तो खरोखर मृगवेष धारण कर-णारा कालच होता; आणि त्यानेंच त्या वेळीं भाग्यहीन अशा मला लुब्ध करून टाकिलें. रामा, हे सत्यनिष्ठा, हे महापराक्रमी, हे पूर्णचंद्रतुल्य सुहास्य-वदना, तूं जगतांतील सर्व प्राण्यांचें हित करणारा व त्यांना प्रिय असूनहि मी राक्षसांना वध्य झाल्याचें तुला कसें समजत नाहीं ? मनुष्यांनीं कृतघ्नांचे ठिकाणीं केलेला उपकार ज्याप्रमाणें व्यर्थ जातो, त्याप्रमाणें पति हेंच मुख्य दैवत मानून राहाणें अशा प्रकारची क्षमा, भूमीवर शय्या, धर्माचे ठिकाणीं निष्ठा आणि पातिव्रत्य हें सर्व व्यर्थ झालें आहे. आपला वियोग झाल्यामुळें मी कृश व निस्तेज झालें आहें. आपण माझ्या दृष्टीस पडत नाहीं, ह्यामुळें मी भेटीविषयीं निराश झालें आहें; आणि म्हणूनच हें माझें धर्माचरण व्यर्थ झालें असून हें पातिव्रत्यहि निष्फल झालें आहे. नियमानें आणि व्रतस्थ राहून पित्याची आज्ञा पार पाडिल्यावर आपण वनांतून निवृत्त व्हाल, आणि निर्भय व कृतार्थ होऊन विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या स्त्रियांसहवर्तमान रममाण व्हाल, असें मला वाटतें. हे राम, माझ्या सर्व कांहीं इच्छा आपणांवरच अव-लंबून आहेत, आणि चिरकालपर्यंत मी आपल्या ठिकाणीं प्रेम ठेवून राहिलें आहें; परंतु प्राणांतिक दुःख हा ह्याचा परिणाम होणार आहे. तस्मात्, आच-

रिलेलें व्रत व तप व्यर्थ झाल्यामुळें मी ह्या जीविताचा त्याग करितें. धिक्कार असो ह्या भाग्यहीन स्त्रीला! विषानें अथवा तीक्ष्ण शस्त्रानें जीविताचा मी सत्वर त्याग करणार आहें; परंतु राक्षसाच्या गृहामध्यें मला विष अथवा शस्त्र देणारा कोणीहि नाहीं."

अशाप्रकारें शोकानें तप्त झालेल्या त्या सीतेनें नानाप्रकारांनीं विचार केल्यानंतर आगवळ हातीं घेतला, आणि ह्या आगवळानें 'मी सत्वर यमाचे समीप जाईन' असें म्हणून सर्व कोमल अवयवांनीं युक्त असलेली ती सीता त्या वृक्षाची एक शाखा हातीं धरून आपला बेत शेवटास नेण्यास तयार झाली; परंतु ह्याप्रमाणें जीविताचा अंत करण्यास तयार झालेली ती सीता राम, लक्ष्मण आणि आपलें कुल ह्यांविषयीं विचार करूं लागली असतां, शोकनाशक आणि धैर्यवर्धक अशीं पुष्कळ सुचिन्हें तिला होऊं लागलीं. तीं सुचिन्हें जगतामध्यें उत्कृष्ठ ठरलेलीं होतीं, आणि पूर्वींहि अनुभव आला असल्यामुळें अभ्युदयसूचक म्हणून मनाला खात्री पटविणारीं होतीं.

## सर्ग एकोणतिसावा.

### सीतेला शुभ शकुन.

दुःखपीडित आणि हर्षरहित अशी ती सीता मनामध्यें अतिशय दीन होऊन तशा स्थितींत असतांना, वैभवसंपन्न पुरुषाची ज्याप्रमाणें सेवा करण्यास सेवक उद्युक्त होऊं लागतात, त्याप्रमाणें त्या निर्दोष राजकन्येला शुभ शकुन होऊं लागले. वक्र पापण्यांनीं व्याप्त, काळींभोर बुबळें व सभोंवतीं श्वेतवर्ण ह्यांनीं युक्त आणि दोन्ही बाजूंना आरक्तवर्ण असा—उत्कृष्ठ केशपानानें युक्त असलेल्या—त्या सीतेचा शुभ डावा डोळा सभोंवतीं आरक्तवर्ण असून मत्स्याचा धक्का लागल्यामुळें स्फुरण पावत असलेल्या कमलाप्रमाणें स्फुरण पावूं लागला. मनोहर, रोमांचयुक्त वर्तुल, पुष्ट, उत्कृष्ठ प्रकारच्या कृष्णागुरूची व चंदनाची उटी लावण्यास योग्य आणि पुष्कळ दिवसपर्यंत सर्वोत्कृष्ठ प्रिय रामाचा संपर्क झालेला तिचा वामबाहु एकदम स्फुरण पावूं लागला. दृढ अशा तिच्या दोन पायांपैकीं एक गजशुंडेप्रमाणें वर्तुल, पुष्ट व सुंदर पाय स्फुरण पावूं लागला, आणि म्हणूनच राम अगदीं पुढें उभाच राहिला आहे कीं काय, असें तिला

सुचवूं लागला. त्याचप्रमाणें अनुपम नेत्र, डाळिंबाच्या बियांच्या अग्रांसारखे दांत आणि मनोहर स्वरूप ह्यांनीं युक्त असलेली ती सीता तेथें असतांना, किंचित् मलिन झालेलें, परंतु सुवर्णासारखें पीतवर्ण असलेलें तिचें वस्त्र थोडेसें स्थानापासून च्युत झालें. पूर्वीं ज्यांचें चांगलें प्रत्यंतर आलेलें आहे, असे हे व दुसरेहि शुभ शकुन होऊं लागले असतां, वाऱ्यानें व उन्हानें कोमेजून जाऊन जवळ जवळ नाश पावलेलें बीज ज्याप्रमाणें वृष्टीच्या योगानें हर्षयुक्त होतें, त्याप्रमाणें ती हर्षयुक्त झाली. पिकलेल्या तोंडल्याप्रमाणें लाल ओंठ, उत्कृष्ठ नेत्र, भिवया, कुरळे केंस, वक्र पापण्या आणि पांढरे स्वच्छ दांत ह्यांनीं युक्त असलेली तिची मुद्रा राहूच्या जबड्यांतून मुक्त झालेला चंद्रच कीं काय अशी दिसूं लागली!

असो. हे शुभ शकुन होऊं लागल्यामुळें तिचा शोक नाहींसा झाला, सुस्ती गेली, संताप शांत झाला व हर्षानें अंतःकरण प्रफुल्लित झालें. ह्यामुळें शुक्लपक्षामध्ये ज्याप्रमाणें उदय पावलेल्या चंद्राच्या योगाने रात्र शोभूं लागते, त्याप्रमाणें ती साध्वी सीता आपल्या मुखाच्या योगानें शोभूं लागली.

## सर्ग तिसावा.

### हनुमंताचा कार्याकार्य निश्चय.

महापराक्रमी हनुमानानें सीतेचें भाषण, आणि त्रिजटा व राक्षस ह्यांची गर्जना हें सर्व इत्थंभूत श्रवण केलें. नंदनवनामध्यें दृष्टीस पडणारी देवताच कीं काय, अशा रीतीनें ती सीता देवी तो वानर अवलोकन करूं लागला असतां, नानाप्रकारचे विचार त्याच्या मनामध्यें येऊं लागले. तो म्हणाला, "जिला हजारों, लाखों किंबहुना असंख्य वानर सर्व दिशांस शोधीत आहेत, ती ही माझ्या आढळण्यांत आली. शत्रूचें सामर्थ्य अवलोकन करण्याकरितां मोठ्या बंदोबस्तानें हेराचा वेष धारण करून गुप्तपणें संचार करितां करितां माझ्या असें आढळण्यांत आलें. राक्षसांचे ठिकाणीं विशेष काय आहे, हें दिसून आलें. ही नगरी पाहिली. ह्या राक्षसाधिपति रावणाचा प्रभाव आढळून आला, आणि प्राणिमात्रावर दया करणाऱ्या त्या अतर्क्यस्वरूप रामानें पतिदर्शनाची इच्छा धरून राहिलेल्या आपल्या असल्या भार्येकरितां त्रैलोक्य पालथें घालण्याचेंहि मनामध्यें आणणेंहि योग्य आहे, ह्याविषयीं माझी खात्री झाली!

असो. पूर्णचंद्राप्रमाणें जिचें मुख आल्हादकारक आहे, आणि पतिवियोगजन्य दुःखाचा अनुभव नसल्यामुळें जी शोक करितांना थांबत नाहीं, अशा त्या सीतेला मी धीर देतों. शोकानें जिचें अंतःकरण व्याकुल झालेलें आहे, अशा ह्या साध्वी सीतेचें सांत्वन केल्यावांचून मी जर जाईन, तर माझें जाणें अनर्थावह होईल. कारण, मी तिकडे गेल्यावर रक्षण करणारा कोणी नाहीं असें आढळून आलें. म्हणजे ही यशस्वी राजकन्या जीविताचा त्याग करील. पूर्ण चंद्रासारख्या आल्हादकारक मुखानें युक्त आणि सीतेच्या दर्शनाची उत्कंठा लागलेल्या महापराक्रमी रामचंद्राला ज्याप्रमाणें सीतेचा शोध लागला, हें कळवून धीर देणें न्याय्य आहे, त्याचप्रमाणें हिलाहि धीर देणें न्याय्य आहे. शिवाय राक्षसस्त्रियांनीं आपल्या समक्ष केलेलें हें भाषणहि उपेक्षा करण्यासारखें नाहीं. तेव्हां आतां कसें करावें, ह्या मोठया अडचणींत मी सांप्रत पडलों आहें. ही रात्र शिल्लक आहे, तोंच जर मीं हिला धीर दिला नाहीं, तर ती जीविताचा त्याग करील, ह्याविषयीं मुळींच शंका नाहीं. बरें, सुंदरी सीतेशीं भाषण न करितां जर मी रामाकडे गेलों, आणि 'सीतेनें मला काय निरोप सांगितला आहे?' असें जर रामानें मला विचारिलें, तर मी त्याला काय उत्तर देऊं? सीतेचा निरोप घेतल्याशिवाय जर मी येथून त्वरेनें गेलों, तर ककुत्स्थकुलोत्पन्न राम क्रोधानें संतप्त झालेल्या दृष्टीच्या योगानें मला दग्धहि करून टाकील. सीतेशीं संभाषण न करितां, ती अमुक अमुक ठिकाणीं आहे, असा वृत्तांत वानराधिपति सुग्रीवाला कळवून रामाकरितां जर मी त्याला उद्योग करण्यास लावीन, तर सैन्यासहवर्तमान त्याचें येथें येणेंच व्यर्थ होऊन जाईल. कारण, इतका काल लोटे-पर्यंत आश्वासन न मिळेल तर सीता जिवंत रहाण्याचाच संभव नाहीं. राक्षसी इकडे तिकडे पहात आहेत, असा समय साधून मीं येथें येऊन बसलों आहें. ह्याकरितां अतिशय संतप्त झालेल्या हिचें आजच हलके हलके मीं सांत्वन करीन. मीं जरी अतिसूक्ष्म रूप धारण केलें आहे, विशेषतः मी जरी वानर आहें, तरी ह्या ठिकाणीं संस्कृत अशा मनुष्यवाणीनेंच मी बोलेन. परंतु ब्राह्मणाप्रमाणें संस्कृत भाषण मी जर करूं लागलों, तर मला रावण समजून ही जनककन्या सीता भयभीत होईल. तथापि कांहीं झालें तरी अर्थयुक्त असें भाषण मनुष्य-वाणीचें अवलंबन करूनच मला अवश्य केलें पाहिजे. नाहीं तर माझ्या हातून ह्या साध्वीचें सांत्वन होणेंच शक्य नाहीं. परंतु ह्या जानकीला अगोदर राक्षसांनीं त्रासवून सोडिलें आहे; तेव्हां माझें रूप अवलोकन केल्यावर आणि

माझें भाषण श्रवण केल्यावरहि कदाचित् हिला अधिकच त्रास होईल. त्रस्त झाल्या-नंतर विशाल नेत्रांनीं युक्त असलेली ही विचारी सीता, हा यथेष्ट रूप धारण करणारा रावण आहे असें मला समजून आक्रोश करूं लागेल. सीतेनें आक्रोश केल्यावर राक्षसस्त्रियांचा घोर समुदाय नानाप्रकारचीं शस्त्रें घेऊन मृत्यूप्रमाणें एकदम तिच्यावर तुटून पडेल. तदनंतर अक्राळविक्राळ मुखांनीं युक्त असलेल्या त्या महाबलाढ्य राक्षसांनीं चोहोंकडे पहातां पहातां मला हुडकून काढिल्यावर ते माझा वध करण्याविषयीं अथवा मला पकडण्याविषयीं प्रयत्न करतील. मोठ-मोठया वृक्षांच्या शाखा, उपशाखा व खोडें ह्यांवरून मला धावतांना पाहून ते राक्षस शंकित होतील. मी संचार करूं लागलों असतां, माझें प्रचंड स्वरूप अवलोकन करून राक्षसस्त्रियाहि मनामध्यें भयभीत होतील व भयंकर सूर काढूं लागतील. इतकेंच नव्हे, परंतु राक्षसाधिपति रावणाच्या गृहामध्यें रक्षणाकरितां त्या राक्षसराजानें नेमिलेल्या राक्षसांनाहि त्या हांका मारतील; आणि शूल, बाण, खड्ग वगैरे नानाप्रकारचीं आयुधें हातांमध्यें घेऊन ते राक्षस उद्वेग उत्पन्न झाल्यामुळें वेगावेगानें ह्या गर्दीमध्यें लोटतील. त्यांनीं मला सर्व बाजूंनीं जखडून टाकिलें असतां मी राक्षस सैन्याचा नाश करीन; परंतु नंतर महासागराच्या पर-तीराला परत जाण्याचें मला सामर्थ्य रहाणार नाहीं. कदाचित् सत्वर पराक्रम गाजविणारे असंख्य राक्षस सभोंवती वेढा देऊन मलाहि पकडतील. त्यामुळें मात्र कांहींच सिद्धीस जाणार नाहीं. मी येथें कशाकरितां आलों, हें ह्या सीतेला समजणार नाहीं. मी पकडलों गेलों, म्हणजे सीतेचा वृत्तांतहि रामाला कळणार नाहीं; अथवा हिंसाप्रिय राक्षसांनीं जर ह्या जनककन्येचा वध केला, तर राम आणि सुग्रीव ह्या दोघांच्याहि कार्याचा घात होईल. ज्याच्या भोंवतीं सागराचा वेढा आहे, ज्याच्याभोंवतीं राक्षसांचा पहारा आहे व ज्याला कोणीकडूनहि मार्ग नाहीं, अशा ह्या गुप्त प्रदेशामध्यें जानकी वास्तव्य करीत आहे. तस्मात्, संग्रामामध्यें राक्षसांनीं जर माझा वध केला, किंवा मला धरून ठेविलें, तर कार्य सिद्धीस नेण्याविषयीं रामाला दुसरा कोणी साहाय्य करणारा मला दिसत नाहीं. कारण, माझा जर वध झाला, तर शंभर योजनें विस्तीर्ण असलेल्या ह्या महासागाराचें उल्लंघन करणारा वानर मी विचार करीत असतां-नाहि माझ्या आढळण्यांत येत नाहीं. हजारों राक्षसांचा वध करण्यास मी समर्थ आहें; परंतु राक्षसांशीं युद्ध करून श्रांत झाल्यावर महासागराच्या पर-तीराला जाण्यास मी समर्थ होणार नाहीं. युद्धामध्यें जय कोणाला येईल, हें

निश्चित नसतें. ह्या प्रसंगीं संशयांत पडणें तर मला बरें दिसत नाहीं. बरें, जें कार्य संशयग्रस्त आहे, तें निःसंशय सिद्धीस जाण्याची खात्री तरी कोणाला देतां येणार आहे ? सारांश, आधींच भिऊन गेलेल्या ह्या सीतेशीं मीं भाषण केलें असतां, हा मोठा अनर्थ गुदरण्याचा संभव आहे. मी जर भाषण न करीन तर सीतेच्या हातून प्राणत्यागच होण्याचा संभव आहे. सूर्योदय झाला असतां ज्याप्रमाणें अंधकार नाहींसा होतो, त्याप्रमाणें अयोग्य दूताशीं प्रसंग पडला असतां देश व काल विरुद्ध झाल्या कारणानें जवळ जवळ सिद्धीस गेलेलींहि कार्यें नाहींतशीं होत असतात. कार्याकार्यांविषयीं स्वामीनें मंत्र्यांसहवर्तमान जरी एखादा विचार निश्चित केला असला, तरी अयोग्य दूताशीं गांठ पडल्यावर त्या विचारापासून कांहींएक निष्पन्न होत नाहीं. कारण शहाणपणाच्या घमेंडींत असणारे दूत स्वामीकार्याचा घात करितात. तेव्हां काय केलें असतां कार्य-विघात होणार नाहीं ? कसें वागलें असतां बुद्धिभ्रंश होणार नाहीं ? कोणता उपाय योजिला असतां मीं केलेलें हें समुद्राचें उल्लंघन व्यर्थ जाणार नाहीं ? आणि कशाचें अवलंबन केलें असतां सीता उद्विग्न न होतां माझें सर्व भाषण शांतपणें ऐकून घेईल ?"

असें चिंतन करितां करितां त्या बुद्धिमान हनुमानाला एक विचार सुचला. उत्कृष्ठ संबंधी जो सत्कर्मनिष्ठ राम, त्याचें वर्णन केलें असतां, त्या रामाचेंच ठिकाणीं मनाचें लय लागून राहिलेल्या ह्या सीतेला उद्वेग होणार नाहीं. तस्मात् इक्ष्वाकुवंशजामध्यें श्रेष्ठ आणि स्वपराक्रमानें प्रसिद्ध अशा रामाला अनुलक्षून असलेलीं धर्मयुक्त शुभ भाषणें मी करूं लागलों असतां सीतेला उद्वेग होणार नाहीं. ह्यास्तव मधुर वाणीनें बोलतां बोलतांच मी सर्व कांहीं सीतेला ऐकवीन, आणि तिचा विश्वास बसेल, अशा रीतीनें मी सर्व कांहीं तिला कथन करीन."

ह्याप्रमाणें विचार ठरवून, जगन्नाथ रामाची तरुण भार्या अवलोकन करण्या-करितां वृक्षशाखांमध्यें बसलेला तो महापराक्रमी हनुमान, सीतेलाच ऐकूं येईल इतक्या जवळ जाऊन नानाप्रकारचे मधुर व सत्य भाषण करूं लागला.

# सर्ग एकतिसावा.

### हनुमत्मुखें रामचरित्रगायन.

हनुमान म्हणाला:—"रथ, गज आणि अश्व ह्यांनीं युक्त; पुण्यशील, महाकीर्तिमान व महायशस्वी असा एक इक्ष्वाकुवंशजामध्यें दशरथ नामक राजा होऊन गेला. तो अहिंसेविषयीं तत्पर असे; मनाचा उदार असे; दयाळू असे; त्याचा पराक्रम अमोघ असे, आणि तो वैभवसंपन्न राजा श्रेष्ठ इक्ष्वाकुवंशाचें वैभव वृद्धिंगत करणारा असे. राजचिन्हांनीं तो युक्त असे, त्यांची संपत्ति मोठी असे आणि तो नृपश्रेष्ठ संपूर्ण पृथ्वीमध्यें विख्यात, प्रजेला सुख देणारा व सुखी असे. त्याचा एक राम म्हणून सर्वांना व प्रिय असा ज्येष्ठ पुत्र आहे. त्याचें मुख नक्षत्राधिपति चंद्राप्रमाणें आल्हादकारक आहे. सर्व धनुर्धरांमध्यें तो श्रेष्ठ आहे. तो शत्रुतापन राम स्वतःच्या शीलाचें, स्वजनाचें, जीवलोकाचें व धर्माचें रक्षण करणारा आहे. त्याचा जो सत्यप्रतिज्ञ वृद्ध पिता, त्याच्या आज्ञेवरून तो वीर, भार्या आणि भ्राता ह्यांसहवर्तमान वनामध्यें निघून गेला; आणि त्या महावनामध्यें मृगया करितां करितां यथेष्ट रूप धारण करणाऱ्या असंख्य शूर राक्षसांचाहि त्या महापराक्रमी वीरानें वध केला; परंतु जनस्थानांतील राक्षसांचा वध व त्याचप्रमाणें खरदूषणांचा वध ऐकून रावणानें जानकीचा क्रोधानें अपहार केला; आणि तो अपहार मायेनें मृगरूप धारण करून वनामध्यें रामाला फसवून केला! तव्हां त्या निर्दोष सीता देवीचा शोध लावण्याकरितां हिंडतां हिंडतां वनामध्यें त्या रामाला सुग्रीव नामक एक वानर मित्र मिळाला. तदनंतर वालीचा वध करून शत्रुसमूह जिंकणाऱ्या रामानें महात्म्या सुग्रीवाला वानरांचें राज्य अर्पण केलें. इतकें झाल्यावर यथेष्ट रूप धारण करणाऱ्या वानरांना सुग्रीवानें त्या सीतेचा शोध लावण्याची आज्ञा केली, व त्याप्रमाणें हजारों वानर चहूंकडे त्या सीता देवीचा शोध करीत हिंडत आहेत. विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या त्याच सीतेकरितां मीं वेगानें संपातीच्या सांगण्यावरून शंभर योजनें विस्तृत असलेल्या समुद्राचें उल्लंघन केलें, आणि रामाच्या मुखांतून सीता ज्या रूपाची, ज्या वर्णाची व ज्या चिन्हांनीं युक्त असलेली मीं श्रवण केली होती ती ही माझ्या दृष्टीस पडली."

इतकें बोलून तो वानरश्रेष्ठ स्वस्थ राहिला, व तें ऐकून सीतेलाहि पराकाष्ठेचा विस्मय झाला. तदनंतर वक्र केशाग्रें आणि उत्कृष्ठ केशपाश ह्यांनीं युक्त असलेली

ती विनयशील सीता केशांनीं आच्छादित झालेलें आपलें मुख वर करून शिंशपा वृक्षाकडे पाहूं लागली. सारांश, वानराचें भाषण श्रवण केल्यावर सीता सर्व दिशा व उपदिशा ह्यांकडे पाहूं लागली, आणि अगदीं मनापासून रामाचा ध्यास घेऊन बसली असल्यामुळें तिला स्वतःला पराकाष्ठेचा हर्ष झाला. शेवटीं चहूंकडे पहातां पहातां, उदयाचलावर आलेला सूर्यच कीं काय अशा प्रकारें वानराधिपति सुग्रीवाचा अमात्य, तो अतर्क्यबुद्धिमान वायुपुत्र हनुमान तिच्या दृष्टीस पडला.

## सर्ग बत्तिसावा.

### सीतेला मारुतीविषयीं शंका.

तदनंतर वृक्षशाखांमध्यें श्वेत वस्त्र गुंडाळून दडून बसलेल्या आणि विद्युद्गणाप्रमाणें तेजस्वी असलेल्या त्या हनुमानाला अवलोकन करून हाहि मायामृगच असेल कीं काय, अशी सीतेच्या मनामध्यें शंका आली. विनयसंपन्न, प्रिय भाषण करणारा, अशोक वृक्षाच्या प्रफुल्लित पुष्पसमुदायाप्रमाणें भासणारा आणि सुवर्णतुल्य नेत्रांनीं युक्त असलेला तो कपि तिनें अवलोकन केला; परंतु नम्रपणें वृक्षावर राहिलेल्या वानरश्रेष्ठाला अवलोकन करून सीतेला पराकाष्ठेचा विस्मय झाला, आणि ती मनामध्यें चिंता करूं लागली. “ अहो, वानराचें हें भयंकर धूड इतरांना अजिंक्य आहे. इतकेंच नव्हे, परंतु इतरांची ह्याकडे पहाण्याचीहि सोय नाहीं. ”

असें मनामध्यें आणून ती पुनरपि गांगरून गेली, आणि भयानें गोंधळून जाऊन दुःखानें व्याकुळ झाल्यामुळें ‘ हे रामा, हे रामा, हे लक्ष्मणा ’ असा करुण स्वरानें एकसारखा विलाप करूं लागली; आणि उत्तरोत्तर तोंडांतून ध्वनीहि जरी निघेनासा झाला, तरी ती साध्वी एकाएकीं रडूं लागली. तदनंतर नम्रपणें समीप आलेल्या त्या वानरश्रेष्ठाला अवलोकन केल्यावर हें स्वप्न आहे, असें ती मनामध्यें आणूं लागली. आपले हे शब्द राक्षसस्त्रियांनीं ऐकिले आहेत कीं काय, अशी शंका घेऊन ती जनककुलनंदिनी इकडे तिकडे पाहूं लागली असतां, वानरराज सुग्रीवाच्या आज्ञेप्रमाणें वागणारा महायोग्य वायुपुत्र वानरश्रेष्ठ तिनें अवलोकन केला. तो बुद्धिमानांमध्यें श्रेष्ठ होता. वज्रप्रहारामुळें त्याच्या विशाल मुखाचा भंग झालेला होता. त्याला अवलोकन करितांक्षणीं तिला

अतिशय धडकी भरली. हा रूपांतर करून रावणच आला असावा, ह्या भीतीनें ती अगदीं मृतवत् निश्चेष्ट पडली; परंतु विशाल नेत्रांनीं युक्त असलेली ती सीता बऱ्याच वेळानें शुद्धीवर येऊन विचार करूं लागली. " हें आज मला वाईट स्वप्न पडलें ! कारण, शास्त्रगणांनीं निषिद्ध सांगितलेला वानर मीं स्वप्नामध्यें अवलोकन केला. ह्यास्तव लक्ष्मणासहवर्तमान रामाचें आणि त्याचप्रमाणें माझ्या पित्या जनकराजाचें कुशल असो ! परंतु शोकानें व दुःखानें पीडित झालेल्या माझा जर मुळीं डोळाच लागत नाहीं, तर हें स्वप्न नव्हे. कारण, पूर्णचंद्रतुल्य आल्हादकारक मुखानें युक्त असलेल्या त्या रामाचा वियोग झाला असल्यामुळें डोळा लागण्याइतकें सुख माझे ठिकाणीं नाहीं. ' रामा, रामा ' असें एकसारखें मी मनामध्यें चिंतन करीत असून वाणीनेंहि त्याचाच उच्चार करीत आहे. त्याचा ज्यांत संबंध आहे, अशीच गोष्ट ऐकण्याकडे माझ्या मनाचा ओढा आहे; आणि माझ्या दृष्टीपुढेंहि त्याचीच गोष्ट दिसत आहे. सारांश, त्या रामासंबंधानें उत्कट इच्छा उत्पन्न झाल्यामुळें मी आज अगदीं पीडलें आहे. माझें सर्व मन त्याचे ठिकाणींच लीन होऊन राहिलें आहे. एकसारखें मी त्याचेंच चिंतन करीत आहें. शिवाय दृष्टीपुढेंहि सर्व कांहीं त्याचाच प्रकार असून कानानेंहि सर्व कांहीं त्याच्याच संबंधानें ऐकूं येत असल्याचा मला भास होत आहे. झालेला हा प्रकार मनोराज्य असेल, असें समजावें तर स्थिर अंतःकरणवृत्तीनेंहि मला तसेंच वाटत आहे. तेव्हां असें होण्याचें कारण काय ? हा सर्व मनोराज्यांतील प्रकार आहे असें म्हणावें तर तसल्या प्रकारचा प्रत्यक्ष अनुभव कधीं नसतो; परंतु हा जो मला उद्देशून भाषण करीत आहे, ह्याचें रूप अगदीं स्पष्ट दिसत आहे. असो. बृहस्पति, इंद्र, ब्रह्मदेव आणि अग्नि यांना नमस्कार असो. ह्या वनचर वानरानें माझ्या समोर केलेलें हें भाषण ह्यांच्या कृपेनें सत्य असो. अन्यथा न होवो."

---

# सर्ग तेहेतिसावा.

### हनुमंताची सीतेला पृच्छा.

नूतन पल्लवाप्रमाणें ज्याचें मुख आहे, असा नम्र मुद्रा धारण केलेला हनुमान झाडावरच्या झाडावरच उंच फांदीवरून एका अगदीं जवळच्या फांदीवर

आला. समीप येऊन प्रणिपात केल्यानंतर तो महातेजस्वी वायुपुत्र हनुमान मस्तकीं हात जोडून मधुर वाणीनें त्या सीतेला म्हणाला, "कमलपत्रांप्रमाणें जिचे नेत्र आहेत, मलिन रेशमी वस्त्र जिनें परिधान केलेलें आहे, आणि जिला नांवें ठेवण्याला जागा नाहीं, अशी कोण बरें तूं वृक्षशाखेचें अवलंबन करून राहिली आहेस ? वर पडलेलें उदक ज्याप्रमाणें कमलपत्रांपासून खालीं गळत असतें, त्याप्रमाणें तुझ्या नेत्रांतून शोकजन्य उदक कशाकरितां स्रवत आहे ? हे कल्याणि, देव, दैत्य, नाग, गंधर्व, राक्षस, यक्ष आणि किन्नर ह्यांपैकीं तूं कोणत्या जातीची आहेस ? तूं मला देवतेसारखी भासत आहेस. तस्मात् रुद्रांची, मरुद्गणांची अथवा अष्टवसूंची तूं अधिष्ठात्री देवता आहेस कीं काय ? नक्षत्रांमध्यें श्रेष्ठ आणि श्रेष्ठ अशा गुणांनीं अधिक अशी चंद्राचा वियोग होऊन स्वर्गांतून खालीं पडलेली तूं रोहिणी तर नाहींस ना ? हे कृष्णनयने, क्रोधानें अथवा मोहानें वसिष्ठाला कोप आणवून तूं कल्याणी अरुंधती तर येथें आली नाहींस ना ? हे सुंदरि, इहलोकापासून परलोकीं गेलेल्या कोणाचा तरी तूं शोक करीत आहेस. तेव्हां परलोकीं गेलेला तो का तुझा पुत्र होता ? पिता होता ? भ्राता होता ? किंवा भर्ता होता ? रोदन, अतिशय श्वासोच्छ्वास, भूमिस्पर्श आणि रामराजाचें नांव घेणें, ह्यांवरून तूं देवता नव्हेस, असें मला वाटतें. राजपत्नीत्वसूचक अशीं जीं लक्षणें तुझीं मला दिसत आहेत, त्यांवरून तूं पृथ्वीपति रामाची पट्टराणी व जनकराजाची कन्या असावीस, असें मला वाटतें. सारांश, तुझें देव बरें करो. रावणानें जनस्थानापासून बलात्कारानें अपहार करून आणिलेली सीता जर तूं असशील, तर मी तुला विचारितों आहें, तसें सांग. तुझी ही दैन्यावस्था, मनुष्यांमध्यें ज्याला कोठेंहि प्रतिमा नाहीं, असें हें तुझें रूप आणि तपश्चर्येला योग्य असा हा तुझा वेष ह्यांवरून तूं निःसंशय रामाची पट्टराणी आहेस !"

### सीतेचें हनुमंताला उत्तर.

हनुमानाचें हें भाषण श्रवण करितांच रामराजाचा उच्चार झाल्यामुळें सीतेला हर्ष झाला, आणि वृक्षशाखेवर बसलेल्या हनुमानाशीं ती विदेहराजकन्या बोलूं लागली. ती म्हणाली, "पृथ्वींतील श्रेष्ठ राजांमध्यें मुख्य, स्वपराक्रमानें प्रसिद्ध आणि शत्रुसैन्यघातक अशा दशरथाची मी स्नुषा आहें. महात्म्या विदेहराज जनकाची मी कन्या आहें. रघुकुलावतंस बुद्धिमान रामाची मी भार्या असून 'सीता' ह्या नांवानें मला हांक मारीत असतात. सर्व इच्छा परिपूर्ण होत असतांना,

आणि मनुष्यजातीला योग्य अशा सर्वहि भोग्य वस्तूंचा उपभोग घडत असतांना, राघवाच्या गृहामध्यें मी बारा वर्षेंपर्यंत राहिलें होतें. तदनंतर तेरावे वर्षी इक्ष्वाकु-वंशज रामाला राज्याभिषेक करण्याचा उपाध्यायांसहवर्तमान दशरथ राजानें उपक्रम केला; परंतु राघवाच्या राज्याभिषेकाची ती तयारी चालली असतां कैकेयी नामक स्त्री भर्त्या दशरथाला म्हणाली, 'रामाला जर राज्याभिषेक व्हाव-याचा असेल, तर माझें नेहमींचें भोजनहि मी घेणार नाहीं, व जलप्राशनहि करणार नाहीं. हे नृपश्रेष्ठा, त्या वेळेला जें तूं वरप्रदानरूप माझ्याशीं प्रेमानें भाषण केलेंस, तें जर व्यर्थ करावयाचें नसेल, तर रामाला वनांत जाऊं दे.' हें कैकेयीचें क्रूर व अप्रिय भाषण श्रवण केल्यावर तिला वर दिल्याचें त्याला स्मरण झालें, आणि तो सत्यवचनी राजा मूर्च्छित झाला. तदनंतर सत्यधर्माचें अवलंबन करून राहिलेला तो वृद्ध राजा रडत रडत आपल्या त्या यशस्वी ज्येष्ठ पुत्रापाशीं राज्याची याचना करूं लागला; व त्या श्रीमान रामानें राज्या-भिषेकापेक्षांहि तें पित्याचें भाषण मनामध्यें अधिक प्रिय मानून तसें वाणीनेंहि उच्चारून दाखविलें. 'सत्यपराक्रमी राम जीविताकरितांहि कधीं खोटें बोलणार नाहीं, सत्यच बोलेल; आणि त्याचप्रमाणें कधीं प्रतिग्रह करणार नाहीं, परंतु दानच देईल.' असें म्हणून त्या महायशस्वी रामानें मोठमोठीं मौल्यवान प्राव-रणें काढून टाकिलीं, आणि मनापासून राज्याचा त्याग करून माझें रक्षण करण्याविषयीं मातेची प्रार्थना केली; परंतु मी त्याच्या पुढेंच वनामध्यें संचार करण्यास सिद्ध होऊन सत्वर चालूं लागलें. कारण, त्याच्याशिवाय स्वर्गामध्येंहि वास्तव्य करणें मला रुचत नाहीं. मित्रांना आनंद देणारा महाभाग्यवान सुमित्रा-पुत्र लक्ष्मण माझ्याहि पूर्वी आपल्या ज्येष्ठ भ्रात्याच्या मागोमाग जाण्याकरितां दर्भ व वल्कलें ह्यांनीं सजून तयार झाला होता. सारांश, स्वीकारिलेल्या व्रताचें परिपालन करणारे ते आम्ही त्रिवर्गहि, दशरथाच्या आज्ञेला बहुमान देऊन, पूर्वी कधींहि न पाहिलेल्या आणि दिसण्यांतहि भयंकर असलेल्या अशा एका वनामध्यें प्रविष्ठ झालों. अतुल सामर्थ्यवान राम घोर दंडकारण्यामध्यें वास्तव्य करीत असतांना, दुरात्म्या रावणानें त्याची भार्या जी मी तिला हरण करून आणिलें आहे. दोन महिने लोटत तोंपर्यंत त्या रावणानें माझ्या जीवितरक्षणाची मुदत केलेली आहे.दोन महिन्यानंतर मला प्राणत्याग करण्याचा प्रसंग येणार आहे."

---

# सर्ग चौतिसावा.



## सीतेला मारुतीविषयीं पुनः शंका.

दुःखपरंपरेनें घेरून टाकिलेल्या त्या सीतेचें भाषण श्रवण करून वानरश्रेष्ठ हनुमान सौम्य शब्दांनीं तिला म्हणाला, " हे देवि, रामाच्या आज्ञेनें मी तुझ्यासमीप आलों आहें. हे वैदेहि, वेदवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असून जो वेद व ब्रह्मास्त्र जाणीत आहे, तो दाशरथि राम कुशल आहे; आणि त्यानें तुला कुशलप्रश्न केला आहे. तुझ्या भर्त्याचा प्रिय अनुयायी महातेजस्वी लक्ष्मण शोकानें संतप्त झाला असून त्यानें तुला साष्टांग नमस्कार सांगितला आहे. "

ह्याप्रमाणें त्या उभयतां पुरुषश्रेष्ठ राम-लक्ष्मणांचें कुशल ऐकून त्या देवीच्या शरीरावर आनंदाचे रोमांच उठले, आणि ती हनुमानाला म्हणाली, " मनुष्य कायम राहील तर शंभर वर्षांनीं तरी त्याला आनंदाचे दिवस येतील, ही लोकप्रसिद्ध म्हण खरोखर मला मोठी कल्याणकारक दिसत आहे. "

त्या वेळीं राम-लक्ष्मणांची भेट झाल्याप्रमाणेंच सीतेला अनिर्वचनीय आनंद झाला; आणि सीता व हनुमान ह्या उभयतांनीं एकमेकांशीं विश्वासानें भाषण करण्यास आरंभ केला. शोकसंतप्त झालेल्या सीतेचें तें भाषण श्रवण केल्यावर वायुपुत्र हनुमान तिच्या जवळ जाऊं लागला; परंतु जसजसा तो हनुमान जवळ येऊं लागला, तसतशी तो रावण असावा, म्हणून सीतेला शंका येऊं लागली. तेव्हां ती म्हणाली, " धिक्कार असो ! धिक्कार असो ह्या माझ्या करण्याला ! ह्याला मीं हें कथन केलें, हें नीट झालें नाहीं. कारण, तो हा रावणच दुसरें रूप घेऊन येथें आला आहे. "

ह्याप्रमाणें बोलून शोकानें व्याकुल झालेल्या त्या सीतेनें अशोक वृक्षाची ती शाखा सोडून दिली, आणि निर्दोष अवयवांनीं युक्त असलेली ती सीता त्या भूमीवर तेथेंच बसली. तदनंतर महापराक्रमी हनुमानानें त्या जनककन्येला वंदन केलें; परंतु त्याला पाहून भयभीत झाल्यामुळें पुनरपि त्याच्याकडे पाहाण्याचेंहि तिला धैर्य होईना. तेव्हां तो वंदन करीत आहे, असें अवलोकन करून, मधुर स्वर आणि चंद्रासारखें आल्हादकारक मुख ह्यांनीं युक्त असलेली ती सीता दुःखानें लांब सुस्कारा टाकून त्या वानराला म्हणाली, " मायेचें अवलंबन करून जर तूं स्वतः मायावी रावण मला पुनरपि संताप उत्पन्न करीत

असशील, तर हें तुझें करणें चांगलें नाहीं. अरे, आपल्या रूपाचा त्याग करून संन्याशाचें रूप धारण केलेला जो जनस्थानामध्यें मीं अवलोकन केला, तो रावणच तूं आहेस. हे यथेष्ट रूप धारण करणाऱ्या निशाचरा, उपवासानें कृश होऊन वियोगजन्य दुःखानें दीन झालेल्या मला तूं पुनरपि संताप उत्पन्न करीत आहेस; परंतु हें चांगलें नव्हे. अथवा ज्या अर्थी तुझें दर्शन झाल्यामुळें माझ्या मनाला आनंद झाला आहे, त्या अर्थी मला शंका आल्याप्रमाणें हा प्रकार नाहीं. वास्तव, तूं जर रामदूत असशील, तर तुझें कल्याण असो. हे वानर-श्रेष्ठा, मी तुला रामकथा विचारीत आहे. कारण ती मला प्रिय आहे. तस्मात् हे वानरा, तूं मला प्रिय रामाचे गुण कथन कर. हे विनयशील, उदकाचा वेग ज्याप्रमाणें नदीचें तीर शिथिल करून टाकीत असतो, त्याप्रमाणें तुझा मला पक्का विश्वास येत नसल्यामुळें तूं माझें अंतःकरण घाबरें करीत आहेस. अहो, किती तरी ह्या स्वप्नाचा सुखकारक परिणाम झाला आहे पहा! रावणानें मला आणून बरेच दिवस झाले असतांनाहि रघुवंशज रामानें पाठविलेला वानर मी स्वप्नामध्यें अवलोकन करीत आहें. ह्याचप्रमाणें लक्ष्मणासहवर्तमान वीर राम स्वप्नामध्येंहि जरी माझ्या दृष्टीस पडला, तरी सुद्धां मी निराश होणार नाहीं; परंतु स्वप्न देखील ह्या वेळेला माझ्याशीं वैर करीत आहे. छे! छे! हें स्वप्न असावें, असें मला वाटत नाहीं. कारण, स्वप्नामध्यें वानर अवलोकन केल्यावर अभ्युदय प्राप्त होणें शक्य नाहीं; आणि मला तर मन आनंदित झाल्यामुळें अभ्युदय लवकरच होण्याचीं चिन्हें दिसत आहेत. अरे, पण हा चित्तमोह तर नव्हेना? कदाचित् वायूच्या झटक्याचाहि हा परिणाम असेल. न जाणो उन्मादामुळें मनाला हा कांहीं विकारहि झाला असेल; किंवा मृगजलाप्रमाणें हा कदाचित् भ्रमहि असेल! हा उन्माद नव्हे. आणि मोह व उन्माद ह्यांचीं लक्षणें जवळ जवळ सारखींच असल्याप्रळें हा मोहहि नव्हे. कारण, मी स्वतःला पूर्णपणें जाणीत आहें, आणि हा वानरहि मला स्पष्टपणें दिसत आहे!"

### विश्वासोत्पादन.

ह्याप्रमाणें सीतेनें नानाप्रकारांनीं सारासार विचार करून पाहिला; परंतु राक्षस हे इच्छेस येईल त्याप्रमाणें रूप धारण करणारे असल्यामुळें तो राक्षसाधि-पति रावणच असावा, असेंच शेवटीं तिला वाटलें. ह्याप्रमाणें निश्चय झाल्यानंतर ती कृशोदरी त्या वानराशीं कांहींएक बोलेनाशी झाली. सीतेचा तो निश्चय जाणून वायुपुत्र हनुमान कर्णाला मधुर लागणाऱ्या शब्दांनीं हर्ष उत्पन्न

करीत करीत तिला म्हणाला, " सूर्याप्रमाणें तेजस्वी, चंद्राप्रमाणें जगताला आल्हादकारक, धनधान्य वगैरे देऊन देवकुबेराप्रमाणें सर्व लोकांचें रंजन करणारा, महायशस्वी, विष्णूप्रमाणें पराक्रमसंपन्न, सत्यवादी, देवगुरु बृहस्पतीप्रमाणें मधुर भाषण करणारा, प्रत्यक्ष मदनाप्रमाणें रूपवान, महाभाग्यवान, वैभवशाली, क्रोध करणें योग्य असेल अशा ठिकाणींच प्रहार करणारा आणि जगतामध्यें श्रेष्ठ महारथी असा जो आहे, आणि ज्या महात्म्याच्या बाहूंचा आश्रय करून जगत् राहिलेलें आहे, त्या राघवाला मृगरूपानें आश्रमांतून काढून नेल्यानंतर शून्य झालेल्या आश्रमामध्यें येऊन ज्यानें तुझा अपहार केला, त्याला आपल्या त्या कर्माचें फल प्राप्त होत असल्याचें लवकरच तुझ्या दृष्टीस पडेल. जो वीर्यवान लवकरच रागारागानें सोडिलेल्या आणि प्रज्वलित अग्नीप्रमाणें भासत असलेल्या बाणांच्या योगानें संग्रामामध्यें रावणाचा वध करणार आहे, त्यानें तुझ्याकडे पाठविलेला मी दूत येथें आलों आहें. तुझ्या वियोगानें दुःखाकुल झालेल्या त्या रामानें तुला कुशल सांगितलें असून, सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या त्या महातेजस्वी व महापराक्रमी लक्ष्मणानेंहि तुला कुशल सांगितलें आहे. त्याचप्रमाणें हे देवि, रामाचा सखा आणि वानरश्रेष्ठांचा राजा जो सुग्रीव नामक वानर, त्यानेंहि तुला कुशल प्रश्न केला आहे. सुग्रीव आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान राम नित्य तुझी आठवण काढीत असतो. हे वैदेहि, राक्षसस्त्रियांच्या तावडींत तूं जिवंत राहिली आहेस, ही मोठ्या भाग्याचीच गोष्ट समजली पाहिजे. आतां राम, महारथी लक्ष्मण आणि अतुल सामर्थ्यवान सुग्रीव हे लवकरच कोटयवधि वानरांमध्यें तुझ्या दृष्टीस पडतील. मी हनुमान नामक वानर सुग्रीवाचा मंत्री आहें, आणि महासागराचें उल्लंघन करून ह्या लंका नगरीमध्यें प्रविष्ठ झालों आहें. इतकेंच नव्हे, परंतु स्वपराक्रमाच्या जोरावर त्या दुरात्म्या रावणाच्या मस्तकीं पाय देऊन मी तुझें दर्शन घेण्याकरितां तुझ्या समीप आलों आहें. ह्यास्तव हे देवि, तूं हा संशय सोडून दे, आणि मी सांगत आहें, ह्यावर विश्वास ठेव. माझ्या संबंधानें जी तुला शंका आली आहे, ती खोटी आहे. मी तसा नाहीं. "



# सर्ग पस्तिसावा.



## हनुमत्मुखें रामवर्णन.

वानरश्रेष्ठ हनुमानाच्या मुखांतून ती रामकथा श्रवण केल्यानंतर, विदेहराजकन्या सीता मधुर वाणीनें व सौम्य शब्दांनीं त्याला म्हणाली, " रामाची व तुझी गांठ कोठें पडली, लक्ष्मण तुला कशावरून विदित झाला, आणि वानर व मनुष्य यांचा समागम कसा झाला, हें तूं मला कथन कर. हे वानरा, राम आणि लक्ष्मण ह्यांचीं जीं लक्षणें आहेत, तीं तूं मला पुनरपि नीट कथन कर, म्हणजे मला शोकग्रस्त करून टाकणार नाहीं. सारांश, त्या रामाची ठेवण कशी आहे, त्याचें रूप कसें आहे, त्याच्या मांड्या कशा आहेत, हात कसे आहेत, त्याचप्रमाणें लक्ष्मणाची ठेवण वगैरे कशी आहे, हें सर्व तूं मला सांग. "

ह्याप्रमाणें सीतेनें सांगितलें असतां वायुपुत्र हनुमान रामाचें होतें तसें वर्णन करूं लागला. तो म्हणाला, " हे वैदेहि, मी रामदूत आहें, असें सुदैवानें जाणून ज्या अर्थीं तूं भर्त्याची व लक्ष्मणाची ठेवण वगैरे विचारीत आहेस, त्या अर्थीं रामाचीं व लक्ष्मणाचीं जीं चिन्हें माझ्या दृष्टोत्पत्तीस आलीं आहेत, तीं मी तुला सांगतों, तूं श्रवण कर. हे जनककन्ये, रामाचे नेत्र कमलपत्रांप्रमाणें आहेत. त्याचें मुख पूर्णचंद्राप्रमाणें आल्हादकारक आहे. तो जातीचाच रूपवान व सरळ आहे. तेजानें तो सूर्याची बरोबरी करणारा आहे. क्षमेनें तो पृथ्वीसारखा आहे. बुद्धीनें तो बृहस्पतीची बरोबरी करणारा आहे. कीर्तीनें इंद्राशींच त्याची तुलना होणारी आहे. बाई सीते, तो शत्रुतापन राम जीवलोक, स्वजन, स्वतःचें वर्तन आणि धर्म ह्यांचें रक्षण करणारा आहे. जगतांतील चातुर्वर्ण्यांचेंहि तो राम परिपालन करणारा आहे. त्याचप्रमाणें जगतामध्यें तो मर्यादा घालून देणारा असून त्या मर्यादेप्रमाणें लोकांना वागविणाराहि आहे. तो तेजस्वी आहे. लोकांना तो अत्यंत पूज्य आहे. ब्रह्मचर्य व्रतानें राहिलेला आहे. साधूंचा उपकार जाणणारा आहे. कर्मानुष्ठानहि त्याला विदित आहे. राजनीतीमध्यें तो निपुण आहे. ब्राह्मणांचा तो उपासक असून ज्ञानवान आहे व सुशील आहे. तो विनयसंपन्न असून शत्रूंना ताप देणारा आहे. यजुर्वेदाचें त्यानें अध्ययन केलेलें आहे. वेदवेत्त्यांना तो फारच मान्य आहे. धनुर्वेद, वेद व वेदांगें ह्यांमध्येंहि तो निष्णात

आहे. त्याचे स्कंध विशाल आहेत. त्याचा कंठ शंखाप्रमाणें तीन रेषांनीं युक्त आहे. त्याचें मुख उत्कृष्ठ आहे. त्याचे स्कंधसंधि गुप्त आहेत व नेत्र चांगले ताम्रवर्ण आहेत. लोकांमध्यें तो 'राम' म्हणून प्रसिद्ध आहे. दुंदुभीप्रमाणें त्याचा स्वर गंभीर आहे व वर्ण तुळतुळीत आहे. तो प्रतापी आहे. त्याच्या अवयवांची ठेवण सारखी आहे व सर्व अवयव चांगले स्पष्ट आहेत. त्याच्या शरिराचा वर्ण श्याम आहे. मांड्या, मनगट आणि मूठ हीं त्याचीं स्थिर आहेत. भिंवया, अंडकोश आणि हात हे त्याचे तीन अवयव लांब आहेत. केशाग्र, वृषण आणि गुडघे हीं त्याचीं सपाट आहेत. नाभीजवळचा प्रदेश, कुक्षी आणि वृक्ष:स्थल हीं उन्नत आहेत. नेत्रप्रांत, नखें आणि हातापायांचे तळवे ह्या ठिकाणीं तो ताम्रवर्ण आहे. पायांवरील रेषा, मस्तकावरील केश आणि लिंगमणि ह्या तीन ठिकाणीं तो तुळतुळीत आहे. स्वर, गति आणि नाभि हीं तीन गंभीर आहेत. उदर आणि कंठ ह्यांचे ठिकाणीं त्याला तीन तीन वळवळ्या आहेत. पायांच्या तळव्यांचा मध्यभाग, पायांवरील रेषा आणि स्तनांचीं अग्रें हीं तीनहि त्याचीं खोलगट आहेत. मान, जननेंद्रिय, पाठ आणि पोटऱ्या हे त्याचे चार अवयव आंखूड आहेत. त्याच्या मस्तका-वर तीन भोंवरें आहेत. त्याच्या अंगुष्ठमूलाचे ठिकाणीं चार रेषा आहेत. त्याची उंची चार हात आहे. हात, गुडघे, मांड्या आणि गाल हे चारी युग्म अवयव त्याचे एकसारखे आहेत. भिंवया, नाकपुड्या, नेत्र, कर्ण, ओष्ठ, स्तनाग्रें, कोपरे, मनगटें, गुडघे, वृषणें, कमरेच्या बाजवा, हात, पाय आणि कुल्ले हे चौदा युग्म अवयव त्याचे एकसारखे आहेत. त्याच्या प्रत्येक बाजूला बरोबर चार चार दाढा आहेत. सिंह व्याघ्र, गज आणि वृषभ ह्या चार पशूं-प्रमाणें त्याची चालण्याची ढब आहे. त्याचे ओंठ, हनुवटी आणि नाशिका हीं प्रशस्त आहेत. जीभ, मुख, नखें, केंस आणि त्वचा हीं पांच त्याचीं स्निग्ध आहेत. हात, बोटें, मांड्या आणि पोटऱ्या हे आठ अवयव त्याचे कळकाप्रमाणें सरळ आहेत. मुख, नेत्र, चेहरा, जीभ, ओठ, टाळू, स्तन, नखें, हात आणि पाय ह्या त्याच्या दहा ठिकाणीं कमलासारख्या आकृती आहेत. वृक्ष:स्थल, मस्तक, ललाट, मान, हात, खांदे, नाभी, पाय, पाठ आणि कान हे दहा त्याचे अवयव मोठे आहेत. श्री, यश आणि तेज ह्या तिहींनीं तो व्याप्त आहे. मातृवंश आणि पितृवंश हीं दोन त्याचीं शुद्ध आहेत. खाका, कुशी, वक्ष:स्थल, नासिका, स्कंध आणि ललाट हीं

सद्दा त्याचीं उन्नत आहेत. बोटांचीं पेरें, केश, रोम, नखें, त्वचा, जननेंद्रिय, श्मश्रु, दृष्टि आणि बुद्धि हीं नऊ त्याचीं सूक्ष्म आहेत; आणि धर्म, अर्थ व काम ह्या तिघांचेंहि तो राम सेवन करणारा आहे. सत्यधर्माविषयीं तो तत्पर असून श्रीमान आहे. निग्रहानुग्रहांविषयीं तो दक्ष आहे. तो कालदेशवर्तमान जाणणारा आहे, आणि सर्व लोकांशीं प्रिय भाषण करणारा आहे. अतुल तेजस्वी सुमित्रापुत्र लक्ष्मण त्याचा भ्राता आहे. तो कौसल्या व सुमित्रा या दोन्हीहि आपल्या माता समजत आहे, आणि रूप, प्रजाजनांचे ठिकाणीं प्रेम व इतरहि गुण ह्यांनीं तो रामासारखा आहे. महायशस्वी आणि वैभवशाली राम श्याम वर्ण असून त्याची कांति सुवर्णासारखी आहे. ते उभयतां पुरुषश्रेष्ठ राम-लक्ष्मण तुझ्या दर्शनाकरितां उत्सुक झालेले आहेत. आम्हां सुग्रीवमंत्र्यांशीं जूट करून ते सर्व पृथ्वी शोधीत आहेत."

### रामवृत्तकथन.

हनुमान पुढें सांगतोः—"हे जनककुलनंदिनि, ते उभयतां तुला पहाण्याकरितां पृथ्वीवर हिंडत असतांना, ज्येष्ठ भ्रात्यानें राज्यापासून हांकून लाविलेल्या वानराधिपति सुग्रीवाला त्यांनीं अवलोकन केलें. त्या वेळीं आल्हादकारक मुद्रेनें युक्त असलेला, परंतु भ्रात्याच्या भयानें व्याप्त झालेला सुग्रीव अनेक वृक्षांनीं गजबजून गेलेल्या ऋष्यमूक पर्वताच्या पायथ्याशीं बसला होता. ज्येष्ठ भ्रात्यानें राज्यावरून हुसकून लाविलेल्या त्या सत्यप्रतिज्ञ वानरराज सुग्रीवाची आम्ही सेवा करीत असतो. असो. श्रेष्ठ धनुष्यें ज्यांनीं हातांमध्यें घेतलेलीं आहेत, व ज्यांनीं वल्कलें परिधान केलेलीं आहेत, अशा त्या पुरुषश्रेष्ठ धनुर्धर रामलक्ष्मणांना अवलोकन करून तो वानरश्रेष्ठ सुग्रीव भीतीनें अगदीं गांगारून गेला, आणि त्यानें त्या पर्वताचे शिखरावर उड्डाण केलें. तदनंतर त्या शिखरावर बसलेल्या त्या वानरराज सुग्रीवानें त्यांच्याजवळ मला सत्वर पाठवून दिलें. तेव्हां सुग्रीवाच्या आज्ञेवरून मी त्या रूपवान, सुलक्षणी व समर्थ अशा पुरुषश्रेष्ठ राम-लक्ष्मणांच्या समीप गेलों, व हात जोडून उभा राहिलों. मग त्यांचा मुख्य उद्देश मला समजून आल्यानंतर, परस्परांवर प्रेम करणाऱ्या त्या पुरुषश्रेष्ठ राम-लक्ष्मणांना मी पाठीवर बसवून सुग्रीव होता, त्या ठिकाणीं घेऊन गेलों. तेथें गेल्यावर महात्म्या सुग्रीवाला मी त्यांचें खरें खरें वृत्त निवेदन केलें. तेव्हां एकमेकांचें संभाषण सुरू होऊन सुग्रीव व रामचंद्र यांच्यामध्यें अतिशयच प्रेम उत्पन्न झालें. आपापला पूर्ववृत्तांत त्या कीर्तिसंपन्न प्रजाधिपति व वानराधिपति राम-

सुग्रीवांनीं एकमेकाला कळवून परस्परांनीं परस्पराला आश्वासन दिलें. प्रथमतः स्त्रीकरितां महातेजस्वी वाली नामक भ्रात्यानें हांकून लाविलेल्या त्या सुग्रीवाचें लक्ष्मणाग्रज रामचंद्रानें सांत्वन केलें. तदनंतर सीते, तूं नाहींशीं झाल्यामुळें सरळ रीतीनें वागणाऱ्या रामाला होत असलेलें दुःख लक्ष्मणानें वानरराज सुग्रीवाला निवेदन केलें. तें ऐकतांक्षणीं तो वानराधिपति सुग्रीव ग्रहण लागलेल्या सूर्याप्रमाणें अतिशय निस्तेज झाला. तदनंतर राक्षस तुला घेऊन चालला असतां तुझ्या शरिराला शोभा आणणारे जे भूषणसमुदाय भूमीवर पडले होते ते सर्व वानरसेनाधिपतींनीं रामाकडे आणून आनंदानें दाखविले; परंतु तूं कोणीकडे गेलीस हें त्यांना समजलें नाहीं. मींच प्रथम आणिलेले ते ध्वनियुक्त भूषणसमुदाय रामाला दिले असतां, ते घेतांक्षणीं त्याला मूर्च्छा आली. नंतर ते प्रेक्षणीय भूषणसमुदाय मांडीवर ठेवून त्या देवावतारी राजानें नानाप्रकारानें शोक केला. सारांश, दाशरथि रामाचा शोकाग्नि त्या वेळीं फारच भडकला; आणि दुःखाकुल झालेला तो महात्मा राम पुष्कळ वेळपर्यंत भूमीवर पडला, तेव्हा नानाप्रकारच्या गोष्टी सांगून मोठ्या कष्टानें मीं त्याला फिरून उठविलें. नंतर ते महामूल्यवान भूषणसमुदाय वारंवार सुग्रीवाला दाखवून लक्ष्मणासहवर्तमान रामानें ते वानरराज सुग्रीवापाशीं ठेविले."

हनुमान पुढें सांगतो, "हे साध्वि, तूं दृष्टीआड झाल्यामुळें रघुवंशज राम ज्वालामुखी पर्वताप्रमाणें मोठ्या उज्ज्वल अग्नीच्या योगानें जसा कांहीं एकसारखा जळत राहिला आहे. अग्नि ज्याप्रमाणें होमशाला संतप्त करीत असतात, त्याप्रमाणें महात्म्या राघवाला तुझ्याकरितां शोक, चिंता आणि जागरण हीं ताप देत आहेत. ज्याप्रमाणें मोठ्या भूकंपानें प्रचंड पर्वतहि कंपित होऊं लागावा, त्याप्रमाणें तूं दृष्टीआड झाल्यामुळें उत्पन्न झालेल्या शोकानें राम कंपित होत आहे. हे राजकन्ये अतिरम्य वनांतून आणि नदीप्रवाहाच्या बाजूनें संचार करीत असतांनाहि त्याच्या मनाला बरें वाटत नाहीं. सीताबाई, मित्र आणि बांधव ह्यांसहवर्तमान रावणाचा वध करून तो पुरुषश्रेष्ठ राम सत्वरच तुला प्राप्त करून घेईल. एकमेकांशीं मैत्री संपादन केलेल्या उभयतां राम-सुग्रीवांनीं वालीचा वध करण्याविषयीं आणि तुझा शोध करण्याविषयीं बरोबरच प्रतिज्ञा केली. तदनंतर तो वानरराज सुग्रीव त्या वीरकुमारांसहवर्तमान किष्किंधा नगरीला आल्यावर वालीचा युद्धामध्यें वध झाला. सारांश, युद्धामध्यें वालीचा स्वपराक्रमानें वध करून रामानें सुग्रीवाला सर्व ऋक्ष आणि वानर ह्यांच्या समुदायाचें

आधिपत्य दिलें. हे देवि, ह्याप्रमाणें राम आणि सुग्रीव ह्यांची मैत्री जुळली आहे; आणि मी त्यांचा दूत हनुमान येथें आलों आहें, असें तूं समज. स्वराज्य प्राप्त झाल्यानंतर सुग्रीवानें महाबलाढ्य महाकपी बोलावून आणिले, आणि तुझ्याकरितां चोहोंकडे पाठवून दिले."

"ह्याप्रमाणें वानरराज सुग्रीवानें आज्ञा केली असतां महापर्वताची बरोबरी करणारे ते महाबलाढ्य वानर चोहोंकडे पृथ्वीवर तुझा शोध करण्याकरितां गेले. सारांश, सुग्रीवाच्या आज्ञेची भीति बाळगून आम्ही व इतर असे ते सर्व वानर सर्व पृथ्वी हिंडूं लागले. वैभवशाली आणि महाबलाढ्य वानरश्रेष्ठ वालिपुत्र अंगद एक तृतीयांश सेना बरोबर घेऊन निघाला; परंतु विंध्य नामक श्रेष्ठ पर्वतावर आम्ही जेव्हां विवरामध्यें गडप होऊन गेलों, तेव्हां आमच्या कित्येक रात्री व दिवस अत्यंत शोकामध्येंच गेल्या. शेवटीं पर्वतावरील दुर्गम प्रदेश आणि नद्यांचे प्रवाह शोधिले असतांहि तुज देवीचा मागमूस सुद्धां जेव्हां लागत नाहीं असें पाहिलें, तेव्हां आम्हीं प्राणत्याग करण्याचा निश्चय केला; व त्या विंध्यपर्वताच्या माथ्यावर आम्ही प्रायोपवेशन करीत बसलों. हें पाहून अंगद शोकसागरामध्यें अगदीं बुडून गेला; आणि हे वैदेहि, वालीचा वध, तुझा थांग न लागणें, आमचें प्रायोपवेशन व जटायूचें मरण ह्यांबद्दल तो विलाप करूं लागला. ह्याप्रमाणें प्रभूची आज्ञा झाली असतां, कालातिक्रमण होऊन कार्यहि शेवटास न गेल्यामुळें आम्ही निराश होऊन मरणाच्या द्वारीं बसलों असतां, एक मोठा वीर्यवान पक्षी तेथें आला. गृध्रराज जटायूचा सहोदर तो संपाति नामक गृध्रराज भ्रात्याचा वध श्रवण केल्यावर रागारागानें म्हणाला, "हे वानर-श्रेष्ठहो, माझ्या कनिष्ठ भ्रात्याचा कोणीं वध केला आणि कोठें केला, हें तुमच्या तोंडून ऐकण्याची माझी इच्छा आहे."

"ह्याप्रमाणें त्यानें विचारिलें असतां, त्या भयंकर रूप धारण करणाऱ्या राक्षसानें जनस्थानामध्यें तुझ्याकरितां त्या महात्म्याचा वध केल्याचें यथार्थ वर्तमान अंगदानें त्याला कळविलें. तेव्हां जटायूचा वध झाल्याचें ऐकून दुःखित झालेल्या त्या अरुणपुत्रानें रावणाच्या गृहामध्यें तूं वास्तव्य करीत आहेस, असें आम्हांला सांगितलें. तें त्याचें आल्हादकारक भाषण श्रवण करितांक्षणीं अंगद-प्रभृति आम्ही सर्वजण तेथून निघालों. तुझ्या दर्शनाविषयीं उत्साह उत्पन्न झाल्यामुळें आमचीं शरीरें टवटवीत होऊन आम्ही आनंदित झालों, आणि विंध्यपर्वतापासून उठून समुद्राच्या उत्कृष्ठ तीराशीं आलों. तुझ्या दर्शनाकरितां

उत्सुक झालेले अंगदप्रभृति सर्व वानर समुद्राच्या तीरासमीप आले असतां त्यांना पुनरपि भयंकर चिंता उत्पन्न झाली. तेव्हां सागर अवलोकन करितांक्षणीं धीर सोडूं लागलेल्या त्या वानरसैन्याची मोठी भीति दूर करून मीं शंभर योजनें उड्डाण केलें. राक्षसांनीं व्याप्त झालेल्या लंकेमध्यें मीं रात्रींच प्रवेश केला, आणि रावण माझ्या दृष्टीस पडला असून शोकाकुल झालेल्या तुलाहि मीं अवलोकन केलें."

मारुती पुढें म्हणतो, "हे निर्दोष देवि, हें इत्थंभूत वृत्त मीं तुला कथन केलें आहे. ह्यास्तव मी दाशरथि रामाचा दूत असल्यामुळें तूं माझ्याशीं संभाषण कर. हे राजपत्नि, रामकार्याकरितां उद्युक्त होऊन तुझ्याकरितां येथें आलेला मी वायुपुत्र सुग्रीवमंत्री आहें, असें तूं समज. शस्त्रधरांमध्यें श्रेष्ठ असा तुझा भर्ता ककुत्स्थकुलोत्पन्न राम खुशाल आहे. त्या ज्येष्ठ भ्रात्याच्या सेवेमध्यें तत्पर असलेला सुलक्षणी लक्ष्मणहि सुखरूप आहे. हे राजपत्नि, त्या तुझ्या वीर्यवान भर्त्याच्या हिताविषयीं दक्ष असलेला मी एकटा सुग्रीवाच्या आज्ञेवरून येथें आलों आहें. कोणीहि सोबती नसतांना मीं यथेष्ट रूप धारण करून तुझा शोध लावण्याच्या उद्देशानें ही दक्षिण दिशा उल्लंघिली. आतां सुदैवानें तुझा शोध लागल्याची वार्ता कळवून तुझा शोध लागत नसल्यामुळें शोक करीत बसलेल्या वानरसेनांचें दुःख मी नाहींसें करीन. हे देवि, समुद्र उल्लंघन करून माझें येणें व्यर्थ झालें नाहीं, हें मोठें भाग्यच म्हणावयाचें. आतां तुझा शोध लावण्यासंबंधानें मी यश संपादन करीन; आणि पुत्र व बांधव ह्यांसहवर्तमान राक्षसाधिपति रावणाचा सत्वरच वध करून महावीर्यवान रघुवंशज राम तुला प्राप्त करून घेईल."

हनुमान आणखी सांगतो, "हे वैदेहि, पर्वतांमध्यें माल्यवान म्हणून एक श्रेष्ठ पर्वत आहे. तेथून केसरी म्हणून वानर गोकर्ण पर्वतावर जात होता. कारण त्या माझ्या महाकपि पित्याला शंबसादन नामक असुराचा वध करण्याविषयीं देवर्षींनीं आज्ञा केली होती. त्या आज्ञेप्रमाणें सागराच्या पवित्र तीर्थावर त्यानें त्याचा वधहि केला. मैथिलि, त्या वानराच्या पत्नीचे ठिकाणीं मी वायूपासून उत्पन्न झालों आहें; आणि स्वपराक्रमानेंच मी जगतामध्यें 'हनुमान' म्हणून विख्यात झालों आहें. हे विदेहराजकन्ये, तुला विश्वास यावा, एतदर्थ मीं तुझ्या भर्त्याचे गुण कथन केले. आतां हे राजपत्नी, रघुवंशज राम निःसंशय तुला येथून लवकरच घेऊन जाईल."

ह्याप्रमाणें विश्वसनीय कारणें देऊन हनुमानानें सीतेचे ठिकाणीं विश्वास उत्पन्न केला असतां, शोकानें कृश झालेल्या त्या सीतेलाहि राम-लक्ष्मणांच्या

चिन्हांची वास्तविक ओळख पटल्यावरून तो रामदूत असावा, असें वाटलें. इतकेंच नव्हे, परंतु त्या जानकीला अनुपम हर्ष झाला. वक्र पापण्यांनीं युक्त असलेल्या तिच्या नेत्रांतून हर्षामुळें आनंदाश्रुहि गळूं लागले. विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या सीतेचें मुखहि ग्रहण सुटलेल्या नक्षत्राधिपति चंद्राप्रमाणें शोभूं लागलें, आणि भलता सलतासमज न होतां तो हनुमान वानरच आहे, असें तिला पक्कें वाटलें.

तदनंतर आल्हादकारक मुद्रेनें युक्त झालेल्या त्या सीतेला हनुमान म्हणाला, " हे मैथिलि, हें मीं सर्व तुला कथन केलें आहे. आतां तूं धैर्य धर आणि मी काय करूं, तें सांग. रामाकडे मी परत जाणार आहें; परंतु हें करणें तुला कसें काय रुचत आहे, तें कळूं दे. असो. हे मैथिलि, संग्रामामध्यें शंबसादन असुराचा महर्षींच्या आज्ञेवरून वानरश्रेष्ठ केसरीनें वध केला असतां, महर्षींच्या प्रसादामुळें वायूपासून उत्पन्न झालेला मी वानर प्रवाहानेंहि त्याच्यासारखाच निजपलों, हें मी तुला आणखी एकदां सांगून ठेवितों. "

## सर्ग छत्तिसावा.

### सीतेला अंगठी देणें.

महातेजस्वी वायुपुत्र हनुमान सीतेला विश्वास येण्याकरितां पुनरपि नम्रपणानें तिला म्हणाला, " हे महाभाग्यवति, मी बुद्धिमान रामाचा दूत वानर आहें. हे राजपत्नि, रामनामानें अंकित अशी ही माझ्यापाशीं असलेली अंगठी तूं पहा. तुला विश्वास पटण्याकरितां त्या महात्म्यानें दिलेली ही अंगठी मीं तुझ्याकडे आणिली आहे. तुझें देव बरें करो. तूं आतां धैर्य धर. तुझ्या पूर्वसंचित पापाचें दुःखदायक फल आतां संपलें आहे. "

भर्त्याचें तें हस्तभूषण हातांत घेऊन ती जानकी पाहूं लागली असतां, जशी कांहीं भर्त्याची गांठ पडल्याप्रमाणें तिला आनंद झाला. आरक्त व शुक्ल वर्णांनीं युक्त असलेले नेत्र ज्याच्यावर आहेत, असें तें तिचें सुंदर मुख ग्रहण सुटलेल्या नक्षत्राधिपति चंद्राप्रमाणें आल्हादकारक झालें; आणि हस्तभूषण पाहिल्यानंतर भर्त्याच्या निरोपानें आनंदित झालेली ती विनयशील बाला सीता सर्वस्वी संतुष्ट होऊन आदरपूर्वक त्या महाकपीची प्रशंसा करूं लागली. ती म्हणाली, " हे

वानरश्रेष्ठा, ज्या एकट्यानें तूं ह्या राक्षसस्थानामध्यें प्रवेश केलास, तो तूं पराक्रमी, समर्थ व बुद्धिमान आहेस. मकरांचें निवासस्थान असलेला हा सागर शंभर योजनें विस्तीर्ण आहे; परंतु पराक्रमानें स्तुतीस पात्र झालेल्या त्वां ह्याला गाईच्या पावलाप्रमाणें करून टाकिलें आहे. हे वानरश्रेष्ठा, ज्या तुला रावणापासूनहि त्रास अथवा उद्वेग प्राप्त झाला नाहीं, त्या तुला मी कांहीं सामान्य वानर समजत नाहीं. हे कपिश्रेष्ठा, स्वपराक्रमानें प्रसिद्ध असलेल्या त्या रामानें जर तुला पाठविलें असेल, तर माझ्याशीं भाषण करण्यास तूं योग्य आहेस. तो अजिंक्य राम परीक्षा केल्यावांचून आणि पराक्रम पाहिल्यावांचून विशेषतः माझ्याकडे कोणाला पाठविणार नाहीं. धर्मात्मा सत्यप्रतिज्ञ राम व त्याचप्रमाणें सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणारा महातेजस्वी लक्ष्मण कुशल आहे, हें सुदैवच समजलें पाहिजे. परंतु ककुत्स्थकुलोत्पन्न राम जर कुशल आहे, तर प्रलयकालीं उत्पन्न झालेल्या अग्नीप्रमाणें हा कोपानें समुद्रवलयांकित पृथ्वी दग्ध करून कां टाकीत नाहीं ? अथवा ते उभयतां राम-लक्ष्मण देवांचाहि निग्रह करण्यास समर्थ आहेत; परंतु माझ्याच दुःखाचा अंत होण्याची वेळ अद्यापि आली नाहीं, असें मला वाटतें."

### रामविषयक पृच्छा.

सीता म्हणतेः—"हे वानरश्रेष्ठा, राम कष्टी झाला नाहींना ? तो काळजी करीत नाहींना ? तो पुरुषश्रेष्ठ माझी मुक्तता करण्याचे पुढील उद्योग करीत आहेना ? दीन होऊन गोंधळून जाऊन काय करावें, हें त्याला सुचेनासें झालें नाहींना ? तो राजपुत्र वीराला योग्य अशींच कर्त्यें करीत आहेना ? सौम्य आणि कडक अशा दोन्ही प्रकारांनीं धर्म, अर्थ आणि काम हे त्रिविध पुरुषार्थ प्राप्त होण्याचे उपाय, आणि त्याचप्रमाणें सामदानादिक उपाय ह्यांचें तो अवलंबन करीत आहेना ? त्याच्या मित्रांना विजयाची इच्छा आहेना ? आणि त्याचप्रमाणें मित्राकरितां तो पराकाष्ठेचा तापहि सहन करीत आहेना ? तसाच तो मित्र संपादन करीत असून मित्रहि त्याला येऊन मिळत आहेतना ? तसेच त्याचे मित्र कल्याणकर्ते असून ते त्याला मान देत आहेतना ? तो राजपुत्र देवतांची कृपा संपादन करण्याची इच्छा धरीत आहेना ? आणि दैव व प्रयत्न ह्या दोहोंचें तो अवलंबन करीत आहेना ? मी दूर झाल्यामुळें माझ्याविषयीं त्याचें प्रेम नाहींसें तर झालें नाहींना ? व ह्या संकटापासून तो राघव मला मुक्त करणार आहेना ? नेहमीं सुखाचा उपभोग घेण्यामध्येंच ज्याचे पहिले दिवस गेले आणि दुःखाचा अनुभव ज्याला मुळींच आलेला नाहीं, तो राम

नंतर दुःख प्राप्त झाल्यामुळें धैर्यहीन तर झाला नाहींना ? कौसल्या, सुमित्रा, आणि त्याचप्रमाणें भरत ह्या सर्वांचेंहि कुशल वृत्त वारंवार त्याच्या कानांवर येत असतेंना ? संन्मानासच पात्र असलेला तो रघुवंशज राम माझ्याकरितां उत्पन्न झालेल्या शोकामुळें संतप्त झाला आहेना ? माझ्याशिवाय दुसरीकडे त्याचें मन नाहींना ? तो मला ह्या संकटांतून तारणार आहेना ? भ्रातृवत्सल भरतमंत्र्यांनीं रक्षण केलेली एक अक्षौहिणी भयंकर सेना माझ्याकरितां पाठविणार आहेना ? हे वानराधिपते हनुमाना, वैभवशाली सुग्रीव हा दंत व नखें ह्या अयुधांनीं युक्त असलेल्या वीर वानरांनीं परिवेष्टित होऊन माझ्याकरितां येणार आहेना ? सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणारा अस्त्रवेत्ता शूर लक्ष्मण बाणसमूहानें राक्षसांना उडवून देईलना ? रामाच्या हातून भयंकर अस्त्रांच्या योगानें सुहृज्जनांसहवर्तमान वध पावलेला रावण थोडक्याच वेळांत मी अवलोकन करीनना ? प्रखर उन्हानें सरोवरांतील पाणी आटून गेलें असतां कमल ज्याप्रमाणें शुष्क होऊन जातें, त्याप्रमाणें सुवर्णासारखें तेजस्वी आणि पद्मासारखें सुगंधि असें त्या रामाचें मुख माझ्या वियोगामुळें उत्पन्न झालेल्या शोकानें दीन होऊन शुष्क तर होत चाललें नाहींना ? धर्माकरितां स्वराज्याचा त्याग करून मलाहि बरोबर अरण्यामध्यें घेऊन जाणाऱ्या ज्या पादचारी रामाला त्या वेळीं भय अथवा दुःख झालें नाहीं, तो इक्ष्वाकुकुलभूषण राम मनामध्यें तसेंच धैर्य धरून राहिला आहेना ? हे वानरश्रेष्ठा, माझें ज्याप्रमाणें त्याच्यावर प्रेम आहे, त्याप्रमाणें पित्याचेंहि त्याच्यावर प्रेम नव्हतें; मातेचेंहि नाहीं आणि दुसऱ्याहि कोणाचें नाहीं; मग माझ्यापेक्षां त्याच्यावर अधिक प्रेम करणाऱ्याची तर गोष्टच नको. तस्मात्, जोंपर्यंत ह्या प्रिय रामाचा वृत्तांत माझ्या कानावर येत राहील, तोंपर्यंतच मी जीविताची आशा धरून राहीन."

### रामस्थितिकथन.

ह्याप्रमाणें गंभीर अर्थानें युक्त आणि मधुर शब्दांनीं भरलेलें भाषण त्या वानरराजाशीं करून रामाविषयीं ज्यांत हकीकत आहे असें त्याचें चित्तवेधक भाषण श्रवण करण्याकरितां ती राजपत्नि स्तब्ध राहिली. सीतेचें भाषण श्रवण केल्यावर महापराक्रमी मारुती मस्तकीं हात जोडून तिला म्हणाला, "कमलनयन रामाला तूं येथें असल्याचें विदित नाहीं, आणि म्हणूनच शचीला घेऊन जाणाऱ्या इंद्राप्रमाणें तो तुला येथून सत्वर घेऊन जात नाहीं. माझें भाषण

ऐकताक्षणीं वानरगण आणि ऋक्षगण ह्यांनीं युक्त असलेली प्रचंड सेना बरोबर घेऊन रघुवंशज राम सत्वर येथून निघेल; आणि अक्षोभ्य अशा सागराचें बाणसमुदायांनीं स्तंभन करून तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम ह्या लंका नगरींतील राक्षसांचा नाश करून टाकील, इतकेंच नव्हे, परंतु त्याच्या त्या मार्गामध्यें देव, मृत्यु अथवा महादैत्य जरी आड आले, तरी त्यांचा सुद्धां तो वध करील. हे साध्वि, सिंहानें जर्जर केलेल्या गजाला ज्याप्रमाणें चैन पडत नाहीं, त्याप्रमाणें तूं दृष्टीआड झाल्यामुळें शोकानें व्याप्त झालेल्या रामाला चैन पडत नाहीं. राजपत्नि, मनोहर कुंडलें, उत्कृष्ट नेत्र आणि परिपक्व तोंडल्याप्रमाणें आरक्तवर्ण ओष्ठ ह्यांनीं युक्त व उदय पावलेल्या पूर्णचंद्राप्रमाणें आल्हादकारक असें रामाचें मुख तूं लवकरच अवलोकन करशील, हें मी तुला मुळें, फळें ह्यांची आणि मंदर, मलय, विंध्य, मेरु व दर्दुर ह्या पर्वतांची शपथ वाहून सांगतों. ऐरावताच्या मस्तकावर बसलेल्या इंद्राप्रमाणें प्रस्रवण पर्वतावर बसलेल्या रामाला हे वैदेहि, तूं लवकरच अवलोकन करशील. राम मांस भक्षण करीत नाहीं, आणि मद्यहि सेवन करीत नाहीं. फक्त शास्त्रविहित असें वनांतील ओदनच तो नित्य एक वेळ संध्याकाळीं सेवन करीत असतो. रामाचें अंतःकरण तुझ्या ठिकाणींच खिळून गेलें असल्यामुळें डांस, माशा, कीटक आणि सर्पहि तो आपल्या शरिरापाशीं आलेले दूर करीत नाहीं. राम एकसारखा चिंताक्रांत झालेला असून सर्वदा शोक करीत असतो. कामाधीन होऊन गेलेल्या त्या रामाच्या मनांत तुझ्याशिवाय दुसरा कांहीं विचार येत नाहीं. राम नेहमीं जागाच असतो; आणि कदाचित् जरी त्याला झोंप लागली, तरी ‘ सीता ’ अशी मधुर वाणी उच्चारीत उच्चारीतच तो जागा होतो. फल, पुष्प अथवा स्त्रियांचें मन हरण करणारी अशी दुसरी कांहीं वस्तु दृष्टीस पडली, म्हणजे ‘ हे प्रिये, ’ असें सुस्कारा टाकीत टाकीत तो बोलूं लागतो. हे राजपत्नि, तो नेहमीं शोक करीत असतो. ‘ सीता ’ म्हणून तुलाच उद्देशून बोलत असतो. ब्रह्मचर्य व्रतानें राहिलेला तो महात्मा राजपुत्र तुझ्याच प्राप्तीकरितां प्रयत्न करीत असतो. ”

ह्याप्रमाणें प्रथमतः रामाचा वृत्तांत निवेदन केल्यामुळें शोकरहित झालेली परंतु राम शोक करीत आहे, असें ऐकिल्यामुळें पुनरपि त्याच्यासारखा शोक करूं लागलेली ती विदेहराजकन्या सीता, मुद्रा वरचेवर पालटूं लागल्यामुळें आकाशामध्यें थोडथोडे मेघांचे छद्दे राहिले असतांना शरदृतूंतील चांदणी रात्र

ज्याप्रमाणें शोभूं लागते, त्याप्रमाणें शोभूं लागली. सारांश, रामाला एकसारखा आपला ध्यास लागून राहिलेला आहे, असें ऐकतांक्षणीं सीतेची मुद्रा आनंदित दिसूं लागली. अशा रीतीनें तिच्या मुद्रेमध्यें वारंवार फेर पडूं लागल्यामुळें, शरदृतूमध्यें आकाशांत इकडे तिकडे मेघांचे कांहीं छट्टे अवशिष्ट असतांना चांदण्या रात्रीं चंद्र ज्याप्रमाणें वारंवार मेघानें आच्छादित व मेघनिर्मुक्त होऊं लागल्यामुळें पुनः पुनः आल्हादकारक व आनंदनाशक भासूं लागतो, त्याप्रमाणें तिची ती मुद्रा भासूं लागली.

---

## सर्ग सदातिसावा.

### हनुमानसीतासंवाद.

पूर्णचंद्रासारख्या आल्हादकारक मुखानें युक्त असलेली ती सीता तें बोलणें ऐकून घेऊन धर्म व अर्थ यांना अनुसरून असलेलें भाषण हनुमानाशीं करूं लागली. ती म्हणाली, "हे वानरा, रामाचें मन दुसरीकडे नाहीं, आणि तो एकसारखा शोक करीत आहे, हें तूं केलेलें भाषण विषमिश्र अमृताप्रमाणें मला भासत आहे. प्रचंड ऐश्वर्याचें अथवा भयंकर संकटाचे ठिकाणीं पुरुषाला दैव जसें कांहीं दोरी बांधून ओढूनच नेत असतें. हे वानरश्रेष्ठा, प्राण्यांना खरोखर दैवाचें उल्लंघन करितां येत नाहीं. कारण, सुमित्रापुत्र लक्ष्मण, मी आणि राम हे सर्व पहा कसे संकटामध्यें सांपडलों आहों. ज्याची नाव बुडालेली आहे, असा पराक्रमी पुरुष सागरामध्यें पोहतां पोहतां ज्याप्रमाणें मोठ्या पराकाष्ठेनें तीराला जाऊन पोहोंचतो, त्याप्रमाणें रघुवंशज राम कसा बरें हा शोकसमुद्र उल्लंघून जाईल? राक्षसांचा वध करून, रावणाचाहि घात करून आणि लंकेचा विध्वंस करून केव्हां बरें भर्ता मला अवलोकन करील? असो. 'त्वरा कर' म्हणून तूं त्या भर्त्याला सांग. कारण, जोंपर्यंत ही वर्षाची मुदत संपली नाहीं, तोंपर्यंत माझें जीवित आहे. हे वानरा, दुष्ट रावणानें जी मला मुदत दिली आहे, तिचा हा दहावा महिना सुरू असून दोनच महिने अवशिष्ट राहिले आहेत. भ्रात्या बिभीषणानें मला परत पाठविण्याविषयीं त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न केला; परंतु त्याच्या सांगण्याप्रमाणें वागण्याची त्याला बुद्धि होत नाहीं. मला पुनरपि रामाचे स्वाधीन

करणें, ही गोष्ट रावणाला रुचत नाहीं. कारण, कालाच्या कचाट्यांत सांपड-लेल्या त्या रावणाची मृत्यु युद्धामध्यें वाट पाहात आहे. हे वानरा, बिभीषणाची कला म्हणून एक ज्येष्ठ कन्या आहे. त्या कन्येला स्वतः तिच्या मातेनें पाठविलें असतां ती मला म्हणाली, 'अविंध्य म्हणून एक मोठा बुद्धिवान व विद्वान राक्षस आहे. तो धैर्यवान, सुशील व वृद्ध असून रावणाला फारच मान्य आहे. त्यानें रामाच्या हातून राक्षसांचा लवकरच क्षय होणार आहे, असें रावणाला कळविलें; परंतु तो दुरात्मा त्याच्या हितकारक भाषणाकडे लक्ष्य देत नाहीं.' तस्मात्, हे वानरश्रेष्ठा, लवकरच मला पति प्राप्त करून घेईल, अशी मला आशा वाटत आहे. कारण, माझा अंतरात्मा शुद्ध असून हा माझा मनोरथ सिद्धीस नेण्याला योग्य असे पुष्कळच गुण त्या माझ्या भर्त्याचे ठिकाणीं आहेत. उत्साह, उद्योग, बल, दया, कृतज्ञता, शौर्य आणि प्रभाव हे गुण महात्म्या राघवाच्या ठिकाणीं आहेत. अरे, जनस्थानामध्यें चौदा हजार राक्षसांचा आपल्या भ्रात्याचेंहि सहाय्य न घेतां ज्यानें वध केला, त्याचा कोणता बरें शत्रु गर्भ-गळीत होणार नाहीं? कितीहि संकटें आलीं तरी तो पुरुषश्रेष्ठ त्यांना हार जाणें शक्य नाहीं. इंद्राणीला ज्याप्रमाणें इंद्राचा अनुभव आहे, त्याप्रमाणें मला त्याचा प्रभाव विदित आहे. हे वानरा, शरसमुदायरूप किरणांनीं युक्त अस-लेला रामरूप शूर सूर्य राक्षसशत्रुरूप उदक शुष्क करून टाकील."

ह्याप्रमाणें रामाकरितां उत्पन्न झालेल्या शोकानें जर्जर झालेली ती रामपत्नी सीता भाषण करीत असतांना तिच्या तोंडावर अश्रूंचे ओघळ आले. तेव्हां हनुमान तिला म्हणाला, "माझें भाषण श्रवण करितांक्षणीं वानर आणि ऋक्ष ह्यांच्या समुदायांनीं व्याप्त असलेली प्रचंड सेना बरोबर घेऊन तो राघव त्वरित इकडे येईल. अथवा राक्षसामुळें प्राप्त झालेल्या ह्या दुःखापासून मीच आजच्या आज तुझी सुटका करून टाकितों. हे निर्दोष सीते, तूं माझ्या पाठीवर बैस. तुला पाठुंगळीला घेऊन मी समुद्र तरून जाईन. इतकेंच नव्हे, परंतु रावणा-सहवर्तमान लंकाहि समुद्राच्या पलीकडे घेऊन जाण्याचें माझें सामर्थ्य आहे. हे मैथिलि, हवन केलेलें द्रव्य ज्याप्रमाणें अग्नि इंद्राकडे नेऊन पोहोंचवितो, त्याप्रमाणें प्रस्रवण पर्वतावर बसलेल्या राघवाकडे मी आजच तुला नेऊन पोहों-चवितों. हे वैदेहि, दैत्यवधार्थ उद्युक्त झालेल्या विष्णूप्रमाणें रावणाच्या वधा-विषयीं उद्युक्त झालेल्या रामाला लक्ष्मणासहवर्तमान तूं आजच अवलोकन कर-शील. सारांश, तुझ्या दर्शनाकरितां उत्सुक झालेला महाबलाढ्य राम पर्वतराज

प्रस्रवणाच्या माथ्यावरील आश्रमामध्यें इंद्राप्रमाणें बसलेला तूं अवलोकन करशील. ह्यास्तव हे राजपत्नि, तूं माझ्या पाठीवर बैस. हे कल्याणि, मनामध्यें कसलीहि शंका आणूं नको. चंद्राशीं समागम पावणाऱ्या रोहिणीप्रमाणें रामाचा समागम करण्याचें आज तूं मनामध्यें आण 'रामाची भेट आजच होऊं दे' इतकीं अक्षरें तुझ्या तोंडून निघतात न निघतात तोंच चंद्राशीं समागम पावणाऱ्या रोहिणीप्रमाणें तुला रामाची भेट होईल. तस्मात्, तूं माझ्या पाठीवर बैस, आणि आकाशमार्गाचें अवलंबन करून महासागर तरून जा. बाई, तुला घेऊन मी येथून चालता झालों असतां लंकेमध्यें वास्तव्य करणाऱ्यांपैकीं कोणीहि माझ्या मागोमाग येण्यास समर्थ नाहीं. हे वैदेहि, पहा तर खरें. जसा मी येथें आलों, तसाच तुला घेऊन निःसंशय आकाशमार्गानें परत जाईन."

ह्याप्रमाणें वानरश्रेष्ठ हनुमानाच्या मुखांतून अद्भुत भाषण श्रवण केल्यावर मिथिलराजकन्या सीतेच्या सर्व शरिरावर हर्षानें रोमांच उठले, आणि ती हनुमानाला म्हणाली, "हनुमंता, इतक्या दीर्घ मार्गाचें उल्लंघन करून तूं मला घेऊन जाण्याचें कसें मनामध्यें आणीत आहेस ? हे वानरसेनाधिपते, ही तुझी मला खरोखरी मार्कडचेष्टाच वाटत आहे. अरे वानरश्रेष्ठा, तुझें शरीर अल्प असतांना माझ्या मानवराज भर्त्याचे समीप तूं मला येथून नेण्याची इच्छा करीत आहेस, ह्याला काय म्हणावें ?"

सीतेचें हें भाषण ऐकून सीतेनें हा आपला अपमानच केला, असें त्या शरीरसंपत्तिमान हनुमानाला वाटूं लागलें, आणि तो मनांत म्हणाला, "कृष्णवर्ण नेत्रांनीं युक्त असलेल्या विदेदराजकन्या सीतेला माझें बल अथवा प्रभाव विदित नाहीं. तस्मात्, आज एकदां स्वेच्छेप्रमाणें बनणारें माझें रूप तिला अवलोकन करूंच द्या."

ह्याप्रमाणें विचार करून त्या शत्रुनाशक वानरश्रेष्ठानें सीतेला आपलें स्वरूप दर्शविलें. तात्पर्य त्या विचारी वानरश्रेष्ठानें त्या वृक्षावरून उडी मारून सीतेला विश्वास येण्याकरितां आपला देह वृद्धिंगत करण्याला आरंभ केला; आणि मेरुमंदरतुल्य शरीर धारण करून प्रदीप्त अग्नीसारख्या तेजानें व्याप्त झालेला तो वानरश्रेष्ठ सीतेच्या समोर येऊन उभा राहिला. नंतर ताम्रवर्ण मुख आणि वज्रतुल्य दंष्ट्रा व नखें ह्यांनीं युक्त असलेला तो महाबलाढ्य व भयंकर वानर सीतेला म्हणाला, "पर्वत, वनप्रदेश, गच्च्या, कोट, वेशी आणि अधिपति ह्यांसहवर्तमान ही लंका नगरी घेऊन जाण्याचें मला सामर्थ्य आहे. तस्मात्,

हे राजपत्नि, तुला आलेली शंका सोडून देऊन माझ्या सामर्थ्याविषयीं तूं आपल्या मनाचा निश्चय करून ठेव; आणि लक्ष्मणासहवर्तमान राघवाला आपल्या दर्शनानें तूं शोकमुक्त करून टाक."

इतकें झाल्यावर कमलपत्रांप्रमाणें विशाल नेत्रांनीं युक्त असलेली ती जनककन्या सीता वायूच्या त्या पर्वतप्राय औरस पुत्राला म्हणाली, "हे महाकपे, तुझें धैर्य व बल मी जाणीत असून, वायूप्रमाणें असलेली तुझी गति आणि अग्नीप्रमाणें असलेलें तुझें अद्भुत तेजहि मला विदित आहे. हे वानरसेनाधिपते, अरे, दुसरा एखादा सामान्य वानर अपार समुद्राचें उल्लंघन करून ह्या भूमीवर येईल कसा? येथून परत जाण्याचें आणि मला घेऊन जाण्याचें तुझें सामर्थ्य मी जाणीत आहें; परंतु तूं ज्याप्रमाणें आपल्या कार्यसिद्धीचा सत्वर विचार केला आहेस, त्याप्रमाणें मलाहि स्वत:संबंधानें अवश्य विचार केला पाहिजे. सारांश, हे वानरश्रेष्ठा, तुझ्याबरोबर मला जाणें योग्य नाहीं. वायूप्रमाणें तुझा वेग असल्यामुळें तो मला मूर्च्छा आणील. आकाशामध्यें मी अगदीं उंच उंच गेलें, म्हणजे वेगावेगानें जाणाऱ्या तुझ्या पाठीवरून समुद्रांत पडेन. तिमि, नक्र व मत्स्य ह्यांनीं व्याप्त झालेल्या अशा सागरामध्यें मी निचेष्ठ पडलें असतां जलचर प्राण्यांचें उत्कृष्ठ अन्नच सत्वर होऊन जाईन. शिवाय हे शत्रुनाशका, तुझ्याबरोबर मला जातांहि येणार नाहीं. कारण स्त्रीसहवर्तमान तूं जाऊं लागलास, म्हणजे इतरांना खचित संशय येईल. तूं मला घेऊन जात आहेस, असें दृष्टीस पडल्यावर दुरात्म्या रावणानें पाठविलेले भयंकर पराक्रमी राक्षस मागोमाग येतील. हातामध्यें शूल व मुद्गर घेऊन ते शूर राक्षस तुला वेढून टाकतील. तेव्हां हे वीरा, माझ्यामुळें तुझ्यावर व माझ्यावरहि प्राणांत संकट येईल. आयुधें बरोबर घेतलेले असे राक्षस पुष्कळ येतील, आणि तुझ्यापाशीं तर आयुध मुळींच नाहीं. तेव्हां आकाशामध्यें त्यांशीं तोंड देण्यास आणि माझें रक्षण करण्यास तूं कसा समर्थ होशील? हे वानरश्रेष्ठा, त्या क्रूरकर्मी राक्षसांसहवर्तमान तुझें युद्ध होऊं लागलें म्हणजे मी भयभीत होऊन तुझ्या पाठीवरून खालीं पडेन; अथवा प्रचंड, बलाढ्य व भयंकर राक्षस युद्धामध्यें कसा तरी तुझा पराभव करतील; किंवा युद्ध करितां करितां तूं पराङ्मुख झालास, म्हणजे मी खालीं पडेन. तेव्हां खालीं पडलेल्या मला ते दुष्ट राक्षस पुन: घेऊन जातील. सारांश, राक्षस तुझ्या हातून मला ओढून तरी नेतील, किंवा तेथल्या तेथेंच मला फाडून टाकतील. कारण, युद्धामध्यें जय किंवा पराजय खात्रीनेंच होईल,

असें सांगतां येत नाहीं. राक्षसांनीं सर्व प्रकारें मला धमकी दिली असतां मीहि मरून जाईन; आणि असें झालें म्हणजे तुझा प्रयत्न निष्फळच होईल. सर्व राक्षसांचा वध करण्यास खरोखर तूंहि समर्थ आहेस; परंतु तूं राक्षसांचा वध केलास, तर रामाचा नांवलौकिक जाईल; अथवा त्या वानरांना आणि रामालाहि विदित नाहीं, अशा एखाद्या गुप्त ठिकाणीं राक्षस मला नेऊन ठेवितील. असें झालें म्हणजे माझ्याकरितां झालेला हा तुझा खटाटोप व्यर्थ जाईल. तुझ्या-सहवर्तमान रामाच्या येण्यांत मोठा लाभ आहे. हे महापराक्रमी हनुमाना, अमित-तेजस्वी राम, त्याचे भ्राते, तूं आणि राजकुल ह्या सर्वांचें जीवित माझ्यावर अवलं-बून आहे. तस्मात्, माझ्याकरितां शोक व संताप ह्यांनीं कृश झालेले ते राम-लक्ष्मण माझ्या प्राप्तीविषयीं निराश झाले असतां सर्व ऋक्ष आणि वानर ह्यांसहवर्तमान प्राणत्याग करतील. हे वानरश्रेष्ठा, भर्त्यांचे ठिकाणीं अतिशयच भक्ति असल्या-मुळें त्या रामावांचून दुसऱ्या कोणाच्याहि शरिराला आपण होऊन स्पर्श कर-ण्याची माझी इच्छा नाहीं. रावणाच्या शरिराचा स्पर्श मला झाला आहे, परंतु तो माझ्या इच्छेविरुद्ध झाला आहे. मी अनाथ, स्वतः असमर्थ आणि पराधीन असल्यामुळें करणार काय? सारांश, रघुकुलवंशजश्रेष्ठ राम राक्षसांसहवर्तमान रावणाचा जर जेथें वध करील आणि येथून मला घेऊन जाईल, तर तें त्याला शोभण्यासारखें होईल. रणामध्यें शत्रूंचें मर्दन करणाऱ्या त्या महात्म्या रामाचे पराक्रम मीं ऐकिले आहेत, व प्रत्यक्ष पाहिलेहि आहेत. त्यावरून देव, गंधर्व, भुजंग आणि राक्षस ह्यांपैकीं कोणाच्यानेंहि युद्धामध्यें रामाची बरोबरी होणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. अद्‌भुत धनुष्य ज्यानें हातांत घेतलें आहे, असा तो इंद्रतुल्य पराक्रमी महाबलाढ्य राम लक्ष्मणासहवर्तमान वायूनें प्रोत्सा-हन दिलेल्या प्रदीप्त अग्नीप्रमाणें युद्धामध्यें उभा राहिलेला अवलोकन केल्यावर त्याच्याशीं संग्राम करण्यास कोण बरें समर्थ होणार आहे? हे वानरश्रेष्ठा, संग्रामामध्यें शत्रूंचा धुव्वा उडवून देणारा, मत्त गजाप्रमाणें अचल राहणारा, आणि बाणरूप किरणांनीं युक्त झाल्यामुळें प्रलयकालच्या सूर्यासारखा दिस-णारा जो राम, त्याला युद्धामध्यें कोण बरें सहन करील? हे वानरश्रेष्ठा, तो तूं त्या माझ्या प्रियाला लक्ष्मण आणि वानरसेनाधिपति सुग्रीव ह्यांसहवर्तमान सत्वर इकडेच घेऊन ये; आणि हे वानरवीरा, पुष्कळ दिवसपर्यंत रामाकरितां शोक करून कृश झालेल्या मला तूं हर्षयुक्त कर."

# सर्ग अडतिसावा.

## सीतेचा निरोप.

संभाषण करण्यामध्यें निपुण असलेला तो वानरश्रेष्ठ हनुमान सीतेच्या त्या भाषणानें संतुष्ट झाला, आणि तिला म्हणाला, "हे देवि, हे जनककुलनंदिनि, हे शुभदर्शने, तूं हें योग्य भाषण केलेंस. हें स्त्रीस्वभावाला आणि पतिव्रतांच्या विनयाला शोभणारेंच आहे. तूं स्त्री असल्यामुळें माझ्या पाठुंगळीस बसून शंभर योजनें विस्तीर्ण असा विशाल समुद्र उल्लंघन करून जाण्यास समर्थ नाहींस. हे विनयसंपन्न जनककन्ये सीते, रामाशिवाय दुसऱ्याच्या शरिराला मी स्पर्श करणार नाहीं, हें जें दुसरें कारण तूं सांगत आहेस, तेंहि त्या महात्म्याच्या तुज पत्नीलाच शोभण्यासारखें आहे. हे देवि, तुझ्याशिवाय दुसरी कोणती बरें स्त्री दुर्धर प्रसंग येऊन ठेपला असतांहि अशा प्रकारचें भाषण करण्यास तयार होईल ? हे देवि, तूं जी वागणूक केलीस, आणि माझ्या समक्ष जें भाषण केलेंस, तें सर्व अगदीं कांहींएक शिल्लक न राहातां ककुत्स्थकुलोत्पन्न रामाच्या कानावर जाईल. रामाचें प्रिय करण्याची इच्छा, प्रेमामुळें अंतःकरणामध्यें उत्पन्न झालेला द्रव, वगैरे अनेक कारणें झाल्यामुळें मीं असें भाषण केलें. शिवाय महासागर दुस्तर असल्या कारणानें रामादिकांचा लंकेमध्यें प्रवेश होणें दुर्घट असल्यामुळें, आणि तुला घेऊन जाण्याचें माझ्या अंगीं सामर्थ्य असल्यामुळें मी असें बोललों. आतां रघुवंशजांना आनंद देणाऱ्या रामाला आजच्या आजच येथें तुझ्याकडे आणावें, अशी माझी इच्छा आहे. अतिशय प्रेमानें व भक्तीनें जें तुझ्या मुखांतून निघालें आहे, तें खोटें होणार नाहीं. हे निर्दोष सीते, माझ्या बरोबर येण्याची जर तुझी इच्छा नसेल, तर रामाला ओळखितां येईल, अशी कांहीं तरी खूण तूं माझ्यापाशीं दे."

ह्याप्रमाणें हनुमानानें सांगितलें असतां, देवकन्येसारखी असलेली ती सीता कंठ दाटून आल्यामुळें अस्पष्ट शब्द उच्चारित उच्चारित हळू हळू वानराधिपति हनुमानाला म्हणाली, "चित्रकूट पर्वताच्या पायथ्याशीं ईशान्येच्या बाजूला तापसाश्रमामध्यें वास्तव्य करीत असतांना जी गोष्ट घडून आली, तीच श्रेष्ठ खूण म्हणून तूं माझ्या प्रियाला कथन कर. तूं त्याला माझा निरोप असा सांग कीं, हे रामा, मंदाकिनीच्या समीपच सिद्धांनीं वास्तव्य केलेल्या त्या प्रदेशां-

तील नानाप्रकारच्या पुष्पांनीं सुगंधयुक्त झालेल्या उपवनांतून विहार करून तूं उदकानें आर्द्र झाल्यावर एकदां माझ्या अंकावर टेकून बसला होतास. तदनंतर तेथें आलेला तो काक पक्षी चोंचीनें मला टोचूं लागला. तेव्हां मी मातीचें डिखूळ उगारून त्याला हांकूं लागलें, परंतु तो मला ओरखडीत ओरखडीत तेथेंच घोंटाळूं लागला. त्याला कांहीं तरी भक्ष्य हवें असल्यामुळें माझ्या वक्षःस्थलांतील मांस काढितांना तो बलिभक्षक काक थांबेना. तेव्हां मी त्या पक्ष्यावर क्रुद्ध होऊन कमरपट्टा वर सारूं लागलें असतां, माझें नेसण सुटूं लागलें. अशा वेळीं तुझी माझ्याकडे दृष्टि गेली. तेव्हां तूं मला हंसलास; परंतु क्रुद्ध आणि भक्ष्यलोलुप काक पक्ष्यानें ओरखडल्यामुळें अतिशय लज्जित झालेली मी तुझ्याजवळ आलें. तदनंतर तूं तेथें बसला असतांना मी श्रमलें असल्यामुळें तुझ्या अंकावर बसलें. मला तर राग आल्यासारखा झाला होता; परंतु तूं हंसत हंसत माझें सांत्वन केलेंस. काक पक्ष्यानें क्षुब्ध करून टाकिल्यामुळें माझें मुख अश्रूंनीं भरून गेलें असतांना आणि हळू हळू मी आपले डोळे पुशीत असतांना तूं मला अवलोकन केलेंस. हे राघवा, हे भरताग्रजा रामा, श्रम झाल्यामुळें पाळीपाळीनें आपल्या अंकावर मी व माझ्या अंकावर आपण ह्या रीतीनें एकमेकांच्या अंकांवर आपण पुष्कळ वेळ पडलों; परंतु पुनरपि तो काक पक्षी तेथें आला, आणि मी झोंपेंतून जागी होऊन रामाच्या मांडीवरून उठून बसलें असतां एकाएकीं माझ्याकडे येऊन त्यानें माझें वक्षःस्थल ओरखडलें. अशा रीतीनें वारंवार तो पक्षी उडून जाई आणि वारंवार माझें वक्षःस्थल ओरखडून टाकी. तदनंतर रक्ताचे थेंब अंगावर पडल्यामुळें राम जागा झाला, आणि स्तनांचे मध्यभागीं ओरखडलेल्या मला अवलोकन करितांक्षणीं सर्पाप्रमाणें क्रुद्ध होऊन सुस्कारे टाकूं लागलेला तो महापराक्रमी राम मला म्हणाला, 'हे रंभोरु[1], तुझ्या स्तनांमध्यें कोणीं ओरखडलें? पंचमुखी क्रुद्ध नागासहवर्तमान कोण बरें क्रीडा करीत आहे?' असें मला विचारीत विचारीत तो इकडे तिकडे पाहूं लागला असतांच, ज्याचीं तीक्ष्ण नखें रक्तांनीं भरलेलीं आहेत, असा तो माझ्या समोरच बसलेला काक पक्षी त्याच्या दृष्टोत्पत्तीस आला. खरोखर पक्ष्यांमध्यें वस्ताद असलेला तो काक पक्षी इंद्राचा पुत्र होता; आणि वायूसारख्या गतीनें युक्त असलेला तो पक्षी रामाला अवलोकन करितांक्षणीं भूमीच्या बिळामध्यें सत्वर प्रविष्ट झाला. तेव्हां महापराक्रमी

1 जिच्या मांड्या केळीच्या गाभ्याप्रमाणें आहेत, अशी

रामाचे नेत्र कोपानें चढून गेले, आणि बुद्धिमानांमध्यें श्रेष्ठ असलेल्या रामाच्या मनांत त्या पक्ष्याविषयीं क्रूर विचार आला. दर्भास्तरणांपैकीं एक दर्भ घेऊन रामानें त्याचें ब्रह्मास्त्रानें अभिमंत्रण केलें असतां, तो प्रदीप्त झालेल्या कालाग्नी-प्रमाणें प्रज्वलित होऊं लागला. नंतर त्या रघुकुलभूषणानें त्या पक्ष्यावर तो प्रदीप्त दर्भ सोडिला असतां भूमीच्या बिळांतून निघून आकाशामध्यें उड्डाण केलेल्या त्या काक पक्ष्याच्या मागोमाग तो दर्भहि चालला. ह्याप्रमाणें दर्भ मागें लागला असतां, नानाप्रकारच्या गतीचें अवलंबन करून तो पक्षी उडूं लागला, आणि आपलें रक्षण व्हावें, एतदर्थ ह्या सर्व जगतामध्यें तो हिंडला; परंतु पित्यानें आणि त्याचप्रमाणें सर्व महर्षींनींहि जेव्हां त्याचा त्याग केला, तेव्हां त्रैलोक्य हिंडून शेवटीं तो त्या रामालाच शरण गेला. तेव्हां शरण येऊन भूमीवर पड-लेला तो पक्षी आपल्या दुराचरणानें जरी वधासच पात्र होता, तरी शरणा-गताचें रक्षण करणाऱ्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें दयेमुळें त्याचें रक्षण केलें. सारांश, शक्तिपात होऊन निस्तेज झालेल्या आणि उड्डाण करितां करितांहि खालीं पडूं लागलेल्या पक्ष्याला तो म्हणाला, 'हें ब्रह्मास्त्र व्यर्थ होणें शक्य नाहीं. तेव्हां ह्या अस्त्रापासून कशाचा नाश व्हावा, हें तूं मला कथन कर.' असें रामानें विचारिल्यानंतर ठरल्याप्रमाणें त्या काक पक्ष्याचा उजवा नेत्र त्या रामानें नाहींसा केला. ह्याप्रमाणें उजवा नेत्र देऊन काक पक्ष्यानें आपल्या प्राणांचें रक्षण केलें. तदनंतर त्या वीर रामानें जाण्याची अनुज्ञा दिली असतां, तो इंद्रपुत्र जयंत रामाला आणि दशरथ राजाला नमस्कार करून स्वस्थानीं परत गेला. तस्मात्, हे हनुमंता, तूं माझा असा निरोप रामाला कळीव कीं, 'हे भूपते, माझ्याकरितां यःकश्चित् काक पक्ष्यावर सुद्धां जर तूं ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला होतास, तर ज्यानें तुझ्यापासून मला हरण करून नेलें, त्याची तूं कशाकरितां क्षमा करीत आहेस ? तस्मात्, हे पुरुषश्रेष्ठा, जिच्या योगानें मला मोठा आनंद होणार आहे, अशी कृपा तूं माझ्यावर कर. हे नाथ, तुझ्यामुळें मी खरोखर सनाथ असतांना आज अनाथांप्रमाणें झालें आहें. अरे, दया हाच श्रेष्ठ धर्म म्हणून तुझ्या मुखांतूनच मीं ऐकिलें आहे; आणि तूं महावीर्यवान, मोठा उत्साही, महाबलाढ्य, आदिअंत न लागणारा, मनामध्यें न कचरणारा व गांभीर्यामुळें सागराची बरोबरी करणारा असा समुद्रवलयांकित पृथ्वीचा इंद्रतुल्य भर्ता असल्याचें मी जाणीत आहें; परंतु राघवा, ह्याप्रमाणें तूं अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ, बलाढ्य व

धैर्यवान असतांनाहि राक्षसांवर अस्त्रप्रयोग कशाकरितां करीत नाहींस ?' नाग, गंधर्व, देव आणि मरुद्गण ह्यांपैकीं कोणीहि प्रतिपक्षी ह्या नात्यानें रामाशीं संग्रामामध्यें युद्ध करण्यास आणि त्याचा वेग सहन करण्यास समर्थ नाहींत. त्या वीर्यवान रामाला माझ्यासंबंधानें जर कांहीं क्षोभ उत्पन्न झाला असेल, तर तीक्ष्ण बाणांनीं तो राक्षसांचा नाश कां करून टाकीत नाहीं ? किंवा भ्रात्याची अनुज्ञा घेऊन तो महाबलाढ्य शत्रुतापन वीर लक्ष्मण तरी कशाकरितां माझें रक्षण करीत नाहीं ? वायु आणि इंद्र ह्यांसारखे तेजस्वी व देवांनाहि अजिंक्य असे ते उभयतां पुरुषश्रेष्ठ राम-लक्ष्मण कशाकरितां माझी उपेक्षा करीत आहेत ? ज्या अर्थी ते शत्रुतापन राम-लक्ष्मण समर्थ असूनहि माझी पर्वा बाळगीत नाहींत, त्या अर्थी माझ्या हातूनच कांहीं तरी मोठें पातक घडलें आहे, ह्यांत संशय नाहीं."

अश्रु ढाळीत ढाळीत करुण स्वरानें सीतेनें केलेलें हें भाषण श्रवण करून वानरसेनाधिपति महातेजस्वी हनुमान तिला म्हणाला, "हे देवि, रघुवंशज रामाला तुझ्या शोकामुळें अगदीं सुचेनासें झालें आहे; आणि राम दुःखित झाल्यामुळें लक्ष्मणहि अतिशय चिंताग्रस्त झाला आहे, हें मी तुला शपथपूर्वक खरें खरें सांगतों. आतां कशी तरी तूं दृष्टीस पडली आहेस, तेव्हां ह्या क्षणापासून शोक करण्याची वेळ राहिली नाहीं. कारण हे कल्याणि, तूं आतां दुःखाचा नाश झालेला अवलोकन करशील. ते उभयतांहि तुझ्या दर्शनाकरितां उत्सुक असलेले महाबलाढ्य पुरुषश्रेष्ठ राजपुत्र तुझ्याकरितां त्रैलोक्याचेंहि भस्म करून टाकतील. हे विशालनयने, संग्रामामध्यें क्रूर कर्म करणाऱ्या त्या रावणाचा बांधवांसहवर्तमान वध करून राम तुला अयोध्या नगरीमध्यें घेऊन जाईल. तेव्हां रामाला काय निरोप सांगावयाचा आहे, महाबलाढ्य लक्ष्मणाला काय विदित करावयाचें आहे, आणि तेजस्वी सुग्रीवाला अथवा तेथें जुळलेल्या वानरांना काय कळवावयाचें आहे, तें मला सांग."

हनुमानाचें हें भाषण ऐकून सीता पुनरपि त्याला म्हणाली, "ज्या लोकनायकाला विचारी कौसल्या प्रसवली, त्याला तूं माझ्याकरितां मस्तकानें प्रणाम करून कुशल प्रश्न कर. माला, सर्व प्रकारचीं रत्नें, प्रिय स्त्रिया आणि संपूर्ण पृथ्वीमध्येंहि दुर्लभ ऐश्वर्य ह्यांचा त्याग करून आणि मातापितरांना सन्मानपूर्वक प्रसन्न करून घेऊन जो रामाचे मागोमाग चालता झाला, ज्याच्या योगानें सुमित्रा पुत्रवती झाली, जो धर्मात्मा अनुपम सुखाचा त्याग करून व अनुकूल वर्तन ठेवून वनामध्यें भ्रात्या रामाचें रक्षण करण्याकरितां त्याच्या मागोमाग

जात आहे, सिंहासारखे स्कंद, आजानुबाहु आणि आल्हादकारक मुद्रा यांनीं युक्त असलेला जो विचारी पुरुषश्रेष्ठ रामाशीं पित्याप्रमाणें वागत आहे, आणि मातेप्रमाणें जो माझ्याशीं वागला, त्या वीर लक्ष्मणाला रावण मला घेऊन जात असतांना समजलें नाहीं. जो वृद्धांचा समागम करणारा आहे, वैभवशाली व समर्थ असून जो मितभाषी आहे, राजपुत्र रामाला जो अतिप्रिय आहे, माझ्या सासऱ्यासारखी ज्याची वागणूक आहे, रामाला जो माझ्यापेक्षांहि नेहमींच अधिक प्रिय आहे, आजपर्यंत जें कार्य करण्याचा प्रसंग पडला नाहीं, तें कार्यहि जो वीर्यवान असल्यामुळें पार पाडीत आहे, आणि ज्याच्याकडे पाहून रामाला आपल्या निवृत्त झालेल्या पित्याचें स्मरण होईनासें झालें आहे, त्या लक्ष्मणाला तूं माझ्याकरितां कुशल प्रश्न कर. म्हणजे हे वानरश्रेष्ठा, नेहमीं सौम्य, शुचि, दक्ष आणि रामाला प्रिय असा तो लक्ष्मण माझें दुःख नाहींसें करील. हे वानरसेनाधिपते, हें माझें कार्य सिद्धीस जाण्याविषयीं मी तुझ्यावरच अवलंबून आहें. कारण तूं उपक्रम केलास म्हणजे राम माझ्याविषयीं यत्न करूं लागेल. माझा नाथ जो शूर राम, त्याला पुनः पुनः तूं माझा असा निरोप सांग कीं, "हे दशरथपुत्रा, मी एक महिनाभर जीव धरून राहीन. महिन्याच्या पुढें मी जिवंत राहाणार नाहीं, हें मी खरें खरें सांगून ठेवितें. तस्मात्, पातालामध्यें बुडून गेलेल्या पृथ्वीला ज्याप्रमाणें भगवानांनीं तारिलें, त्याप्रमाणें दुराचारी रावणानें कपट करून येथें अडकवून ठेविलेल्या मला तूं तार."

### सीतेचें हनुमंताला मणिप्रदान.

असा निरोप सांगितल्यानंतर पदरांत बांधून ठेविलेलें एक दिव्य व शुभ शिरोरत्न सीतेनें सोडिलें; आणि 'हें रामाला द्यावयाचें' असें म्हणून तिनें तें हनुमानाच्या स्वाधीन केलें. तें अनुपम श्रेष्ठ रत्न घेऊन वीर हनुमानानें तें आपल्या बोटाला घट्ट बांधून ठेविलें. तथापि तें रत्न स्वीकारण्यास मनापासून त्याचा हात धावला नाहीं. असो. शेवटीं तें श्रेष्ठ रत्न घेऊन त्यानें सीतेला अभिवंदन केलें; आणि प्रदक्षिणा केल्यावर नम्र होऊन तो तिच्या बाजूस उभा राहिला. सीतेचें दर्शन झाल्यामुळें त्याला मोठा हर्ष झाला, आणि राजलक्षणांनीं युक्त असलेल्या लक्ष्मणाचें व रामाचें त्याला स्मरण झालें. जनक राजाच्या कन्येनें राक्षसींना न दिसेल अशा युक्तीनें जवळ ठेविलेलें तें बहुमूल्य श्रेष्ठ रत्न घेतल्यानंतर, प्रथमतः सीतेचें दर्शन न झाल्यामुळें उच्च पर्वतावर असलेल्या पुरुषाप्रमाणें दुःखानें कंपित झालेला आणि नंतर सीतेचें दर्शन झाल्यामुळें कंपरहित झालेला तो हनुमान मनामध्यें प्रसन्न होऊन तेथून परत फिरण्यास उद्युक्त झाला.

# सर्ग एकोणचाळिसावा.

## वानरांच्या आगमनाविषयीं सीतेला शंका.

रत्न दिल्यानंतर सीता हनुमानाला म्हणाली, "खरोखर हें रत्न रामाच्या ओळखीचें आहे. हें रत्न अवलोकन केल्यावर मी, माता कौसल्या आणि दशरथ राजा ह्या तिघांचें त्या वीर रामाला स्मरण होईल. तस्मात् हे वानर-श्रेष्ठा, तुला हें कार्य हातीं घेण्याविषयीं प्रेरणा होईल; आणि प्रेरणा झाल्यानंतर पुढें काय करावयाचें त्याचा तूं विचार कर. हे वानरश्रेष्ठा, हें कार्य पार पाडण्याविषयीं तुझ्यावर भार आहे. ह्यास्तव रामानें कोणता प्रयत्न केला असतां दुःखाचा नाश होईल, तें तूं मनामध्यें आण. हे हनुमाना, यत्नाचें अवलंबन करून तूं माझ्या दुःखाचा परिहार कर."

सीतेचें हें भाषण ऐकून हनुमंतानें 'ठीक आहे' असें म्हटलें, आणि तो भयंकर पराक्रमी मारुती सीतेला मस्तकानें प्रणाम करून तेथून निघण्यास तयार झाला. तेव्हां देवी सीता कंठ दाटून आल्यामुळें अडखळत अडखळत त्याला म्हणाली, "हनुमाना, उभयतां राम-लक्ष्मणांना तूं कुशल सांग; आणि त्याच-प्रमाणें अमात्यांसहवर्तमान सुग्रीवाला व सर्व वृद्ध वानरांना तूं धर्माला अनुसरून कुशल सांग. सारांश, तो महापराक्रमी राम ह्या दुःखसागरापासून मला तारील, अशा रीतीनें तूं त्याचें मन वळीव. हे वानरश्रेष्ठा, मी जिवंत असतांना तो कीर्तिमान राम माझें रक्षण करील, असें भाषण तूं त्याच्याशीं कर; आणि संभाष-णाच्या योगानें मला दुःखांतून पार पाडण्याचा हा धर्म तुझ्या हातून होऊं दे. मी जे शब्द तुझ्याशीं बोललें, ते श्रवण केल्यावर नेहमीं उत्साहयुक्त असलेल्या दशरथपुत्र रामाचा माझ्या प्राप्तीकरितां अधिक अधिकच प्रयत्न होत जाईल. माझा निरोप तुझ्या मुखांतून श्रवण करितांक्षणींच वीर राम पराक्रम करण्याचा योग्य तो विचार करील."

सीतेचें हें भाषण श्रवण केल्यानंतर वायुपुत्र हनुमान मस्तकीं हात जोडून तिला म्हणाला, "श्रेष्ठ श्रेष्ठ वानर आणि अस्वलें बरोबर घेऊन ककुत्स्थकुलो-त्पन्न राम सत्वरच इकडे येईल; आणि शत्रूंना युद्धामध्यें जिंकून तो लवकरच तुझ्या दुःखाचा परिहार करील. राम बाण सोडूं लागला असतां त्याच्या समोर उभा राहण्यास समर्थ असा कोणीहि वीर मनुष्यांमध्यें, दैत्यांमध्यें अथवा देवां-

मध्यें माझ्या आढळण्यांत येत नाहीं. संग्राममध्यें सूर्याशीं, इंद्राशीं अथवा वैव-स्वत यमाशींहि युद्ध करण्यास तो समर्थ आहे. मग विशेषेंकरून तुझ्याकरितां तर तो त्यांच्याशींहि युद्ध करण्याचा प्रसंग पडला असतां मागेंपुढें पहाणार नाहीं. समुद्रवलयांकित पृथ्वीहि जिंकण्यास तो समर्थ आहे. तात्पर्य, हे राज-कन्ये, तुझ्याकरितां राम हवा त्याचा पराजय करणारा आहे."

ह्याप्रमाणें हनुमानानें केलेलें तें सत्य भाषण श्रवण करतांच तिला तें फारच महत्त्वाचें वाटलें, आणि तिनें त्याच्याशीं कांहीं भाषणहि केलें. सारांश, तो हनु-मान निघाला असतां सीता वारंवार त्याच्याकडे पाहूं लागली. भर्त्याच्या प्रेमाचा ज्यांत संबंध आहे, अशा त्या हनुमानाच्या भाषणाची प्रेमानें तिनें प्रशंसा केली. नंतर ती म्हणाली, " हे शत्रुदमना वीरा, कोणत्या तरी गुप्त प्रदेशामध्यें वाटेल तर तूं एक दिवस रहा. तूं विश्रांती घेऊन उद्यां जाशील. असें झालें असतां ह्या प्रचंड शोकांतून मज भाग्यहीन स्त्रीची तुझ्या सान्निध्यामुळें क्षणभर सुटका तरी होईल. कारण हे वानरश्रेष्ठा, पुनरपि तुझें आगमन होण्याची पंचाईतच आहे. यदाकदाचित् असें जरी झालें, तरी तोंपर्यंत खरोखर मी जिवंत रहाण्या-चाहि संशयच आहे. हे वानरा, तूं माझ्या दृष्टीआड झालास, म्हणजे माझा शोक अधिकच होईल; आणि अत्यंत दुःख भोगीत असलेल्या माझ्या अंगाचा जसा कांहीं भडका करून देईल. हे वीरा, माझ्या मनामध्यें हा एक जबरदस्त संशय जसा कांहीं उभाच आहे. तुला साहाय्य करणारे वानर व अस्वलें एकदम जुळले असतां वानराधिपति सुग्रीव हा दुस्तर महासागर तरण्यास कसा बरें समर्थ होईल ? किंवा अस्वल-वानरांच्या त्या सेना अथवा ते पुरुषश्रेष्ठ दशरथाचे पुत्र तरी महासागराचें उल्लंघन करण्यास कसे समर्थ होतील ? ह्या जगतामध्यें समुद्र उल्लंघन करण्याचें सामर्थ्य तिघांचेच ठिकाणीं असण्याचा संभव आहे. गरुडाचे ठिकाणीं, तुझ्या ठिकाणीं आणि वायूचे ठिकाणीं. तस्मात्, हें दुर्घट कार्य पार पाडण्याचा कोणता उपाय तुला दिसत आहे ? हे वीरा, कार्य कसें शेवटास न्यावें, हें जाणणाऱ्यांमध्यें तूं श्रेष्ठ आहेस. हे शत्रुपक्षीय वीरनाशका, तूं एकटाहि खरोखर हें कार्य पार पाडण्यास समर्थ आहेस; परंतु तुझ्या हातून कार्य शेवटास गेलें असतां कीर्तिवर्धक असें विजयरूप फलहि तुलाच प्राप्त होईल, रामाला होणार नाहीं. परंतु संपूर्ण सैन्य बरोबर घेऊन आणि संग्रामामध्यें राव-णाला जिंकून विजयी झाल्यावर जर राम मला घेऊन आपल्या राजधानीला जाईल, तर तें त्याला शोभण्यासारखें होईल. शत्रुसैन्याचें मर्दन करणारा तो राम

सैन्याच्या योगानें लंकेमध्यें दाणादाण उडवून देऊन जर मला घेऊन जाईल, तर तें त्याच्या नांवलौकिकाला योग्य दिसेल. तस्मात्, त्या रणशूर महात्म्याला योग्य असा पराक्रम त्याच्या हातून होईल, अशी तूं तजवीज कर."

### सीतेचें शंकानिरसन.

अर्थ, विनय आणि हेतु यांनीं भरलेलें तें सीतेचें भाषण श्रवण करून हनुमान शेवटीं म्हणाला, "हे देवि, वानर आणि अस्वलें ह्यांच्या सैन्यांचा अधिपति तो वानरश्रेष्ठ सुग्रीव सत्यनिष्ठ आहे. तुझ्या कार्याविषयीं त्याचा निश्चय झाला आहे. सीते, हजारों वानरांच्या कोट्यावधि झुंडी बरोबर घेऊन तो राक्षसनाशक सत्वरच इकडे येईल. पराक्रमी, धैर्यवान, महाबलाढ्य आणि इच्छेप्रमाणें उड्डाण करणारे वानर त्याच्या आज्ञेंत आहेत. ऊर्ध्वभागीं, अधोभागीं आणि आठहि दिशांचे ठिकाणीं त्यांची गति कुंठित होत नाहीं. अपरिमित तेजानें युक्त असलेले ते वानर कसल्याहि मोठ्या कामामध्यें हार जात नाहींत. आकाशमार्गानें गमन करणाऱ्या त्या महोत्साही वानरांनीं सागर आणि पर्वत ह्यांसहवर्तमान अनेक वेळां पृथ्वीला प्रदक्षिणा केली आहे. सुग्रीवाजवळ माझ्यापेक्षां कमी कोणीहि नाहीं. जे कांहीं वानर आहेत, त्यांपैकीं कांहीं माझ्यापेक्षां जास्त आहेत, आणि कांहीं माझ्या बरोबरीचे आहेत. मी कनिष्ठ प्रतींतला असूनहि जर येथें आलों, तर त्या महाबलाढ्य वानरांची गोष्ट पाहिजे कशाला ? मोठमोठ्यांना कधींहि अल्पस्वल्प कामें करण्याकरितां पाठवीत नसतात, यःकश्चितांना बाहेर पाठवीत असतात. तस्मात् हे देवि, तूं संताप करून घेऊं नको. तुझा शोक आतां पुरे झाला. ते वानरसेनाधिपति एका उड्डाणानेंच लंकेमध्यें येतील. उदय पावलेल्या चंद्रसूर्याप्रमाणें असलेले ते पुरुषश्रेष्ठ राम-लक्ष्मण माझ्या पाठीवर बसून आणि मोठमोठ्या सेना बरोबर घेऊन तुझ्याकडे येतील. एकत्र असलेले ते उभयतां वीर पुरुषश्रेष्ठ राम-लक्ष्मण येथें येऊन लंका नगरी बाणांनीं उडवून देतील. सारांश, रघुनंदन राम अनुयायांसहवर्तमान रावणाचा वध करील, आणि तुला घेऊन आपल्या राजधानीला परत जाईल. तस्मात्, तूं धीर धर, आणि काळाची प्रतीक्षा करीत रहा. तुझें कल्याण होईल. प्रज्वलित अग्नीप्रमाणें असलेल्या इक्ष्वाकुकुलभूषण रामाला तूं लवकरच अवलोकन करशील, आणि रोहिणीचा ज्याप्रमाणें चंद्राशीं समागम होत असतो, त्याप्रमाणें पुत्र, अमात्य आणि बांधव ह्यांसहवर्तमान राक्षसाधिपति रावणाचा वध झाला असतां रामाशीं तुझा समागम होईल. हे

मैथिलि, शोकाचा शेवट पाहण्याची पाळी तुला लवकरच येईल; आणि रामाच्या हातून रावण वध पावल्याचेंहि तूं सत्वर अवलोकन करशील."

ह्याप्रमाणें सीतेला धीर देऊन वायुपुत्र हनुमानानें तेथून जाण्याचा विचार केला, आणि पुनरपि तो तिला म्हणाला, "शत्रुनाशक महात्मा राम आणि हातामध्यें धनुष्य घेतलेला लक्ष्मण लंकेच्या द्वाराजवळ आल्याचें तूं सत्वरच अवलोकन करशील. नखें आणि दंष्ट्रा हींच ज्यांचीं आयुधें आहेत, सिंह आणि व्याघ्र ह्यांप्रमाणें ज्यांचे पराक्रम आहेत, आणि गजेंद्रासारखीं ज्यांचीं शरीरें आहेत, असे वीर वानर येथें जुळलेले तूं सत्वरच पहाशील. हे साध्वि, लंकेंतील मलय पर्वताच्या शिखरावर गर्जना करीत असलेल्या आणि पर्वतांप्रमाणें व मेघां-प्रमाणें दिसत असलेल्या मोठमोठ्या वानरांच्या अनेक झुंडी तुझ्या दृष्टीस पडतील. मदनाच्या घोर बाणांनीं मर्मस्थानीं ताडित झालेल्या त्या रामाला सिंहानें जर्जर केलेल्या गजाप्रमाणें सुख मुळींच होत नाहीं. हे देवि, तूं रडूं नको, आणि शोका-मुळें तूं आपल्या मनामध्यें धास्तीहि बाळगूं नको. हे कल्याणि, इंद्राणीचा ज्या-प्रमाणें इंद्राशीं समागम होतो, त्याप्रमाणें तुझा भर्त्याशीं समागम होईल. रामा-पेक्षां अधिक कोण आहे ? आणि लक्ष्मणाशीं बरोबरी करणारा तरी कोण आढळणार आहे ? तुझ्यावरच अवलंबून राहणारे ते उभयतां भ्राते अग्नि व वायु ह्यांप्रमाणें आहेत. हे देवि, राक्षसगणांनीं वास्तव्य केलेल्या या अतिभयंकर प्रदेशामध्यें तुला आतां फार दिवस रहावें लागणार नाहीं. सत्वरच तुझ्या प्रियाचें आगमन इकडे होईल. माझी व त्याची भेट होण्यास आवश्यक इतकाच काळ लोटेपर्यंत तूं आतां वाट पहा, म्हणजे झालें."

## सर्ग चाळिसावा.

### निरोपाची पुनरावृत्ति.

महात्म्या हनुमानाचें तें हितकारक भाषण श्रवण केल्यावर देवकन्येप्रमाणें असलेली ती सीता त्याला म्हणाली, "हे वानरा, अर्धवट धान्यें जिच्यामध्यें उगवलीं आहेत, अशा पृथ्वीला ज्याप्रमाणें पर्जन्यवृष्टि प्राप्त झाली असतां आनंद होतो, त्याप्रमाणें प्रिय भाषण करणाऱ्या तुला अवलोकन करून मला आनंद होत आहे. तस्मात्, शोकांनीं कृश झालेल्या ह्या गात्रांच्या योगानें त्या पुरुषश्रेष्ठ रामाला स्पर्श करून मी कृतकृत्य होईन, अशा प्रकारची तूं मजवर दया कर.

हे महागुणवान वानरा, काक पक्ष्याचा एक नेत्र नाहींसा करून टाकणारी इषीकास्त्र सोडल्याची खूण तूं रामाला दे, आणि त्याला असेंहि सांग कीं, 'पूर्वीचा तिलक पुसून गेला असतां तूं एक जो मनःशिलेचा तिलक लाविला होतास, त्याची आठवण करून पहा. हे इंद्रवरुणतुल्य रामा, तूं वीर्यवान असतांहि रावणानें हरण करून नेल्यामुळें राक्षसांमध्यें सीता वास्तव्य करीत आहे, हें तुला सहन कसें होत आहे ? हे निष्पापा रामा, हें दिव्य शिरोरत्न मीं फारच जपून ठेविलें होतें. कारण संकटामध्यें तुझें दर्शन झाल्यावर जसा मला आनंद होत आहे, तसा हें रत्न अवलोकन करून मला आनंद होत असतो; परंतु उदकामध्यें उत्पन्न झालेलें हें भव्य रत्न मीं तुझ्याकडे पाठविलें आहे. ह्यामुळें आज पासून पुढें शोकाकुल झालेली मी जिवंत राहणें शक्य नाहीं. असह्य दुःखें, मर्मभेदक भाषणें आणि राक्षसांसहवर्तमान वास्तव्य हें सर्व मी तुझ्याकरितां सहन करीत आहें. हे राजपुत्रा, एक महिनाभर मी जीव धरून राहीन. महिन्यानंतर तुझ्यावांचून मी जिवंत रहाणार नाहीं. हा राक्षसाधिपति रावण क्रूर आहे, आणि माझ्यावर ह्याची दृष्टीहि चांगली नाहीं. तेव्हां इतकें असून तूंहि आणखी इकडे येण्यास विलंब करीत आहेस, हें माझ्या कानावर आलें म्हणजे मी एक क्षणभरहि जिवंत रहाणार नाहीं."

डोळ्यांमध्यें अश्रु आणून सीतेनें केलेलें हें दीन भाषण श्रवण केल्यावर महातेजस्वी वायुपुत्र तिला म्हणाला, "हे देवि, तुझ्या शोकामुळें रामाची मुखचर्या अगदीं पालटून गेली आहे. राम शोकाकुल झाला असल्यामुळें लक्ष्मणहि दुःखित झाला आहे, हें मी तुला शपथपूर्वक खरें खरें सांगतों; परंतु आतां कसा तरी तुझा शोध लागला आहे. तेव्हां शोक करण्याचा काल सांप्रत उरला नाहीं. हे साध्वि, ह्या घटकेलाच तुझ्या दुःखाचा शेवट होईल. निंदेला पात्र नसलेले ते उभयतां पुरुषश्रेष्ठ राजपुत्र तुझ्या दर्शनाकरितां उत्सुक असल्यामुळें लंका भस्म करून टाकतील. हे विशालनयने, संग्रामामध्यें बांधवांसहवर्तमान रावणाचा वध करून ते राम-लक्ष्मण तुला आपल्या राजधानीला घेऊन जातील. हे निर्दोष सीते, ज्याची रामाला चांगली ओळख पटेल, आणि ज्याच्या योगानें त्याला आनंद होईल, अशी आणखी एक खूण तूं रामाला दे."

ह्यावर ती म्हणाली, "अरे, मीं उत्कृष्ठ खूण दिलीच आहे. हेंच भूषण नीट अवलोकन केल्यावर रामाला तुझें बोलणें विश्वसनीय वाटेल."

असें सीतेनें सांगितल्यानंतर तें श्रेष्ठ रत्न घेऊन त्या श्रीमान वानरश्रेष्ठानें

त्या देवीला शिरसा प्रणाम केला, आणि तो जाण्यास तयार झाला तेव्हां उड्डाण करण्यास सिद्ध होऊन वृद्धिंगत होऊं लागलेल्या त्या महावेगवान वानरसेनाधिपतीकडे पाहिल्यावर त्या दीन सीतेच्या तोंडावर अश्रूंचे ओघळ आले, आणि कंठ दाटून आल्यामुळें अडखळत अडखळत ती त्याला म्हणाली, "हनुमंता, सिंहतुल्य भ्राते राम-लक्ष्मण आणि अमात्यांसहवर्तमान सुग्रीव ह्या सर्वांना तूं माझ्या वतीनें आरोग्यविषयक प्रश्न कर; आणि तो महापराक्रमी राम ह्या दुःखसागरापासून माझा सत्वर उद्धार करील, अशा प्रकारची तूं कांहीं युक्ति याज. हे वानरश्रेष्ठा, तूं रामाचे समीप गेल्यावर हा माझा तीव्र शोकातिरेक आणि ह्या राक्षसांकडून होत असलेली निर्भर्त्सना तूं त्याला सांग. तुला मार्ग सुखकर होवो."

ह्याप्रमाणें त्या राजकन्येनें निरोप सांगितल्यावर अंतःकरणामध्यें अतिशय आनंदित झालेला तो कपि सीतेचा शोध लागल्यामुळें कृतार्थ झाला; आणि राहिलेलें कार्य अगदींच थोडें आहे, असें समजून त्यानें उत्तर दिशेकडे जाण्याचें मनामध्यें आणिलें.

---

## सर्ग एकेचाळिसावा.

### वनविध्वंस.

तो हनुमान जावयास निघाला असतां प्रशस्त शब्दांनीं सीतेनें त्याची प्रशंसा केली. नंतर तो तेथून चालता झाल्यावर मनामध्यें म्हणाला, "कृष्णवर्ण नेत्रांनीं युक्त असलेली ही सीता तर दृष्टीस पडली. आतां हें हातीं घेतलेलें कार्य थोडेंच शिल्लक राहिलेलें आहे. ह्या ठिकाणीं पहिल्या तीन उपायांचें अवलंबन न करितां चौथाच मला हितावह दिसत आहे. कारण, राक्षसांचे ठिकाणीं सामाचा कांहीं उपयोग होणार नाहीं. जे द्रव्यसंपन्न आहेत, त्यांना दान देणेंहि योग्य होणार नाहीं. बलाचा गर्व झालेले लोक भेदानें साध्य होणें शक्य नाहीं. तस्मात्, ह्या राक्षसांचे ठिकाणीं पराक्रम हाच उपाय मला दिसत आहे. पराक्रमाचें अवलंबन केल्यावांचून ह्या कार्यसिद्धीला दुसरा कांहींएक निश्चित उपाय येथें चालणार नाहीं. संग्रामामध्यें मोठमोठे वीर वध पावले, म्हणजेच कसे तरी आज हे राक्षस मऊ येतील. मुख्य कार्य पार पडल्यानंतर पहिल्या कार्याशीं विरोध न येतां जो अनेक कार्यें पार पाडितो, तोच हातीं घेतलेलें काम शेव-

टास नेण्यास समर्थ होतो. अल्पस्वल्प जरी कार्य असलें, तरी एकाच उपायानें तें पार पडेल असें नाहीं. ह्यास्तव, अनेक प्रकारांनीं उपाय योजण्याचें ज्याला माहीत असतें, तोच कार्य शेवटास नेण्यास समर्थ होतो. तस्मात्, सीतेचा शोध लावणें एवढेंच जरी कार्य करण्याचा माझा प्रथम निश्चय होता, तरी शत्रूंचा व आपला युद्धप्रसंग प्राप्त झाला असतां आपणांमध्यें आणि शत्रूंमध्यें विशेष काय आहे, हें खरें खरें समजून आल्यानंतर जर मी वानराधिपति सुग्रीवा-कडे प्रथमतः गेलों, तर यजमानाच्या आज्ञेप्रमाणें खरें खरें काम मीं केल्या-सारखें होईल. परंतु आज ह्या माझ्या येथें येण्याचा परिणाम सुखावह कसा होईल, राक्षसांसहवर्तमान एकाएकीं माझें युद्ध होण्याचा प्रसंग कसा येईल, त्याचप्रमाणें संग्रामामध्यें स्वतःचें सामर्थ्य आणि माझें सामर्थ्य यांविषयीं राव-णाची चांगल्या रीतीनें खात्री कशी होईल, याचा आधीं आपल्याला विचार केला पाहिजे. हा विचार झाला, म्हणजे संग्रामामध्यें सैन्य आणि मंत्रिवर्ग ह्यां-सहवर्तमान रावणाची गांठ घेऊन आणि त्याचें बल व मनांतील आशय जाणून आपण येथून सुखानें परत जाऊं. नेत्रांना व मनाला आनंद देणारें असें हें ह्या दुष्टाचें नानाप्रकारच्या वृक्षांनीं व लतांनीं युक्त असलेलें नंदनतुल्य उत्कृष्ठ वन आहे. तेव्हां शुष्क वन दग्ध करून टाकणाऱ्या अग्नीप्रमाणें मी ह्या वनाचा विध्वंस करून टाकीन. ह्याचा विध्वंस झाला असतां, तो रावण क्रुद्ध होईल. तदनंतर अश्व, मोठमोठे रथ आणि गज यांनीं युक्त असें प्रचंड सैन्य घेऊन राक्षसाधिपति रावण येईल. तो आला असतां त्रिशूळ व पोलादी पट्टे ह्यां-सहवर्तमान मोठें युद्ध सुरू होईल. युद्धामध्यें प्रचंड पराक्रम करणाऱ्या त्या राक्ष-सांशीं गांठ पडल्यावर आपला पराक्रम मुळींच वायां जाऊं न देतां रावणानें पाठविलेल्या त्या सैन्याचा वध करून वानराधिपति सुग्रीवाच्या घराकडे मी खुशाल चालता होईन."

असा बेत केल्यानंतर वायूप्रमाणें भयंकर पराक्रम करणारा तो मारुती क्रुद्ध झाला, आणि आपल्या मांड्यांच्या मोठ्या वेगानें तो वृक्ष उलथेपालथे करूं लागला. नंतर मत्त पक्ष्यांनीं नादित, नानाप्रकारच्या वृक्षांनीं व लतांनीं युक्त आणि अंतःपुरांतील स्त्रियांना विहार करण्यास योग्य असें तें वन वीर हनुमा-नानें मोडून टाकिलें. त्या वनांतील वृक्षांचा त्यानें विध्वंस करून टाकिला. दिसण्यांत मनोहर असलेल्या पर्वत शिखरांचे नानाप्रकारानें तुकडे तुकडे करून टाकिले. नानाप्रकारचे पक्षी ज्यांमध्यें शब्द करीत असत, असे जलाशय फोडून

टाकिले. आरक्तवर्ण पल्लव त्यानें चुरगळून टाकिले, व अवशिष्ट राहिलेले वृक्ष आणि लता हि त्यानें जर्जर करून टाकिल्या. ह्यामुळें तें वन वणवा लागून दग्ध झाल्यासारखें दिसूं लागलें, आणि त्यांतील लता अस्ताव्यस्त होऊन शोकाकुल झालेल्या स्त्रियांप्रमाणें दिसूं लागल्या. उध्वस्त झालेलीं लतागृहें, धूळधाण झालेलीं क्रीडागृहें, आर्त ध्वनि करूं लागलेले व्याघ्र, मृग आणि पक्षी, उलथून टाकलेले दगडी बंगले आणि सामान्य निवासस्थलें ह्यांच्या योगानें तें महावन जमीनदोस्त झाल्यासारखें दिसूं लागलें. रावणाच्या स्त्रियांचें ज्यांत रक्षण होत असे, अशा प्रमदावनांतील चंचल अशोकलतांच्या समुदायांनीं युक्त असलेल्या त्या वनभूमींतील लतासमुदायांची स्थिति वानराच्या बळामुळें शोचनीय झाली.

ह्याप्रमाणें पृथ्वीपति महात्म्या रावणाच्या मनाला अतिशय लागणारी गोष्ट केल्यानंतर कांतीनें देदीप्यमान असलेला तो प्रचंड वानर अनेक महाबलाढ्य राक्षसांशीं एकाकी युद्ध करण्याच्या इच्छेनें दरवाजावर बसला.

## सर्ग बेचाळिसावा.

### रावणाला वनविध्वंसवृत्तकथन.

तदनंतर पक्ष्यांच्या स्वरानें आणि मोडतां मोडतां झालेल्या वृक्षांच्या आवाजानें लंकेमध्यें वास्तव्य करणारे सर्व भीतीनें गांगरून गेले. भयभीत झालेले मृग व पक्षी कांहीं सैरावैरा धावूं लागले, आणि कांहीं फारच घाबरून गेल्यामुळें जागच्या जागींच बसले. राक्षसांनाहि अपशकून होऊं लागले. इतक्यांत अक्राळविक्राळ मुद्रांनीं युक्त असलेल्या राक्षसी जाग्या होऊन पहातात, तों तें विध्वंस झालेलें वन आणि तो वीर महाकपि यांजकडे त्यांची दृष्टि गेली; परंतु त्यांना अवलोकन करितांक्षणीं त्या महाधैर्यवान, महापराक्रमी व महाबलाढ्य हनुमानानें राक्षसींना भयप्रद असें फारच मोठें रूप धारण केलें. तेव्हां पर्वताप्रमाणें अतिशय धिप्पाड असलेल्या महाबलाढ्य वानराला अवलोकन करून त्या राक्षसी जनककन्येला म्हणाल्या, “ हा कोण ? कोणाचा ? कोठून आला आहे ? कशाकरितां आला आहे ? आणि तुझ्यासहवर्तमान त्यानें संभाषण कशाकरितां केलें ? सीते, हें सर्व तूं आम्हांला सांग. हे विशालनयने, तूं भय बाळगूं नको. हे महाभाग्यवती, हे कृष्णनयने, तुझ्यासहवर्तमान ह्यानें काय संभाषण केलें, हें तूं आम्हांला सांग.”

ह्याप्रमाणें राक्षसींनीं विचारिल्यानंतर ती सर्वांगसुंदरी साध्वी त्यांना म्हणाली, " यथेष्ट रूप धारण करणाऱ्या राक्षसांना ओळखण्याइतकें मला बुद्धिसामर्थ्य कोठून असणार ? हा कोण आहे, आणि याच्या मनांतून काय करावयाचें आहे, ह्याचा तुम्हीच शोध लावा. कारण, सर्पालाच सर्पाचीं पावलें ओळखितां येतात, यांत संशय नाहीं. मी तर फारच भेदरून गेलें असल्यामुळें, हा कोण हें मला मुळींच ओळखितां येत नाहीं. इच्छेप्रमाणें रूप धारण करणारा हा कोणी तरी राक्षसच आला असावा, असें मला वाटतें. "

सीतेचें हें भाषण श्रवण करितांक्षणीं कांहीं राक्षसींनीं तेथून पळ काढिला, कांहीं तेथेंच उभ्या राहिल्या आणि कांहीं रावणाला हा वृत्तांत निवेदन करण्याकरितां निघून गेल्या. अक्राळविक्राळ मुद्रांनीं युक्त असलेल्या त्या राक्षसी रावणाच्या समीप गेल्या, आणि विद्रूप व भयंकर वानर तेथें आला असल्याचें त्या रावणाला सांगूं लागल्या. त्या म्हणाल्या, " हे महाराजा, अशोकवनामध्यें भयंकर शरीर धारण करणारा एक वानर आला आहे. त्याचा पराक्रम अनुपम आहे, आणि सीतेशीं संभाषण करून तो तेथेंच बसला आहे. मृगनयना सीतेला आम्हीं नानाप्रकारांनीं विचारून पाहिलें, परंतु तो कोण आहे, हें आम्हांला सांगण्याचा त्या जानकीचा मानस दिसत नाहीं. तो इंद्राचा अथवा कुबेराचा दूत असावा, किंवा सीतेचा शोध लावण्याच्या उद्देशानें रामानें कोणी पाठविलेला असावा, असें आम्हांला वाटतें. नानाप्रकारच्या मृगगणांनीं गजबजलेलें जें आपलें मनोहर प्रमदावन, त्याची त्या अद्भुत रूप धारण करणाऱ्या वानरानें नासाडी करून टाकली. ज्या ठिकाणीं देवी जनककन्या आहे, तें ठिकाण मात्र त्यानें उध्वस्त केलें नाहीं. बाकी त्यानें विध्वंस करून टाकलेला असा कोणताहि प्रदेश त्या वनामध्यें शिल्लक राहिलेला नाहीं. जानकी ज्या प्रदेशांत बसली आहे, त्या प्रदेशाचा त्यानें तिच्या रक्षणाकरितां विध्वंस केला नाहीं, का इतर सर्व प्रदेशांची धूळधाण करितां करितां तो थकून गेल्यामुळें त्याच्या तावडींतून तेवढा भाग शाबूत राहिला आहे, हें कांहींच आमच्या लक्ष्यांत येत नाहीं. परंतु एवढ्या थोरल्या वनाचा धुव्वा उडवून देणाऱ्या त्या वानराला थकवा कोठला येणार ? तो प्रदेश सुरक्षित ठेवून त्यानें त्या सीतेचेंच रक्षण केलेलें आहे. मनोहर पल्लव आणि पानें यांनीं समृद्ध असलेल्या ज्या वृक्षाचा आश्रय करून सीता बसली आहे, त्या विस्तीर्ण शिंशपा वृक्षाला मात्र त्यानें धक्का लाविला नाहीं. तेव्हां त्या उग्र रूप धारण करणाऱ्या वानराला चांगली कडक शिक्षा

देण्याविषयीं आपली आज्ञा होऊं द्या. कारण त्यानें सीतेचें संरक्षण केलें असून वनाचाहि नाश केला आहे. हे राक्षसगणाधिपते, आपलें मन जिच्यावर गेलें आहे, त्या सीतेशीं जिवावर उदार न झालेला असा कोण खरें भाषण करील?"

किंकरांचा वध.

राक्षसींचें हें भाषण श्रवण करितांक्षणीं राक्षसाधिपति रावणाची दृष्टि कोपानें चढून गेली. चिताग्नीप्रमाणें चोहोंकडून त्याच्या अंगाचा भडका होऊं लागला प्रज्वलित झालेल्या दीपापासून ज्योतिसहवर्तमान ज्याप्रमाणें तेलाचे बिंदु पडूं लागतात, त्याप्रमाणें क्रुद्ध झालेल्या त्या रावणाच्या नेत्रांतून तेजासहवर्तमान अश्रुबिंदु पडूं लागले. तदनंतर त्या महातेजस्वी रावणानें हनुमानाचा बंदोबस्त करण्याकरितां आत्मतुल्य सामर्थ्यवान असलेल्या किंकर नामक राक्षसांना जाण्याची आज्ञा केली असतां, कूट आणि मुद्गर हीं आयुधें हातांत घेऊन ऐशीं हजार बलाढ्य किंकर तेथून निघाले. मोठें उदर, प्रचंड दंष्ट्रा, घोर रूप आणि भयंकर सामर्थ्य ह्यांनीं युक्त असलेले ते सर्व राक्षस युद्धाची इच्छा करून हनुमानाला धरण्याविषयीं उद्युक्त झाले. चित्रविचित्र गदा, सुवर्णाच्या पट्ट्यांनीं जखडून टाकिलेले परिघ व सूर्यासारखे उज्ज्वल बाण हातांत घेऊन ते राक्षस कमानीवर बसलेल्या वानरश्रेष्ठ हनुमानासमीप आले; आणि मुद्गर, पट्ट व शूल बरोबर घेऊन आणि त्याचप्रमाणें भाले व तोमर हातांत घेऊन ते एकाएकीं मारुतीला गराडा देऊन उभे राहिले. तेव्हां तेज आणि कांति ह्यांनीं युक्त असलेल्या हनुमानानेंहि प्रचंड शरीर धारण केलें, आणि गर्जनेच्या योगानें लंका दणाणून टाकून पुच्छ भूमीवर आपटिलें. तेव्हां त्याच्या भयंकर प्रतिध्वनीनें पक्षी आकाशांतून खालीं पडले, व तो हनुमान मोठ्यानें गर्जना करूं लागला कीं, "अतिबलाढ्य राम, महाबलाढ्य लक्ष्मण व रामानें रक्षण केलेला राजा सुग्रीव ह्यांचा विजय आहे. महापराक्रमी कोसलदेशाधिपति रामाचा मी दास आहें. माझें नांव हनुमान आहे, आणि मी शत्रुसैन्याचा नाश करणारा आहें. हजार रावण जरी आले, तरी युद्धामध्यें हजारों शिला व वृक्ष ह्यांनीं प्रहार करणाऱ्या माझ्याशीं सामर्थ्यामध्यें बरोबरी करणें त्यांना शक्य होणार नाहीं. सर्व राक्षसांच्या समक्ष लंका नगरीचा विध्वंस करून व सीतेला अभिवंदन करून मनोरथ परिपूर्ण झालेला असा मी परत जाईन."

ह्या त्याच्या गर्जनेमुळें ते राक्षस भयभीत झाले, आणि संध्याकाळच्या मेघाप्रमाणें उन्नत असलेल्या हनुमानाकडे पाहूं लागले. हनुमानानें आपल्या स्वामीचा

निर्देश केला असल्यामुळें हा कोणाचा योद्धा असावा, ह्याविषयीं राक्षसांना शंका उरली नाहीं; आणि म्हणूनच ते राक्षस भयंकर व अद्‌भुत शस्त्रास्त्रें बरोबर घेऊन चोहोंकडून त्याच्यावर धावले. ह्याप्रमाणें त्या महाबलाढ्य हनुमानाला सर्व बाजूंनीं त्या शूर राक्षसांनीं वेढून टाकिलें असतां, त्यानें कमानीपाशीं ठेविलेला एक भयंकर लोखंडी परिघ हातामध्यें घेतला, आणि तडफड करणारा सर्प हातांत धरणाऱ्या गरुडाप्रमाणें तो परिघ हातांत घेऊन त्या मारुतीनें निशाचरांचा वध केला. सारांश, तो वायुपुत्र वीर हनुमान परिघायुध हातामध्यें घेऊन आकाशामध्यें संचार करूं लागला, आणि वज्राच्या योगानें दैत्यांचा वध करणाऱ्या इंद्राप्रमाणें त्यानें त्या परिघानें राक्षसांचा वध केला. इतकेंच नव्हे, तर त्या किंकर राक्षसांचा वध करून तो वायुपुत्र महावीर युद्धाच्या इच्छेनें पुनरपि दरवाजावर जाऊन बसला.

तदनंतर भीतीमुळें तेथून निघून गेलेल्या कांहीं राक्षसांनीं सर्व किंकरांचा वध झाल्याचें रावणाला जाऊन सांगितलें. तेव्हां राक्षसांचें तें प्रचंड सैन्य वध पावल्याचें ऐकून राक्षसराजाचे डोळे फिरून गेले; आणि संग्रामामध्यें पराजय पावण्यास अगदीं अशक्य व पराक्रमानें अप्रतिम असलेल्या प्रहस्तपुत्र जंबुमालीला त्यानें युद्धाला जाण्याची आज्ञा केली.

## सर्ग त्रेचाळिसावा.

### राक्षसदेवतालयविध्वंस.

किंकर राक्षसांचा वध केल्यावर हनुमान आपल्याशीं म्हणतो, "वनाचा मीं विध्वंस केला; परंतु राक्षसांच्या कुलदेवतेचें देवालय मीं मोडून टाकिलें नाहीं. तस्मात्, ह्याचप्रमाणें त्या देवालयाचाहि मी आजच विध्वंस करून टाकितों."

असें मनांत आणून आपलें सामर्थ्य दाखविण्याकरितां, मेरुपर्वताच्या शिखराप्रमाणें उंच असलेल्या त्या राक्षसकुलदेवतेच्या देवालयावर तो वानरश्रेष्ठ उडी मारून उभा राहिला. त्या पर्वततुल्य देवालयावर आरोहण केल्यानंतर तो महासेनाधिपति हनुमान उदय पावलेला दुसरा सूर्यच कीं काय, असा दिसूं लागला. तें उंच देवालय मोडून टाकिल्यानंतर कांतीनें झळकत असलेला तो अजिंक्य हनुमान पारियात्र पर्वताप्रमाणें दिसूं लागला. पारियात्रपर्वताप्रमाणें फारच मोठें शरीर धारण केल्या-

नंतर त्या तेजस्वी वायुपुत्र हनुमानानें ध्वनीनें लंका दणाणून टाकीत टाकीत निर्भय-पणें दंड ठोकिले असतां, कानठळ्या बसविणाऱ्या अशा त्या त्याच्या दंड ठोकण्याच्या प्रचंड ध्वनीनें पक्षी खालीं पडले, व देवालयाचे रक्षक मूर्च्छित झाले! तदनंतर त्या महाबलाढ्य वायुपुत्रानें अशी गर्जना केली कीं, "अस्त्रवेत्ता राम, महाबलाढ्य लक्ष्मण आणि रामानें संरक्षण केलेला राजा सुग्रीव ह्यांचा विजय आहे. कोसलदेशाधिपति महापराक्रमी रामाचा दास मी वायुपुत्र हनुमान आहें, आणि शत्रुसैन्याचा मी नाश करणार आहें. हजारों शिलांनीं व वृक्षांनीं मी युद्धामध्यें प्रहार करूं लागलों असतां सहस्र रावणहि माझ्यासमोर टिकाव धरण्यास समर्थ होणार नाहींत. आतां मी सर्व राक्षसांसमक्ष लंका नगरीचा विध्वंस करून व सीतेला अभिवंदन करून हेतु सिद्धीस गेल्यावर परत चालता होईन."

असें बोलून भयंकर ध्वनीनें युक्त असलेल्या त्या धिप्पाड हनुमानानें राक्षसांना भय उत्पन्न करण्याकरितां देवालयावर असतांनाच गर्जना केली. तेव्हां प्रचंड ध्वनि झाल्याबरोबर नानाप्रकारचीं अस्त्रें हातांत घेऊन देवालयावरील शंभर रक्षक त्याच्याकडे धावले; आणि ते मोठमोठे धिप्पाड राक्षस भाले, तलवारी व कुऱ्हाडी त्याच्या अंगावर फेंकीत फेंकीत त्याला वेढून उभे राहिले. सुवर्णाच्या पट्ट्यांनीं जखडून टाकिलेले परिघ, विचित्र गदा आणि सूर्यासारखे उज्ज्वल बाण हातांत घेऊन ते राक्षस वानरश्रेष्ठ हनुमानासमीप आले असतां, त्याला वेढून उभा राहिलेला तो राक्षससमुदाय गंगाजलाच्या मोठ्या अगाध भोंवऱ्याप्रमाणें दिसूं लागला. तदनंतर वायुपुत्र हनुमानानें क्रुद्ध होऊन भयंकर रूप धारण करून त्या देवालयाचा सुवर्णानें मढविलेला एक स्तंभ वेगानें उपटला; आणि शंभर कोरांनीं युक्त असलेला तो स्तंभ त्या महाबलाढ्य हनुमानानें गरगर फिरविला. फिरवितां फिरवितां दुसऱ्या स्तंभाशीं घर्षण होऊं लागल्यामुळें तेथें अग्नि उत्पन्न होऊन देवालयहि जळून गेलें. तेव्हां देवालय जळत असलेलें अवलोकन केल्यावर वज्रानें असुरांचा वध करणाऱ्या इंद्राप्रमाणें मारुतीनें त्या शंभर राक्षसांचा स्तंभाच्या योगानें वध केला; आणि अंतरिक्षामध्यें जाऊन तो श्रीमान कपि म्हणाला, "सुग्रीवाच्या आज्ञेंत वागणारे असे माझ्यासारखे हजारों महात्मे व बलाढ्य वानराधिपति त्या सुग्रीवानें बाहेर पाठविले आहेत. आम्ही आणि इतरहि वानर मिळून सर्व पृथ्वी हिंडत आहों. आम्हांपैकीं कांहींना दहा हत्तींचें बळ आहे, कांहीं त्यांच्याहिपेक्षां दसपट बलाढ्य आहेत, आणि कांहीं तर पराक्रमामध्यें सहस्र गजांची बरोबरी करणारे आहेत. कांहींचे ठिकाणीं

हत्तींच्या अनेक कळपांइतकें सामर्थ्य आहे, कांहीं वायूसारखे बलाढ्य आहेत, आणि बलाचा अंत लागत नाहीं, असेहि कांहीं वानरसेनाधिपति त्यांत आहेत. दंत आणि नखें ह्या आयुधांनीं युक्त आणि ह्याप्रमाणें बलाढ्य असे शेंकडों, हजारों, लाखों, क्रोडों वानर बरोबर घेऊन तुम्हां सर्वांचा वध करण्याकरितां सुग्रीव येथें येईल; आणि तो येथें आला म्हणजे ही लंका नगरी तुम्ही आणि महात्म्या इक्ष्वाकु वीर रामाशीं ज्यानें वैर बांधिलें आहे, तो रावण ह्यांपैकीं कोणीहि रहाणार नाहीं."

## सर्ग चवेचाळिसावा

### जंबुमाली याचा वध.

राक्षसाधिपति रावणानें आज्ञा केली असतां, मोठमोठ्या दंष्ट्रांनीं युक्त असून धनुष्य धारण केलेला बलाढ्य प्रहस्तपुत्र जंबुमाली बाहेर पडला. त्या धिप्पाड व प्रचंड जंबुमालीचे डोळे फिरून गेले होते; समरांगणामध्यें त्याचा पराजय होणें दुर्घट होतें; आणि आरक्तवर्ण पुष्पें व वस्त्र, मनोहर कुंडलें आणि माला त्यानें धारण केल्या होत्या. इंद्रधनुष्यासारखें मोठें, मनोहर बाणांनीं युक्त आणि वज्राप्रमाणें व विद्युल्लतेप्रमाणें गर्जना करणारें असें मोठें धनुष्य घेऊन तो तसा चमत्कार करूं लागला असतां, धनुष्याच्या त्या प्रचंड टणत्कारानें दिशा, उपदिशा आणि आकाश हीं एकदम दणाणून गेलीं. इतक्यांत गर्दभ जोडिलेल्या रथावर आरूढ होऊन आलेल्या त्या जंबुमालीला अवलोकन करितांक्षणीं वेगवान हनुमानाला हर्ष झाला व तो गर्जना करूं लागला. तदनंतर कमानी खालच्या दोन खांबावरील आडव्या लांकडावर बसलेल्या त्या हनुमानाला जंबुमालीनें अर्धचंद्र बाणानें मुखाचे ठिकाणीं वेध केला. एका करणी बाणानें मस्तकाचे ठिकाणीं त्यानें वेध केला, आणि दहा बाणांनीं त्यानें त्या वानराधिपतीच्या बाहूचे ठिकाणीं वेध केला. तेव्हां बाणांनीं विद्ध झालेलें तें त्या हनुमानाचें ताम्रवर्ण मुख शरदृतूमध्यें सूर्याच्या किरणानें विद्ध झालेल्या प्रफुल्लित कमलाप्रमाणें दिसूं लागलें. सुवर्णबिंदूंचें ज्याच्यावर सिंचन झालें आहे, असें आकाशांतील एक मोठें कमलच कीं काय अशा रीतीनें तें त्याचें रक्तानें भरलेलें आरक्तवर्ण मुख शोभूं लागलें. राक्षसांचे बाण लागल्या-

मुळें महाकपि हनुमान क्रुद्ध झाला, आणि शेजारींच असलेल्या एका अति-विस्तीर्ण व प्रचंड शिलेकडे त्यानें दृष्टि फेंकिली. नंतर ती शिला उपटून बलाढ्य हनुमानानें जंबुमालीवर झुगारून दिली; परंतु त्या क्रुद्ध राक्षसानें दहा बाणांनीं ती शिला फोडून टाकिली. आपलें तें कर्म व्यर्थ झालेलें अवलोकन करून प्रचंड पराक्रमी हनुमान एक मोठा सालवृक्ष उपटून गरगर फिरवूं लागला; परंतु तो सालवृक्ष फिरवीत आहे, असें पाहून महाबलाढ्य जंबुमालीनें पुष्कळ बाण त्याच्यावर टाकिले. चार बाणांनीं त्यानें तो सालवृक्ष तोडून टाकिला, आणि पांच बाणांनीं हाताचे ठिकाणीं, एका बाणानें उरांत आणि दहा बाणांनीं स्तनामध्यें त्या वानराला वेध केला. ह्याप्रमाणें बाणांनीं देह भरून गेला असतां हनुमान अतिशय क्रुद्ध झाला, आणि तोच परिघ हातांत घेऊन वेगावेगानें फिरवूं लागला. नंतर त्या अतिवेगवान व महाबलाढ्य कपिश्रेष्ठानें अतिशय वेगानें तो परिघ फिरवून जंबुमालीच्या विशाल वक्षस्थलावर फेंकिला असतां त्या राक्षसाचें मस्तक, हात, पाय, धनुष्य, रथ, वाहनें आणि बाण ह्यांपैकीं कशा-चाच मागमूस राहिला नाहीं! सारांश, परिघाच्या त्या वेगानें महारथि जंबुमाली वध पावला; आणि शाखा व उपशाखा वगैरेंचा चुराडा होऊन पडलेल्या वृक्षा-प्रमाणें तो भूमीवर पडला!

अशा प्रकारें महाबलाढ्य प्रहस्तपुत्र जंबुमाली वध पावला असतां निशा-चराधिपति रावणाचे नेत्र क्रोधानें लाल होऊन गेले, आणि त्यानें तत्क्षणींच अतिवीर्यवान व अतिपराक्रमी अमात्यपुत्रांना युद्धाला जाण्याची आज्ञा केली.

## सर्ग पंचेचाळिसावा.

### मंत्रिपुत्रांचा वध.

राक्षसाधिपति रावणानें आज्ञा केली असतां ते अग्नीसारखे तेजस्वी सात मंत्रिपुत्र राजवाड्यांतून बाहेर निघाले. त्यांच्याबरोबर सैन्याचा मोठा परिवार होता. त्यांनीं धनुष्यें धारण केलीं होतीं. ते मोठे बलाढ्य होते. अस्त्रविद्या त्यांना अवगतच नसून ते अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ होते, आणि जय प्राप्त करून घेण्याविषयीं एकमेकाशीं चढाओढ करीत होते. सुवर्णजालानें आच्छादित, ध्वज व पताका ह्यांनीं युक्त आणि अश्व जोडिलेल्या व मेघाप्रमाणें गर्जना कर-णाऱ्या मोठमोठ्या रथांवर ते अतुल पराक्रमी मंत्रिपुत्र आरूढ झाले होते. ते

आनंदित होऊन तप्त सुवर्णानें मढविलेल्या धनुष्यांचा टणत्कार करूं लागले. तेव्हां विद्युल्लतेनें युक्त असलेले मेघच कीं काय असे ते दिसूं लागले.

असो. तदनंतर रावणाच्या सेवकांचा वध झाल्याचें श्रवण करून त्या मंत्रिपुत्रांच्या माता, बांधव आणि सुहृज्जन ह्यांसहवर्तमान शोकाकुल झाल्या; आणि इकडे प्रथम जय प्राप्त करून घेण्याविषयीं एकमेकांशीं स्पर्धा करीत असलेले आणि उत्कृष्ट सुवर्णाचीं भूषणें धारण केलेले मंत्रिपुत्र दरवाजावर बसलेल्या हनुमानावर चालून गेले. रथघोषरूप ध्वनीनें युक्त असलेले ते राक्षसरूप मेघ बाणवृष्टि करूं लागले असतां पर्जन्यकालीं वृष्टि करणाऱ्या मेघांप्रमाणें दिसूं लागले. त्या बाणवृष्टींनीं हनुमान व्याप्त झाला असतां, पर्जन्यवृष्टींनीं आच्छादित झालेल्या पर्वतराजाप्रमाणें दिसूं लागला. राक्षस हनुमानावर बाणवृष्टि करूं लागले; परंतु सत्वर गतीनें युक्त असलेल्या त्या हनुमानानें निर्मल आकाशामध्यें संचार करितां करितां त्या वीरांचे रथवेग व बाण चुकविण्यास आरंभ केला. ह्याप्रमाणें तो समर्थ वीर त्या धनुर्धारी राक्षसांसहवर्तमान क्रीडा करूं लागला असतां, इंद्रधनुष्यांनीं युक्त असलेल्या मेघांशीं युद्ध करणाऱ्या वायूप्रमाणें दिसूं लागला. तदनंतर त्या प्रचंड सेनेला त्रस्त करण्याकरितां भयंकर गर्जना करून तो वीर्यवान हनुमान वेगावेगानें त्या राक्षसांवर धावून गेला. त्या शत्रुतापन हनुमानानें कोणाला चपराक मारूनच परलोक दाखविला, कोणाची वृक्षांच्या योगानें संभावना केली, कोणाला बुक्क्या मारूनच त्यानें मृत्युलोकच्या यात्रेंतून मुक्त केलें. आणि कोणाला नखांनींच फाडून टाकिलें! वक्षस्थलानें ताडन करूनच कोणाचा वध केला, कोणाला तर त्यानें पादप्रहारानेंच परलोकीं पाठविलें. कांहीं त्याच्या गर्जनेमुळें तेथल्या तेथेंच भूमीवर पडले. ह्याप्रमाणें ते राक्षस कांहीं उलथून पडले असतां व कांहीं तसेच भूमीवर पडले असतां भयभीत झालेलें तें सर्व सैन्य वाट फुटेल तिकडे पळून गेलें. गज भेसूर गर्जना करूं लागले, अश्व भूमीवर पडले, आणि ध्वज, छत्र व उपवेशनस्थान हीं ज्यांचीं भग्न झालीं आहेत, अशा रथांनीं ती रणभूमि आच्छादित झाली. राक्षसांच्या शरीरांतून रक्त वाहूं लागल्यामुळें मार्गामध्यें रक्ताच्या नद्याच दृष्टीस पडूं लागल्या. नानाप्रकारच्या शब्दांनीं लंका भेसूर शब्द करूं लागली. याप्रमाणें त्या मत्त राक्षसांचा वध करून इतर राक्षसांशीं युद्ध करण्याकरितां तो महाबलाढ्य व प्रचंड पराक्रमी कपिवीर पुनरपि त्या दरवाजावरच जाऊन बसला.

# सर्ग शेहेचाळिसावा.

## विरूपाक्षप्रभृतींचा वध.

महात्म्या वानरानें मंत्रिपुत्रांचा वध केला, असें समजल्यावर अंतःकरणांत भेदरून गेलेल्या रावणानें आपल्या समजुतीप्रमाणें एक उत्कृष्ठ विचार मनामध्यें आणिला. विरूपाक्ष, यूपाक्ष, दुर्धर राक्षस, प्रघस आणि भासकर्ण अशा पांच कर्तव्यदक्ष सेनाधिपतींना त्या रावणानें हनुमानाला धरण्याविषयीं आज्ञा केली. ते वीर सेनाधिपति युक्तिमान होते. युद्धामध्यें वेगानें वायूशीं बरोबरी करणारे होते. रावण त्यांना म्हणाला, " सेनाधिपतींनो, तुम्ही सर्वजण मोठें सैन्य आणि अश्व, रथ व गज बरोबर घेऊन जा, आणि त्या वानराचा समाचार घ्या. त्या वनचराची गांठ पडल्यावर तुम्ही दक्षतेनें असा, आणि देशकालाकडे दृष्टि देऊन जें काय करावयाचें असेल, तें करा. त्याच्या कृतीवरून मी तर्क करूं लागलों, म्हणजे तो वानर असावा असें मला वाटत नाहीं. प्रचंड सामर्थ्यानें युक्त असें तें एक मोठें भूतच आहे. सारांश, ही जी मीं आतां हकीकत सांगितली, ह्यावरून तो वानर असावा, असें मला मुळींच वाटत नाहीं. कदाचित् तपःसामर्थ्यानें आमच्याकरितां इंद्रानें हें एक भूत उत्पन्न केलें असेल. कारण ज्या अर्थी नाग, यक्ष, गंधर्व, देव, असुर आणि महर्षी ह्यांचा मी तुम्हां सर्वांना पाठवून पराजय केला आहे, त्या अर्थी ते आमची कांहीं तरी खोडी काढणारच, ह्याविषयीं मुळींच संशय नाहीं. तस्मात्, तुम्ही बलात्कारानें त्याला धरा. तात्पर्य, त्या वानराला शासन झालेंच पाहिजे. एतदर्थ तुम्ही सर्व सेनापति मोठें सैन्य आणि अश्व, रथ व गज घेऊन तिकडे जा. त्या महापराक्रमी वानराची तुम्ही उपेक्षा करूं नका. महापराक्रमी वानर मी पुष्कळ अवलोकन केले आहेत; उदाहरणार्थ—सुग्रीवासहवर्तमान वाली, महाबलाढ्य जांबवान, सेनाधिपति नील आणि द्विविदप्रभृति इतरहि पराक्रमी वानर मीं अवलोकन केले आहेत. परंतु ह्या वानराप्रमाणें त्यांची भयंकर गति नाहीं, तेज नाहीं, पराक्रम नाहीं, बुद्धि नाहीं, बल नाहीं, उत्साह नाहीं, आणि ह्याच्याप्रमाणें यथेष्ट रूपहि त्यांना धारण करितां येत नाहीं. वानररूपानें हें एक मोठें भूतच उपस्थित झालें आहे, असेंच समजलें पाहिजे. तस्मात् मोठ्या यत्नानें तुम्ही ह्याला धरा. देव, दैत्य, मानव आणि इंद्र ह्यांसहवर्तमान त्रैलोक्य सुद्धां खरोखर संग्रामामध्यें तुमच्यासमोर टिकाव धरण्यास जरी समर्थ नाहीं, तरी रणामध्यें जय इच्छिणाऱ्या

नीतिवेत्त्या पुरुषानें स्वतःचें रक्षण प्रयत्नानें केलें पाहिजे. कारण युद्धामध्यें जय कोणाला प्राप्त होणार, हें अनिश्चित असतें."

आपल्या स्वामीचें हें भाषण मान्य करून ते सर्व महाबलाढ्य, महावेगवान आणि अग्नीसारखे तेजस्वी सेनाधिपति तेथून उडाले. नंतर रथ, मत्त गज, महावेगवान अश्व, धार लाविलेलीं तीक्ष्ण शस्त्रें आणि सर्व प्रकारचीं सैन्यें बरोबर घेऊन ते वीर तिकडे गेले असतां, तो देदीप्यमान महाकपि त्यांच्या दृष्टीस पडला. स्वतःचेच ठिकाणीं असलेल्या प्रभेच्या किरणसमुदायांनीं युक्त असल्यामुळें तो वानर उदयाचलावर येत असलेल्या सूर्याप्रमाणें दिसत होता. प्रचंड वेग, अनुपम धैर्य, अतर्क्य सामर्थ्य, लोकोत्तर बुद्धि, अद्वितीय उत्साह, अनिर्वचनीय देह व अतुल पराक्रम ह्यांनीं युक्त असलेला तो कपि दरवाजावर बसला होता.

त्याला अवलोकन करितांक्षणीं, ते सर्व दिशांस उभे असलेले राक्षस नानाप्रकारच्या भयंकर अस्त्रांसहवर्तमान चोहोंकडून त्याच्या अंगावर धावले. प्रथमतः दुर्धर राक्षसानें मुखाशीं पीतवर्ण असलेले पांच श्वेतवर्ण व तीक्ष्ण बाण त्याच्या मस्तकावर टाकले; परंतु ते त्या महाकपीला कमलपत्रांप्रमाणेंच निरुपद्रवी भासले. त्या पांच बाणांनीं ह्याप्रमाणें तो वानर मस्तकाचे ठिकाणीं ताडित झाला असतां, गर्जनेनें दशदिशा दणाणून टाकीत टाकीत त्यानें आकाशामध्यें उड्डाण केलें. तदनंतर धनुष्य सज्ज करून रथावर आरूढ झालेला महाबलाढ्य वीर दुर्धर शेंकडों बाण टाकीत टाकीत हनुमानाच्या जवळ आला; परंतु वर्षाकाल संपत आला असतां पर्जन्यवृष्टि करणाऱ्या मेघाला ज्याप्रमाणें वायु उडवून देतो, त्याप्रमाणें बाणवृष्टि करणाऱ्या त्या दुर्धराला त्या कपीनें आकाशामध्यें असतांनाच उडवून दिलें. तथापि दुर्धर पीडा देऊं लागला असतां हनुमानानें गर्जना करून आणखीहि आपलें शरीर वृद्धिंगत केलें. इतकेंच नव्हे, तर विजेचा लोळ ज्याप्रमाणें समुद्रावर पडतो, त्याप्रमाणें तो महावेगवान वानर एकाएकीं दुर्धराच्या रथावर पडला. तेव्हां त्या रथाच्या आठहि अश्वांचा चुराडा झाला, दांडी मोडून गेली, कण्याचे तुकडे तुकडे झाले, आणि तो दुर्धर गतप्राण होऊन भूमीवर पडला.

ह्याप्रमाणें भूमीवर पडलेल्या त्या दुर्धराला अवलोकन करितांच, शत्रूला जेरीस आणणारे ते अजिंक्य विरूपाक्ष व यूपाक्ष क्रुद्ध झाले, आणि त्यांनीं उड्डाण केलें. एतकेंच नव्हे, परंतु एकाएकीं उड्डाण करून त्या राक्षसांनीं निर्मल आकाशामध्यें असलेल्या महापराक्रमी वानराला वक्षःस्थलाचे ठिकाणीं मुद्गरांच्या

योगानें प्रहारहि केला. तथापि त्या महाबलाढ्य वानरानें आपल्या वज्रतुल्य वक्षःस्थलानें त्या वेगवान मुद्गरांचा वेग व्यर्थ केला, आणि गरुडासारखा वेग धारण करून त्यानें पुनरपि भूमीवर उडी टाकिली. नंतर एका सालवृक्षासमीप जाऊन व तो उपटून त्या वायुपुत्र वानरानें त्या उभयतां वीर राक्षसांचा वध केला! त्या बलाढ्य वानरानें तिघांचा वध केला, असें पाहून महावेगवान बलाढ्य प्रघस हास्य करून एका बाजूनें हनुमानाच्या जवळ जाऊन उभा राहिला; आणि क्रुद्ध झालेला वीर्यवान भासकर्णहि हातामध्यें शूल घेऊन त्या यशस्वी वानरश्रेष्ठाच्या दुसऱ्या बाजूला उभा राहिला. प्रघसानें आपल्या तीक्ष्ण धारेच्या पट्टयानें वानरश्रेष्ठ हनुमानाला वार केला, आणि भासकर्ण राक्षसानें त्याला शूलानें प्रहार केला. ह्याप्रमाणें त्या उभयतां राक्षसांनीं शरिराला क्षतें पाडिल्यामुळें ज्याचे केस रक्तानें भरलेले आहेत, असा तो क्रुद्ध झालेला वानर बालसूर्यासारखा दिसूं लागला; आणि मृग, श्वापदें व वृक्ष ह्यांसहवर्तमान एक पर्वताचें शिखर उपटून घेऊन वानरश्रेष्ठ वीर हनुमानानें दोन्ही राक्षसांना प्रहार केला असतां पर्वतशिखराच्या तडाक्यानें चिरडून गेलेल्या त्या राक्षसांचे तिलप्राय तुकडे तुकडे होऊन गेले.

ह्याप्रमाणें ते पांचहि सेनापती जमीनदोस्त झाले असतां, अवशिष्ट राहिलेल्या त्या राक्षससेनेचा हनुमंतानें वध केला. सहस्रनयन इंद्र ज्याप्रमाणें दैत्यांचा नाश करितो, त्याप्रमाणें त्या कपीनें अश्वांच्या योगानें अश्वांचा, गजांच्या योगानें गजांचा, योद्धयांच्या योगानें योद्धयांचा व रथांच्या योगानें रथांचा नाश करून टाकिला; आणि वध पावलेले राक्षस, शीघ्र गमन करणारे अश्व व गज आणि कणे मोडून गेलेले मोठमोठे रथ ह्यांच्या योगानें त्या रणभूमींतील मार्ग अगदीं बंद होऊन गेले.

ह्याप्रमाणें सेना व वाहनें ह्यांसहवर्तमान त्या वीर सेनाधिपतींचा संग्रामामध्यें वध केल्यावर प्रजेचा संहार केल्यानंतर विश्रांती घेत बसणाऱ्या कालाप्रमाणेंच कीं काय, त्या द्वाराचा आश्रय करून हनुमान विश्रांती घेत पडला.



# सर्ग सत्तेचाळिसावा.

## रावणपुत्र अक्षाचा वध.

हनुमानानें वाहनें व अनुयायी ह्यांसहवर्तमान पांचहि सेनापतींचा वध केल्याचें ऐकून संग्रामामध्यें भयंकर आणि युद्धाविषयीं उत्सुक अशा तेथें प्रत्यक्ष असलेल्या अक्ष नामक पुत्राला रावणानें नेत्रसंकेतानें सुचविलें. तेव्हां सुवर्णाचें शृंगारिलेलें धनुष्य हातांत घेऊन तयार असलेला प्रतापी अक्ष यज्ञमंडपामध्यें द्विजश्रेष्ठांनीं आज्याच्या योगानें प्रज्वलित केलेला अग्निच कीं काय, अशा रीतीनें तेथून उठाला. तदनंतर बालसूर्याप्रमाणें ज्याची प्रभा आहे. आणि उत्कृष्ठ सुवर्णभूषणसमुदायानें जो व्याप्त झालेला आहे, अशा रथावर आरूढ होऊन तो प्रचंड राक्षसश्रेष्ठ वीर्यवान अक्ष त्या महाकपीकडे निघाला. तात्पर्य तपश्चर्येच्या समृद्धीमुळें जो प्राप्त झाला आहे; उत्कृष्ठ सुवर्णाच्या भूषणसमुदायानें जो शृंगारिलेला आहे; पताका, रत्नविभूषित ध्वज आणि मनाप्रमाणें वेगवान श्रेष्ठ अश्व ह्यांनीं जो युक्त आहे; ज्याच्यावर देवदैत्यांचा हल्ला होणें दुर्घट आहे; ज्याची गति कोठेंहि कुंठित होत नाहीं; विद्युल्लतेसारखी ज्याची प्रभा आहे; युद्धसामुग्रीनें युक्त असून जो आकाशमार्गानें संचार करणारा आहे; ज्याच्यावर भाते ठेविले आहेत; ज्याच्या आठहि बाजूंस तरवारी लटकविलेल्या आहेत; शक्ति व तोमर हीं आयुधें ज्यावर योग्य ठिकाणीं ठेविलेलीं आहेत; सोन्याच्या कड्यांना अडकविलेल्या आणि चंद्रसूर्याप्रमाणें तेजस्वी असलेल्या युद्धोपयोगी वस्तूंनीं जो झळकत आहे; आणि सूर्याप्रमाणें ज्याची प्रभा आहे, अशा रथावर आरूढ होऊन तो देवतुल्य पराक्रमी अक्ष लंकेंतून बाहेर पडला. अश्व, गज आणि मोठमोठे रथ ह्यांच्या ध्वनींनीं आकाश व पर्वतांसहवर्तमान पृथ्वी दणाणून टाकीत टाकीत तो अक्ष एकत्र जुळलेल्या सैन्यासहवर्तमान दारावर बसलेल्या त्या समर्थ वानरासमीप गेला; आणि त्याकडे ऐटीनें पाहूं लागला असतां, प्रजेच्या संहारानंतर बसलेला प्रलयकालचा अग्निच कीं काय असा तो हनुमान विस्मयचकित व क्षुब्ध होऊन बसलेला त्याच्या दृष्टीस पडला. तदनंतर शत्रूंचे ठिकाणीं गाजलेल्या या महात्म्या वानराचा पराक्रम आणि वेग व स्वतःचें बल हीं लक्ष्यांत आणून, तो महाबलाढ्य रावणपुत्र प्रलयकालीं वृद्धिंगत होणाऱ्या सूर्याप्रमाणें वृद्धिंगत झाला. संग्रामामध्यें निवारण होण्यास अशक्य असा त्या हनुमानाचा पराक्रम पाहून क्रुद्ध झालेला तो अक्ष स्वस्थ उभा राहिला; आणि मनामध्यें यत्किंचित्हि

गोंधळून न जातां तीक्ष्ण अशा तीन बाणांनीं हनुमानाला त्यानें युद्धाकरितां प्रेरणा केली. तदनंतर हनुमान हा शत्रूचा पराजय करण्यास समर्थ, श्रमरहित व गर्विष्ठ आहे, असें पाहून हातामध्यें धनुर्बाण घेतलेला तो अक्ष क्षुब्ध मनानें इकडे तिकडे पाहूं लागला; आणि अमोघ पराक्रम करणारा व सुवर्णाचीं उरोभूषणें, बाहुभूषणें व मनोहर कुंडलें ह्यांनीं युक्त असलेला तो अक्ष त्या वानराला जाऊन भिडला असतां, देवदैत्यांनाहि मोह उत्पन्न करणारा असा त्या उभयतांमध्यें अप्रतिम युद्धप्रसंग झाला. भूमीवरील प्राणी आक्रोश करूं लागले, सूर्याचा प्रकाश पडेनासा झाला, वायु स्तब्ध झाला, पर्वत हालूं लागले, आणि कपि व रावणकुमार ह्यांचें तें वीर्यामुळें प्रवृत्त झालेलें युद्ध अवलोकन करून स्वर्ग दुमदुमून राहिला, व समुद्रहि क्षुब्ध होऊन गेला! लक्ष्य, संधान व प्रयोग ह्यांचें तत्त्व जाणणाऱ्या त्या वीर अक्षानें विषयुक्त भुजंगच कीं काय असे उत्कृष्ठ अग्रें व सुवर्णाचीं पिसें ह्यांनीं युक्त असलेले तीन बाण त्या वानराच्या मस्तकावर टाकिले. एकदम मस्तकावर टाकिलेल्या त्या बाणांच्या योगानें ज्याचें शरीर रक्तानें भरून गेलें आहे, व ज्याचे नेत्र फिरून गेले आहेत, असा तो बालसूर्यतुल्य तेजस्वी हनुमान बाणरूप किरणांनीं युक्त झाला असल्यामुळें किरणसमुदाय धारण करणाऱ्या सूर्याप्रमाणें झळकूं लागला. तदनंतर राजाधिराज रावणाचा पुत्र संग्रामामध्यें आपलीं अद्भुत आयुधें व चकित करून सोडणारें धनुष्य सज्ज करून उभा असल्याचें अवलोकन करून वानरराज सुग्रीवाचा तो श्रेष्ठ मंत्री आनंदित झाला, आणि युद्धाविषयीं उत्सुक होऊन वृद्धिंगत होऊं लागला.

असो. मंदर पर्वताच्या शिखरावर आलेल्या मध्यान्हकालच्या सूर्याप्रमाणें ज्याचें कोपरूप तेज वृद्धिंगत झालें आहे, आणि बल व वीर्य ह्यांनीं जो युक्त आहे, तो हनुमान नेत्रस्थ अग्नीच्या किरणांनीं त्या अक्ष कुमाराला सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान दग्ध करूं लागला. तदनंतर मेघ ज्याप्रमाणें महापर्वतावर वृष्टि करूं लागतो, त्याप्रमाणें शरासनरूप इंद्रधनुष्य व शररूप पर्जन्यवृष्टि ह्यांनीं युक्त असलेल्या त्या राक्षसरूप मेघानें वानराधिपतिरूप पर्वतावर जोराजोरानें बाणवृष्टि केली. तेव्हां संग्रामामध्यें प्रचंड पराक्रम करणाऱ्या आणि प्रवृद्ध तेज, बल व वीर्य ह्यांनीं युक्त असलेल्या त्या रावणकुमाराचें तें कृत्य पाहून मेघासारखी गर्जना करणारा हनुमान हर्षानें गर्जना करूं लागला. बालपणामुळें युद्धाचा ज्याला गर्व झाला आहे, आणि कोप चढला

असल्यामुळें ज्याचे नेत्र रक्ताच्या उपमेस पात्र झाले आहेत, असा तो अक्ष तृणांनीं आच्छादित झालेल्या मोठ्या विहिरीजवळ येणाऱ्या गजाप्रमाणें युद्धामध्यें त्या अप्रतिम वानराजवळ आला. हातपाय हालवूं लागल्यामुळें ज्याची मुद्रा भयंकर दिसूं लागली आहे, व ज्याचा शब्द मेघाप्रमाणें गंभीर आहे, अशा त्या हनुमानावर त्या अक्षानें एकदम बाणांचा गहजब केला असतां त्यानें गर्जना केली, आणि उत्साहानें तो आकाशामध्यें उड्डाण करूं लागला; परंतु तो हनुमान उड्डाण करूं लागला असतां, पाषाणवृष्टींनीं पर्वत आच्छादित करणारा मेघच कीं काय, अशा रीतीनें रथावर आरूढ झालेला आणि रथ्यांमध्यें अतिशय श्रेष्ठ असलेला तो बलाढ्य राक्षसश्रेष्ठ बाणांनीं हनुमानाला आच्छादित करीत करीत त्याच्या अंगावर धावला. तेव्हां त्याचे ते बाण व्यर्थ करण्याकरितां संग्रामामध्यें भयंकर पराक्रम करणारा व मनाप्रमाणें वेगवान असलेला तो वीर हनुमान आकाशमार्गामध्यें बाणांच्या अंतरालांतून वायूप्रमाणें सत्वर संचार करूं लागला. प्रथमतः धनुष्य घेऊन आणि युद्धाविषयीं उत्सुक होऊन नानाप्रकारच्या उत्कृष्ठ बाणांनीं आकाश व्याप्त करून टाकीत असलेल्या त्या अक्षाकडे ऐटीनें पाहिल्यावर तो वायुपुत्र हनुमान चिंताक्रान्त झाला. तदनंतर कुमारश्रेष्ठ महात्म्या अक्षानें बाणांच्या योगानें ज्याचें वक्षःस्थल विदीर्ण करून करून टाकिलें आहे, अशा त्या गर्जना करणाऱ्या महापराक्रमी आणि महापराक्रमाचें विशेष तत्त्व जाणणाऱ्या वानरानें संग्रामामध्यें पराक्रम करण्याचा विचार चालविला. तो म्हणाला, “ हा महाबलाढ्य प्रचंड राक्षस बालबालसूर्याप्रमाणें तेजस्वी असून प्रौढाप्रमाणें कृति करीत आहे. ह्यास्तव युद्धासंबंधीं सर्व प्रकारचे पराक्रम करीत असलेल्या राक्षसाचा आतांच वध करावा, असें मला वाटत नाहीं. हा महात्मा वीर्यानें मोठा असून दक्ष व संग्रामामध्यें अतिशय सहनशील आहे. तस्मात्, पराक्रम व गुण ह्याचे ठिकाणीं दृष्टीस पडत असल्यामुळें नाग आणि यक्ष ह्यांसहवर्तमान मुनी निःसंशय त्याची प्रशंसा करीत असतील. पराक्रम आणि उत्साह ह्यांच्या योगानें ज्याचें मन विकास पावलें आहे, असा हा माझ्यासमोर उभा असलेला राक्षस माझ्याकडे पहात आहे; परंतु देवदैत्यांच्याहि मनामध्यें कांपरें भरविण्याजोगा ह्या चलाख राक्षसाचा पराक्रम आहे. ह्याची उपेक्षा केली असतां हा आपला पराभव करण्यास कमी करणार नाहीं. संग्रामामध्यें ह्याचा पराक्रम वाढ-

तच आहे. ह्यास्तव आज ह्याचा वध करणें, मला बरें दिसतें. कारण वृद्धिंगत होत असलेल्या अग्नीची उपेक्षा करणें योग्य नाहीं.

ह्याप्रमाणें शत्रूच्या पराक्रमाचा विचार करून आणि स्वत:चाहि पराक्रम मनांत आणून त्या महाबलाढय हनुमानानें वेगाचें अवलंबन करून त्याच वेळीं त्याचा वध करण्याचा विचार केला. प्रथमत: त्या वायुपुत्रानें आकाशामध्यें असतांना कोणतीहि चाल लाविली तरी गोंधळून न जाणाऱ्या व भार सहन करणाऱ्या त्या राक्षसाच्या मोठमोठ्या श्रेष्ठ आठ अश्वांचा तलप्रहारांनीं वध केला. तळहाताचा तडाखा बसल्याबरोबर रथांतील उपवेशनस्थान मोडून गेलें. दांड्याहि उलथ्या झाल्या. अशा रीतीनें वानराधिपति सुग्रीवाच्या मंत्र्याचे हातून भग्न झालेला तो महारथ, अश्व मृत झाल्यामुळें आकाशांतून भूमीवर पडला. असें झालें असतां, धनुष्य व खड्ग धारण करणारा तो महारथी अक्ष त्या रथाचा त्याग करून आकाशामध्यें उड्डाण करूं लागला असतां, योगसामर्थ्यानें देहत्याग करून स्वर्गारोहण करणारा ऋषिच कीं काय, असा दिसला. तदनंतर पक्षिराज गरुड, वायु आणि सिद्ध ह्यांनीं अवलंबन केलेल्या आकाशामध्यें तो अक्ष संचार करूं लागला असतां, तो वायूसारखा वेगवान व पराक्रमी वानर त्याच्याशीं जाऊन भिडला. त्यानें त्याचे दोन्ही पाय घट्ट धरिले. नंतर मोठा सर्प घेतलेला पक्षिराज गरुडच कीं काय, अशा त्या पितृतुल्य पराक्रमी वानरश्रेष्ठ हनुमानानें त्याला हजारों वेळां रणामध्यें गरगर फिरवून वेगानें भूतलावर टाकिलें. तेव्हां त्याचे हात, पाय, कंबर व ऊर ह्यांचा चुराडा होऊन गेला. शरिरांतून रक्तस्राव चालला. डोळ्यांतील हाडें पिचून गेलीं. सांधे फुटून गेले. शिराहि अस्ताव्यस्त झाल्या. अशा रीतीनें तो राक्षस वायुपुत्र हनुमानाच्या हातून वध पावला !

अशा प्रकारें महाकपि हनुमानानें त्याला भूतलावर आपटून राक्षसाधिपति रावणाच्या अंत:करणांत भय उत्पन्न केलें; आणि कुमाराचा वध झाला असतां एकत्र जुळलेले ग्रह, महर्षी, भूतें, यक्ष, पन्नग आणि इंद्रासहवर्तमान देव अत्यंत विस्मयचकित होऊन त्या वानराकडे पाहूं लागले. असो. इंद्रपुत्र जयंताप्रमाणें असलेल्या आणि क्रोधामुळें नेत्र आरक्तवर्ण झालेल्या त्या कुमार अक्षाचा वध करून तो वीर हनुमान प्रजेचा संहार केल्यानंतर श्रांत झालेल्या कालाप्रमाणें त्या दरवाजावरच गेला.

# सर्ग अठ्ठेचाळिसावा.



## रावणाची इंद्रजिताला प्रेरणा.

ह्याप्रमाणें हनुमानानें कुमार अक्षाचा वध केला असतां, त्या महात्म्या राक्षसाधिपति रावणानें मन घट्ट करून रागारागानें देवतुल्य इंद्रजिताला जाण्याची अनुज्ञा दिली. तो म्हणाला, "तूं अस्त्रवेत्ता आहेस, शस्त्र धारण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ आहेस, देवदैत्यांना भय उत्पन्न करणारा आहेस, इंद्रासहवर्तमान देवांचे ठिकाणीं तुझा पराक्रम दृष्टोत्पत्तीस आलेला आहे, आणि ब्रह्मदेवाची शुश्रूषा करून तूं अस्त्रविद्या संपादन केली आहेस. तुझ्या अस्त्रसामर्थ्यामुळेंच इंद्राचा आश्रय करून राहिलेले मरुद्गणांसहवर्तमान देव संग्रामामध्यें टिकाव धरण्यास समर्थ झाले नाहींत. संग्रामामध्यें श्रांत न होणारा असा तुझ्याखेरीज त्रैलोक्यांत दुसरा कोणीहि नाहीं. बाहुबलानें व तपानें सुरक्षित असून बुद्धिमानांमध्येंहि तूंच श्रेष्ठ आहेस, आणि सांप्रत तूंच पृथ्वीमध्यें मुख्य आहेस. संग्रामामध्यें कर्तव्य जीं कर्में त्यांत तुला अशक्य असें कोणतेंहि नाहीं. बुद्धिपूर्वक राजकार्याचा विचार कर्तव्य असतां तुझ्या बुद्धीला गहन अशी कोणतीहि गोष्ट नाहीं, आणि तुझें सामर्थ्य व अस्त्रबल न जाणणारा असा त्रैलोक्यामध्यें एकहि नाहीं. संग्रामामध्यें तुझा पराक्रम, अस्त्रबल व तपःसामर्थ्य हीं सर्व माझ्याप्रमाणें आहेत. म्हणूनच निकरानें युद्ध सुरू झालें असतां जयाविषयीं निःसंशय असलेलें माझें मन तुझ्यावर अवलंबून असल्यामुळें साशंक होत नाहीं. सर्व किंकर, जंबुमाली, राक्षस, वीर व सेनाधिपति असे पांचहि अमात्यपुत्र, अश्व, गज आणि रथ ह्यांसहवर्तमान असलेल्या समृद्ध सेना, महोदर व कुमार अक्ष ह्या सर्वांचा वध झाला आहे; परंतु हे शत्रुनाशका इंद्रजिता, तुझी ज्याप्रमाणें मला खात्री आहे, त्याप्रमाणें त्यांची मुळींच नव्हती. तेव्हां वध पावलेलें हें प्रचंड सैन्य लक्ष्यांत आणून वानराचा पराभव आणि पराक्रम ह्यांकडे दृष्टि देऊन व आपल्या सामर्थ्याचाहि विचार करून तूं आपल्या सामर्थ्याला अनुरूप असा त्या वानरावर भडिमार कर. हे अस्त्रधरश्रेष्ठा, युद्धाकरितां बाहेर पडून तूं संनिध गेल्यावर सैन्याच्या भडिमारांनीं शत्रु जेरीस येऊन नाश होईल, अशा रीतीनें तूं आपलें व शत्रूचें बल अवलोकन करून युद्धाला आरंभ कर. हे वीरा, सेनांचा तेथें कांहींएक उपयोग नाहीं. कारण, सेनांच्या झुंडीच्या झुंडी जरी असल्या, तरी त्याच्याशीं गांठ पडली असतां त्या

पळून जात असतात. त्याचप्रमाणें प्रचंड सामर्थ्यानें युक्त असलेलें वज्र घेऊनहि कांहीं उपयोग व्हावयाचा नाहीं. कारण, वायुपुत्र हनुमानाचें सामर्थ्य किती आहे, ह्याची अटकळ करितां येणें अशक्य आहे, आणि हा अग्नितुल्य असल्यामुळें शस्त्रादिरूप साधनांनींहि ह्याचा वध होणें शक्य नाहीं. सारांश, ह्याप्रमाणें मीं सांगितलेल्याचा नीट विचार करून, स्वतःच्या पराक्रमाशीं कपीच्या पराक्रमाचें साम्य असल्यामुळें अंतःकरण स्वस्थ ठेवून आणि ह्या दिव्य धनुष्याच्या सामर्थ्याकडे लक्ष्य देऊन तूं जा; आणि शत्रूचा वार न घेतां त्याचा पराभव करण्याचें कृत्य सुरू कर. अशा प्रसंगीं मी तुला पाठवीत आहें, हा जरी माझा विचार बरोबर नाहीं, तरी राजधर्म आणि क्षत्रधर्म ह्यांना अनुसरूनच हा विचार आहे. हे शत्रुदमना, राजानें नानाप्रकारच्या शास्त्रांमध्यें आणि संग्रामामध्यें नैपुण्य संपादिलें पाहिजे. रणामध्यें जय प्राप्त व्हावा अशी ज्याला इच्छा असेल, त्यानें नानाप्रकारच्या शास्त्रांचें ज्ञान अवश्य संपादन केलें पाहिजे."

### हनुमान आणि इंद्रजित यांचें युद्ध.

हें पित्याचें भाषण ऐकतांच रणांत जाण्याचा निश्चय करून त्या देवतुल्य पराक्रमी वीर इंद्रजितानें रावणाला अतित्वरेनें प्रदक्षिणा केली. नंतर कमलपत्रांप्रमाणें ज्याचे नेत्र विशाल आहेत, आणि जो युद्धाविषयीं अति उत्सुक झाला आहे, असा तो राक्षसाधिपति रावणाचा पुत्र महातेजस्वी इंद्रजित युद्धाकरितां बाहेर पडला. पक्षिराज गरुडाप्रमाणें ज्यांचा वेग आहे व ज्यांचे दंत तीक्ष्ण आहेत, असे चार गज जोडिलेल्या रथावर तो असह्य वेगवान इंद्रजित आरूढ झाला; आणि धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ व अस्त्रवेत्त्यांमध्यें वरिष्ठ असलेला तो शस्त्रवेत्ता महारथी जिकडे हनुमान होता, तिकडे रथांत बसून सत्वर गेला. तेव्हां त्याच्या रथाचा घोष आणि धनुष्याचा व प्रत्यंचेचा टणत्कार ऐकून घेऊन त्या वानरवीर हनुमानाला फारच हर्ष झाला.

असो. तो रणपंडित इंद्रजित फळ घांसलेले बाण व धनुष्य घेऊन हनुमानाकडे गेला. तेव्हां हातामध्यें बाण घेऊन तो इंद्रजित आनंदानें रणामध्यें जाऊं लागला असतां, सर्व दिशा धुंद झाल्या. अशुभसूचक वनचर प्राणी नानाप्रकारें आक्रोश करूं लागले. त्याचप्रमाणें तेथें असलेले नाग, यक्ष, महर्षी, ग्रह, सिद्ध आणि आकाश व्याप्त करून राहिलेले पक्षिगण पराकाष्ठेचे आनंदित होऊन उच्च स्वरानें गर्जना करूं लागले. रथासहवर्तमान येत असलेला विशाल इंद्रध्वज अवलोकन केल्यावर तो वेगवान कपि मोठी गर्जना करून

वृद्धिंगत झाला असतां, त्या दिव्य रथावर आरूढ झालेला आणि अद्भुत धनुष्य धारण केलेला तो इंद्रजित विद्युल्लतेसारखें तेजस्वी व मोठा शब्द करणारें आपलें धनुष्य आकर्षण करूं लागला. तदनंतर देवदैत्याधिपतींप्रमाणें परस्परांशीं वैर बांधून राहिलेले आणि संग्रामासंबंधानें निःशंक असलेले ते महाबलाढ्य व अत्यंत तीक्ष्ण वेगवान वानर आणि राक्षस एकमेकांशीं येऊन भिडले. संग्रामामध्यें निपुण असा जो धनुर्धर महारथी वीर इंद्रजित, त्याच्या बाणांचा वेग त्या वृद्धिंगत झालेल्या अतर्क्य हनुमानानें व्यर्थ करून टाकिला, आणि तो आकाशामध्यें संचार करूं लागला. तदनंतर दीर्घ व तीक्ष्ण फळें, उत्कृष्ठ पंख आणि सुवर्णाचे चित्रविचित्र पंखे[1] ह्यांनीं युक्त व वेगामध्यें वज्राची बरोबरी करणारे असे एकसारखे बाण त्या शत्रुपक्षीय वीरनाशक इंद्रजितानें हनुमानावर सोडिले. परंतु त्याच्या रथाचा गडगडाट, मृदंग, नौबदी व पडघम ह्यांचा घोष, आणि आकृष्ठ होत असलेल्या धनुष्याचा टणत्कार ऐकून त्या वानरानें पुनरपि उड्डाण केलें. तदनंतर नेम धरण्यामध्यें पटाईत असलेल्या त्या इंद्रजिताचा नेम चुकविण्याकरितां तो महाकपि बाणांच्या अंतरालामध्यें मोठ्या चलाखीनें हिंडूं लागला. तो वायुपुत्र हनुमान त्याच्या बाणांपुढें वारंवार येऊं लागला, आणि हात पसरून उड्डाण करूं लागला.

### हनुमंताला ब्रह्मास्त्रबंधन.

संग्रामामध्यें निपुण असलेल्या त्या उभयतां वेगवान मारुती व इंद्रजित ह्यांनीं सर्व प्राण्यांचें मन थक्क करून सोडणारें अनुपम युद्ध केलें. इंद्रजिताला हनुमानाचा अंदाज लागला नाहीं, व हनुमानालाहि त्या प्रचंड राक्षसाच्या सामर्थ्याचा अदमास झाला नाहीं. ते उभयतांहि देवतुल्य पराक्रमी एकमेकांशीं येऊन भिडल्यावर परस्परांना असह्य होणारें असें युद्ध करूं लागले. तदनंतर लक्ष्याचे स्थानीं असलेला हनुमान इकडे तिकडे संचार करीत असल्यामुळें नेम धरलेला व्यर्थ जाऊन अमोघ बाण कोठें तरी पडूं लागले असतां, समाधीनें एकाग्र चित्त करून तो महात्मा इंद्रजित विचार करूं लागला. तेव्हां राक्षसपुत्र इंद्रजितानें तो वानर अवध्य आहे, असें धर्मबलानें जाणिलें. ह्याचा निग्रह करितां यावा एतदर्थ हा कांहीं वेळ स्थिर कसा राहील, असा विचार त्या मुख्य वानर वीरासंबंधानें त्याच्या मनामध्यें आला. नंतर अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या अत्यंत तेजस्वी इंद्रजितानें त्या वानरश्रेष्ठ हनुमानाला उद्देशून

---

१ बाणाचा पिसारा लाविलेला भाग.

ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला; परंतु ब्रह्मास्त्रानेंहि हा अवध्य आहे, असें जाणून त्या अस्त्रतत्त्ववेत्त्या इंद्रजितानें महापराक्रमी हनुमानाला त्या अस्त्रानें नुसतें बांधून टाकिलें. ह्याप्रमाणें ब्रह्मास्त्राचा प्रयोग करून त्या राक्षसानें त्या वानराला बद्ध केलें असतां, तो वानर वीर निश्चेष्ट होऊन भूतलावर पडला! तदनंतर ब्रह्मास्त्रानें आपणाला बंध प्राप्त झाला आहे, असें समजून आल्यावर वानरश्रेष्ठ हनुमानानें ब्रह्मदेवाचा अनुग्रह मनामध्यें आणिला. त्या प्रभूच्या कृपाप्रभावामुळें त्या अस्त्रापासून त्याला अल्पहि पीडा झाली नाहीं. सारांश, ब्रह्मविषयक मंत्रांनीं अभिमंत्रण केलेल्या ब्रह्मास्त्राचा बंध आपणाला प्राप्त झाला आहे, असें अवलोकन करून 'माझ्या अस्त्रापासून एका क्षणांत तूं मुक्त होशील' असा जो वर ब्रह्मदेवानें दिला होता, त्याचें मारुतीनें स्मरण केलें. "ब्रह्मास्त्राच्या बंधांतून ब्रह्मदेवाच्या प्रभावानें मुक्त होण्याचें मला सामर्थ्य नाहीं, असें समजून ह्यानें जो ब्रह्मदेवाचा अस्त्रबंध योजिला आहे, तो मला निवृत्त केला पाहिजे."

ह्याप्रमाणें अस्त्राचें वीर्य, त्या संबंधानें ब्रह्मदेवाचा आपणावर झालेला अनुग्रह आणि अस्त्रबंध सोडण्याची आपली शक्ति ह्या सर्वांचा विचार करून त्या वानरानें एक क्षणभर ब्रह्मदेवाच्याच आज्ञेचें अवलंबन केलें. तो म्हणाला, "ब्रह्मा, इंद्र आणि वायु ह्यांनीं माझें रक्षण केलें असल्यामुळें, ह्या अस्त्रानेंहि जरी मी बद्ध झालों आहें, तरी मला भीति नाहीं; परंतु राक्षसांनीं मला बांधून नेलें असतां राक्षसराज रावणाशीं संवाद हा आपणाला एक मोठाच फायदा होणार आहे. ह्यास्तव शत्रु मला खुशाल अस्त्रानें बांधून नेवो."

ह्याप्रमाणें कोणतेंहि कृत्य विचारपूर्वक करणारा तो हनुमान मनाचा निश्चय करून निश्चेष्ट राहिला; आणि शत्रूंनीं सर्व बाजूंनीं हल्ला करून त्याला धरिलें असतां आणि ते त्याची निर्भर्त्सना करूं लागले असतां तो गर्जना करूं लागला. इंद्रजिताच्या ब्रह्मास्त्रप्रयोगामुळें तो शत्रुदमन वानर निश्चेष्ट झाला आहे, असें अवलोकन करून त्या राक्षसांनीं झाडांच्या एकत्र केलेल्या सालींनीं व तागाच्या दोऱ्यांनीं त्याला बांधिलें. तेव्हां 'उत्सुकतेमुळें राक्षसराज रावण मला एकदां तरी अवलोकन करण्याचें मनांत आणील' असा मनामध्यें निश्चय बाळगून, शत्रुभूत असलेल्या वीर राक्षसांनीं बलात्कारानें केलेलें बंधन आणि निर्भर्त्सना हीं त्यानें सहन केली. असो. तो वीर्यवान हनुमान झाडांच्या सालींनीं वगैरे बद्ध झाल्यामुळें अस्त्राच्या बंधांतून मुक्त झाला. कारण, दुसरा बंध प्राप्त झाला असतां तो अस्त्रबंध कायम रहात नाहीं. तदनंतर वृक्षत्वचांनीं तो वानर-

श्रेष्ठ बद्ध झाला असून अस्त्रबंधांतून मुक्त झाला आहे, असें अवलोकन करून आणि इतर बंधानें बद्ध झाला असतांनाहि अस्त्रबंधानेंच बद्ध झाल्यासारखें तो दाखवीत आहे, हेंहि लक्ष्यात घेऊन तो वीर इंद्रजित चिंता करूं लागला. तो म्हणाला, "अहो, मीं केलेलें मोठें कर्म राक्षसांनीं व्यर्थ करून टाकिलें! कारण, त्या राक्षसांनीं मंत्रसामर्थ्याचा विचार केला नाहीं. सारांश इतरांचा बंध प्राप्त झाला असतां, ब्रह्मास्त्रमंत्रानें झालेला बंध नाहींसा होतो, हें त्यांना समजलें नाहीं; आणि ब्रह्मास्त्र व्यर्थ झाल्यावर पुनरपि अस्त्रप्रयोग चालतहि नाहीं. ह्यास्तव जयाविषयीं आम्हां सर्वांनाच संशय उत्पन्न झाला आहे."

हनुमंताला सभेंत नेणें.

असो. हनुमान ब्रह्मास्त्रापासून मुक्त झाला असूनहि तसें त्यानें दर्शविलें नाहीं; व ते राक्षस सालीच्या वगैरे बंधनांनीं त्याला पीडा देऊन रावणाकडे ओढून नेऊं लागले. तदनंतर कालाप्रमाणें ज्यांची मुष्टि भयंकर आहे, असे ते क्रूर राक्षस मारीत मारीत त्या वानराला राक्षसराज रावणाचे समीप घेऊन गेले; आणि वृक्षत्वचेच्या दोऱ्यांनीं बद्ध झालेला तो हनुमान अस्त्रबंधापासून मुक्त झाल्याचें अवलोकन केल्यावर अनुयायांसहवर्तमान असलेल्या रावण राजाला इंद्रजितानें तो महाबलाढय वानरश्रेष्ठ दाखविला. तात्पर्य मत्त गजाप्रमाणें बद्ध झालेला तो वानरश्रेष्ठ हनुमान आणिल्याचें राक्षसांनीं राक्षसाधिपति रावणाला निवेदन केलें. तेव्हां "हा कोण? कोणाचा पुत्र? कोठून आला? याचें काय कार्य आहे? आणि ह्याला कोणाचा आश्रय आहे?" अशा गोष्टी त्याला अवलोकन केल्यावर राक्षसवीरांमध्यें सुरू झाल्या; आणि "मारा, जाळा, खाऊन टाका" अशा प्रकारें वेगवेगळे राक्षस दांत ओठ खाऊन त्याच्या संबंधानें एकमेकांशीं रागारागानें बोलूं लागले.

असो. मार्गाचें एकदम आक्रमण करून तेथें गेल्यावर राक्षसाधिपति रावणाच्या पायांशीं बसलेले त्या राजाचे वृद्ध सेवक आणि मोठमोठ्या रत्नांनीं भूषित केलेलें गृह त्या कपीनें अवलोकन केलें. अक्राळविक्राळ रूपें धारण करणारे राक्षस ज्याला इकडून तिकडे ओढीत आहेत, अशा त्या वानरश्रेष्ठ हनुमानाला त्या महातेजस्वी रावणानें अवलोकन केलें. त्या कपिश्रेष्ठ हनुमानानेंहि सूर्याप्रमाणें प्रकाशत असलेल्या त्या तेजस्वी व बलाढ्य राक्षसाधिपतीला पाहिलें. त्या कपीला अवलोकन केल्यावर क्रोधानें ज्याचे नेत्र लाल होऊन गेले आहेत, अशा त्या रावणानें कुलानें व शीलानें श्रेष्ठ अशा आपल्या तेथें बसलेल्या मुख्य

मंत्र्यांना त्याची चौकशी करण्याविषयीं आज्ञा केली असतां, त्याचा उद्देश काय आहे, व तो उपस्थित होण्याचें कारण काय आहे, हें त्या वानराला त्यांनीं प्रथम अनुक्रमें विचारिलें; व त्यानेंहि " वानरराज सुग्रीवाचा मी दूत आहें, व तेथूनच मी येथें आलों आहें " असें सांगितलें.

## सर्ग एकुणपन्नासावा.

### सभेंत बसलेल्या रावणाचें वर्णन.

तदनंतर इंद्रजिताच्या त्या कर्मानें विस्मयचकित झालेल्या भयंकर पराक्रमी हनुमानाचे नेत्र आरक्त वर्ण झाले, आणि राक्षसाधिपति रावणाकडे तो पाहूं लागला. तो महातेजस्वी रावण मोत्यांच्या समुदायांनीं भरलेल्या व चकाकत असलेल्या मोठ्या मूल्यवान सुवर्णमुकुटानें झळकत होता. हिरे बसविलेल्या आणि मुख्य भागावर मोठमोठीं रत्नें जडलेल्या अद्भुत सुवर्णभूषणांनीं तो देदीप्यमान दिसत होता; व तीं भूषणें जशीं कांहीं मनःकल्पितच होतीं. मोठा मूल्यवान शेला त्यानें पांघरिला होता. त्याच्या शरिराला रक्तचंदनाची उटी लाविलेली होती. नानाप्रकारच्या चित्रविचित्र आकृतींनीं त्याचें शरीर भरून काढिलेलें होतें. दीप्त, तीक्ष्ण व प्रचंड दंष्ट्रांनीं युक्त असलेल्या त्या राक्षसाधिपतीची मुद्रा ओष्ठांच्या योगानें, आणि आरक्तवर्ण व दिसण्यांतहि भयंकर अशा मनोहर नेत्रांच्या योगानें विचित्र दिसत होती. नानाप्रकारच्या श्वापदांनीं व्याप्त झालेल्या शिखरांच्या योगानें झळकत असलेला मंदर पर्वतच कीं काय, असा तो महाबलाढ्य वीर रावण दहा मस्तकांच्या योगानें झळकत होता. कज्जलाच्या राशीप्रमाणें तो दिसत होता. त्याच्या वक्षःस्थलावर हार झळकत होता, आणि त्याचें मुख चंद्रासारखें आल्हादकारक असल्यामुळें तो बालसूर्यासहवर्तमान असलेल्या मेघाप्रमाणें दिसत होता. पांच फडांचे भयंकर नागच कीं काय अशा प्रकारच्या हातांनीं तो युक्त होता, आणि दंडामध्यें केयूर व अंगद हीं भूषणें त्यानें घातलीं होतीं. वर जडावाचें काम केलें असल्यामुळें अद्भुत आणि उत्कृष्ट आस्तरणांनीं युक्त अशा स्फटिकाच्या मोठ्या अद्भुत सिंहासनावर तो बसलेला होता. अतिरिक्त भूषणें धारण केलेल्या तरुणी स्त्रिया हातामध्यें विंझणे घेऊन सभोंवतीं त्याला वारा घालीत उभ्या

राहिल्या होत्या. दुर्धर, प्रहस्त आणि महापार्श्व हे मंत्रतत्त्वज्ञ मंत्री आणि निकुंभ नामक मंत्री हे चार राक्षस शेजारीं बसले असल्यामुळें, बलाविषयीं गर्व वाहणारा तो रावण चार सागरांनीं परिवेष्ठिलेलें संपूर्ण भूमंडलच कीं काय असा दिसत होता. देव ज्याप्रमाणें इंद्राला धीर देत असतात, त्याप्रमाणें मंत्रतत्त्वज्ञ मंत्री आणि इतरहि चांगला विचार करणारे सचिव त्याला धीर देत होते. अशा प्रकारें मंत्र्यांनीं परिवेष्ठित असलेल्या त्या अतितेजस्वी राक्षसाधिपति रावणाला हनुमानानें अवलोकन केलें असतां, मेरुपर्वताच्या शिखरावरील सजल मेघच कीं काय असा तो त्याला दिसला. हनुमानाला ते भयंकर पराक्रमी राक्षस जरी पीडा देत होते, तरी तो अतिशय विस्मयचकित होऊन त्या राक्षसाधिपतीकडेच पहात होता.

ह्याप्रमाणें झळकत असलेल्या त्या राक्षसाधिपतीला अवलोकन केल्यावर त्याच्या तेजानें दिपून गेलेला हनुमान मनांत म्हणाला, " अहाहा ! काय हो हें रूप ! काय हो हें धैर्य ! काय हो हें बल ! काय हो ही कांति ! आणि काय हो तरी ही ह्या राक्षसराजाची सर्वलक्षणसंपन्नता ! ह्याचे ठिकाणीं जर हा मोठा अधर्म नसता, तर हा राक्षसाधिपति इंद्रासहवर्तमान देवलोकाचाहि रक्षक होण्यास योग्य झाला असता. खरोखर लोकनिंदेस पात्र अशा ह्याच्या क्रूर व घातकी कर्मांमुळें देवदैत्यांसहवर्तमान सर्व लोक ह्यास भीत आहेत. आणि हा क्रुद्ध रावण सर्व जगत् रसातळाला नेण्याची इच्छा करीत आहे. "

असो. महाबलाढ्य राक्षसाधिपति रावणाचा प्रभाव अवलोकन केल्यावर तो बुद्धिमान हनुमान असे नानाप्रकारचे विचार मनामध्यें आणूं लागला.

## सर्ग पन्नासावा.

### प्रहस्त-हनुमानसंवाद.

पिंगटवर्ण नेत्रांनीं युक्त असलेला तो वानर पुढें बसलेला अवलोकन करून लोकांना भय उत्पन्न करणारा तो महापराक्रमी रावण अतिशय क्रुद्ध झाला, आणि मन साशंक झाल्यामुळें तो आपल्याशीं त्या तेजस्वी वानराधिपतीसंबंधानें असा विचार करूं लागला, " अरे, हा प्रत्यक्ष भगवान नंदीच येथें आला आहे कीं काय ? कारण पूर्वीं मी कैलास पर्वतावर त्याला हंसल्यामुळें ' माझ्यासारखें ज्यांचें

मुख आहे, अशांच्या हातून तुझा नाश होईल' म्हणून त्यानें मला शाप दिला होता. अथवा नंदीनें पाठविलेला हा बाणासुरच वानररूप धारण करून येथें आला आहे कीं काय ? "

ह्याप्रमाणें मनामध्यें शंका आल्यानंतर क्रोधानें ज्याचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत, असा तो रावण राजा समयाला अनुरूप, गंभीर आणि अर्थानें भरलेलें भाषण मंत्रीश्रेष्ठ प्रहस्ताशीं करूं लागला. तो म्हणाला, "अरे, ह्या दुरात्म्याला विचारा तरी ! हा आला कोठून ? ह्यानें येथें येण्याचें कारण काय ? वनाचा भंग करण्यांत आणि राक्षसांचा नाश करण्यांत ह्याचा काय उद्देश होता ? जिच्यावर कोणाचाहि हल्ला होणें शक्य नाहीं, अशा माझ्या नगरीमध्यें हा कशा-करितां आला ? आणि ह्यानें युद्ध कशाकरितां केलें ? विचारा हें ह्या दुर्बुद्धीला ! "

हें रावणाचें भाषण श्रवण करून प्रहस्त हनुमानाला म्हणाला, " हे वानरा, तूं स्वस्थ ऐस. तुझें कल्याण असो. तूं भिऊं नको. अरे, तुला जर इंद्रानें महाराजांच्या निवासस्थानाकडे पाठविलें असेल, तर तें तूं खरें खरें सांग, म्हणजे तुझी सुटका होईल. तुला कांहीं संकट प्राप्त व्हावें, अशी आमची इच्छा नाहीं. कुबेर, यम आणि वरुण ह्यांपैकीं एखाद्याचें मनोहर रूप धारण करून तूं आमच्या ह्या नगरीमध्यें प्रविष्ट झाला आहेस कीं काय ? किंवा विजयेच्छु विष्णूनें पाठविलेला तूं दूत आहेस कीं काय ? तुझें रूप मात्र वानरासारखें दिसत आहे; परंतु तुझें तेज वानराचें नव्हे. काय असेल तें आज खरें खरें सांग, म्हणजे तूं मुक्त होशील. परंतु तूं जर अनृत भाषण करशील, तर तुझें जीवितहि दुर्लभ आहे. सारांश, रावणाच्या निवासस्थानामध्यें तुझा प्रवेश होण्याचें कारण काय, हें तूं सांग. "

ह्याप्रमाणें प्रहस्त बोलला असतां वानरश्रेष्ठ हनुमान राक्षसकुलाधिपति राव-णाला म्हणाला, " इंद्राचें, यमाचें अथवा वरुणाचें रूप धारण करून मी आलों नाहीं, कुबेराशीं माझें सख्य नाहीं, आणि विष्णूनेंहि मला पाठविलें नाहीं. ही माझी जातिच आहे. मी वानरच येथें राक्षसराजाच्या दर्शनाकरितां आलों आहे. तें हें दर्शन मला दुर्लभ आहे, असें समजून दर्शनाकरितां मीं राक्षस-राजाच्या वनाचा विध्वंस केला. तदनंतर ते बलाढ्य राक्षस युद्धाची इच्छा धरून माझ्या अंगावर आले असतां, देहाच्या रक्षणार्थ मीं संग्रामामध्यें त्याच्याशीं उलट युद्ध केलें. देवदैत्यांच्या हातूनहि अस्त्रपाशांच्या योगानें मी बद्ध होणें शक्य नाहीं. कारण, ब्रह्मदेवापासून हा वरच मला प्राप्त झाला आहे. राजाच्या दर्शनाकरितां मीं ह्या अस्त्राला मान दिला, आणि म्हणूनच वास्तविक जरी मी

अस्त्रापासून मुक्त झालों आहे, तरी अस्त्रानें बद्ध करून मला आणल्याचें राक्षसांनीं तुला कळविलें आहे. कांहीं रामकार्याकरितां मी तुझ्यासमीप आलों आहें. ह्यास्तव, अतुल सामर्थ्यवान रामाचा मी दूत आहें, असें समजून माझें हें हितकारक भाषण तूं श्रवण कर."

## सर्ग एकावन्नावा.

### हनुमंताचा रावणाला उपदेश.

तदनंतर स्वकर्तव्याविषयीं दक्ष असलेला तो सत्त्वशील वानरश्रेष्ठ रावणाकडे पाहून अर्थयुक्त शब्दांनीं त्याला म्हणाला, "हे राक्षसाधिपते, सुग्रीवाच्या आज्ञेनें मी तुझ्या समीप आलों आहे, व तुला भ्रात्या वानराधिपति सुग्रीवानें कुशल प्रश्न केला आहे. आतां धर्म व अर्थ ह्यांना अनुसरून असलेला आणि इहलोकीं व परलोकीं हितावह होणारा असा महात्म्या भ्रात्या सुग्रीवाचा निरोप तूं ऐकून घे. रथ, गज व अश्व ह्यांनीं संपन्न, इंद्रासारखा तेजस्वी व प्रजेवर पित्याप्रमाणें प्रेम करणारा असा एक दशरथ नामक राजा होऊन गेला. त्याचा महापराक्रमी, समर्थ व धर्ममार्गाचें अवलंबन केलेला ज्येष्ठ पुत्र महातेजस्वी राम त्याला अतिशय प्रिय होता. तो पित्याच्या आज्ञेनें दंडकारण्यामध्यें भ्रात्या लक्ष्मणसहवर्तमान व सीता नामक भार्येसहवर्तमान प्रविष्ट झाला. विदेहदेशाधिपति महात्म्या जनकराजाची सीता म्हणून प्रसिद्ध असलेली कन्या त्याची भार्या आहे, व ती जनस्थानामध्यें असतांना नाहींशी झाली आहे. त्या देवीला शोधितां शोधितां राजपुत्र राम कनिष्ठ भ्रात्यासहवर्तमान ऋष्यमूक पर्वतावर आला असतां सुग्रीवाशीं त्याची भेट झाली. तेव्हां सीतेचा शोध लाविण्याविषयीं त्या सुग्रीवानें त्याला वचन दिलें, व रामानेंहि सुग्रीवाला वानरराज्य अर्पण करण्याचें अभिवचन दिलें. तदनंतर त्या राजपुत्र रामानें युद्धामध्यें वालीचा वध करून वानर व ऋक्ष ह्यांच्या समुदायांचा अधिपति जो सुग्रीव त्याला राज्यावर बसविलें. सारांश, तुला पूर्वींपासूनच विदित असलेल्या वानरश्रेष्ठ वालीचा त्या पराक्रमी रामानें एकाच बाणाच्या योगानें संग्रामामध्यें वध केला. तदनंतर स्वकर्तव्याविषयीं दक्ष असलेल्या त्या सत्यवचनी वानराधिपति सुग्रीवानें सीतेच्या शोधाकरितां सर्व दिशांस वानर पाठवून दिले. ते शेंकडों, हजारों, लाखों

वानर सर्व दिशांस वर आकाशामध्यें आणि अधोभागीं तिला शोधीत आहेत. शीघ्र गमन करणाऱ्या त्या महाबलाढ्य वानरवीरांची गति कोठेंहि कुंठित होत नाहीं. त्यांपैकीं कांहीं वेगामध्यें गरुडाची बरोबरी करणारे असून कांहीं वायूची बरोबरी करणारे आहेत. मी वायूचा औरस पुत्र हनुमान वानर सीतेकरितां शंभर योजनें लांब समुद्र सत्वर ओलांडून तुला पहाण्याकरितां येथें आलों आहें, व हिंडतां हिंडतां तुझ्या घरीं जनककन्या सीताहि माझ्या दृष्टीस पडली आहे. तस्मात् हे महामान्य रावणा, परस्त्रीला अडकवून ठेवणें तुला योग्य नाहीं. कारण, धर्म व अर्थ ह्यांचा अनुभव तुला आलेला आहे; व तपश्चर्येमुळें तुझ्या जवळ धनधान्यादिकांची समृद्धि झालेली आहे. ज्याच्यामुळें मोठाच अपाय होणारा आहे, व समूळ नाशच ज्याच्या योगानें होणार आहे, अशा कर्मांचे ठिकाणीं तुमच्यासारखे विचारी पुरुष कधींहि आसक्त होत नाहींत. अरे, रामाच्या कोपाचें अनुकरण करणाऱ्या लक्ष्मणाचे हातून सुटलेल्या बाणांपुढें टिकाव धरण्यास देवदैत्यांमध्यें तरी कोण समर्थ आहे? राजा, रामाचा अपराध केल्यावर सुखानें रहाणारा त्रैलोक्यामध्येंहि कोणी नाहीं. तस्मात्, जानकी पुरुषश्रेष्ठ रामाला परत द्यावी, हें माझें धर्म व अर्थ ह्यांना अनुसरून असलेलें व सर्वकालीं हितावह होणारें भाषण तूं लक्ष्यांत आण. दुर्लभ जी गोष्ट ती मला येथें प्राप्त झाली आहे, म्हणजे ही सीता देवी माझ्या दृष्टीस पडली आहे. आतां अवशिष्ट राहिलेलें जें कर्म तें रामामुळेंच होणारें आहे. पंचमुखी नागिणीप्रमाणें घरीं असलेली जी तूं ओळखीत नाहींस, ती ही सीता शोकाकुल झालेली माझ्या दृष्टीस पडली आहे. विषसंयुक्त असलेलें अन्न अतिशय भक्षण केलें असतां बलाच्या योगानें ज्याप्रमाणें तें पचणें शक्य नाहीं, त्याचप्रमाणें ही सीता देवदैत्यांनाहि पचणें शक्य नाहीं. तपश्चर्या करून जें हें धर्मसाध्य ऐश्वर्य व दीर्घ आयुष्य तुला प्राप्त झालें आहे, त्याचा अधर्माच्या योगानें नाश करून टाकणें योग्य नाहीं. असुरांसहवर्तमान देवांच्या हातून आज जी तुला तपामुळें अवध्यता प्राप्त झाली आहे, तिचें कारण तरी हें धर्माचरणच होय. हा सुग्रीव देव नव्हे, यक्ष नव्हे व राक्षसहि नव्हे. हे राजा, सुग्रीव वानरांचा अधिपति आहे, आणि राम मनुष्य आहे. ह्यास्तव हे भूपते, त्या सुग्रीवापासून तूं आपलें प्राणरक्षण कसें करशील? धर्माचें फल जें सुख तें अधर्मफलरूप दुःखानें कधींहि युक्त होत नाहीं. धर्म केला असतां धर्मफल जें सुख तेंच प्राप्त होत असतें; आणि अधर्म केला असतां अधर्मफल जें दुःख

तेंच प्राप्त होतें. शिवाय धर्म हा अधर्मनाशक आहे. आजपर्यंत धर्माचें फल तुला प्राप्त झालें आहे, ह्यांत संशयच नाहीं. आतां ह्या अधर्माचेंहि फल सत्वरच तुला प्राप्त होईल. खरोखर अश्व, रथ आणि गज ह्यांसहवर्तमान लंकेचा नाश करण्यास मी एकटाहि समर्थ आहें; परंतु त्या रामाचा हा विचार नाहीं. कारण ज्यानें सीतेचा अपहार केलेला आहे, त्या शत्रूंचा नाश करण्याची प्रतिज्ञा वानरगण व ऋक्षगण ह्यांचे सन्निध रामानें केली आहे. अरे, रामाला अपकार करणाऱ्या प्रत्यक्ष इंद्रालाहि सुख होणार नाहीं, मग तुझ्यासारख्या यःकश्चित् सामान्य जनाची गोष्ट कशाला पाहिजे ? जिला तूं सीता असें समजत आहेस, आणि जी ही तुझ्या घरामध्यें रहात आहे, ती सर्व लंकेचा नाश करणारी कालरात्रिच आहे, हें तूं समजून ठेव. सारांश स्वतःच खांद्यावर टाकिलेला हा सीताशरीररूप कालपाश आतां पुरे झाला. आपल्या कल्याणाचा तूं कांहीं तरी विचार कर. नाहीं तर रामाच्या कोपानें प्रदीप्त आणि सीतेच्या तेजानें आधींच दग्ध झालेली ही लंका, मार्ग व इमारती ह्यांसहवर्तमान जळत असलेली तुला पहाण्याचा प्रसंग येईल. स्वतःचे मित्र, मंत्री, जातभाई, भ्राते, पुत्र, हितावह भोग्य वस्तु, भार्या आणि लंका ह्यांचा तूं नाश करून घेऊं नको. हे राक्षसाधिराज, मज रामदासाचें आणि विशेषतः वानरदूताचें सत्य भाषण तूं श्रवण कर. महाकीर्तिमान राम स्थावरजंगमात्मक प्राण्यांसहवर्तमान व पंचमहाभूतांसहवर्तमान सर्व लोकांचा संहार करून पुनरपि त्यांना उत्पन्न करण्यासहि समर्थ आहे. देव, असुर व मनुष्य ह्यांचे अधिपति, यक्ष, राक्षस, उरग, विद्याधर नाग, गंधर्व, मृग, सिद्ध, किन्नराधिपति, सर्व पक्षी, किंबहुना कोणत्याहि वेळीं, कोणत्याहि ठिकाणचे, कोणतेहि प्राणी ह्यांमध्यें विष्णुतुल्य पराक्रमी रामाशीं सामना करणारा कोणीहि नाहीं. सर्वलोकाधिपति नृपश्रेष्ठ रामाचा अशा प्रकारें अपराध करून तुझें जीवित कायम रहाणें अशक्य आहे. हे राक्षसाधिपते, देव, दैत्य, गंधर्व, विद्याधर, नाग आणि यक्ष हे सर्व मिळूनहि संग्रामामध्यें त्रैलोक्याधिपति रामापुढें टिकाव धरण्यास समर्थ नाहींत. स्वयंभु चतुर्मुख ब्रह्मदेव, त्रिपुरनाशक त्रिलोचन रुद्र, विष्णु अथवा देवाधिपति इंद्रहि युद्धामध्यें रामापुढें टिकाव धरण्यास समर्थ नाहींत."

ह्याप्रमाणें दीन वाणीचें अवलंबन न करितां भाषण करणाऱ्या त्या वानराचें तें सयुक्तिक परंतु अप्रिय भाषण श्रवण करून त्या अतुल पराक्रमी रावणाचे नेत्र कोपानें चढून गेले, आणि त्यानें त्या महाकपीचा वध करण्याची आज्ञा केली.

# सर्ग बावन्नावा.

## बिभीषणमुखें हनुमद्वधनिषेध.

हनुमंताचें हें भाषण ऐकून रावण क्रोधानें व्याप्त झाला, आणि त्यानें त्याचा वध करण्याविषयीं आज्ञा केली; परंतु आपलें दूतकर्म योग्य रीतीनें बजावणाऱ्या त्या हनुमानाच्या वधाची त्या दुरात्म्यानें आज्ञा केली असतां बिभीषणाचें तिला अनुमोदन मिळालें नाहीं. तेव्हां उचित कार्य करण्याविषयीं ज्याचा निश्चय झालेला आहे, असा तो बिभीषण त्या क्रुद्ध झालेल्या राक्षसाकडे आणि उपस्थित झालेल्या कार्याकडे लक्ष्य देऊन पुढें काय करावें, ह्याचा विचार करूं लागला; आणि निश्चय झाल्यानंतर तो संभाषणपटु विजयी बिभीषण आपल्या पूज्य ज्येष्ठ भ्रात्याशीं सौम्य रीतीनें अत्यंत हितकारक असें भाषण करूं लागला. तो म्हणाला, "हे राक्षसाधिपते, क्षमा असावी. आपण क्रोध सोडून द्या, आणि कृपा करून माझें हें भाषण श्रवण करा. सन्मार्गानें वागणारे सदसद्विचारी राजाधिराज दूताचा वध करीत नाहींत. तस्मात् हे राजन्, ह्या वानराचा वध करणें हें धर्माला विरुद्ध असून लोकव्यवहारालाहि निंद्य आहे, आणि आपणाला अयोग्य आहे. उत्कृष्ट गोष्ट कोणती, हें आपण जाणणारे आहां. कारण, प्राणिमात्रासंबंधानें सर्व कांहीं बरें वाईट आपण जाणणारे असून धर्मज्ञ, कृतज्ञ व राजधर्मामध्यें निपुण असे आहां. ह्यास्तव आपणासारखे ज्ञानीहि जर क्रोधाच्या तावडींत सांपडूं लागले, तर शास्त्रांमध्यें पांडित्य संपादन करणें म्हणजे केवळ व्यर्थ प्रयासच आहेत, असें समजलें पाहिजे. तस्मात् हे अजिंक्य, हे शत्रुनाशका, हे राक्षसाधिपते, आपण कृपा करा, आणि योग्य कोणतें व अयोग्य कोणतें ह्याचा निश्चय करून मग दूताला दंड करा."

हें बिभीषणाचें भाषण श्रवण करून दुरात्मा रावण अतिशयच क्रुद्ध झाला, आणि म्हणाला, "हे शत्रुनाशका, पाप्याचा वध करण्यांत पातक नाहीं. ह्यास्तव मी ह्या पापी वानराचा वध करीत आहें."

अनेक दोषांनीं भरलेलें, दुष्टांनाच योग्य आणि अधर्माचें मूळ असें हें रावणाचें बोलणें ऐकून, बुद्धिमानांमध्यें श्रेष्ठ असलेला बिभीषण उत्कृष्ठ तत्त्वांनीं युक्त असलेलें भाषण त्याच्याशीं करूं लागला. तो म्हणाला, "हे लंकाधिपते, हे राक्षसराज, धर्म आणि अर्थ ह्यांच्या तत्त्वाला अनुसरून असलेलें माझें भाषण

श्रवण करा. राजा, दूत आपलें कर्तव्य करीत असतांना कोणत्याहि वेळीं त्यांचा वध करितां उपयोगीं नाहीं, असें सर्व ठिकाणीं सज्जन म्हणत असतात. हा शत्रु निःसंशय प्रबल झाला असून ह्यानें आपला पराकाष्ठेचा अपराध केला आहे; परंतु दूताचा वध सज्जनांनीं सांगितलेला नाहीं. दूताला दुसरे एकंदर दंड सांगितले आहेत. गात्रांचे ठिकाणीं विरूपता, चाबकांचा मार व मुंडन ह्यांपैकीं एकेक अथवा हीं सगळीं हे दंड दूताला सज्जनांनीं सांगून ठेविलेले आहेत; पण दूताचा वध आमच्या ऐकण्यांत नाहीं. धर्मशास्त्र व अर्थशास्त्र ह्यांमुळें ज्याच्या बुद्धीला संस्कार झालेला आहे, आणि उत्कृष्ठ कोणतें व निकृष्ठ कोणतें हें समजत असल्यामुळें कर्तव्यासंबंधानें ज्याचा निश्चय झालेला आहे, असा आपणांसारखा पुरुष कोपाच्या अधीन होऊन कसा राहील? हे वीरा, धर्मवाद, लोकवर्तन आणि शास्त्रसिद्धांत ग्रहण करणें ह्यांमध्यें आपली बरोबरी करणारा कोणीहि नसून आपणच सर्व देवदैत्यांमध्यें श्रेष्ठ आहां. सारांश, मला ह्या वानराचा वध करण्यांत कांहींएक अर्थ दिसत नाहीं. ज्यांनीं ह्या वानराला पाठविलें, त्यांच्यावर ह्या शिक्षेचा अंमल होऊं द्या. हा बरा असो अथवा वाईट असो, दुसऱ्यांनीं त्याला पाठविलें आहे, आणि म्हणूनच दुसऱ्याचा निरोप सांगणारा हा पराधीन दूत वधास पात्र नाहीं. शिवाय हे शत्रुसमुदायविजयी राजा, ह्याचा वध झाला असतां, आकाशमार्गानें येथें येणारा मला दुसरा कोणी दिसत नाहीं. तस्मात्, ह्याच्या वधाविषयीं आपण यत्न करूं नये. इंद्रासहवर्तमान देवांसंबंधानें आपण यत्न करणें योग्य आहे. हे युद्धप्रिय, हा दूत नाहींसा झाल्यावर तुझ्याशीं विरुद्ध असलेल्या त्या उद्दाम राजपुत्रांना युद्धाविषयीं उद्युक्त करणारा दुसरा कोणी प्राणी मला दिसत नाहीं. पराक्रम, उत्साह आणि बुद्धि ह्यांनीं युक्त असलेल्या देवदैत्यांनाहि आपण अजिंक्य आहां. ह्यास्तव हे राक्षसाधिपते, युद्धाकरितां उद्युक्त झालेल्या मनाचा भंग करणें तुला योग्य नाहीं. आज आपणांपाशीं असलेले योद्धे मोठमोठ्या गुणवान कुलांमध्यें उत्पन्न झालेले आहेत. ते हित करणारे आहेत, शूर आहेत, स्वकर्तव्याविषयीं दक्ष आहेत, विचारी आहेत व शस्त्र धारण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ आहेत. तूं त्यांचें उत्तम रीतीनें पोषण केलेलें आहेस, आणि अपमान सहन न करण्याविषयीं त्यांची प्रसिद्धि आहे. ह्यास्तव थोडेसें सैन्य बरोबर घेऊन आपल्या आज्ञेप्रमाणें वागणारे कांहीं योद्धे शत्रूचे ठिकाणीं आपला प्रभाव गाजविण्याकरितां आज जाऊं दे, आणि त्या मूढ राजपुत्रांना त्यांना तेथें घेऊन येऊं दे."

ह्याप्रमाणें कनिष्ठ भ्रात्या बिभीषणाचा उत्कृष्ठ शब्दांनीं दर्शविलेला उपदेश त्या मुख्य राक्षसराज व निशाचराधिपति महाबलाढ्य देवशत्रु रावणानें मनापासून स्वीकारिला.

## सर्ग त्रेपन्नावा.

### पुच्छदहन.

महात्म्या बिभीषणाचें तें भाषण श्रवण केल्यावर रावणानें देशकालाला अनुरूप अशा शब्दांनीं त्या भ्रात्याला उत्तर दिलें. तो म्हणाला, " तूं चांगलें बोललास. दूताचा वध निंद्य मानिला आहे, परंतु वधाच्याच तोडीचा कांहीं प्रकार करण्याकरितां ह्याला आणखी एकदां अवश्य बांधून टाकावें. पुच्छ हें खरोखर वानरांना मोठें प्रिय व भूषण असतें. ह्यास्तव ह्याचें तें पुच्छच तुम्ही सत्वर पेटवून द्या. त्या दग्ध झालेल्या पुच्छासहवर्तमान त्याला जाऊं द्या. तदनंतर मित्रत्वानें वागणारे जातभाई, बांधव आणि सुहृज्जन ह्या सर्वांना ह्याला दीन आणि शरीरविरूपतेमुळें कृश झालेला अवलोकन करूं द्या. "

ह्याप्रमाणें सांगितल्यानंतर राक्षसाधिपति रावणानें, " वानराचें पुच्छ प्रदीप्त करून राक्षसांनीं सर्व नगरांतून व चवाठ्यांवरून त्याला फिरवावें " अशी आज्ञा केली. ही त्याची आज्ञा ऐकून क्रोधानें गर्जना करूं लागलेले ते राक्षस त्याच्या पुच्छाला चिंध्या गुंडाळूं लागले; आणि शुष्क काष्ठाचा संयोग झाला असतां ज्याप्रमाणें वनामध्यें अग्नि वृद्धिंगत होतो, त्याप्रमाणें राक्षस चिंध्या गुंडाळूं लागले असतां, तो महाकपि हनुमान वृद्धिंगत होऊं लागला. तदनंतर वर तेल ओतून त्या राक्षसांनीं त्याला आग लाविली. तेव्हां त्या प्रदीप्त झालेल्या पुच्छानें त्या राक्षसांना त्यानें ताडन केलें. नंतर क्रूर राक्षसांनीं एकत्र जुळून बालसूर्यतुल्य तेजस्वी मुखानें युक्त असलेल्या आणि क्रोध व असहिष्णुता यांनीं व्याप्त झालेल्या त्या वानरश्रेष्ठाला अधिकच आवळून टाकिलें; आणि स्त्रिया, बाल व वृद्ध यांसहवर्तमान ते सर्व राक्षस आनंदित झाले. राक्षसांनीं करकचून बांधलें असतां त्या समयाला योग्य असा विचार त्या वीरानें मनामध्यें आणिला. तो म्हणाला, " मी जरी बद्ध झालों आहें, तरी राक्षसांचें खरोखर माझ्यापुढें कांहींएक चालावयाचें नाहीं. मी हे पाश तोडून टाकून उड्डाणाबरोबर यांना

मारून टाकीन. स्वामीचें हित करण्याकरितां संचार करणाऱ्या मला जरी आपल्या मालकाच्या आज्ञेनें हे दुरात्मे बांधून टाकीत आहेत, तरी मी जें येथें नुकसान केलें आहे, त्याची भरपाई यांच्या हातून होणार नाहीं. सर्व राक्षसांचा समाचार घेण्यास मी समर्थ आहें; परंतु रामाचे प्रीत्यर्थ हा अशा प्रकारचा अपमान मला सहन केला पाहिजे. शिवाय मला पुनरपि एकदां लंकेमध्यें संचारहि करावयाचा आहेच. कारण ठिकठिकाणीं दुर्गम स्थलें बांधून ठेविलीं असल्यामुळें रात्रीं ही लंका मला चांगलीशी पहावयास सांपडली नाहीं. रात्र उजाडल्यावर लंका मला अवश्य पाहिलीच पाहिजे. मला हे खुशाल बांधोत. पुच्छ प्रदीप्त करून हे राक्षस मला पीडा देत आहेत; परंतु माझ्या मनाला त्याचा मुळींच खेद होत नाहीं."

ह्याप्रमाणें हनुमानानें विचार केला असतां, आपलें स्वरूप गुप्त ठेविलेल्या त्या बलाढ्य वानरश्रेष्ठ महाकपीला आनंदानें ते राक्षस घेऊन गेले. नंतर शंख व नगारे यांच्या ध्वनींनीं आपला पराक्रम गाजवीत गाजवीत ते क्रूरकर्मी राक्षस त्या नगरींतून त्याला हिंडवूं लागले. राक्षस मागें लागले असतांना शत्रूला जर्जर करणारा तो हनुमान खुशाल पुढें चालला; आणि अशा रीतीनें त्या राक्षसांच्या नगरीमध्यें त्यानें संचार केला. जातां जातां त्या महाकपीनें अद्भुत वाडे, इमारतींनीं आच्छादित झालेले भूप्रदेश, सुव्यवस्थितपणें रेखिलेले चौक, घरांनीं गजबजून गेलेले रस्ते, चवाठे, लहानमोठे मार्ग आणि घरांमधील मोकळे प्रदेश अवलोकन केले. चौकांतून, चावड्यांतून आणि राजमार्गांवरून ते सर्वहि राक्षस 'हेर' असें म्हणत म्हणत त्या वानराची दवंडी पिटूं लागले.

•असो. त्या हनुमानाच्या पुच्छाचें अग्र प्रदीप्त होऊं लागलें असतां, कुरूप नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या राक्षसस्त्रिया देवी सीतेला ती अप्रिय वार्ता कथन करूं लागल्या. त्या म्हणाल्या, "अग सीते, ज्या ताम्रमुख वानरानें तुझ्याशीं संभाषण केलें, त्याच वानराला त्याचें पुच्छ प्रदीप्त करून सर्व बाजूंनीं हिंडवीत आहेत."

आपल्या अपहाराप्रमाणेंच अतिदुःखकारक असलेलें हें भयंकर भाषण श्रवण करून सीता शोकाकुल झाली; आणि त्या महाकपीच्या कल्याणाची इच्छा धरून त्या विशालनयना जितेंद्रिय सीतेनें अग्नीची प्रार्थना केली कीं, "मी जर पतीची शुश्रूषा केली असेल, जर कांहीं तप केलें असेल अथवा माझे ठिकाणीं जर पातिव्रत्य असेल, तर हे अग्ने, तूं हनुमानाला शीतल हो."

तेव्हां तीक्ष्ण तेजानें युक्त असलेला आणि कर्तव्याविषयीं दक्ष असलेला तो

अग्नि, त्या विशालनयना सीतेला वानराचें स्वस्तिक्षेम सुचवीत सुचवीत प्रदक्षणीक ज्वाला जातील, अशा रीतीनें प्रज्वलित होऊं लागला; आणि हनुमानाचा जनक जो वायु त्याच्या पुच्छांतील अग्नीनें युक्त झाला असून सुद्धां बर्फाच्या प्रदेशावरील वायूप्रमाणें शीतल वाहूं लागल्यामुळें सीता देवीच्या मनाला स्वस्थता वाटूं लागली.

असो. पुच्छ जळूं लागलें असतां हनुमान मनांत म्हणाला, "अग्नि प्रदीप्त झाला असूनहि सर्व प्रकारें हा मला दग्ध कां करून टाकीत नाहीं? याची ज्वाला तर मोठी दिसत आहे; परंतु हा मला मुळींच पीडा करीत नाहीं. बर्फाच्या गोळ्याप्रमाणें हा माझ्या पुच्छाच्या शेवटीं आहे, असें मला भासतें. अथवा आकाशमार्गानें उड्डाण करीत असतां समुद्रामध्यें ज्याप्रमाणें रामाच्या प्रभावामुळें पर्वतरूप आश्चर्य माझ्या दृष्टीस पडलें, त्याप्रमाणें हेंहि एक उघड उघड आश्चर्य मला आढळून आलें आहे. सारांश, समुद्र आणि विचारी मैनाक पर्वत यांचीहि जर रामाकरितां तशा प्रकारची गडबड उडून गेली होती, तर रामाकरितां अग्नि काय करणार नाहीं? सीतेचें दयाळुत्व, रामाचें तेज आणि माझ्या पित्याशीं असलेलें अग्नीचें सख्य यांच्या योगानें मला अग्नि दग्ध करीत नाहीं."

ह्यानंतर तो वानरश्रेष्ठ पुनरपि आपल्या मनाशीं म्हणाला, "आमच्यासारख्यांचें बंधन हे अधम राक्षस या ठिकाणीं कसे करीत आहेत? माझ्या अंगांत जर पराक्रम आहे, तर याच्या उलट आपणहि कांहीं क्रिया करणें योग्यच होणार आहे."

तदनंतर त्या वेगवान महाकपीनें ते पाश तोडून टाकून वेगानें उड्डाण केलें आणि गर्जनाहि केली. नंतर राक्षसांची ज्या ठिकाणीं गर्दी नाहीं, अशा पर्वतशिखराप्रमाणें उच्च असलेल्या नगरद्वारावर तो श्रीमान हनुमान वायुपुत्र जाऊन बसला. तो मनोनिग्रही हनुमान पर्वतप्राय बनून एका क्षणांत पुनरपि अतिशयच लहान झाला, आणि अशा रीतीनें त्यानें सर्व बंधनें दूर केलीं.

अशा रीतीनें बंधनांतून मुक्त झाल्यावर, पुनरपि तो श्रीमान कपि पर्वतप्राय बनून आपल्या त्या दरवाजावरील परिघाकडे पहात आहे, असा दिसूं लागला. लोखंडानें मढविलेला तो परिघ हातीं घेऊन त्या महापराक्रमी मारुतीनें पुनरपि त्या सर्व राक्षसांचा वध केला. असो.

ह्याप्रमाणें त्यांचा वध करून रणामध्यें भयंकर पराक्रम करणारा तो हनुमान पुनरपि लंकेकडे पाहूं लागला, आणि दीप्त झालेल्या पुच्छामुळें किरणसमुदायांनीं तो व्याप्त झाला असल्या कारणानें उदय पावलेल्या तेजोराशि सूर्याप्रमाणें दिसूं लागला.

# सर्ग चौपन्नावा.

## लंकादहन.

तदनंतर मनोरथ सिद्धीस गेलेला तो वानर लंकेकडे पाहूं लागला असतां त्याचा उत्साह वृद्धिंगत होऊं लागला, आणि अवशिष्ट राहिलेल्या कार्याविषयीं तो मनांत विचार करूं लागला. तो म्हणाला, "ह्या राक्षसांना आणखीहि संताप उत्पन्न करणारें असें माझें सांप्रत काय बरें कर्तव्य खरोखर अवशिष्ट राहिलें आहे ? प्रथम वनाचा तर मीं विध्वंस केला, प्रबल राक्षसांचाहि वध केला, आणि सैन्यहि नाहींसें केलें. आतां किल्ल्याचा नाश करणें अवशिष्ट राहिलें आहे. ह्याप्रमाणें किल्ल्याचा नाश झाला असतां केलेल्या कर्माबद्दल आपल्या परिश्रमाचाहि परिहार होईल, आणि ह्या कृत्यामध्यें जे कांहीं मला श्रम पडले, तेहि थोडक्याच यत्नानें सफल होतील. माझ्या पुच्छाचे ठिकाणीं जो अग्नि प्रदीप्त झाला आहे, त्याला ह्या उत्कृष्ठ गृहांनीं तृप्त करणें योग्य आहे.

असा विचार केल्यानंतर पुच्छ प्रदीप्त झालेला आणि म्हणूनच विद्युल्लते-सहवर्तमान असलेल्या मेघांप्रमाणें दिसत असलेला तो महाकपि लंकेंतील घरां-वरून संचार करूं लागला. मनांत कांहींएक भीति न बाळगितां इकडे तिकडे पहाणारा तो वानर राक्षसांच्या घरांवरून, बागांतून आणि वाड्यांवरून संचार करूं लागला. वायूप्रमाणें बलाढ्य असलेल्या त्या महावेगवान हनुमानानें प्रथ-मतः प्रहस्ताच्या घरावर उडी मारून तेथें आग लावून दिली; आणि नंतर दुसऱ्या महापार्श्वाच्या घरावर उडी मारून तेथेंहि त्या वीर्यवान हनुमानानें प्रलयकालच्या अग्नीसारख्या ज्याच्या ज्वाला आहेत, असा अग्नि ठेवून दिला ! तदनंतर वज्रदंष्ट्र, शुक आणि विचारी सारण ह्यांच्याहि घरांवर त्या महाकपि वानरानें उड्डाण केलें. मग इंद्रजिताचें घर त्या वानरसेनाधिपति हनुमानानें जाळून टाकिलें; आणि नंतर जंबुमालीचें व सुमालीचें घर त्यानें दग्ध केलें. तदनंतर रश्मिकेतु, सूर्यशत्रु, ऱ्हस्वकर्ण, दंष्ट्र, रोमश राक्षस, युद्धोन्मत्त, मत्त, ध्वजग्रीव राक्षस, विद्युज्जिव्ह, घोर, हस्तिमुख, कराल, विशाल, शोणिताक्ष, कुंभकर्ण, मकराक्ष, नरांतक, कुंभ, महात्मा निकुंभ, यज्ञशत्रु, ब्रह्मशत्रु वगैरे राक्षसांचीं गृहें बिभीषणाचें गृह वर्ज करून त्या महातेजस्वी वानरश्रेष्ठानें संचार करितां करितां क्रमाक्रमानें दग्ध करून टाकिलीं. सारांश, संपत्तिमान राक्षसांच्या ठिक-ठिकाणच्या त्या महामूल्यवान घरांतील संपत्ति त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें दग्ध करून

टाकिली. ह्याप्रमाणें सर्वांच्या घरांवरून फिरल्यानंतर तो लक्ष्मीवान व वीर्यवान हनुमान रावणाच्या गृहावर आला. तदनंतर नानाप्रकारच्या रत्नांनीं भूषित, नानाप्रकारच्या मंगलकारक वस्तूंनीं सुशोभित आणि मेरुमंदरांप्रमाणें उंच अशा त्या मुख्य गृहावर पुच्छाचे अग्रभागीं असलेला प्रदीप्त अग्नि सोडून तो वीर हनुमान प्रलयकालच्या मेघाप्रमाणें गर्जना करूं लागला. वायूचा समागम झाल्यामुळें तो अतिवेगवान व महाबलाढ्य अग्नि वृद्धिंगत झाला, आणि प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें प्रज्वलित होऊं लागला. त्या घरांवर वायु अग्नीला नेऊं लागला असतां सुवर्णजाल, मोत्यें आणि हिरे ह्यांनीं भरलेली व रत्नांनीं युक्त असलेलीं तीं मोठमोठीं घरें जमीनदोस्त झालीं, मजले मोडून तीं घरें भूतलावर पडली असतां पुण्यक्षय झाल्यामुळें आकाशांतून पडत असलेलीं सिद्धांचीं घरेंच कीं काय अशीं दिसूं लागलीं. नंतर आपापल्या घराचें संरक्षण होण्याविषयीं ज्यांचा उत्साह भग्न होऊन तेज नाहींसें झालें आहे, असें ते राक्षस धावाधाव करूं लागले असतां, त्यांच्यामध्यें मोठा गलगा सुरू झाला. ' वानररूपानें हा अग्निच आला आहे, ' असें ओरडत ओरडत स्त्रिया स्तनपान करणारी मुलें जवळ असतांनाच एकाएकीं पडल्या ! सर्वांगाला आग लागलेल्या व केश मोकळे सोडलेल्या कांहीं स्त्रिया वाड्यांतून बाहेर पडूं लागल्या असतां, आकाशांतून व मेघांपासून पडणाऱ्या विद्युल्लताच कीं काय, अशा दिसूं लागल्या. तदनंतर हिरे, पोंवळीं, वैदूर्य मणि, मोत्यें आणि रौप्य ह्यांनीं युक्त असलेले आश्चर्यकारक धातु घरांतून गळतांना त्या हनुमानानें अवलोकन केले. अग्नि ज्याप्रमाणें काष्ठें व तृण ह्यांच्या दाहाविषयीं तृप्त होत नाहीं, त्याप्रमाणें राक्षसश्रेष्ठांच्या वधाविषयीं हनुमान यत्किंचितूहि तृप्त झाला नाहीं. हनुमानानें मारिलेल्या राक्षसांना ती लंकाभूमिहि पुरेशी झाली नाहीं. सारांश, रुद्रानें ज्याप्रमाणें त्रिपुर दग्ध केलें, त्याप्रमाणें महात्म्या वेगयुक्त हनुमान वानरानें तें लंका नगर दग्ध केलें. तदनंतर वेगवान हनुमानानें सोडिलेला आणि लंकारूप पर्वताच्या शिखरावर उसळलेला तो भयंकर अग्नि आपल्या ज्वालाचा समुदाय चोहोंकडे पसरून प्रदीप्त होऊं लागला. प्रलयकालच्या कालरूप अग्नीप्रमाणें ज्याचें रूप आहे, राक्षसशरीररूप घृतामुळें ज्याचे ठिकाणीं ज्वाला उत्पन्न झाल्या आहेत, आणि ज्यांत धूर मुळींच नाहीं असा तो राक्षसांच्या गृहांमध्यें चिकटून राहिलेला अग्नि वायूचें साहाय्य असल्यामुळें स्वर्गाला स्पर्श होण्याइतका वृद्धिंगत होऊं लागला. कोटिसूर्यांप्रमाणें दिसत असलेला तो महातेजस्वी अग्नि संपूर्ण लंका नगरी व्याप्त करून राहिला

असतां आणि विद्युल्लतेसारख्या अनेक ध्वनींनीं युक्त होऊं लागला असतां, ब्रह्मांडाचा विध्वंस करण्यास उद्युक्त झालेला प्रलयाग्निच कीं काय असा दिसूं लागला. अतिशय वृद्धिंगत झालेला तो अग्नि आकाशापर्यंत जाऊं लागला. त्याची कांति क्रूर दिसूं लागली, ज्वाला पलाशपुष्पांप्रमाणें दिसूं लागल्या, आणि अधोभागीं विच्छेद पावून केवळ आकाशच व्याप्त करून राहिलेल्या प्रचंड धूमपंक्ति नीलकमलासारख्या कांतीनें युक्त असल्यामुळें मेघांप्रमाणें शोभूं लागल्या. तेव्हां " हा वानर नव्हे हा स्वर्गाधिपति वज्रपाणि इंद्र असेल, प्रत्यक्ष यमच असेल, वरुण असेल, वायु असेल, प्रलयकाळचा भयंकर अग्नि असेल, सूर्य असेल, कुबेर असेल, चंद्र असेल अथवा प्रत्यक्ष काळच असेल. जगत्स्रष्टा जो सर्वांचा मूळपुरुष चतुर्मुख ब्रह्मदेव, त्याचा हा—राक्षसांचा संहार करणारा—कोपच वानररूप धारण करून येथें आला आहे कीं काय? अथवा अचिंत्य, अव्यक्त, अनंत व अद्वितीय असें विष्णूचें अत्यंत उज्ज्वल तेजच राक्षसांच्या नाशाकरितां मायेचें अवलंबन करून सांप्रत वानररूपानें येथें आलें कीं काय?" असें अनेक महाबलाढ्य राक्षस म्हणूं लागले; आणि प्राणिसमुदाय गृहें व वृक्ष ह्यांसहवर्तमान दग्ध झालेली ती नगरी अवलोकन केल्यावर सर्व राक्षसगणहि तेथें जुळून तसेंच बोलूं लागले.

असो. अशा रीतीनें एकाएकीं दग्ध झालेली ती लंका राक्षस, अश्व, रथ, गज, पक्षिगण, मृग आणि वृक्ष ह्यांसहवर्तमान दीन होऊन व तुमुल आक्रोश करून रोदन करूं लागली. सारांश, " हे तात, हे पुत्रा, हे कांत, हे मित्रा, हे प्राणनाथ, आपलें पुण्य व्यर्थ गेलें!" अशा प्रकारें भाषण करणाऱ्या राक्षसांनीं भयपूर्वक अतिच भयंकर आक्रोश केला, आणि हनुमानाच्या क्रोधानें व बलानें ग्रस्त झालेली ती लंका अग्नीच्या ज्वालांनीं व्याप्त झाल्यामुळें, आंतील वीरांचा वध झाल्यामुळें, आणि योध्यांची दाणादाण उडून गेल्यामुळें शापदग्ध झाल्यासारखी दिसूं लागली. असो. जिच्यांतील राक्षस गोंधळून जाऊन त्रस्त व खिन्न झाले आहेत, व प्रदीप्त ज्वालांनीं युक्त अशा अग्नीनें जी चिन्हित झालेली आहे, अशी ती लंका ब्रह्मदेवाच्या क्रोधानें दग्ध झालेल्या पृथ्वीप्रमाणें उदारबुद्धि हनुमानाच्या दृष्टीस पडली. उत्कृष्ठ वृक्षांनीं गजबजलेलें वन मोडून, मोठमोठ्या राक्षसांचा संग्रामामध्यें वध करून आणि उत्कृष्ट गृहसमुदायांनीं युक्त असलेली ती नगरी जाळून तो वायुपुत्र स्वस्थ उभा राहिला, व त्या महात्म्या हनुमानानें रामाचें स्मरण केलें. तदनंतर वायूप्रमाणें ज्याचा वेग आहे,

व वानरवीरांतील जो मुख्य आहे, अशा त्या महाबुद्धिमान व महाबलाढ्य श्रेष्ठ वायुपुत्राची सर्व देवगण स्तुति करूं लागले. कारण सर्व देव, श्रेष्ठ ऋषी, गंधर्व, विद्याधर, पन्नग आणि इतरहि सर्व मोठमोठे प्राणी ह्यांना पराकाष्ठेचा अनुपम आनंद झाला होता. ह्याप्रमाणें कृत्यें करून तो महाकपि झळकूं लागला, आणि श्रेष्ठ गृहांच्या शेवटल्या अद्भुत गच्चीवर बसलेला तो श्रेष्ठ वानराधिपति प्रदीप्त पुच्छाच्या ज्वालांनीं युक्त झाला असल्यामुळें किरणसमुदायांनीं युक्त असलेल्या सूर्याप्रमाणें दिसूं लागला.

असो. सर्व लंका दग्ध केल्यावर हनुमानानें समुद्रामध्यें आपल्या पुच्छाचा अग्नि विझविला, आणि ती लंका दग्ध झाल्याचें अवलोकन करून गंधर्वांसहवर्तमान देव, सिद्ध आणि महर्षी हे पराकाष्ठेचे विस्मित झाले !

## सर्ग पंचावन्नावा.

### हनुमंताला सीतेविषयीं चिंता

जिच्यांतील राक्षसगण त्रस्त झालेले आहेत, व जी जळूं लागल्यामुळें जिच्यामध्यें हलकल्लोळ उडून गेलेला आहे, अशी ती लंका अवलोकन केल्यावर हनुमान मनामध्यें विचार करूं लागला, आणि त्याला अतिशय त्रास होऊन व आपल्या हातून वाईट कृत्य झालें, असें वाटून तो म्हणाला, “ यथेष्ठ लंका दहन करून मीं हें काय बरें केलें ? प्रदीप्त झालेला अग्नि ज्याप्रमाणें उदकानें विझवून टाकितात, त्याप्रमाणें उत्पन्न झालेल्या कोपाचा जे महात्मे आपल्या बुद्धीनें निरोध करितात ते खरोखर धन्य होत. कोणता बरें क्रुद्ध पुरुष पाप करणार नाहीं ? क्रुद्ध पुरुष गुरूंचाहि वध करील, आणि मर्मभेदक वाणीनें साधूंचीहि निंदा करील. बोलावें कोणतें व न बोलावें कोणतें हें क्रुद्ध झालेल्या पुरुषाला मुळींच समजत नाहीं. सारांश, क्रुद्ध पुरुषाला अकार्य असें कोणतेंहि नाहीं, आणि अवाच्य असेंहि कांहींएक नाहीं. सर्प ज्याप्रमाणें आपली जीर्ण त्वचा टाकून देतो, त्याप्रमाणें उत्पन्न झालेला क्रोध जो क्षमेच्या योगानें बाहेर फेकून देतो, त्यालाच पुरुष असें म्हणतात. तस्मात्, त्या सीतेचा विचार न करितां आग लावणाऱ्या, आणि अर्थात्च स्वामिनीचा घात करणाऱ्या मज अत्यंत दुर्बुद्धि, निर्लज्ज व पाप्याला धिक्कार असो ! अहो ! ही सर्व लंकाच जर दग्ध झाली आहे, तर खरोखर

साध्वी जानकीहि दग्ध झालीच असेल. तेव्हां असें करण्यानें न समजतां मी आपल्या यजमानाच्या कार्याचा मात्र बिघाड केला. अरेरे! ज्याच्याकरितां हा एवढा खटाटोप केला, त्या कार्याचाच माझ्या हातून घात झाला! अरे, लंका दग्ध करितांना मी सीतेचें रक्षण केलें नाहीं. लंका जाळणें हें खरोखर अगदींच क्षुल्लक कार्य माझ्या हातून झालें आहे; परंतु क्रोधग्रस्त झाल्यामुळें त्या रामचंद्राचा मात्र मीं समूळ नाश केला आहे. जानकीचा नाश झाला, हें स्पष्टच आहे. कारण लंकेंतील कोणताहि प्रदेश जळल्यावांचून राहिलेला दिसत नाहीं. सर्व नगरी जळून खाक झाली आहे. ह्यास्तव बुद्धीला विपर्यास पडल्यामुळें जर त्या रामकार्याचा माझ्या हातून घात झालेला आहे, तर येथल्या येथेंच प्राणत्याग करणें, हेंच आज मला बरें दिसत आहे. तस्मात्, आज मी का अग्नीमध्यें उडी घालावी? किंवा वडवानलामध्यें जाऊन पडावें? का समुद्रनिवासी प्राण्यांना आपलें शरीर अर्पण करावें? कार्याचा सर्व प्रकारें घात करणारा मी जिवंत राहून आतां मला वानराधिपति सुग्रीवाचें अथवा त्या पुरुषश्रेष्ठ राम-लक्ष्मणांचें दर्शन होणें शक्य तरी कसें? सारांश, त्रैलोक्यामध्यें प्रसिद्ध असलेला वानरांचा अव्यवस्थितपणा मात्र क्रोधरूप दोषामुळें खरोखर मीं दर्शविला आहे! अरे, समर्थ असूनहि ज्या अर्थी रजोगुणमूलक क्रोधाला वश झाल्यामुळें सीतेचें रक्षण करण्यास मी प्रवृत्त झालों नाहीं, त्या अर्थी सत्कार्याला अयोग्य आणि अव्यवस्थित अशा ह्या माझ्या राजस स्वभावाला धिक्कार असो! अरेरे! सीतेचा नाश झाला असल्यामुळें आतां अर्थात्च त्या उभयतां राम-लक्ष्मणांचा अंत होणार. त्यांचा अंत झाला म्हणजे सुग्रीवाचाहि बांधवांसहवर्तमान नाश होणार! इतकेंच नव्हे, परंतु ही वार्ता ऐकतांक्षणीं भ्रातृवत्सल धर्मात्मा भरत शत्रुघ्नासहवर्तमान जिवंत राहण्यास कसा समर्थ होईल? तात्पर्य, इक्ष्वाकुवंशाधिपति धर्मिष्ठ राम नाहींसा झाल्यावर सर्व प्रजा शोक व संताप ह्यांनीं ग्रस्त होऊन जाईल, ह्यांत संशय नाहीं. धर्म व अर्थ ह्यांचा सर्वस्वी माझ्या हातून लोप झालेला आहे. मी भाग्यहीन आहें, आणि रोषरूप दोषानें माझें मन व्याप्त झालें असल्यामुळें मी उघडच जगताचा घातक ठरलों आहें."

### चिंतापरिहार.

ह्याप्रमाणें तो विचार करूं लागला असतां, पूर्वीं दृष्टोत्पत्तीस आलेलींच कांहीं कारणें त्याला सुचलीं; आणि पुनरपि तो मनापासून विचार करूं लागला. तो म्हणाला, "स्वतःच्या तेजानेंच सर्वांगसुंदरी सीतेचें रक्षण केलें असल्यामुळें

ती कल्याणी नाश पावणार नाहीं. कारण अग्नीला अग्नि जाळण्यास कधीं प्रवृत्त होत नाहीं. त्या अतुल तेजस्वी धर्मात्म्या रामाची भार्या स्वतःच्या वर्तनानेंच सुरक्षित असल्यामुळें अग्नि तिला स्पर्श करण्यास समर्थ नाहीं. खरोखर दग्ध करून टाकणें हेंच ज्याचें कर्म आहे, अशा अग्नीनेंहि रामाच्या प्रभावानें आणि वैदेहीच्या पुण्यानें मला मुळींच दग्ध केलें नाहीं. तस्मात्, भरतप्रभृति तिन्ही भ्रात्यांची जी देवता आणि मनाप्रमाणें असलेली जी रामाची कांता, ती कशी नाश पावेल? फार कशाला, दहन करणें हेंच ज्याचें कर्म आहे, असा हा अक्षय्य अग्नि सर्वत्र आपलें कर्म करण्यास समर्थ असूनहि जर माझें पुच्छ दग्ध करीत नाहीं, तर साध्वी सीतेला तो कसा दग्ध करील?"

असा विचार केल्यानंतर जलामध्यें दृष्टीस पडलेल्या हिरण्यनाभ पर्वताचें त्याला स्मरण झालें; आणि विस्मयचकित होऊन तो पुनः म्हणाला, "तप, सत्य भाषण आणि भर्त्याचे ठिकाणीं अनन्य प्रेम ह्यांच्या योगानें ही सीताच अग्नीला जाळून टाकील. अग्नि तिला दग्ध करण्यास समर्थ होणार नाहीं."

ह्याप्रमाणें त्या देवीच्या धर्माचरणाचा तो हनुमान विचार करूं लागला असतां, महात्म्या चारणांचें असें भाषण त्यानें ऐकिलें. "अहो, राक्षसांच्या गृहांवर तीक्ष्ण व भयंकर अग्नि सोडणाऱ्या हनुमानानें खरोखर हें फारच दुर्घट कर्म केलें आहे. अहो, पळत सुटलेल्या राक्षसस्त्रिया, बाल आणि वृद्ध ह्यांनीं व्याप्त झालेली व लोकांच्या हलकल्लोळानें दुमदुमून गेल्यामुळें पर्वतगुहारूप मुखांनीं जशी कांहीं आक्रोशच करीत असलेली ही लंका गच्च्या, कोट व वेशी ह्यांसहवर्तमान दग्ध झाली असतांहि जानकी दग्ध झाली नाहीं, ह्यामुळें आम्हांला खरोखर अद्भुत विस्मयच झाला आहे!"

ह्याप्रमाणें ती अमृततुल्य वाणी कानीं पडतांक्षणीं हनुमानाच्या मनाला हर्ष झाला. ज्यांचा प्रत्यय आलेला आहे, असे शकुन अवलोकन करून, रामप्रभाव-प्रभृति मोठमोठीं कारणें लक्ष्यांत आणून व आकाशामध्यें झालेल्या ऋषिवाक्यां-कडे लक्ष्य देऊन तो प्रसन्न झाला. ह्याप्रमाणें मनोरथ परिपूर्ण झालेल्या त्या कपीनें त्या राजकन्येला धक्का लागलेला नाहीं, असें जाणून व तिला प्रत्यक्ष पाहून परत जाण्याचें मनामध्यें आणिलें.

# सर्ग छपन्नावा.

## सीतेचा निरोप घेणें.

तदनंतर शिंशपा वृक्षाखालीं बसलेल्या जानकीला अभिवंदन करून हनुमान म्हणाला, " सुदैवानें मी आज तुला क्षतरहित अवलोकन करीत आहें. "

इतकें बोलून चालूं लागलेल्या त्या हनुमानाकडे सीता वारंवार पाहूं लागली, आणि भर्त्याचे ठिकाणीं प्रेम असलेली ती सीता त्याला म्हणाली, " बा निष्पापा, तुझी मर्जी असेल, तर कोठें तरी चांगल्या गुप्त प्रदेशामध्यें आजच्या दिवस विश्रांती घेऊन तूं उद्यां जा. कारण हे वानरा, तूं जवळ असल्यामुळें मज भाग्यहीन स्त्रीला होत असलेल्या ह्या अनुपम दुःखाचा क्षणभर तरी विसर पडेल. हे वानरश्रेष्ठा, तूं एकदां गेल्यावर पुनरपि तुझी भेट होईल म्हणावें, तर माझे प्राण रहातील, असाहि मला विश्वास वाटत नाहीं. हे वीरा, तूं दिसेनासा झालास, म्हणजे पूर्वीच्या दुःखाहूनहि मला अधिक दुःख प्राप्त होणार असल्यामुळें आणि खेद व शोक ह्यांनीं मी अगदीं जर्जर होऊन गेलें असल्यामुळें माझें हृदय विदीर्ण होऊन जाईल. शिवाय माझ्या डोळ्यांसमोर हा फारच मोठा संशय अगदीं जसा कांहीं दत्त म्हणून उभा आहे. अरे, अतिप्रचंड वानर व ऋक्ष जरी साहाय्य करणारे असले, तरी तीं ऋक्षवानरांचीं सैन्यें अथवा ते राजपुत्र राम-लक्ष्मण दुस्तर सागर तरून येण्यास खरोखर समर्थ कसे होतील? सागराचें उल्लंघन करण्याविषयीं तीनच प्राण्यांचें सामर्थ्य आहे.—गरुडाचें, तुझें अथवा वायूचें.—तस्मात्, कार्य निर्विघ्नपणें होण्याला ही दुस्तर अडचण आली असतांना तुला काय बरें उपाय सुचत आहे? हातीं घेतलेलें कृत्य पार पाडण्यामध्यें तूं निपुण आहेस. हे शत्रुदमना, हें कार्य सिद्धीस नेण्याविषयीं खरोखर तूंच समर्थ आहेस, व तुझ्या बलाचा प्रभाव यशस्कारक होणार आहे. तथापि शत्रुसैन्याचें मर्दन करणारा ककुत्स्थकुलोत्पन्न राम सैन्याच्या योगानें लंकेमध्यें दाणादाण उडवून देऊन जर मला घेऊन जाईल, तर तें त्याला साजेलसें होईल. तस्मात्, त्या महात्म्या रणशूर रामाला अनुरूप असा पराक्रम त्याच्या हातून होईल, अशी तूं तजवीज कर. "

अर्थ, विनय आणि हेतु ह्यांनीं युक्त असलेलें हें भाषण श्रवण करून हनुमान तिला म्हणाला, " हे देवि, वानर आणि ऋक्ष ह्यांच्या सैन्यांचा अधिपति

सुग्रीव बलवान आहे; आणि तुझ्या कार्याविषयीं त्याचा निश्चय झालेला आहे. तो वानराधिपति हजारों वानरांचीं कोट्यवधि सैन्यें बरोबर घेऊन सत्वर इकडे येईल. ते पुरुषश्रेष्ठ वीर राम-लक्ष्मणहि बरोबर येऊन बाणांनीं सर्व लंका नगरी उडवून देतील; आणि ज्ञातिगणांसहवर्तमान लवकरच रावणाचा वध करून तुला घेऊन रघुनंदन राम आपल्या राजधानीला परत जाईल. तुझें कल्याण असो. तूं धैर्य धर, आणि कालप्रतीक्षा करून रहा. संग्रामामध्यें रामाच्या हातून वध पावलेल्या रावणाला तूं लवकरच अवलोकन करशील; आणि पुत्र, अमात्य व बांधव ह्यांसहवर्तमान राक्षसाधिपति रावणाचा वध झाला असतां चंद्राशीं भेट होणाऱ्या रोहिणीप्रमाणें लवकर तुझी रामाशीं भेट होईल. सारांश, श्रेष्ठ श्रेष्ठ वानर व ऋक्ष बरोबर घेऊन ककुत्स्थकुलोत्पन्न राम सत्वर इकडे येईल, आणि युद्धामध्यें राक्षसांना जिंकून तुझा शोक नाहींसा करील."

### अरिष्ट पर्वतीं आरोहण.

ह्याप्रमाणें सीतेला धीर देऊन व जाण्याचें मनांत आणून वायुपुत्र हनुमानानें तिला अभिवंदन केलें. तात्पर्य, श्रेष्ठ श्रेष्ठ राक्षसांचा वध करून, आपलें नांव गाजवून, सीतेला आश्वासन देऊन, अपरिमित सामर्थ्य प्रकट करून, लंका नगरीमध्यें दाणादाण उडवून देऊन, रावणाला फसवून, भयंकर बल प्रकट करून आणि सीतेला अभिवंदन करून त्या हनुमानानें पुनरपि समुद्राचें उल्लंघन करून जाण्याचें मनामध्यें आणिलें. सीतेला अभिवंदन केल्यानंतर स्वामीदर्शनाविषयीं उत्सुक झालेला तो शत्रुनाशक वानरश्रेष्ठ हनुमान अरिष्ट नामक श्रेष्ठ पर्वतावर आरूढ झाला. उंच उंच पद्मक वृक्षांनीं युक्त असलेल्या नीलवर्ण वनपंक्ति त्याच्यावर असल्यामुळें त्यानें नीलवस्त्र नेसलें आहे कीं काय, असें दिसत होतें, शिखरांमधून लोंबणाऱ्या मेघांच्या योगानें तो जसा कांहीं उत्तरीय वस्त्रच परिधान केल्यासारखा दिसत होता. सूर्याचीं शुभ किरणें प्रेमानें त्याला जागृत करीत आहेत कीं काय असें दिसत होतें. इकडे तिकडे उडालेल्या धातूंच्या योगानें तो जसा कांहीं डोळेच उघडीत आहे कीं काय असें दिसत होतें. जलप्रवाहाच्या गंभीर स्वरांच्या योगानें त्याच्यावर जसें कांहीं चोहोंकडे वेदाध्ययनच चाललें आहे कीं काय असा भास होत होता. झुळझुळ वहाणाऱ्या अनेक जलप्रवाहांच्या स्वरांच्या योगानें त्याच्यावर जसें कांहीं स्पष्ट गायनच चाललें आहे कीं काय असें भासत होतें. उंच उंच देवदारु वृक्षांच्या योगानें जसा कांहीं तो पर्वत हात वर करूनच उभा राहिल्यासारखा दिसत होता.

धबधब्यांच्या ध्वनीमुळें सर्व बाजूंनीं त्या प्रदेशावर आरडाओरड चालल्याचा भास होत होता. शरदृतूंतील श्यामवर्ण वृक्षसमुदाय हालत असल्यामुळें तो पर्वत जसा कांहीं कंपित झाल्यासारखा दिसत होता. आंत वारा भरलेल्या कीचकसंज्ञक कळकांच्या योगानें तो जसा कांहीं अलगुजेंच वाजवीत असल्यासारखा दिसत होता. मोठमोठ्या घोर सर्पांच्या योगानें तो जसा कांहीं रागारागानें सुस्कारे टाकीत असल्यासारखा भासत होता. दंव पडल्यामुळें गंभीर झालेल्या दऱ्यांच्या योगानें तो ध्यानस्थ बसल्यासारखा दिसत होता. मेघांच्या फांव्याप्रमाणें असलेल्या भोंवतालच्या लहान लहान टेंकड्या जशा कांहीं त्याच्यावरून चालून जाण्यासच प्रवृत्त झाल्या आहेत कीं काय असें दिसत होतें. मेघपटलांनीं युक्त असलेल्या शिखरांच्या योगानें तो जसा कांहीं आकाशामध्यें जांभयाच देत असल्यासारखा दिसत होता. शिखरांच्या योगानें तो नानाप्रकारांनीं गजबजलेला होता. अनेक दऱ्यांनीं त्याला शोभा आलेली होती. साल, ताल, कर्ण आणि वंश ह्या असंख्य वृक्षांनीं तो व्याप्त झालेला होता. पसरलेल्या पुष्पयुक्त लतांच्या योगानें वर चांदवे पसरून तो श्रृंगारिल्यासारखा दिसत होता. नानाप्रकारच्या मृगगणांनीं तो गजबजून गेलेला होता. धातूंच्या स्रावामुळें तो भूषित झालेला होता. अनेक जलप्रवाह त्याच्यावरून वहात होते. पाषाणसमूहानें त्याच्यावर अगदीं खेचाखेच झालेली होती. महर्षी, यक्ष, गंधर्व, किन्नर आणि उरग ह्यांनीं त्याचा आश्रय केलेला होता. लता व वृक्ष ह्यांची त्यावर गर्दी उडालेली होती. सिंहांनीं त्याच्या गुहांचा आश्रय केलेला होता. व्याघ्रादि श्वापदांनीं तो व्याप्त झालेला होता. आणि मधुर मुळांनीं युक्त असे वृक्ष त्यावर होते.

अशा प्रकारच्या त्या अरिष्ट पर्वतावर तो वायुपुत्र आरूढ झाला. कारण, रामदर्शनाकरितां झालेल्या अतिशय हर्षाच्या योगानें त्याला प्रोत्साहान मिळालेलें होतें. तो हनुमान पर्वतावर आरूढ झाला असतां, पर्वताच्या रमणीय शिखरावरील ज्या ज्या शिलांवर त्याचे पाय पडले, त्या त्या शिलांचे मोठे आवाज होऊन त्यांचें अगदीं पीठ होऊन गेलें. ह्याप्रमाणें त्या पर्वतराजावर आरूढ झाल्यानंतर महाकपि हनुमान वृद्धिंगत झाला, आणि महासमुद्राच्या दक्षिणतीरापासून निघून उत्तरतीराला येण्याच्या उद्देशानें तो वायुपुत्र पर्वतावर आरूढ झाला असतां, भयंकर सर्पांनीं ज्याचा आश्रय केलेला आहे, असा प्रचंड सागर त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां आकाशामध्यें प्रविष्ठ होणाऱ्या वायूप्रमाणें तो वानरश्रेष्ठ हनुमान दक्षिण दिशेपासून निघून उत्तर दिशेस गेला. ह्याप्रमाणें

त्या वानरानें त्या श्रेष्ठ पर्वताला चिरडिलें असतां नानाप्रकारच्या प्राण्यांच्या द्वारें तो आक्रोश करूं लागला, आणि भूतलामध्यें खचूं लागला. त्याचप्रमाणें त्याचीं शिखरें कांपूं लागलीं, आणि वृक्ष कोसळून पडूं लागले. त्या हनुमानाच्या मांड्यांच्या वेगानें उपटले गेलेले प्रफुल्लित वृक्ष इंद्राच्या वज्राचा तडाखा बसल्यामुळेंच कीं काय, मोडून भूमीवर पडले! दऱ्यांतून राहिलेल्या महाबलाढ्य सिंहांना पीडा होऊं लागल्यामुळें आकाश दुमदुमून सोडणारी त्यांची गर्जना कानीं येऊं लागली. त्रस्त झाल्यामुळें ज्यांचीं वस्त्रें अस्ताव्यस्त होऊन भूषणांचाहि गोंधळ उडून गेलेला आहे, अशा विद्याधरस्त्रिया एकाएकीं पर्वतावरून खालीं पडल्या. शरिरानें फारच मोठे बलाढ्य, प्रदीप्त जिव्हा आणि जालीम विष ह्यांनीं युक्त असलेले प्रचंड सर्प मस्तक व मान चेपल्यामुळें वेटोळीं घालूं लागले. किन्नर, उरग, गंधर्व, यक्ष आणि विद्याधर चुरडून गेलेल्या त्या श्रेष्ठ पर्वताचा त्याग करून आकाशामध्यें गेले. वृक्ष व शिखरें ह्यांनीं उन्नत असलेला तो भव्य पर्वत त्या बलाढ्य वानरामुळें चेपला गेला असतां रसातलामध्यें प्रविष्ट झाला. सारांश, चाळीस कोस रुंद आणि एकशें वीस कोस उंच असलेला तो पर्वत जमिनीबरोबर होऊन गेला. तदनंतर ज्याच्या तीरावर लाटा उसळत आहेत, असा तो भयंकर जलरूप सागर उल्लंघून जाण्याकरितां वानरानें आकाशामध्यें उड्डाण केलें.

## सर्ग सत्तावन्नावा.

### पुनरपि समुद्रोल्लंघन.

पक्षयुक्त पर्वतच कीं काय अशा त्या महावेगवान हनुमानानें उड्डाण करून आकाशरूप समुद्रामध्यें पोहण्यास आरंभ केला. भुजंग, यक्ष आणि गंधर्व हींच त्या सागरांतील उमललेलीं कमलें होतीं. चंद्ररूप श्वेतकमल आणि सूर्यरूप कारंडव पक्षी ह्यांनीं युक्त असल्यामुळें तो आकाशरूप शुभ सागर रमणीय दिसत होता. पुष्यसंज्ञक आणि श्रवणसंज्ञक नक्षत्रें हींच त्याच्यांतील बदकें होतीं. मेघ हेच त्यांतील शेवाळें व हिरवें गवत होतें. पुनर्वसु नक्षत्राचे तारे हेच त्यांतील मोठे मत्स्य होते. मंगळ हाच त्यांतील मोठा नक्र होता. ऐरावत हा त्याच्यांतील महागज होता. स्वातीनक्षत्ररूप हंसाचा तेथें विलास चाललेला

होता. वावटळींचे समुदाय ह्याच त्यांतील लाटा होत्या, आणि चंद्रकिरणें हेंच त्यांतील शीतल उदक होतें.

अशा प्रकारच्या त्या आकाशरूप सागरामध्यें हनुमान श्रांत न होतां पोहूं लागला. आकाश गिळूनच टाकीत आहे कीं काय, ताराधिपति चंद्राला नखांनीं ओरबडीतच आहे कीं काय, आणि सूर्यमंडल व नक्षत्रें ह्यांसहवर्तमान आकाश हरणच करीत आहे कीं काय, असा तो हनुमान श्रांत न होतां अपार समुद्राचें उल्लंघन करूं लागला. तो जणूंकाय मेघपटलांना ओढीतच जाऊं लागला असतां श्वेतवर्ण, आरक्तवर्ण, नीलवर्ण, रक्तवर्ण, हरितवर्ण आणि अरुणवर्ण असे मोठमोठे मेघ त्याच्या मागोमाग ओढले जात आहेत, असें दिसूं लागलें. वारंवार अभ्रपटलांमध्यें प्रवेश करीत असलेला व त्यांतून बाहेर पडत असलेला तो हनुमान प्रकाशयुक्त व प्रकाशरहित होणाऱ्या चंद्राप्रमाणें दिसूं लागला. नानाप्रकारच्या अभ्रसमुदायांतून जात असल्यामुळें, आणि शुभ्र वस्त्र परिधान केलें असल्यामुळें वारंवार दृश्य व अदृश्य होत असलेला तो वीर हनुमान आकाशामध्यें चंद्रासारखा दिसूं लागला. तो वायुपुत्र आकाशामध्यें गरुडासारखा भासूं लागला. मेघसमुदाय वारंवार विदीर्ण करीत करीत आणि पुनरपि त्यांतून बाहेर पडत पडत तो मेघाप्रमाणें गंभीर स्वरानें युक्त असलेला हनुमान उच्च स्वरानें गर्जना करीत करीत चालला. सारांश, श्रेष्ठ राक्षसांचा वध करून, आपलें नांव गाजवून, नगरींत दाणादाण उडवून देऊन, रावणाला व्यथा उत्पन्न करून, मोठमोठ्या योद्ध्यांना पीडा देऊन आणि सीतेला अभिवंदन करून तो महातेजस्वी हनुमान पुनरपि सागराच्या मध्यभागीं आला. त्या पर्वतराज वसुनाथ मैनाकाला स्पर्श करून तो वीर्यवान व महावेगवान कपि प्रत्यंचेपासून सुटलेल्या नाराच बाणाप्रमाणें वेगानें पुढें चालता झाला. प्रथमतः थोडासा जवळ आल्यावर त्या महापर्वताला अवलोकन करून त्या इंद्रमेघतुल्य महाकपीनें गर्जना केली. उच्च स्वरानें गर्जना करितां करितां मेघतुल्य गंभीर स्वरानें युक्त असलेल्या त्या हनुमानानें दशदिशा दणाणून दिल्या. तात्पर्य, सुहृदांचें दर्शन घेण्याविषयीं उत्सुक झालेला तो हनुमान त्या प्रदेशावर येतांक्षणीं उच्च स्वरानें गर्जना करून पुच्छ हालवूं लागला. ह्याप्रमाणें गरुडानें अवलंबन केलेल्या आकाशमार्गामध्यें जातां जातां तो गर्जना करूं लागला असतां, त्याच्या त्या गर्जनेनें सूर्यमंडलासहवर्तमान आकाश विदीर्णच होत आहे कीं काय असा भास होऊं लागला! जे पूर्वीं महाबलाढ्य शूर वानर वायुपुत्राची मार्गप्रतीक्षा

करीत समुद्राच्या उत्तरतीरावर बसले होते, त्या ठिकाणीं त्यांनीं वायूनें युक्त असलेल्या महामेघाच्या गर्जनेप्रमाणें प्रचंड वेगानें युक्त असलेला हनुमानाचा सिंहनाद श्रवण केला तो मेघासारखा गंभीर सिंहनाद श्रवण करून सुहृदाच्या दर्शनाकरितां ते सर्व अतिशय उत्सुक झाले; आणि प्रेमानें ज्याच्या मनाला अतिशय हर्ष झालेला आहे, असा तो वानरश्रेष्ठ जांबवान सर्व वानरांना हांक मारून म्हणाला, " हा हनुमान सर्वस्वी कार्य करून आला आहे, ह्यांत संशय नाहीं. कारण ह्याचा अशा प्रकारचा सिंहनाद कार्य झाल्यावांचून होण्याचा संभव नाहीं."

वानरांची भेट.

इतकें जांबवानानें सांगितल्यानंतर त्या महात्म्या हनुमानाच्या हातापायांचा वेग व सिंहनाद लक्ष्यांत आणून आनंदित झालेले वानर इकडे तिकडे उड्या मारूं लागले. हनुमानाला पाहण्याकरितां उत्सुक झालेले ते वानर आनंदानें ह्या वृक्षाग्रावरून त्या वृक्षाग्रावर आणि एका पर्वतशिखरावरून दुसऱ्या पर्वतशिखरावर उड्या टाकूं लागले. तदनंतर आनंदित होऊन वृक्षांचे अग्रभागीं शाखा धरून राहिलेले ते वानर आपलीं उज्ज्वल वस्त्रें हालवूं लागले. इतक्यांत पर्वताच्या गुहेमध्यें लीन झालेला वायु ज्याप्रमाणें गर्जना करितो, त्याप्रमाणें बलाढ्य वायुपुत्र गर्जना करूं लागला; आणि अतिशय उंच असलेल्या व मेघपटलाप्रमाणें येत असलेल्या त्या महाकपीला अवलोकन करून ते सर्व वानर हात जोडून उभे राहिले, तों अरिष्ट पर्वतापासून निघालेला तो पर्वतप्राय वेगवान वीर वृक्षांनीं गजबजलेल्या त्या महेंद्र पर्वताच्या शिखरावर येऊन धडकला! सारांश, हर्षानें उचंबळत असलेला तो हनुमान जलप्रवाहांनीं युक्त अशा रम्य पर्वतशिखरावर पंख तुटलेल्या पर्वताप्रमाणेंच कीं काय आकाशांतून पडला! तेव्हां मनामध्यें प्रसन्न झालेले ते सर्व वानरश्रेष्ठ महात्म्या हनुमानाचे भोंवतीं गराडा देऊन उभे राहिले. तदनंतर नजराण्यादाखल मुळें व फळें आणून हनुमानाचा त्यांनीं सत्कार केला. कांहीं-जण आनंदित झाले, कांहीं किलकिल शब्द करूं लागले, आणि आनंदित झालेले कांहीं वानरश्रेष्ठ वृक्षांच्या शाखा घेऊन त्याच्याकडे आले. नंतर त्या महाकपि हनुमानानें जांबवान वगैरे वृद्ध व गुरुतुल्य वानरांना आणि राजकुमार अंगदाला वंदन केलें. त्या उभयतांनीं त्या पूज्य वानराचा सत्कार केल्यावर आणि इतर वानरांनींहि त्याला प्रसन्न केल्यावर त्या पराक्रमी हनुमानानें 'दिसली देवी' एवढें थोडक्यांतच सांगून टाकिलें.

तदनंतर वालिपुत्र अंगदाचा हात धरून तो हनुमान महेंद्र पर्वताच्या रम्य वनप्रदेशावर बसला, आणि वानरांनीं प्रश्न केल्यावर तो म्हणाला, "अशोक-वनामध्यें बसलेली ती जनककन्या सीता माझ्या दृष्टीस पडली. अतिभयंकर राक्षसी त्या निर्दोष सीतेच्या बंदोबस्ताला आहेत. तिनें नुसता अंबाडा बांधिलेला आहे, आणि ती बाला रामदर्शनाकरितां उत्सुक झालेली आहे. ती जटिल सीता उपवास करून अगदीं थकलेली आहे आणि, मलिन दिसत असून कृश झालेली आहे."

असो. 'दिसली' हे महत्त्वाच्या अर्थानें युक्त असलेले अमृततुल्य शब्द मारुतीच्या मुखांतून श्रवण करितांक्षणीं सर्व वानर आनंदित झाले. कांहींजण क्रीडा करूं लागले, कांहीं सामान्य शब्द करूं लागले, कांहीं महाबलाढ्य वानर गर्जना करूं लागले, कांहींजण किलकिल शब्द करूं लागले, कांहींजण इतरांनीं गर्जना केल्यावर आपण त्यांच्यावर ताण करण्याकरितां गर्जना करूं लागले, आणि आनंदित व म्हणूनच उन्नत पुच्छांनीं युक्त झालेले कांहीं वानर श्रेष्ठ रोमांचयुक्त अशीं आपली स्थूल व दीर्घ पुच्छें हालवूं लागले, व कांहीं त्या उदार वानरश्रेष्ठ हनुमानाला, पर्वतशिखरावर उड्डाण करून आनंदानें स्पर्श करूं लागले. असो.

हनुमानाचें भाषण झाल्यानंतर वानरवीरांमध्यें श्रेष्ठ असलेला अंगद अनुपम वाणीनें त्याला म्हणाला, "हे वानरा, धैर्य आणि वीर्य ह्यांमध्यें तुझी बरोबरी करणारा कोणीहि नाहीं. कारण, उड्डाणाबरोबर विस्तीर्ण सागर उल्लंघन करून पुनरपि परत आलेला आणि म्हणूनच आम्हांला जीवदान देणारा असा तूंच एक आहेस. तुझ्या प्रसादानें आमचे मनोरथ परिपूर्ण झाले असल्यामुळें रघु-वंशज रामाला आतां आम्ही भेटूं. कायरे ही तुझी स्वामीभक्ति! काय हें वीर्य! आणि काय हें धैर्य! यशस्विनी रामपत्नी सीता देवी तुझ्या दृष्टीस पडली, ही फार उत्तम गोष्ट झाली. आतां सुदैवानें ककुत्स्थकुलोत्पन्न राम सीतेच्या वियो-गामुळें झालेल्या दुःखाचा त्याग करील."

तदनंतर हनुमानानें समुद्राचें उल्लंघन कसें केलें, आणि लंका, सीता व रावण हीं त्याच्या कशीं दृष्टीस पडलीं, हें श्रवण करण्याकरितां त्या महेंद्र पर्व-ताच्या विस्तीर्ण शिलांवर, हनुमानाच्या मुखाकडे पहात पहात ते सर्व वानर हात जोडून बसले. नानाप्रकारचे देव ज्याच्या शुश्रूषेंत तत्पर आहेत, असा देव-राज इंद्र ज्याप्रमाणें स्वर्गामध्यें बसतो, त्याप्रमाणें अनेक वानरांनीं परिवेष्टित

असलेला श्रीमान अंगद तेथें बसला. ह्याप्रमाणें कीर्तिमान हनुमान व बाहुभूषणें हातांमध्यें घातलेला यशस्वी अंगद हे आनंदानें त्या पर्वताच्या शिखरावर बसले असतां, तें उन्नत पर्वतशिखर कांतीनें उज्ज्वल दिसूं लागलें.

## सर्ग अठ्ठावन्नावा.

### वानरांना वृत्तनिवेदन.

ह्याप्रमाणें ते महात्मे वानर आनंदानें महेंद्र पर्वताच्या शिखरावर बसले असतां, हर्षयुक्त झालेला जांबवान त्या महाकपि वायुपुत्र हनुमानाला हातीं घेतलेल्या कार्याविषयींचा वृत्तांत विचारूं लागला. तो म्हणाला, " हे महाकपे, देवी तुझ्या कशी दृष्टीस पडली, ती तेथें कशी काय आहे, आणि तिच्याशीं तो क्रूरकर्मा रावण कसा वागत आहे, हें सर्व तूं आम्हांला खरें खरें सांग; व देवी सीतेचा शोध तूं कसा लाविलास, आणि ती तुला काय म्हणाली, हेंहि कथन कर. याप्रमाणें काय वृत्तांत आहे, तो आम्हांला विदित झाला, म्हणजे पुढें काय करावयाचें, याचा निश्चय करितां येईल. शिवाय तेथें गेल्यावर स्वतः-संबंधानें आम्हीं रामाला काय सांगावयाचें, आणि काय गुप्त ठेवावयाचें, हेंहि तूं आम्हांला स्पष्ट सांग. "

ह्याप्रमाणें जांबवानानें विचारिलें असतां, हर्षानें ज्याच्या अंगावर रोमांच उठले आहेत, असा तो हनुमान सीता देवीला मस्तकानें प्रणाम करून त्या वानरांना म्हणाला, " सागराच्या दक्षिणतीरास जाण्याचा उद्देश मनांत धरून स्वस्थ चित्तानें मीं तुमच्या समक्ष महेंद्र पर्वताच्या शिखरावरून आकाशांत उड्डाण केलें. जातां जातां प्रथमतः मला एक घोर विघ्नच आल्यासारखें वाटलें. कारण एक सुवर्णाचें मनोहर दिव्य शिखर माझ्या दृष्टीस पडलें. तेव्हां मार्ग आडवून राहिलेला तो पर्वत एक विघ्नच आहे, असें मला वाटलें. नंतर त्या उत्कृष्ठ व दिव्य सुवर्णपर्वतासमीप गेल्यावर तो फोडून टाकावा, असा मीं निश्चय केला, आणि एक पुच्छाचा तडाकाहि त्याला दिला. तेव्हां त्या महापर्वताच्या एका सूर्यासारख्या तेजस्वी शिखराचे हजारों तुकडे झाले. हा माझा पराक्रम पाहून तो महापर्वत ' हे पुत्रा, ' अशा मधुर वाणीनें मनाला आल्हाद देत देत मला म्हणाला, " मी वायूचा सखा असल्यामुळें तुझा चुलता आहें, असें तूं समज.

मैनाक ह्या नांवानें मी प्रसिद्ध असून महासागरामध्यें वास्तव्य करीत असतों. पूर्वी श्रेष्ठ पर्वतांना पक्ष होते. तेव्हां ते आपल्या इच्छेप्रमाणें पृथ्वीवर संचार करीत असत; आणि संचार करितां करितां मार्गांत जें कांहीं येईल, त्याला पीडा देत असत. पर्वतांचें हें वर्तन श्रवण करून पाकशासन भगवान महेंद्रानें पंखांचे वज्राच्या योगानें हजारों तुकडे केले. तेव्हां तुझ्या महात्म्या पित्यानें इंद्रापासून माझी मुक्तता केली. वत्सा, वायूनें त्या वेळीं मला सागरामध्यें फेंकून दिलें. असो. हे शत्रुदमना, रघुवंशज रामाचें मला साहाय्य केलें पाहिजे. कारण राम धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ आहे, आणि महेंद्रासारखा त्याचा पराक्रम आहे."

"हें त्या महात्म्या मैनाकाचें भाषण श्रवण करून व त्या पर्वताचा उद्देश जाणून माझ्या मनाला धीर आला. नंतर त्या महात्म्या मैनाकानें मला जाण्याची अनुज्ञा दिली. अनुज्ञा देतांक्षणीं मोठें मनुष्यरूप धारण केलेला तो महापर्वत पुनरपि फक्त पाषाणरूपाचेंच अवलंबन करून समुद्रामध्यें गुप्त झाला. नंतर पराकाष्ठेच्या वेगाचें अवलंबन करून मी अवशिष्ट राहिलेला मार्ग उल्लंघन करूं लागलों असतां, वेगावेगानें बराच वेळपर्यंत मार्गांतून गेलों. तदनंतर नागमाता देवी सुरसा समुद्रामध्यें माझ्या दृष्टीस पडली. ती मला म्हणाली, 'हे वानरश्रेष्ठा, देवांनीं तुला माझें भक्ष्य नेमिलें आहे. ह्यास्तव मी तुला भक्षण करितें. कारण, देवांनींच तुझी माझ्याकडे योजना केलेली आहे.' ह्याप्रमाणें सुरसेनें सांगितलें असतां मी हात जोडून नम्रपणें उभा राहिलों. माझें मुख निस्तेज झालें, आणि मीं तिला म्हटलें, 'दशरथपुत्र शत्रुतापन श्रीमान राम हा भ्राता लक्ष्मण व भार्या सीता ह्यांसहवर्तमान दंडकारण्यामध्यें प्रविष्ट झाला असतांना, दुरात्म्या रावणानें त्याची भार्या सीता हरण करून नेली आहे; आणि रामाच्या आज्ञेवरून तिच्याकडे मी दूत ह्या नात्यानें जात आहें. ह्यास्तव हा प्रदेश जर रामाच्या आज्ञेंतील असेल, तर तूं त्याला सहाय्य कर. अथवा असें नसेल, तर सीतेचा शोध लावून आणि तो वृत्तांत निवेदन करण्याकरितां पापापासून परावृत्त असलेल्या रामाची भेट घेऊन मी पुनरपि तुझ्या मुखामध्यें परत येईन, हें मी तुला प्रतिज्ञापूर्वक सत्य सांगतों."

"ह्याप्रमाणें मीं तिला सांगितलें असतां, इच्छेप्रमाणें रूप धारण करणारी ती सुरसा मला म्हणाली, 'हा मला प्राप्त झालेला वर व्यर्थ करण्यास कोणीहि समर्थ नाहीं.' असें तिनें सांगितलें असतां एका क्षणामध्यें मी दहा योजनें उंच आणि पांच योजनें रुंद इतका विस्तृत झालों; परंतु माझ्याहिपेक्षां तिनें आपला

जबडा जास्त मोठा केला. तेव्हां तो आ पसरलेला पाहून मी पुनरपि लहान रूप धारण केलें, आणि तत्क्षणींच अगदीं अंगुष्ठाएवढा लहान झालों. नंतर सत्वर तिच्या मुखामध्यें प्रवेश करून तत्क्षणींच बाहेर पडलों असतां, स्वाभाविक रूप धारण करून ती सुरसा देवी मला म्हणाली, ' हे विनयसंपन्न वानरश्रेष्ठा, कार्यसिद्धीकरितां तूं खुशाल जा, आणि महात्म्या राघवाकडे सीतेला घेऊन ये. हे महापराक्रमी वानरा, तूं सुखी हो. मी तुजवर प्रसन्न झालें आहें. "

" तदनंतर ' शाबास, शाबास ' म्हणून माझी सर्वांनीं प्रशंसा केल्यावर विस्तीर्ण अंतरिक्षामध्यें मीं गरुडाप्रमाणें उड्डाण केलें, तों छायेच्या द्वारानें मला कोणी आकर्षण केलें; परंतु कोण आकर्षण करीत आहे, हें मला कांहींच दिसेना. वेग नाहींसा झाल्यामुळें मी चहूंकडे अवलोकन करूं लागलों; पण ज्याच्या योगानें माझी गति कुंठित झाली होती, तें कांहींच माझ्या दृष्टीस पडेना. असें झालें असतां मीं मनांत म्हटलें, ' अरे, आकाशामध्यें अशा प्रकारचें विघ्न उत्पन्न झालें आहे, आणि प्रत्यक्ष रूप तर मला कोणाचेंच दिसत नाहीं, ह्याचा अर्थ काय ? "

" अशाप्रकारें मी काळजी करीत आहें, इतक्यांत अधोभागीं माझी दृष्टि गेली, तों उदकामध्यें वास्तव्य करणारी एक भयंकर राक्षसी मीं पाहिली. मी निश्चेष्ट परंतु निर्भय होतों; पण ती भयंकर राक्षसी, हास्यपूर्वक उच्च स्वरानें व अशुभ शब्दांनीं मला म्हणाली, ' अरे धटिंगणा, तूं आतां कोठें रे जाणार ? क्षुधित असलेल्या माझें तूं उद्दिष्ट भक्ष्यच आहेस. आतां पुष्कळ वेळपर्यंत आहाररहित असलेला हा माझा देह तृप्त कर."

" ह्यावर ' ठीक आहे ' असें म्हणून मीं तिच्या भाषणाला मान दिला, आणि तिच्या मुखापेक्षांहि आपलें शरीर मोठें केलें. परंतु मला भक्षण करण्याकरितां तिचेंहि भयंकर मुख फारच वाढूं लागलें. तथापि तिनें मला ओळखिलें नाहीं, व तिच्यापासून मला कांहीं इजाहि झाली नाहीं. नंतर आपलें विशाल रूप एका निमिषांत मीं संकुचित केलें, आणि तिचें हृदय घेऊन आकाशामध्यें उड्डाण केलें. तेव्हां मीं तिचें हृदय तोडून नेल्यामुळें ती पर्वतप्राय भयंकर राक्षसी हातपाय पाखडून समुद्रामध्यें पडली ! असें होतांक्षणीं, ' भयंकर सिंहिका राक्षसीचा हनुमानानें तडकाफडकीं वध करून टाकिला ' असें अंतरिक्षामध्यें संचार करणाऱ्या महात्म्यांचे सौम्य शब्द कानीं आले. "

" ह्याप्रमाणें तिचा वध केल्यावर आपल्या कार्याला विलंब होत आहे, हें मनांत आणून मी बराच रस्ता उल्लंघून गेलों असतां, पर्वतानें मंडित असें समुद्राचें दक्षिणतीर मीं अवलोकन केलें. त्याच तीरावर लंका नगरी आहे. पुढें सूर्यास्त झाल्यानंतर राक्षसांचें निवासस्थान असलेल्या त्या नगरीमध्यें भयंकर पराक्रमी राक्षसांच्या समजण्यांत न येतां मीं प्रवेश केला. परंतु मी प्रवेश करीत असतांनाच, प्रलयकालच्या मेघाप्रमाणें जिची कांति आहे, अशी एक स्त्री अट्टहास करीत करीत माझ्यासमोर उभी राहिली. तदनंतर माझा वध करण्याचा उद्देश मनांत धरणाऱ्या आणि प्रदीप्त अग्नीसारख्या उज्ज्वल केशांनीं युक्त असलेल्या त्या अतिभयंकर स्त्रीला डाव्या मुष्टिप्रहारानेंच पराजित करून प्रदोषसमयींच मीं लंका नगरीमध्यें प्रवेश केला. तेव्हां भयभीत झालेली ती स्त्री मला म्हणाली, 'हे वीरा, मी लंका नगरी आहें. ज्या अर्थी तुझ्या पराक्रमानें मी पराजित झालें आहे, त्या अर्थी तूं सर्व राक्षसांचा पूर्णपणें पराभव करशील."

" असें तिनें सांगितल्यानंतर सर्व रात्रभर तेथें हिंडतां हिंडतां रावणाच्या गृहामध्यें सीता दृष्टीस न पडल्यामुळें मी शोकसागरांत बुडून गेलों, आणि त्यांतून तरून जाण्याचा मला कांहींएक उपाय सुचेना. तथापि खेद करितां करितां सभोंवतीं सुवर्णमय उंच कोट असलेली उत्कृष्ट बाग माझ्या दृष्टीस पडली. तेव्हां प्राकारानें परिवेष्टित आणि असंख्य वृक्षांनीं युक्त अशा त्या बागेमध्यें मी उडी मारून गेलों असतां, पहातों तों त्या अशोकवनांत शिशवीचा एक मोठा वृक्ष होता. त्या वृक्षावर चढून पाहूं लागलों. तों एक पिंवळें कदली-वन माझ्या दृष्टीस पडलें. तेथें त्या शिसवीच्या वृक्षाजवळच सुंदरी सीता माझ्या दृष्टीस पडली ! कमलपत्रांसारख्या विस्तीर्ण नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या श्यामवर्ण सीतेची मुद्रा उपवासानें कृश झालेली होती. एकाच वस्त्रानें तिचें शरीर आच्छादिलेलें होतें. केंसांमध्यें धूळ उडालेली होती. शोक व संताप ह्यांनीं तिचें शरीर अगदीं जर्जर झालें होतें. भर्त्याच्या हिताविषयीं ती चिंतन करीत बसली होती. रक्तमांस भक्षण करणाऱ्या वाघिणींनीं घेरून टाकिलेली हरिणच कीं काय अशी ती सीता विरूप व क्रूर राक्षसींनीं वेढून टाकिलेली होती. राक्षसींमध्यें बसलेली मीं तिला अवलोकन केली. तेव्हां त्या राक्षसी वारंवार तिला दटावीत होत्या. भर्त्याच्या चिंतनामध्यें ती अगदीं गढून गेली होती व दीन झाली होती. केसांचा तिनें नुसता अंबाडाच बांधिलेला होता. ती भूमीवरच शयन करीत होती. हिंवाळा आला असतां निस्तेज होणाऱ्या

कमलिनीप्रमाणें तिचें शरीर निस्तेज झालेलें होतें, आणि रावणामुळें तिचें सुख नाहींसें झालें असल्या कारणानें मरण्याविषयींच ती निश्चय करून बसली होती."

"अशा अवस्थेमध्यें असलेल्या त्या मृगनयना सीतेजवळ मी सत्वर गेलों, आणि तशा प्रकारची ती यशस्विनी राजपत्नि अवलोकन केल्यावर तिच्याकडे पहात पहात मी तसाच त्या शिशवीच्या वृक्षावर बसलों. इतक्यांत कमरपट्टा व तोरड्या ह्यांच्या ध्वनींनीं मिश्रित झालेला अतिच प्रचंड शब्द रावणाच्या गृहासमीप मला ऐकूं आला. तेव्हां अत्यंत उद्विग्न होऊन मीं आपलें स्वरूप सूक्ष्म केलें, आणि त्या शिंशपा वृक्षावर पानांनीं गजबजून गेलेल्या एका प्रदेशामध्यें पक्ष्यांप्रमाणें दडून बसलों."

"तदनंतर ज्या ठिकाणीं सीता होती, तेथें आपल्या स्त्रियांसहवर्तमान महाबलाढ्य रावण आला. तो राक्षसगणाधिपति आल्याचें समजतांक्षणीं सुंदरी सीतेनें आपले पाय वस्त्राच्या आंत सांवरून घेतले, आणि पुष्ट स्तन बाहूंनीं अगदीं झांकून टाकिले. तदनंतर अतिशय त्रस्त व अत्यंत उद्विग्न होऊन इकडे तिकडे पहात असलेल्या, आणि रक्षण करणारा कोणी दृष्टीत पडत नसल्यामुळें थरथर कांपत असलेल्या त्या अत्यंत दुःखित तपस्विनी सीतेला मान खालीं घालून प्रणिपातपूर्वक रावण म्हणाला, 'माझ्या म्हणण्याला बहुमान दे. हे गर्विष्ठ सीते, गर्वानें जर तूं माझें म्हणणें मान्य केलें नाहींस, तर सुमारें दोन महिन्यांनंतर मी तुझें रक्त प्राशन करीन.'"

"हें त्या दुरात्म्या रावणाचें भाषण श्रवण करून, अत्यंत क्रुद्ध झालेली सीता उत्कृष्ठ शब्दांनीं त्याला म्हणाली, 'हे राक्षसाधमा, अतुल तेजस्वी रामाच्या भार्येशीं आणि इक्ष्वाकुवंशाधिपति दशरथाच्या स्नुषेशीं अनुच्चारणीय भाषण करीत असतांना तुझी जिह्वा झडून कशीरे पडली नाहीं! हे दुष्टा, हे पाप्या, भर्ता सन्निध नसतांना त्या महात्म्याच्या दृष्टीस न पडतां तूं मला हरण करून इकडे घेऊन आला आहेस, ह्यांत तुझा पुरुषार्थ तो काय? तूं रामाच्या तोडीचा नाहींस. इतकेंच नव्हे, परंतु त्याचा दास होण्याचीहि तुझी योग्यता नाहीं. संग्रामासंबंधानें विख्यात असलेला सत्यवचनी व शूर राम अजिक्य आहे."

"ह्याप्रमाणें जानकीनें रावणाला अनुलक्षून कठोर भाषण केलें असतां चितेवरील अग्नीप्रमाणें तो एकाएकीं क्रोधानें जळफळूं लागला, आणि आपले क्रूर डोळे वटारून व उजव्या हाताची मूठ उगारून तो सीतेला मारण्यास उद्युक्त झाला असतां स्त्रियांनीं हाहाःकार केला. तेव्हां स्त्रियांमधून त्या दुरा-

त्याची मंदोदरी नामक श्रेष्ठ भार्या लगबगीनें उठली, आणि तिनें त्याला आवरून धरिलें. नंतर मदनानें व्याकुळ झालेल्या रावणाला मधुर वाणीनें ती म्हणाली, 'हे महेंद्रतुल्य पराक्रमी राजा, आपणांला सीतेशीं काय कर्तव्य आहे ? माझ्यासहवर्तमान आज आपण रममाण व्हां. जानकी माझ्यापेक्षां अधिक नाहीं. देव, गंधर्व आणि यक्ष ह्यांच्या कन्यांसहवर्तमान आपण रममाण व्हां. सीतेशीं आपल्याला काय करावयाचें आहे."

" इतकें झाल्यानंतर त्या एकत्र जुळलेल्या स्त्रिया त्या महाबलाढ्य रावण राक्षसाला एकदम तेथून उठवून स्वतःच्या घरीं घेऊन गेल्या. तो रावण निघून गेल्यानंतर अक्राळविक्राळ मुद्रेनें युक्त असलेल्या त्या राक्षसी क्रूर व अत्यंत भयंकर भाषणांनीं सीतेची निर्भर्त्सना करूं लागल्या; परंतु सीतेनें त्यांचें भाषण कस्पटाप्रमाणें मानिलें. त्यामुळें सीतेसंबंधानें त्यांची ती गर्जना व्यर्थ झाली ! ह्याप्रमाणें मांसभक्षक राक्षसस्त्रियांची गर्जना व तडफड व्यर्थ झाली असतां, सीतेनें मरण्याविषयीं केलेला भयंकर निश्चय त्यांनीं रावणाला कळविला. तदनंतर हताश झालेल्या आणि म्हणूनच सीतेचें मन वळविण्याचा प्रयत्न सोडून दिलेल्या त्या सर्व राक्षसी श्रांत झाल्यामुळें एकदम निद्रिस्थ झाल्या. ह्याप्रमाणें त्या गाढ निद्रिस्थ झाल्या असतां, भर्त्याच्या हिताविषयीं तत्पर असलेली ती अत्यंत दुःखित व दीन सीता करुण स्वरानें विलाप करून शोक करूं लागली. तेव्हां त्या राक्षसींमधून एक त्रिजटा नामक राक्षसी उठली, आणि त्यांना म्हणाली, ' तुम्ही स्वतःलाच सत्वर खाऊन टाका. जनकाची कन्या आणि दशरथाची स्नुषा जी कृष्णनयना साध्वी सीता, तिला भक्षण करणें तुमच्या हातून होणार नाहीं. कारण, आज मला अंगावर कांटा आणण्यासारखें एक भयंकर स्वप्न पडलें आहे. त्यावरून राक्षसांचा नाश व हिच्या भर्त्याचा जय होणार आहे. ही सीता आम्हां राक्षसींच्या समुदायाचें रामापासून रक्षण करण्यास समर्थ आहे. ह्यास्तव ह्याविषयीं आपण सीतेची प्रार्थना करावी, हें मला बरें दिसतें. दुःखाकुल झालेल्या सीतेसंबंधानें जर अशा प्रकारचें स्वप्न दृष्टीस पडत आहे, तर नानाप्रकारच्या दुःखांतून ती मुक्त होईल, आणि तिला अनुपम सुख प्राप्त होईल. ह्यास्तव राक्षसस्त्रियांनो, प्रणिपातानें आपण जर जनककन्या मैथिली प्रसन्न करून घेतली, तर महाभयापासून ती आपलें संरक्षण करण्यास समर्थ आहे. "

" हें त्रिजटेचें भाषण ऐकून भर्त्याचा विजय होणार म्हणून हर्ष झालेली

ती विनयसंपन्न बाला सीता तिला म्हणाली, 'हें जर खरें असेल, तर मी तुमचें खात्रीनें रक्षण करीन. "

" सीतेची ती तशा प्रकारची भयंकर अवस्था पाहिल्यावर मी काळजींत पडलों; आणि सीता दृष्टीस पडली, म्हणून मला प्रथमतःच जरी श्रमाचें सार्थक झाल्यासारखें वाटत होतें, तरी तशी तिची अवस्था अवलोकन केल्यानंतर माझ्या मनाला बरें वाटेना. तदनंतर सीतेशीं संभाषण करण्याचा उपाय मनामध्यें आणून माझ्या डोळ्यांपुढें असलेल्या इक्ष्वाकुवंशाची मीं स्तुति केली. तेव्हां राजर्षिपरंपरेच्या वर्णनानें भूषित अशी मीं उच्चारिलेली वाणी श्रवण करून अश्रूंनीं नेत्र आच्छादित झालेली ती देवी मला म्हणाली, 'हे वानरश्रेष्ठा, तूं कोण आहेस, येथें कसा आलास, आणि रामाविषयीं तुझें प्रेम कसें आहे, हें मला कथन कर. "

" हें तिचें भाषण श्रवण करून मीं तिला म्हटलें, 'हे देवि, तुझ्या भर्त्या रामाचा एक महापराक्रमी साहाय्यकर्ता सुग्रीव नामक महाबलाढ्य व शूर वानराधिपति आहे. त्याचा सेवक हनुमान मी येथें आलों आहें, असें तूं समज. पापकर्मापासून परावृत्त असलेल्या भर्त्या रामानें मला तुझ्याकडे पाठविलें आहे. हे यशस्विनि, पुरुषश्रेष्ठ श्रीमान दाशरथि रामानें खुणेकरितां ही अंगठीहि तुला दिली आहे. तस्मात्, तुझी काय आज्ञा मीं शेवटास न्यावी, हें समजण्याचीं माझी इच्छा आहे. राम-लक्ष्मणाजवळ तर मी तुला घेऊन जाईनच, परंतु तुझी दुसरी काय आज्ञा आहे, ती मला कळूं दे. "

" हें भाषण श्रवण करून व ती खूण ओळखून जनककन्या सीता मला म्हणाली, 'रावणाचा समूळ नाश करून रामानेंच मला घेऊन जावें. "

" असें तिनें सांगितल्यानंतर त्या साध्वी अनिंदित देवीला मीं मस्तकानें प्रणाम केला, आणि राघवाच्या मनाला आनंद देण्यासारखी खूणहि मीं तिच्यापाशीं मागितली. तेव्हां सीता मला म्हणाली, 'हा उत्कृष्ठ मणि घे. ह्या मण्याच्या योगानें महापराक्रमी राम तुला बहुमान देईल.' असें बोलून त्या सुंदरीनें हें उत्कृष्ठ व श्रेष्ठ रत्न माझ्या स्वाधीन केलें, आणि अत्यंत उद्विग्न होऊन रामाला खूण पटण्यासारखा तिनें कांहीं वृत्तांतहि मला कथन केला. "

" तदनंतर स्वस्थ चित्तानें मीं त्या राजकन्येला प्रणाम केला, आणि इकडे परत येण्याचा उद्देश मनांत धरून तिला प्रदक्षिणा केली. तेव्हां मनाचा पूर्ण निश्चय करून ती मला आणखीहि म्हणाली, 'हनुमाना, राघवाला तूं माझा

वृत्तांत निवेदन कर, आणि तो श्रवण करितांक्षणीं लवकरच ते उभयतां वीर रामलक्ष्मण सुग्रीवासहवर्तमान इकडे येतील, असें कर. ह्यांत जर अंतर पडेल, तर आतां माझें जीवित दोनच महिने अवशिष्ठ राहिलें आहे. त्यानंतर मी ककुत्स्थकुलोत्पन्न रामाच्या दृष्टीस पडणार नाहीं. इतक्या मुदतींत जर तो लवकरच न येईल, तर मी अनाथाप्रमाणें येथेंच मरेन."

"हें दीन भाषण श्रवण करितांक्षणीं क्रोधानें मला घेरून टाकिलें, आणि सीतादर्शनानंतर आपलें अवशिष्ट कार्य काय राहिलें आहे, तें मीं मनामध्यें आणिलें. तेव्हां माझें शरीर पर्वतासारखें वाढलें, आणि युद्धाची इच्छा धरून मीं त्या रावणाच्या वनाचा नाश करण्याला आरंभ केला. तें वन मोडिलें असतां त्यांतील मृग व पक्षी त्रस्त होऊन गोंधळून गेले; आणि अक्राळविक्राळ मुद्रांनीं युक्त असलेल्या राक्षसस्त्रिया जाग्या होऊन इकडे तिकडे पाहूं लागल्या. नंतर त्या वनामध्यें मला अवलोकन करितांक्षणीं त्या चोहोंकडून एकत्र जुळल्या, आणि सर्वांनीं मिळून रावणाला तो वृत्तांत सत्वर निवेदन केला. त्या म्हणाल्या, 'हे महाबलाढ्य राजा, आपल्या सामर्थ्याचा विचार न करितां दुरात्म्या वानरानें हें आपलें गहन वन मोडून टाकिलें आहे. ह्यावरून राजन्, आपला अपराध करणाऱ्या त्या वानराला अवदसाच आठवली आहे. ह्यास्तव आपण सत्वर ह्याच्या वधाची आज्ञा द्या, म्हणजे पुनरपि ह्याला येथें येतां येणार नाहीं."

"हें भाषण श्रवण करून राक्षसाधिपति रावणानें आपल्या मर्जीप्रमाणें वागणारे असे किंकर नामक अत्यंत दुर्जय राक्षस पाठवून दिले. परंतु शूल व मुद्गर हातांत घेऊन आलेल्या त्या ऐशीं हजार राक्षसांचा मीं गदेच्या योगानें त्या॰ वनप्रदेशामध्यें वध केला. तथापि त्यांच्यापैकीं जे अवशिष्ट राहिले होते, ते सत्वर तेथून निघाले; आणि मीं सैन्य मारल्याचें त्यांनीं रावणाला कथन केलें. तदनंतर चिरेबंदी काम केलेला रावणाचा उत्कृष्ठ प्रासाद मोडून टाकावा, असें माझ्या मनांत आल्यामुळें तेथील शंभर राक्षसांचा वध करून, लंका नगरीला भूषण होऊन राहिलेल्या त्या प्रसादाचा स्तंभाच्या योगानें मीं रागारागानें विध्वंस केला. तदनंतर प्रहस्तपुत्र जंबुमालीला घोर रूप धारण करणाऱ्या असंख्य भयंकर राक्षसांसहवर्तमान माझ्याकडे जाण्याची रावणानें आज्ञा केली; परंतु त्या बलाढ्य व संग्रामवेत्त्या राक्षसाचा अनुयायांसहवर्तमान मीं अतिघोर गदेनें घात केला. हें ऐकून राक्षसाधिपति रावणानें पायदळ सैन्य बरोबर देऊन महाबलाढ्य मंत्रिपुत्रांना हुकूम केला; तथापि गदेच्याच योगानें मीं त्या सर्वांना

यमलोकीं पाठवून दिलें. ह्याप्रमाणें संग्रामामध्यें झटपट पराक्रम करणाऱ्या मंत्रि-पुत्रांचा वध झाल्याचें ऐकून रावणानें पांच शूर सेनाधिपति पाठवून दिले; परंतु सैन्यासहवर्तमान त्याहि सर्वांचा मीं वध केला. तदनंतर त्या दशाननानें आपला महाबलाढ्य पुत्र अक्ष पुष्कळ राक्षस बरोबर देऊन संग्रामामध्यें पाठवून दिला. तेव्हां पित्याच्या आज्ञेवरून तो मंदोदरीचा रणशूर कुमार अक्ष एकाएकीं आकाशामध्यें आला असतां मीं त्याचे पाय धरिले, आणि शंभर वेळां गरगर फिरवून त्याचें चूर्ण करून टाकिलें! ह्याप्रमाणें अक्षाचा वध झाल्याचें ऐकून रावण अतिशयच क्रुद्ध झाला, आणि युद्धामध्यें अजिंक्य व बलाढ्य अशा आपल्या इंद्रजित नामक पुत्राला त्यानें आज्ञा केली. तेव्हां त्या राक्षसश्रेष्ठाला आणि त्याच्याबरोबर आलेल्या सर्व सैन्याला संग्रामामध्यें सामर्थ्यहीन केल्यावर मला पराकाष्ठेचा हर्ष झाला. मोठ्या खात्रीनें रावणानें मदमत्त वीरांसहवर्तमान ह्या महापराक्रमी व महाबलाढ्य पुत्राला माझ्याकडे पाठविलें होतें. असो. मी अजिंक्य आहें, असें जाणून आणि आपल्या सैन्याचा नाश झाला हें लक्ष्यांत आणून, त्यानें मला अतिवेगवान ब्रह्मास्त्रानें बांधून टाकिलें असतां इतर राक्षसांनींहि मला दोऱ्यांनीं आवळून टाकिलें; व ते मला रावणासमीप घेऊन गेले. मला पाहून दुरात्म्या रावणानें माझ्याशीं संभाषण केलें, आणि लंकेमध्यें येण्याचें व राक्षसांचा संग्रामामध्यें वध करण्याचें कारण काय म्हणून त्यानें विचारिलें असतां, तें सर्व सीतेकरितां आहे, म्हणून मीं त्याला सांगितलें. सारांश, मीं त्याला म्हटलें, ‘ हे विभो, त्या सीतेच्या दर्शनाकरितां मी तुझ्या घरीं आलों आहे, आणि मी वायूचा औरस पुत्र वानर हनुमान आहें. शिवाय मी वानर सुग्रीवाचा मंत्री व रामाचा दूत आहें, असें तूं समज. तात्पर्य, रामासंबंधानें निरोप घेऊन मी तुझ्यासमीप येथें आलों आहें. हे राक्षसाधिपते, तो निरोप मी तुला सांगतों, तूं श्रवण कर. वानराधिपति सुग्रीवानें तुला स्वस्थ चित्तानें निरोप सांगितला आहे. हे महाभाग्यवान रावणा, त्या सुग्रीवानें प्रथमतः तुला कुशल प्रश्न विचारून धर्म, अर्थ आणि काम ह्यांना अनुसरून असलेला हितावह व पथ्यकारक निरोप तुला सांगितला आहे. तो म्हणाला, “विपुल वृक्षांनीं युक्त असलेल्या ऋष्यमूक पर्वतावर वास्तव्य करीत असतांना रणशूर राम माझा मित्र झाला, आणि मला म्हणाला, ‘ हे राजा, राक्षसानें माझी भार्या हरण करून नेली आहे. ह्यास्तव, त्यासंबंधानें साहाय्य करण्याविषयीं तूं मला वचन दे. ’ ह्याप्रमाणें रामानें सांगितल्यानंतर, वालीनें ज्याचें राज्य हरण केलें आहे, त्या सुग्रीवा-

सहवर्तमान प्रभु रामानें लक्ष्मणाला बरोबर घेऊन व अग्नीला साक्ष ठेवून सख्य केलें. नंतर एका बाणानें संग्रामामध्यें वालीचा वध करून महाराज सुग्रीवाला त्या रामानें उड्डाण करणाऱ्या वानरांचें प्रभुत्व दिलें. ह्यास्तव, त्या सुग्रीवाचें अगदीं मनापासून साहाय्य करणें आमचें कर्तव्य आहे, आणि त्यानेंच धर्मबुद्धीनें मला तुझ्याकडे पाठविलें आहे. तेव्हां ह्या वीर वानरांनीं तुझ्या सैन्याचा नाश केला नाहीं, तोंच सीतेला लवकर परत आणून रामाच्या स्वाधीन कर. वानरांचा हा प्रभाव पूर्वींच कोणाला बरें माहीत झालेला नाहीं ? निमंत्रित असल्यामुळें देवतांच्याहि समीप ते जात असतात. "

" ह्याप्रमाणें वानरराज सुग्रीवानें तुला निरोप सांगितला आहे, म्हणून मीं त्याला सांगितलें असतां दृष्टीनें मला दग्धच करीत कीं काय तो रावण क्रुद्ध होऊन माझ्याकडे पाहूं लागला; आणि माझा प्रभाव न समजून त्या क्रूरकर्मी दुरात्म्या राक्षसानें माझा वध करण्याविषयीं राक्षसांना आज्ञा केली. तेव्हां बिभीषण म्हणून त्याचा एक महाविचारी भ्राता आहे. त्यानें माझ्याकरितां त्या राक्षसराजाची प्रार्थना केली. तो म्हणाला, ' हे राक्षसश्रेष्ठा, हा आग्रह आपण सोडा. आपण राजनीतीला सोडून असलेल्या मार्गाचें अवलंबन करीत आहां. हे महाराजा, राजनीतिशास्त्रामध्यें दूतांचा वध कोठेंहि सांगितलेला नाहीं. जसें असेल तसें भाषण करणाऱ्या दूतानें आपला निरोप सांगितला पाहिजे. हे अतुलपराक्रमी रावणा, मोठा अपराध जरी दूताच्या हातून घडला, तरी त्याला फार तर विद्रूप करावें, एवढेंच शास्त्रामध्यें सांगितलें आहे. शास्त्रांत त्याचा वध करावा असें सांगितलेलें नाहीं. "

" ह्याप्रमाणें बिभीषणानें प्रार्थना केली असतां ' हें ह्याचें पुच्छ आजच्या आजच दग्ध करून टाका ' म्हणून रावणानें त्या राक्षसांना आज्ञा केली. तेव्हां राक्षसांनीं माझ्या पुच्छाला कापसाचीं चिरगुटें व तागाचीं वस्त्रें भोंवताली गुंडाळलीं, आणि युद्धाची तयारी करून सज्ज झालेल्या त्या प्रचंड पराक्रमी राक्षसांनीं काष्ठें व मुष्टि ह्यांच्या योगानें मला प्रहार करीत करीत माझें पुच्छ पेटवून दिलें; परंतु राक्षसांनीं जरी मला जखडलें होतें, आणि अनेक पाशांनीं जरी मला बांधिलें होतें, तरी दिवसा लंका नगरी पहावयास सांपडावी, अशी माझी इच्छा असल्यामुळें मला कांहींएक पीडा झाली नाहीं. तदनंतर त्या शूर राक्षसांनीं बांधून अग्नीनें प्रदीप्त केलेल्या माझ्यासंबंधानें राजमार्गामध्यें दवंडी पिटविली, आणि नगराच्या द्वाराशीं ते मला घेऊन आले. तेव्हां आपलें तें प्रचंड रूप

मीं पुनरपि संकुचित केलें, आणि तो बंध सोडून टाकून मी पुनः नेहमींप्रमाणेंच झालों. मग लोखंडाची गदा घेऊन मीं त्या राक्षसांचा वध केला, वेगावेगानें त्या नगराच्या द्वारावर उडी मारिली आणि नंतर आपल्या प्रदीप्त झालेल्या पुच्छाच्या योगानें मी अगदीं निर्भयपणें प्रलयकालीं प्रजा दग्ध करणाऱ्या अग्नीप्रमाणें गच्च्या व बुरूज यांसहवर्तमान लंका नगरी दग्ध करूं लागलों. परंतु ' सर्व नगरी जळून खाक झाली आहे, लंकेंतील कोणताहि प्रदेश न जळलेला शिल्लक राहिलेला नाहीं. तेव्हां जानकीचा निःसंशय नाश झालाच असेल. लंका दहन करितांना माझ्या हातून सीता ही निःसंशय दग्ध झाली, आणि ह्यामुळें रामाचें हें मोठें कार्य मीं अगदीं निष्फळ केलें ' अशा प्रकारची मला काळजी पडली, व मी अगदीं शोकाकुल झालों. तेव्हां आश्चर्यचकित करून टाकणारी वार्ता कथन करणाऱ्या चारणांची, ' जानकी दग्ध झाली नाहीं ' अशी शुभ अक्षरांनीं युक्त असलेली वाणी मीं श्रवण केली. ती अद्भुत वाणी श्रवण करून मलाहि ' जानकी दग्ध झाली नाहीं ' असें वाटलें, आणि इतर चिन्हांवरून माझें तसें अनुमानहि झालें. कारण माझें पुच्छ जरी प्रदीप्त झालें होतें, तरी अग्नीमुळें माझ्या अंगाचा दाह होत नव्हता. माझें हृदय आनंदित होतें, आणि वायु सुगंधि वहात होता. त्या प्रत्यक्ष चिन्हांवरून, इतरहि महत्त्वाच्या कारणांवरून आणि प्रतीतीस येऊन चुकलेल्या ऋषिवाक्यांवरून मी मनामध्यें आनंदित झालों. पुनरपि सीतेचें दर्शन घेतलें आणि तिनें मला जाण्याची अनुज्ञाहि दिली. अरिष्ट पर्वतावर येऊन तुमचें दर्शन घेण्याच्या इच्छेनें मीं उलट उड्डाण करण्याचा उपक्रम केला. वायु, सूर्य, चंद्र, सिद्ध आणि गंधर्व ह्यांनीं आश्रय केलेल्या आकाशमार्गाचें आक्रमण करून मी तुम्हांला येथें येऊन भेटलों. रामाच्या प्रसादामुळें आणि तुमच्या तेजामुळें सुग्रीवाच्या कार्याकरितां मीं हें सर्व केलें. हें सर्व तेथें केलेलें मीं तुम्हांला कथन केलें आहे. आतां माझ्या हातून न झालेलें जें अवशिष्ट राहिलेलें कार्य, तें सर्व उरकण्याची तुम्ही तजवीज करा. "

## सर्ग एकुणसाठावा.

### सीतास्थितिकथन.

हें सर्व त्यांना सांगितल्यानंतर वायुपुत्र हनुमान आणखीहि त्यांना म्हणाला, " रामाचा उद्योग आणि सुग्रीवाची त्वरा ह्यांचें सार्थक झालें आहे, आणि

सीतेचें शील अवलोकनांत आल्यामुळें माझ्याहि मनाला आनंद झाला आहे. हे वानरश्रेष्ठहो, अशा प्रकारचें शील त्या साध्वी सीतेलाच योग्य आहे. आपल्या तपाच्या योगानें ती त्रैलोक्याचें रक्षण करील; आणि क्रुद्ध झाली असतां ती त्रैलोक्य दग्धहि करून टाकील. ज्या अर्थी सीतेच्या शरिराला स्पर्श केला असतांहि तिच्या तपाच्या योगानें रावणाचा नाश झाला नाहीं, त्या अर्थी तो राक्षसाधिपति महातेजस्वी असला पाहिजे. जनककन्या सीता क्रुद्ध झाली असतां जें करील, तें हस्तस्पर्श झाला असतां अग्नीची ज्वालाहि करूं शकणार नाहीं. आतां जांबवान आदिकरून सर्व महाकपींची अनुज्ञा घेतल्यानंतर सीताशुद्धिरूप कार्य येथपर्यंत झाल्याचें मीं आपणांस निवेदन केलें आहे. तस्मात्, आतां सीतेसहवर्तमान त्या राजकुमार राम-लक्ष्मणांचें आपणांला दर्शन होणें शक्य आहे. राक्षसगणांसहवर्तमान ती लंका नगरी आणि इतर राक्षसांसहवर्तमान तो रावण ह्यांचा स्वसामर्थ्यानें वध करण्यास मी एकटाहि समर्थ आहें. मग वीर, बलाढ्य, सुशिक्षित, अस्त्रसंपन्न, शक्तिमान आणि विजयेच्छु असलेल्या तुमची गोष्ट कशाला पाहिजे? मी सैन्य, पुढारी, पुत्र व सहोदर भ्राते ह्यांसहवर्तमान रावणाचा वध करीन. संग्रामामध्यें शत्रूची दृष्टि दिपवून टाकणारीं अशीं ब्राह्म, रौद्र, वायव्य आणि वरुण हीं अस्त्रें असलीं, तरी मी त्या सर्वांचा नाश करून राक्षसांचा वध करीन. तुमची अनुज्ञा झाली असतां रावणाला जखडून टाकण्यास माझा पराक्रमच पुरे होईल. मीं एकसारखी अतुल पाषाणवृष्टि सुरू केली असतां संग्रामामध्यें ती देवांचाहि वध करील, मग त्या निशाचरांची कथा काय? परंतु जोंपर्यंत तुमची अनुज्ञा झाली नाहीं, तोंपर्यंत मला पराक्रम करितां येत नाहीं. सागरहि मर्यादेचें उल्लंघन करील, आणि कदाचित् मंदर पर्वतहि स्थानापासून चळेल; परंतु संग्रामामध्यें शत्रूची सेना जांबवानाला जेरीस आणण्यास समर्थ होणार नाहीं. एकंदर राक्षससमुदायांचा आणि त्यांच्या पूर्वज राक्षसांचा नाश करण्यास मी एकटाहि पुरे आहें, अथवा वालीपुत्र वीर अंगदहि समर्थ आहे. महात्म्या नील वानराच्या प्रचंड वेगानें मंदर पर्वतहि विदीर्ण होऊन जाईल, मग युद्धामध्यें राक्षसांची गोष्ट कशाला पाहिजे? मैदाशीं अथवा द्विविदाशीं सामना करणारा देव, असुर, यक्ष, गंधर्व, उरग आणि पक्षी ह्यांमध्यें एक तरी कोणी सांगा पाहूं? हे महावेगवान वानरश्रेष्ठ अश्विनीकुमारांचे पुत्र आहेत. ह्यांच्याशीं संग्रामामध्यें सामना करणारा मला कोणीहि दिसत नाहीं. लंका नगरींतील मोठमोठ्या राक्षसांचा वध करून मीं

ती दग्ध करून टाकिली, आणि सर्व राजमार्गांमध्यें नांव गाजविलें. 'अतिबलाढ्य रामाचा व महाबलाढ्य लक्ष्मणाचा जयजयकार असो. राघवानें रक्षण केलेल्या सुग्रीव राजाचा विजय असो. मी वायुपुत्र हनुमान कोसलदेशाधिपति रामाचा दास आहें' असें सर्व ठिकाणीं नांव गाजविलें आहें. दुरात्म्या रावणाच्या अशोकवनांत शिशवीच्या झाडाखालीं साध्वी सीता दीनवाणीनें बसली आहे. राक्षसींनीं तिला घेरून टाकिलें आहे. शोक व संताप ह्यांनीं ती कृश झाली असल्यामुळें मेघपटलानें आच्छादित झालेल्या चंद्रकलेप्रमाणें ती निस्तेज दिसत आहे; परंतु बलामुळें मत्त झालेला रावण तिच्या खिजगणतींतहि नाहीं. कारण तेथें अडकवून टाकिलेली ती सुंदरी पतिव्रता आहे. रामावांचून मनामध्यें ती दुसरें कांहींएक चिंतन करीत नाहीं. इंद्राणी ज्याप्रमाणें इंद्राचे ठिकाणीं अनुरक्त आहे, त्याप्रमाणें ती कल्याणी रामाचे ठिकाणीं अगदीं मनापासून अनुरक्त आहे. एकच वस्त्र तिनें परिधान केलें आहे, आणि तिच्या अंगावर धूळ उडालेली आहे. प्रमदावनांत राक्षसींमध्यें असलेल्या त्या सीतेला एकसारख्या अक्राळविक्राळ राक्षसी धमकी देत आहेत, असें मीं अवलोकन केलें. भर्त्याचाच ध्यास घेऊन बसलेल्या त्या दीन सीतेनें केंसांचा अंबाडा बांधिलेला आहे. ती भूमीवर शयन करीत आहे. हिंवाळा आला असतां ज्याप्रमाणें कमलिनीची कांति पालटते, त्याप्रमाणें तिची कांति पालटून गेलेली आहे, आणि रावणाच्या हातून सुटका होण्याविषयीं निराशा झाल्यामुळें ती मरणाचा निश्चय करून राहिलेली आहे. हरिणाच्या पाडसाप्रमाणें जिचे नेत्र आहेत, अशा त्या सीतेला मीं कसा तरी धीर दिला, आणि संभाषण करून सर्व कांहीं तिला निवेदन केलें. राम आणि सुग्रीव ह्या उभयतांमध्यें सख्य झाल्याचें श्रवण करितांक्षणीं तिला आनंद झाला. तिचें दृढ पातिव्रत्य एकसारखें चाललेलें आहे, आणि भर्त्याचे ठिकाणीं तिची अनुपम भक्ति आहे. इतकें असूनहि सीतेच्या हातून रावणाचा वध होत नाहीं, यावरून तो रावण खरोखर महातपस्वी असला पाहिजे. तथापि सीतेला दुःख दिल्याच्या पातकानें तो आपोआप मृतप्रायच झालेला आहे. राम त्याचा वध होण्याला निमित्तमात्र होईल. ती सीता जातीचीच सडपातळ असून त्या रामाच्या वियोगानें अधिकच कृश झालेली आहे. ह्यामुळें प्रतिपदेचें दिवशीं अध्ययन करणाऱ्याच्या विद्येप्रमाणें ती अतिच सूक्ष्म झाली आहे. सारांश, ती महाभाग्यवती सीता ह्याप्रमाणें एकसारखा शोक करीत बसली आहे. तेव्हां ह्याला काय उपाय करावयाचा असेल, तो सर्व लवकर होण्याची तजवीज करा."

# सर्ग साठावा.

## अंगदाचा विचार.

हनुमानाचें भाषण ऐकून वालिपुत्र अंगद म्हणाला, "हे महावेगवान अश्विनीकुमारपुत्र मैंद व द्विविद वानर बलाढ्य आहेत. ब्रह्मदेवाच्या वरानें ते पराकाष्ठेचे गर्विष्ठ झालेले आहेत. अश्विनीकुमारांना मान देण्याकरितां सर्वलोकाधिपति ब्रह्मदेवानें पूर्वी ह्यांना, 'तुम्हांला कोणापासूनहि पीडा होणार नाहीं' असा अतुल वर दिला असतां, त्या वरानें मत्त होऊन व प्रचंड सेनेचा पराजय करून ह्या महाबलाढ्य वानरवीरांनीं देवांचें अमृत प्राशन केलें. सर्व वानर स्वस्थ बसूं द्या. हेच उभयतां क्रुद्ध झाले असतां अश्व, रथ व गज ह्यांसहवर्तमान लंकेचा नाश करण्यास समर्थ आहेत. अथवा राक्षसगणांसहवर्तमान ती लंका नगरी आणि तो महाबलाढ्य रावण ह्यांचा स्वसामर्थ्यानें नाश करण्यास मीहि पुरेसा आहें. मग बलवान, वीर, सुशिक्षित, अस्त्रवेत्ते, समर्थ आणि विजयशाली असलेल्या तुमचें सहाय्य असल्यावर तर काय विचारावयाचें आहे? वायुपुत्राच्या बलानेंच लंका दग्ध झाली, असें आपल्या कानावर आलें आहे; परंतु पराक्रमाविषयीं प्रख्यात असलेले तुम्ही सहाय्यकर्ते असतांना, 'सीता देवीचें दर्शन झालें, परंतु तिला आणिलें नाहीं,' असें रामाला जाऊन सांगणें मला योग्य दिसत नाहीं. वानरश्रेष्ठहो, उड्डाण करण्यामध्यें अथवा पराक्रम गाजविण्यामध्यें देव आणि दैत्य ह्यांसहवर्तमान त्रैलोक्यांत तुमची बरोबरी करणारा कोणीहि नाहीं. ह्यास्तव राक्षसगणांसहवर्तमान लंका जिंकून व संग्रामामध्यें त्या राक्षसांचा वध करून आपण कृतकृत्य होऊं, आणि सीतेला घेऊन आनंदानें रामाकडे जाऊं. हनुमानानें राक्षसांचा वध केल्यामुळें त्यामध्यें थोडकेच अवशिष्ट राहिले असतांना, आतां तेथें आपलें दुसरें कर्तव्य तें काय उरलें? जानकीला घेऊन येऊन आपण रामाकडे जाऊं, म्हणजे झालें. आपणच जानकीला राम-लक्ष्मणांच्या मध्यें नेऊन ठेवूं. किष्किंधा नगरींतून लंका नगरींत जाण्याचे ह्या सर्व वानरांना व वानरश्रेष्ठांना आयास पाडण्यांत काय अर्थ आहे? आपणच तेथें जाऊन मुख्य मुख्य राक्षसांचा वध केल्यावर लक्ष्मणासहवर्तमान सुग्रीवाची भेट घ्यावी, हें बरें."

### जांबवानाचें अंगदाला उत्तर.

ह्याप्रमाणें वालिपुत्र अंगदाचें बोलणें झाल्यानंतर त्याच्या भाषणाचें तत्त्व

आणारा वानरश्रेष्ठ जांबवान अतिशय संतुष्ट झाला, आणि म्हणाला, " हे महाबुद्धिमान श्रेष्ठ वानरा, तूं म्हणतोस तें खरें; परंतु हा विचार उपयोगी नाहीं. कारण दक्षिण दिशेमध्यें त्या श्रेष्ठ देवीचा शोध करण्याविषयींच आपणांला आज्ञा झालेली आहे. 'तिला घेऊन या' अशी वानरराज सुग्रीवानें अथवा विचारी रामानें आपणांला आज्ञा केलेली नाहीं. शिवाय आपल्या कुलाचा अभिमान बाळगणाऱ्या नृपश्रेष्ठ रघुवंशज रामाला आपणच सीतेला जिंकून आणिलें असतां कधींहि बरें वाटणार नाहीं. आणखी रावणाला जिंकून स्वतः सीतेला आणण्याची जर त्या राजानें सर्व वानरश्रेष्ठांसमक्ष प्रतिज्ञा केली आहे, तर त्याची प्रतिज्ञा मिथ्या होणें, योग्य कसें होईल ? सारांश, हे वानरश्रेष्ठहो, असें झालें असतां आपला मात्र पराक्रम व्यर्थ जाईल, आणि त्यालाहि संतोष होणार नाहीं. तस्मात्, लक्ष्मणासहवर्तमान राम आणि महातेजस्वी सुग्रीव हे हे जिकडे आहेत, तिकडे हें झालेलें कार्य निवेदन करण्याकरितां आपण सर्व जाऊं ! हे राजपुत्रा अंगदा, आमच्या संबंधानें हा तुझा विचार अयोग्य आहे, असें नाहीं; परंतु रामाचा विचार ज्याप्रमाणें ठरलेला आहे, त्याप्रमाणें कार्यसिद्धि करून घेण्याकडे तुला लक्ष्य दिलें पाहिजे."

---

## सर्ग एकसष्टावा.

### आनंदित वानरांच्या चेष्टा.

अंगदप्रभृति वीर आणि महाकपि हनुमान ह्यांनीं जांबवानाचें म्हणणें कबूल केलें, आणि वायुपुत्र हनुमानाला पुढें घालून ते सर्व आनंदित झालेले वानरश्रेष्ठ महेंद्र पर्वताच्या शिखरापासून उड्या टाकीत टाकीत निघाले. शरिरानें धिप्पाड असल्यामुळें मेरु व मंदर ह्या पर्वतांसारखे आणि मोठमोठ्या मत्त गजांसारखे दिसणारे ते महाबलाढ्य वानर जसे कांहीं आकाश आच्छादित करूं लागले. आकाशामध्यें वास्तव्य करणारे सिद्धप्रभृति भूतगण त्या महावेगवान व महाबलाढ्य हनुमानाची प्रशंसा करूं लागले असतां, दृष्टींनीं त्याला वाहूनच नेत आहेत कीं काय, अशा रीतीनें ते त्याच्याकडे एकसारखे पाहूं लागले. रामाची कार्यसिद्धि करण्याचा आणि पराकाष्ठेची कीर्ति गाजविण्याचा निश्चय करून चाललेले ते वानर सीतादर्शन, लंकादहन वगैरे कर्मांनीं आनंदित झाले

होते, आणि पुढें काय करावयाचें, हेंहि त्यांनीं ठरविलें होतें. प्रिय वार्ता सांगण्याविषयीं ते सर्वजण उत्सुक झाले होते. ते सर्व युद्धाचें अभिनंदन करणारे होते; आणि रामाच्या हातून रावणाचा प्रतिकार व्हावा, ह्याविषयीं त्या सर्व विचारी वानरांचा निश्चय झालेला होता.

असो. आकाश व्यास करून ते वानर उड्या टाकीत टाकीत जाऊं लागले असतां, शेंकडों वृक्षांनीं युक्त असलेल्या एका नंदनतुल्य वनामध्यें ते येऊन पोहोंचले. तें सुग्रीवानें रक्षण करून ठेविलेलें मधुवन होय. तें मधुवन प्राणिमात्रांच्या मनाला आल्हाद देणारें होतें; आणि आज्ञेशिवाय कोणत्याहि प्राण्याचा त्यांत प्रवेश होणें शक्य नव्हतें. वानरश्रेष्ठ महात्म्या सुग्रीवाचा मातुल दधिमुख नामक महावीर त्याचें रक्षण करीत असे. वानरराज सुग्रीवाला आनंद देणारें तें मोठें मधुवन पाहतांच, ते वानर आनंदित होऊन मधुपान करण्याविषयीं अति उत्सुक झाले; आणि मधासारख्या पिंगट वर्णानें युक्त असलेल्या त्या वानरांनीं मधुपान करण्याला अनुज्ञा देण्याविषयीं कुमार अंगदाची प्रार्थना केली. तेव्हां अंगदानें जांबवान वगैरे वृद्ध कपींचें अनुमोदन घेऊन त्यांना अनुज्ञा दिली. अंगदाचें अनुमोदन मिळतांच त्या सर्व वानरांना अतिशय हर्ष झाला, आणि आनंदित होऊन ते ठिकठिकाणीं नाचूं लागले. कांहींजण गाऊं लागले, कांहीं हसूं लागले, कांहीं प्रणाम करूं लागले, कांहीं पठण करूं लागले, कांहीं हिंडूं लागले, कांहीं उड्या मारूं लागले, कांहीं संभाषण करूं लागले, कांहीं एकमेकांकडे जाऊं लागले, कांहीं बोलण्यामध्यें एकमेकांवर ताण करूं लागले, कांहीं ह्या वृक्षावरून त्या वृक्षावर धावाधाव करूं लागले, कांहीं वृक्षाग्रांवरून भूमीवर उड्या टाकूं लागले, आणि कांहीं महावेगमान वानर भूतलावरून मोठमोठ्या वृक्षांच्या अग्रांवर एकदम उड्या मारूं लागले. कोणी गाऊं लागला असतां दुसरा हंसत हंसत त्याच्याकडे जाऊं लागला, कोणी रडूं लागला असतां दुसराहि थट्टेनें रडत रडत त्याच्याकडे जाऊं लागला, कोणी कुचाळी काढूं लागला असतां दुसराहि त्याची कुचाळी काढण्याकरितां त्याच्याकडे जाऊं लागला. अशा रीतीनें त्या वानरसभेमध्यें एकच गोंधळ उडून गेला. मधुपान करून तर्र न झालेला, आणि स्वसामर्थ्याबद्दल गर्व न चढलेला असा एकहि वानर त्या सैन्यामध्यें नव्हता.

ह्याप्रमाणें वानर सर्व प्रकारें त्या वनांतील पदार्थ भक्षण करून टाकीत आहेत, आणि वृक्षांवरील पत्रांचा व पुष्पांचा त्यांनीं विध्वंस केला आहे, असें

आढळून आल्यावर दधिमुख नामक वानर रागारागानें त्यांचें निवारण करूं लागला; परंतु ते मद चढलेले वानरच उलट त्याची निर्भर्त्सना करूं लागले. तेव्हां उग्र तेजानें युक्त असलेल्या त्या वनरक्षक वृद्ध वानरवीरानें त्या वानरां-पासून वनाचें संरक्षण करण्याचें आणखी एकदां मनामध्यें आणिलें. कांहीं कांहीं वानरांना तो निर्भयपणें कठोर शब्द बोलूं लागला, कांहींना मुळींच उपेक्षा न करितां तो चपराका मारूं लागला, कांहींच्या जवळ येऊन कलह करूं लागला, आणि कांहींशीं सामोपचारानेंच बोलूं लागला; परंतु मद चढल्यामुळें ज्यांच्या वेगाचें निवारण होणें अशक्य झालें होतें, आणि आपल्याला जो आड येईल त्याच्यावर हल्ला करण्याविषयीं ज्यांना मुळींच भय वाटेनासें झालें होतें, त्या वानरांचें तो बलात्कारानें निवारण करूं लागला असतां यत्किंचित्‌हि दोष मनामध्यें न आणितां ते वानर एकत्र जुळून त्याला ओढूं लागले, कांहींजण नखांनीं त्याला बोचकारूं लागले, कांहींजण त्याला चावूं लागले, आणि कांहीं-जण चपराकांनीं व लाथांनीं त्याला मृतप्राय करूं लागले. असो. अशा रीतीनें मद चढल्यामुळें त्या वानरांनीं त्या सर्व महावनांतील यत्किंचित्‌हि भोग्य वस्तु शिल्लक ठेविली नाहीं.

## सर्ग बासष्टावा.



### मधुहरण.

प्रथमतः कपिश्रेष्ठ हनुमान त्यांना म्हणाला, "हे वानरहो, तुम्ही स्वस्थ मनानें मध सेवन करा. तुम्हांला आड येणाऱ्यांचें मी निवारण करीन."

हें हनुमानाचें भाषण श्रवण करून वानरश्रेष्ठ अंगद प्रसन्न मनानें म्हणाला "वानरांना मध सेवन करूं द्या. कार्य करून आलेल्या वानरांचें म्हणणें अयोग्य जरी असलें, तरी सुद्धां मला तें अवश्य शेवटास नेलें पाहिजे. मग अशा म्हणण्याची तर गोष्ट पाहिजे कशाला?"

अंगदाच्या मुखांतून हें भाषण श्रवण करितांक्षणीं वानरश्रेष्ठ आनंदित होऊन 'शाबास, शाबास' म्हणून त्याची प्रशंसा करूं लागले. मग ते सर्व वानर वृक्षाकडे जाणाऱ्या नदीच्या वेगाप्रमाणें मधुवनाच्या मार्गाला लागले, व आपल्या सामर्थ्यानें रक्षकांना पादाक्रांत करून मधुवनामध्यें प्रविष्ट झाले. हनुमानाला

सीतेचें दर्शन झाल्यामुळें आणि इतरांना तिची वार्ता समजल्यामुळें, निर्भय झालेले ते सर्व वानर अंगदाच्या अनुज्ञेनें मध पिऊं लागले, आणि रसानें भरलेलीं फळेंहि तोडूं लागले. वनरक्षक त्यांच्याकडे आले असतां उड्या मारून ते सर्व वानर त्यांना ताडण करूं लागले, आणि शेंकडों टोळया करून ते मधुवनामध्यें मध प्राशन करण्याकरितां ठिकठिकाणीं बिलगून राहूं लागले. शेर शेर मध हातांमध्यें घेऊन कांहीं वानर आनंदानें पंक्ति पंक्ति करून पिऊं लागले, कांहींजण सर्व मिळून एकदम वनरक्षकांना मारूं लागले, कांहीं भक्षण करण्यामध्यें गुंतले, आणि मधासारख्या पिंगट वर्णानें युक्त असलेले कांहीं वानर मध पिऊन पोळीं फेंकूनहि देऊं लागले. मद चढल्यामुळें कित्येकजण एकमेकाला मधानेंच मारूं लागले, आणि कांहींजण शाखा धरून वृक्षांवर स्वस्थ बसूं लागले. मदानें अतिशय ग्लानी आल्यानंतर कांहींजण पानें पसरून वर पडूं लागले, आणि मधु पिऊन मत्त झालेले कांहीं वानर उन्मत्त पुरुषाप्रमाणें हंसत हंसत दांडगाई करूं लागले. कांहींजण एक-मेकाला ढकलूं लागले. कांहींजण चालतां चालतां अडखळूं लागले, कांहीं गर्जना करूं लागले, आणि कांहीं आनंदानें मंजुळ शब्द करूं लागले. मधानें मत्त झालेल्या कांहीं वानरांना भूतलावरच गाढ झोंप लागली. कांहीं धीट होते ते हंसूंहि लागले, व रोदनहि करूं लागले. कांहींजण हातानें एक करून तोंडानें भलतेंच बोलूं लागले, आणि कांहींजण एक सांगितलें असतां भलतेंच समजूं लागले. दधि-मुखाच्या हाताखालचे जे त्या वनामध्यें मधुरक्षक होते, त्याचा त्या भयंकर वानरांनीं निषेध केला असतां ते वाट फुटेल तिकडे निघून गेले. कांहींना गुडघे धरून वानरांनीं फरपटत फरपटत ओढून नेलें, आणि कांहींना धरून आकाशामध्यें उंच फेंकूनहि दिलें. तेव्हां अतिशय भयभीत झालेले ते वनरक्षक दधिमुखाकडे जाऊन म्हणाले, " हनुमानानें अनुज्ञा दिलेल्या वानरांनीं बला-त्कारानें मधुवनाचा विध्वंस केला. आम्हांला गुडघे धरून त्यांनीं फरपटीत नेलें, आणि उंच फेंकून दिलें ! "

हें ऐकून वनरक्षक दधिमुख वानर क्रुद्ध झाला, आणि मधुवनाचा विध्वंस झालेला पाहून त्यांना धीर देण्याकरितां तो म्हणाला, " चला या, आपण तिकडे जाऊं. अतिशय चढून जाऊन अनुपम मध प्राशन करीत असलेल्या त्या वानरांचें मीं स्वतःच आपल्या सामर्थ्यानें निवारण करीन. "

दधिमुखाचें हें भाषण श्रवण केल्यावर ते वीर वानरश्रेष्ठ पुनरपि त्याच्या बरोबर मधुवनामध्यें गेले. दधिमुख त्यांच्यामध्यें राहून व एक महावृक्ष हातांत

घेऊन वेगानें तिकडे धावूं लागला. तेव्हां त्याच्या बरोबर ते सर्वहि वानर धावूं लागले. ते वानरश्रेष्ठ जिकडे आवाडाव करीत होते, तिकडे हे दधिमुखाबरोबर असलेले वानर शिला, वृक्ष आणि पाषाण घेऊन रागारागानें गेले; आणि आपापल्या सामर्थ्याप्रमाणें निवारण करण्याकरितां तेथील वानरांच्या समीप येऊन पोहोंचल्यावर रागानें दांतओंठ खाऊन ते वारंवार त्यांची निर्भर्त्सना करूं लागले.

तेव्हां क्रुद्ध झालेल्या त्या दधिमुखाला अवलोकन करून हनुमानप्रभृति वानरश्रेष्ठ वेगानें त्याच्या अंगावर येऊं लागले असतां, क्रुद्ध झालेल्या अंगदानें हातांनींच त्याला आंवळून धरिलें. इतकेंच नव्हे, परंतु मदांध झाल्यामुळें 'हा मला पूज्य आहे' असा विचार मनामध्यें न आल्या कारणानें त्याच्यावर दया न करितां अंगदानें त्याला वेगानें भूतलावर आपटिलें! तेव्हां हात, पाय व मुख हीं भग्न होऊन रक्तानें भरून गेलेला तो वानरश्रेष्ठ महावीर दधिमुख विव्हल झाला, आणि एक मुहूर्तपर्यंत त्याला मूर्च्छाहि आली.

नंतर कसा तरी त्या वानरांच्या हातून सुटल्यावर तो एकीकडे येऊन जवळ आलेल्या आपल्या सेवकांना म्हणाला, "चला या, विशाल कंठानें युक्त असलेला आपला अधिपति सुग्रीव रामासहवर्तमान जिकडे आहे, तिकडे आपण जाऊं; आणि हा सर्व अंगदाचा दोष आहे, असें आपण राजाला सांगूं. म्हणजे हें भाषण ऐकून तो रागीट सुग्रीव ह्या वानरांचा वध करील. कारण देवांनाहि मिळण्यास अशक्य असें हें वाडवडिलांपासून चालत आलेलें दिव्य मधुवन महात्म्या सुग्रीवाला प्रिय आहे. ह्यास्तव तो वानर सुहृज्जनांसहवर्तमान आसन्नमरण झालेल्या ह्या सर्व मधुलुब्ध वानरांना बांधून मृत्यूची शिक्षा देईल. असें झालें म्हणजे असहिष्णुतेमुळें उत्पन्न झालेला माझा क्रोध सफल होईल. कारण, हे दुरात्मे राजाज्ञा अमान्य करणारे आहेत."

ह्याप्रमाणें वनपालांना सांगितल्यावर तो महाबलाढ्य दधिमुख त्यांसहवर्तमान एकदम उड्डाण करून चालता झाला, आणि एका निमेषामध्यें सुग्रीवाजवळ जाऊन पोहोंचला. नंतर राम, लक्ष्मण व सुग्रीव ह्यांना अवलोकन करून त्या सर्व वनपाल वानरांनीं परिवेष्टित असलेला तो वनपालाधिपति महावीर आकाशांतून खालीं उतरला. दीन वदन होऊन त्यानें मस्तकीं हात जोडिले, आणि सुग्रीवाच्या चरणांवर सत्वर मस्तक ठेविलें.

# सर्ग त्रेसष्टावा.

### सुग्रीवाला मधुहरणवृत्तानिवेदन.

चरणीं मस्तक ठेविलेल्या दधिमुखाला अवलोकन करितांक्षणीं वानरश्रेष्ठ सुग्रीवाचें हृदय उद्विग्न झालें, व तो त्याला म्हणाला, "ऊठ, ऊठ, तूं कशाकरितां माझ्या पायां पडत आहेस? जें सत्य असेल, तें सांग; म्हणजे मी तुला अभय देईन. कसल्या भीतीमुळें तूं येथें आला आहेस? हितावह असें जें कांहीं असेल, तें सर्व तूं मला सांग. हे वानरा, तुझ्यापासून तिकडील हकीकत श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. मधुवनामध्यें सर्व यथास्थित आहे ना?"

ह्याप्रमाणें त्या महात्म्या सुग्रीवानें आश्वासन दिल्यावर तो महाबुद्धिमान दधिमुख उठला आणि म्हणाला, "राजा, जांबवानानें, आपण अथवा वालीनें वानरांना यथेच्छ उपभोग घेण्याकरितां आजपर्यंत मधुवन कधींहि देऊन टाकिलें नाहीं; परंतु त्या वनाचा आज वानरांनीं विध्वंस केला. ह्या वनचरांसहवर्तमान मीं त्या सर्वांचें निवारण केलें; परंतु मला न जुमानितां ते आनंदानें मध प्राशन करीत आहेत, व फळें भक्षण करीत आहेत. ह्याप्रमाणें त्यांनीं विध्वंस आरंभिला असतां वनपालांनीं त्यांचें निवारण केलें; परंतु माझीहि खिजगणती न करितां त्या वानरांनीं खाण्याचा सपाटा चालविलाच आहे. खाऊन अवशिष्ट राहिलेला मध कांहीं फेंकून देत आहेत, कांहीं फळें भक्षण करीत आहेत, आणि कोणी आडकाठी करूं लागला असतां, ते सर्वजण क्रोधानें आपल्या भिवया चढवून दाखवीत आहेत. ह्या वनपालांनीं त्यांचें निवारण करण्याची अगदीं शिकस्त केली; आणि त्यांनीं ह्यांच्यावर हल्ला केला असतां हे क्रुद्ध वानरश्रेष्ठ त्यांना त्या वनांतून हांकूनहि देऊं लागले; परंतु क्रोधानें ज्यांचे नेत्र आरक्तवर्ण झालेले आहेत, अशा त्या असंख्य वीर वानरांनीं वनरक्षकांचा पराभव केला. कांहींना चपराका बसल्या, कांहींना जानूंचे प्रहार मिळाले, कांहींना त्यांनीं फरफर ओढीत नेलें, आणि कांहींना आकाशामध्यें यथेष्ट फेकून देऊन देवमार्गाचेंहि त्यांना दर्शन करविलें. सारांश, आपण अधिपति विद्यमान असतांना याप्रमाणें ह्या शूरांना मार बसला आहे, आणि सर्व मधुवन ते यथेष्ट भक्षण करीत आहेत."

ह्याप्रमाणें दधिमुख सुग्रीवाला सांगूं लागला असतां, महाबुद्धिमान लक्ष्मण सुग्रीवाला विचारूं लागला, "राजा, हा वनपाल वानर येथें कशाकरितां आला आहे? आणि कशाकरितां हा दुःखित होऊन भाषण करीत आहे?"

ह्याप्रमाणें महात्म्या लक्ष्मणानें विचारिलें असतां, संभाषण करण्यामध्यें निपुण असलेला तो सुग्रीव लक्ष्मणाला म्हणाला, "आर्या लक्ष्मणा, अंगदप्रभृति वीरांनीं मध भक्षण करून टाकल्याचें दधिमुखानें सांगितलें. तस्मात्, कार्यसिद्धि झाल्यावांचून त्यांच्या हातून असा अतिक्रम होणार नाहीं. त्यांनीं ज्या अर्थीं वनावर धाड घातली आहे, त्या अर्थीं हातीं घेतलेलें तें कार्य त्यांनीं निःसंशय पार पाडिलें आहे. अहो, निवारण करण्याकरितां हे वनपाल त्यांच्याकडे गेले असतां, त्यांनीं ह्यांना जानूंनीं अतिशयच ताडन केलें, आणि ह्या बलाढय दधिमुख वानरालाहि त्यांनीं जुमानिलें नाहीं. आम्ही स्वतः वनाचा अधिपति म्हणून ह्याला नेमिलें आहे. असो. तेव्हां सीता दृष्टीस पडली, ह्यांत संदेहच नाहीं; परंतु हनुमानावांचून ती दुसऱ्या कोणाच्या दृष्टीस पडली नाहीं कारण, हें कार्य सिद्धीस नेण्यासारखा हनुमानावांचून दुसरा कोणीहि नाहीं. वानरश्रेष्ठ हनुमानाचे ठिकाणीं कार्यसिद्धि, बुद्धि, उद्योग, सामर्थ्य आणि विद्या हें सर्व कांहीं आहे. जांबवान, महाबलाढय अंगद आणि हनुमान हे जेथें पुढारी आहेत, तेथें कार्यसिद्धीवांचून दुसरें कांहीं होणें शक्यच नाहीं. अंगदप्रभृति वीर वानरांनीं खरोखर मधुवनाचा फडशा पाडिला. दक्षिण दिशा शोधून ते वानरश्रेष्ठ परत आले, आणि आनंदानें मधुवनामध्यें परत आल्यावर त्यांनीं वनावर हल्ला करून तें सर्व खाऊनहि टाकिलें. त्यांनीं वनपालांना फेंकून दिलें, आणि त्यांना जानूंनींहि प्रहार केले. हें सांगण्याकरितांच हा मधुर भाषण करणारा व पराक्रमाविषयीं प्रख्यात असलेला दधिमुख येथें आला आहे. हे महापराक्रमी सुमित्रानंदना, सीता खरोखर दृष्टीस पडली. कारण, पहा हे सर्व वानर इकडे येऊन मधुपान करीत आहेत. हे पुरुषश्रेष्ठा, वैदेही दृष्टीस पडल्यावांचून देवांनीं आम्हांला वर म्हणून अर्पण केलेल्या ह्या दिव्य वनावर ते प्रख्यात वानर कधींहि धाड घालणार नाहींत."

कर्णेंद्रियाला सुखावह अशी सुग्रीवाच्या मुखांतून निघालेली वाणी श्रवण करून त्या उभयतां महाकीर्तिमान राम-लक्ष्मणांना अत्यंत हर्ष झाला. दधिमुखाचें ह्याप्रमाणें भाषण श्रवण केल्यावर सुग्रीव आनंदित झाला, आणि त्या वनपालाला पुनः म्हणाला, "कामगिरी बजाविलेल्या त्या वानरांनीं वन फस्त करून टाकिलें, ह्याबद्दल मी प्रसन्न झालों आहें. कारण, काम करून आलेल्या वानरांचें तें अमर्याद वर्तन सहन करणें भाग आहे. ह्यास्तव तूं सत्वर जा. तूंच मधुवनाचें संरक्षण कर, आणि हनुमान आदिकरून आलेल्या त्या सर्व

वानरांना इकडे पाठवून दे. त्या सिंहतुल्य मानी असलेल्या मारुतीप्रभृति कृत-कृत्य वानरांना रघुवंशज राम-लक्ष्मणांसहवर्तमान सत्वर प्रश्न करण्याची आणि सीतेच्या प्राप्तीविषयीं त्यांनीं केलेला प्रयत्न श्रवण करण्याची माझी इच्छा आहे."

आनंदानें ज्यांचे नेत्र विकसित झाले आहेत, असे ते राजकुमार राम-लक्ष्मण मनोरथ सिद्धीस गेल्याप्रमाणें आनंदित झालेले पाहून, आणि आपल्या शरीरावर आनंदानें उठलेल्या रोमांचांवरून कार्यसिद्धी अगदीं जवळच आल्याचें जाणून वानरराज सुग्रीवाला अतिशयच हर्ष झाला.

## सर्ग चौसष्टावा.

### वानरांचें श्रीरामाकडे आगमन.

सुग्रीवानें असें सांगितल्यानंतर आनंदित झालेल्या दधिमुख वानरानें राम, लक्ष्मण व सुग्रीव ह्यांना अभिवंदन केलें. ह्याप्रमाणें महाबलाढय राम-लक्ष्मणांना व सुग्रीवाला अभिवंदन केल्यावर त्या दधिमुखानें शूर वानरांसहवर्तमान आकाशामध्येंच उड्डाण केलें. जशा त्वरेनें तो पूर्वीं आला होता, तशाच त्वरेनें परत गेला; आणि गगनांतून भूमीवर उतरून त्या वनामध्यें प्रविष्ट झाला. मधुवनामध्यें प्रविष्ट झाल्यावर ते सर्व वानरसेनाधिपती अमर्याद व मदरहित असून मधच मुतत असल्याचें त्यानें अवलोकन केलें. नंतर तो वीर त्यांच्या जवळ गेला, आणि हात जोडून आनंदानें युवराज अंगदाशीं मृदु भाषण करूं लागला. तो म्हणाला, "हे सौम्य, वनरक्षकांनीं तुम्हांला अडथळा केला, ह्याबद्दल तुम्ही राग मानूं नका. अज्ञानामुळें ह्यांनीं तुमचा निषेध केला आहे. हे महाबलाढ्य अंगदा, लांबून आला असल्यामुळें तूं श्रांत झाला आहेस. ह्यास्तव स्वतःचाच मध तूं भक्षण कर. कारण, तूं युवराज असल्यामुळें ह्या वनाचा अधिपतिच आहेस. मूर्खपणामुळें पूर्वीं आम्ही तुमच्यावर राग केला, त्याची तूं आम्हांला क्षमा कर. पूर्वीं जसा तुझा पिता वानरसमुदायांचा अधिपति होता, तसा तूंहि वानरसमुदायाचा अधिपतिच आहेस. हे वानरश्रेष्ठा, तूं सुग्रीवच आहेस, कोणी परका नाहींस. हे निष्पापा, मीं तुझ्या पितृव्याकडे जाऊन हे सर्व वानर येथें आल्याचें त्याला सांगितलें असतां, ह्या वानरांसहवर्तमान तुझें आगमन झाल्याचें श्रवण करून तो रुष्ट न होतां हर्षयुक्त झालेला आहे. वनाची तुम्हीं नासाडी केल्याचें

श्रवण केल्यावरहि तुझा पितृव्य वानराधिपति राजा सुग्रीव आनंदित होऊन मला म्हणाला, 'त्या सर्वांना इकडे पाठवून दे."

दधिमुखाचें हें मधुर भाषण श्रवण केल्यावर, संभाषण करण्यामध्यें निपुण असलेला तो वानरश्रेष्ठ अंगद त्या वानरांना म्हणाला, "हे वानराधिपतींनो, रामाच्याहि कानावर हा वृत्तांत गेला असावा, अशी मला शंका वाटत आहे. कारण हा दधिमुख हर्षानें आपल्याशीं बोलत आहे, ह्यावरून माझें असें अनुमान झालें आहे. ह्यास्तव हे शत्रुतापन वानरहो, कार्यसिद्धि झाल्यावर येथें रहाणें आपणांला योग्य नाहीं. पराक्रमी वानरांनीं यथेष्ट मधुपान केल्यानंतर मग शिल्लक काय राहिलें? सुग्रीव जिकडे आहे, तिकडे जाणें एवढेंच आतां अवशिष्ट कार्य राहिलेलें आहे. सर्व वानरश्रेष्ठ एकत्र जुळून जसें मला सांगतील, तसें मी करीन. कारण पुढें काय करावयाचें, ह्याविषयीं मी तुमच्यावर अवलंबून आहें. मी जरी युवराज आहें, तरी तुम्हांला आज्ञा करण्यास समर्थ नाहीं. काम शेवटास नेलेल्या तुम्हांला सत्तेच्या जोरावर वांकविणें योग्य नाहीं."

ह्याप्रमाणें अंगदाचें उत्कृष्ट भाषण श्रवण करून वानर आनंदित झाले आणि म्हणाले, "हे वानरश्रेष्ठा, प्रभु असतांना असें कोण बरें म्हणणारा आहे? कोणीहि झाला तरी ऐश्वर्यमदानें मत्त होऊन मी मीच म्हणत असतों. हें भाषण तुलाच योग्य आहे. दुसऱ्या कोणालाहि योग्य नाहीं. तुझा हा विनयच पुढें तुला मोठी योग्यता प्राप्त होण्याचें सुचवीत आहे. जेथें तो वानरवीरांचा अक्षय अधिपति सुग्रीव आहे, तेथें जाण्याविषयीं आम्हीहि सर्व उत्सुक आहों. हे वानरश्रेष्ठा, तुझ्या आज्ञेवांचून एक पाऊल देखील टाकण्यास वानर समर्थ नाहींत, हें आम्ही तुला सत्य सांगतों."

ह्याप्रमाणें ते बोलत असतांना अंगदानेंहि त्यांना उत्तर दिलें, आणि नंतर 'ठीक आहे, आपण तिकडे जाऊं' असें म्हणून त्या महाबलाढ्य वानरांनीं आकाशामध्यें उड्डाण केलें. अंगद उड्डाण करून जाऊं लागला असतां, ते सर्व वानरसेनाधिपती आकाश व्याप्त करून तोफेंतून सुटलेल्या पाषाणांप्रमाणें सत्वर उड्डाण करून निघाले. अंगद आणि हनुमान ह्यांना पुढें करून त्या वेगवान वानरांनीं आकाशामध्यें एकदम उड्डाण केलें, आणि वायूचा तडाखा बसलेल्या मेघाप्रमाणें ते उच्च स्वरानें गर्जना करूं लागले.

अंगद आल्यावर शोकाकुल झालेल्या कमलनयन रामाला वानराधिपति सुग्रीव म्हणाला, "तुझें कल्याण असो. धीर धर. देवी दिसली, ह्यांत संशय

नाहीं. कालमर्यादेचें उल्लंघन झालें असल्यामुळें त्यांच्या हातून जर कार्य झालें नसतें, तर त्यांचें येथें येणेंच शक्य झालें नसतें; परंतु हें शुभ दर्शन, अंगदाला झालेल्या आनंदावरून कार्य शेवटास गेलें असावें, असें माझें अनुमान आहे. कारण वानरांमध्यें श्रेष्ठ असलेला हा महापराक्रमी युवराज अंगद कार्य शेवटास गेलें नसतांना माझ्या समीप येणार नाहीं. कार्यसिद्धि झाली नसतांनाहि इतर वानरांनीं कदाचित् तशा प्रकारचे चाळे आरंभिले असते; परंतु अंगद तर दीनवदन होऊन मनामध्यें गोंधळून गेला असता. वाडवडिलांपासून चालत आलेल्या आणि पूर्वजांनीं रक्षण करून ठेविलेल्या ह्या मधुवनाचा, जनककन्या दृष्टीस पडल्याशिवाय तो नाश करणारच नाहीं. हे सुव्रता, कौसल्या सुपुत्रवति आहे. तूं धीर धर. देवी दिसली, ह्यांत संशयच नाहीं; आणि ती एका हनुमानाच्याच दृष्टीस पडली आहे, ह्यांतहि संदेह नाहीं. हें कार्य सिद्धीस नेणारा त्याच्यासारखा दुसरा कोणीहि नाहीं. हे श्रेष्ठ बुद्धिमंता, ह्या वानरसैन्यामध्यें हनुमानाचेच ठिकाणीं बुद्धि, सिद्धि, उद्योग, शौर्य आणि ज्ञान हीं वास्तव्य करीत आहेत. अरे, जांबवान आणि वानराधिपति अंगद हे जेथें पुढारी आहेत, आणि हनुमान जेथें मुख्य आहे, तेथें कार्यसिद्धिवांचून भलताच प्रकार कधींहि व्हावयाचा नाहीं. ह्यास्तव हे अतुल पराक्रमी रामा, सांप्रत तुला काळजी करण्याचें प्रयोजन नाहीं. ज्या अर्थीं वानर गर्वानें चढून जाऊन एकत्र जुळलेले आहेत, त्या अर्थीं कार्यसिद्धि झाल्याशिवाय त्यांच्या हातून असा प्रकार घडणार नाहीं. वनभंग आणि मधुभक्षण ह्यांवरून कार्यसिद्धि झाली असावी, असें मी समजत आहें."

इतक्यांत हनुमानाच्या पराक्रमामुळें गर्वयुक्त झालेल्या, आणि कार्यसिद्धि झाली हें समजविण्याकरिताच कीं काय गर्जना करीत करीत किष्किंधेजवळ आलेल्या अरण्यवासी वानरांचा शब्द श्रवण केल्याबरोबर सुग्रीव मनामध्यें आनंदित झाला, आणि त्याचें पुच्छ दीर्घ व रोमांचयुक्त झालें, तोंच अंगद आणि हनुमान ह्यांना पुढें करून रामदर्शनाकरितां ते सर्व कपी तेथें आले. ते अंगदप्रभृति बेफाम व आनंदित झालेले वीर वानरराज सुग्रीव आणि राघव ह्यांच्याजवळ येऊन पोहोंचल्यावर महा-पराक्रमी हनुमानानें मस्तकानें प्रणाम करून सीता देवि शुद्ध आणि क्षतरहित असल्याचें रामाला निवेदन केलें. 'दिसली देवी' हें अमृततुल्य वाक्य हनुमाना-च्या मुखांतून श्रवण करितांक्षणीं लक्ष्मणासहवर्तमान रामाला हर्ष झाला. तदनंतर त्या वायुपुत्र हनुमानाविषयीं ज्यानें निश्चयपूर्वक सांगितलें होतें, त्या सुग्रीवाकडे आनंदित झालेल्या लक्ष्मणानें बहुमानानें प्रेमपूर्वक अवलोकन केलें, आणि रामहि अतिशय संतुष्ट होऊन मोठ्या बहुमानानें हनुमानाकडे पाहूं लागला.

# सर्ग पांसष्टावा.

## सीतेनें दिलेला मणि रामाला देणें.

तदनंतर चित्रविचित्र वनांनीं युक्त असलेल्या प्रस्रवण पर्वतावर जाऊन त्या वानरांनीं महाबलाढ्य राम-लक्ष्मणांना मस्तकानें प्रणाम केला; आणि युवराज अंगदाला पुढें करून व सुग्रीवाला अभिवंदन करून त्यांनीं सीतेचा वृत्तांत कथन करण्यास आरंभ केला. रावणाच्या अंतःपुरामध्यें सीतेचा निरोध, राक्षसीं-कडून तिला मिळत असलेली धमकी, रामाचे ठिकाणीं तिचें असलेलें प्रेम, आणि रावणानें केलेली मुदत हें सर्व निवेदन करून ते वानर रामाचे सन्निध उभे राहिले. तेव्हां सीता बिनधोक आहे, असें ऐकून राम त्यांना म्हणाला, " वान-रहो, सीता देवी कोठें आहे, आणि माझ्याविषयीं तिचें आचचरण कसें आहे, हें सर्व तुम्ही मला कथन करा. "

रामाचें हें भाषण श्रवण केल्यावर, त्याचे सन्निध असलेल्या वानरांनीं सीतेचा वृत्तांत जाणणाऱ्या हनुमानाला तो निवेदन करण्याची विनंति केली. तेव्हां हनुमानानें प्रथम दक्षिण दिशेकडे सीता देवीला मस्तकानें प्रणाम केला, आणि सीतेचें दर्शन कसें झालें ह्याविषयीं तो वक्ता हनुमान रामाशीं संभाषण करूं लागला. प्रथम स्वतःच्या तेजानें झळकत असलेलें तें दिव्य सुवर्णयुक्त रत्न रामाला दिल्यावर, सुग्रीवादिक ऐकत असतां तो हात जोडून म्हणाला, " शंभर योजनें विस्तीर्ण असलेल्या समुद्राचें उल्लंघन करून मी महाभाग्यवती जनककन्या सीतेचें दर्शन घेण्याच्या उद्देशानें पहात पहात तिच्यासमीप गेलों. त्या ठिकाणीं दुरात्म्या रावणाची समुद्राच्या दक्षिणतीरावर लंका म्हणून एक नगरी आहे. तेथें रावणाच्या अंतःपुरांत साध्वी सीता माझ्या दृष्टीस पडली. हे राम, ती सुंदरी सीता आपल्या मनोरथाचा भार तुझ्यावर ठेवून जिवंत राहिली आहे. मीं जेव्हां तिला पाहिलें, तेव्हां ती राक्षसींमध्यें होती, व तिला वारंवार त्या दटावीत होत्या. अक्राळविक्राळ राक्षसांनीं प्रमदावनामध्यें सीतेला बंदोबस्तांत ठेविलें असल्यामुळें, सुख भोगण्यासच योग्य असलेल्या त्या देवीला दुःख होत आहे. रावणाच्या अंतःपुरामध्यें तिला अडकवून ठेविलें आहे, राक्षसींनीं तिचा फारच बंदोबस्त ठेविला आहे, आणि त्या दीन सीतेनें आपल्या केंसांचा अंबाडा बांधिला असून ती एकसारखें तुझेंच चिंतन करीत आहे. ती भूमीवर पडली आहे, थंडीचे दिवस आले असतां निस्तेज होऊन जाणाऱ्या कमलिनी-

प्रमाणें ती निस्तेज झाली आहे, आणि रावणापासून पराङ्मुख असलेली ती मरणाचाच निश्चय करून बसलेली आहे. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना, इक्ष्वाकुवंशाची कीर्ति मी हळू हळू गाऊं लागलों असतां, तुझे ठिकाणींच मनाचा लय लावून राहिलेली ती देवी मोठ्या प्रयासानें माझ्या दृष्टीस पडली. हे पुरुषश्रेष्ठा, ती दृष्टीस पडल्यानंतर मीं तिला हळू हळू धीर दिला, आणि तिच्याशीं संभाषण करून सर्व उद्देश मीं तिला कळविला. राम आणि सुग्रीव ह्यांमध्यें सख्य झाल्याचें श्रवण केल्यावर तिला हर्ष झाला. तिचें सदाचरण अगदीं एकसारखें चाललें असून तिची भक्ति सर्वदा तुझेच ठिकाणीं आहे. हे महाभाग्यवान पुरुषश्रेष्ठा, ह्याप्रमाणें तुझ्याविषयीं प्रेम आणि उग्र तपश्चर्या ह्यांनीं युक्त असलेली जनकनंदिनी सीता माझ्या दृष्टीस पडली. शिवाय हे महाप्राज्ञ, चित्रकूट पर्वतावर तुझ्यासमीप काक पक्ष्यासंबंधानें घडलेला एक वृत्तांतहि खूण पटण्याकरितां तिनें मला सांगितला आहे. आणि 'हे वायुपुत्रा, तूं ज्याप्रमाणें माझी स्थिति अवलोकन केली आहेस, त्याप्रमाणेंच ती रामाला तूं पूर्णपणें निवेदन कर' असेंहि मला तिनें सांगितलें आहे."

हनुमान म्हणतो:—"श्रीरामचंद्रा, देवी आणखी म्हणाली, 'यत्नानें संरक्षण करून ठेविलेला हा मणि त्यांना द्यावयाचा आहे. हा भव्य चूडामणि मीं आपणांकरितां यत्नानें रक्षण करून ठेविला आहे, हा आपण पहा; आणि मनःशिलेचा तिलक आपण मला केला होता, त्याचीहि आठवण करा. उदकामध्यें उत्पन्न झालेला हा भव्य चूडामणि मीं आपणांकडे परत पाठविला आहे. ही आपण पाठविलेली अंगठी पाहून संकटामध्यें आपलेंच दर्शन झाल्याप्रमाणें मी आपल्या मनाला आनंद मानीन. हे दशरथनंदन, एक महिनापर्यंत मी जीव ठेवीन. राक्षसांच्या आधीन होऊन राहिलेली मी एक महिन्यानंतर जीव ठेवणार नाहीं."

वायुपुत्र हनुमान पुढें सांगतो:—"हे रघुवंशजश्रेष्ठा, ह्याप्रमाणें शरिरानें कृश, धर्मानें वागणारी आणि हरिणीप्रमाणें विकसित नेत्रांनीं युक्त असून सांप्रत रावणाच्या अंतःपुरामध्यें अडकून राहिलेली सीता मला असें म्हणाली. असो. हे राघव, हें जसें होतें, तसें सर्व मीं तुला निवेदन केलें आहे. आतां हरप्रयत्नानें समुद्राच्या उदकांतून तरून जाण्याचा विचार कर."

आपलें हें भाषण ऐकून राम-लक्ष्मणांना धीर आला आहे, असें समजून व राघवाला ती खूण देऊन वायुपुत्र हनुमानानें सीता देवीनें सांगितलेलें सर्व कांहीं पूर्णपणें कथन केलें.

# सर्ग सहासष्टावा.

## श्रीरामाची मारुतीला पृच्छा.

ह्याप्रमाणें हनुमानानें सांगितलें असतां लक्ष्मणासहवर्तमान असलेला दशरथपुत्र राम तो मणि हृदयावर ठेवून रडूं लागला. ह्याप्रमाणें तो श्रेष्ठ मणि अवलोकन केल्यावर शोकाकुल झालेला राम अश्रूंनीं नेत्र भरून आले असतांना सुग्रीवाला म्हणाला, "ज्याप्रमाणें वत्साच्या प्रेमामुळें प्रेमळ गायीला पान्हा फुटतो, त्याप्रमाणें ह्या श्रेष्ठ रत्नाच्या दर्शनानें माझ्या हृदयाला पाझर फुटूं लागले आहेत. माझ्या श्वशुरानें हा श्रेष्ठ मणि विवाहसमयीं वैदेहीला दिलेला आहे; आणि हा त्या वेळीं जेव्हां तिनें मस्तकीं धारण केला होता, तेव्हां तो फारच शोभत होता. उदकामध्यें उत्पन्न झालेला व देवांनाहि पूज्य असलेला हा मणि यज्ञामध्यें अतिशय संतुष्ट झालेल्या इंद्रानें दिला आहे. हा श्रेष्ठ मणि अवलोकन केल्यानें आज मला पित्याचें आणि त्याचप्रमाणें प्रभु विदेहाधिपति जनकाचेंहि स्मरण झालें. त्या माझ्या प्रियेच्या मस्तकीं हा मणि शोभत असतो, आणि ह्याचें आज दर्शन झाल्यामुळें ती प्रियाच प्राप्त झाल्यासारखें मला वाटत आहे."

इतकें बोलून तो हनुमंताला म्हणाला:—"हे सौम्य, हे वानरश्रेष्ठा, मृतप्राय झालेल्या मला संभाषणरूप उदकानें सिंचन करणारी विदेहराजकन्या पतिव्रता सीता काय म्हणाली, तें तूं मला फिरून फिरून सांग. लक्ष्मणा, सीतेवांचून हा उदकामध्यें उत्पन्न झालेला मणि आज माझ्या दृष्टीस पडत आहे. ह्यापेक्षां अधिक दुःस्सह तें काय असणार! सीता एक महिनाभर जिवंत राहील, तर ती चिरंजीविनीच आहे, असें मी समजतों. कारण हे वीरा, कृष्णवर्ण नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या सीतेवांचून एक क्षणभरहि जिवंत रहाण्यास मी समर्थ नाहीं. जेथें माझी प्रिया दृष्टीस पडली, त्या ठिकाणीं मला घेऊन जा. तिची वार्ता समजल्यावर एक क्षणभरहि मला तिच्यावांचून राहवणार नाहीं. भयावह आणि घोर अशा राक्षसांमध्यें भित्र्यांतली भित्री असलेली ती माझी सुंदरी कशी बरें राहिली आहे? अंधकारापासून मुक्त झालेला शरदृतूंतील चंद्र मेघांनीं व्याप्त झाला असतां ज्याप्रमाणें प्रकाशत नाहीं, त्याप्रमाणें सांप्रत तिचें मुख खरोखरच प्रकाशत नसेल. हनुमाना, सीता काय म्हणाली, हें तूं मला खरें खरें सांग. कारण रोगग्रस्त पुरुष ज्याप्रमाणें औषधाच्या योगानें जिवंत रहाण्याची इच्छा

धरीत असतो, त्याप्रमाणें ह्याच्याच योगानें खरोखर जगण्याची मला आशा आहे. हनुमाना, रूपानें मनोहर आणि मधुर भाषण करणारी ती माझा वियोग झालेली सुंदरी मला काय म्हणाली, हें तूं मला सांग. वनवासाच्या दुःखाहून अधिक दुःसह दुःख प्राप्त झालें असतां ती जानकी जिवंत तरी कशी राहिली आहे?"

## सर्ग सदुसष्टावा.

### सीतासंदेशनिवेदन.

ह्याप्रमाणें महात्मा राम हनुमानाला म्हणाला असतां, सीतेचें सर्व कांहीं भाषण हनुमानानें रामाला कथन केलें. तो म्हणाला, "हे पुरुषश्रेष्ठा, चित्रकूट पर्वतावर पूर्वीं घडलेली ही एक गोष्ट खुणेकरितां देवी जानकीनें अगदीं हुबेहुब सांगितली आहे. पूर्वीं तुझ्यासहवर्तमान गाढ झोपीं गेलेली ती जानकी उठून पाहूं लागली, तों काक पक्ष्यानें एकाएकीं झडप घालून तिचें वक्षःस्थल विदीर्ण केलें. नंतर तूंहि पाळीप्रमाणं सीता देवीच्या अंकावर निद्रिस्थ झालास. तेव्हां पुनरपि त्यानें झडप घालून देवीचें वक्षःस्थल अतिशय ओरखडिलें असतां, तिचें रक्त अंगावर पडल्यामुळें तूं जागा झालास. वक्षःस्थलाचे ठिकाणीं तिला ओरखडिलेली पाहून तूं सर्पाप्रमाणें क्रुद्ध झालास, आणि तिला म्हणालास कीं, 'हे भीरु, नखांच्या अग्रांनीं तुझ्या वक्षःस्थलावर ओरखडे कोणीं केले आहेत? क्रुद्ध झालेल्या पंचमुखी नागाबरोबर कोण अतिप्रसंग करीत आहे?' असें म्हणून तूं जेव्हां इकडे तिकडे पाहूं लागलास, तेव्हां रक्तानें तीक्ष्ण नखें भरलीं असतांना तिच्याच संमुख स्थित असलेला तो पक्षी एकाएकीं तुझ्या दृष्टीस पडला. इंद्राचा पुत्र असलेला तो पक्षिश्रेष्ठ वायस गतीमध्यें वायूची बरोबरी करणारा असल्यामुळें सत्वर पाताळांत गेला. तेव्हां रामा, त्या पक्ष्यासंबंधानें तुझ्या मनामध्यें क्रूर विचार आला असतां दर्भाच्या आस्तरणांतील एक दर्भ घेऊन तूं तो ब्रह्मास्त्रानें अभिमंत्रण केलास, व तो प्रलयकालच्या प्रदीप्त अग्नीप्रमाणें संमुख असलेल्या पक्ष्याला अनुलक्षून जळूं लागला. तूं तो प्रदीप्त दर्भ त्या पक्ष्याला उद्देशून टाकिलास, तेव्हां तो त्या पक्ष्याच्या मागोमाग जाऊं लागला. त्या वेळीं तो आश्रयार्थ फिरूं लागला असतां, सर्व देवांनींहि भयभीत होऊन त्याचा त्याग केला. अशा रीतीनें त्रैलोक्या-

# सर्ग सहासष्टावा.

## श्रीरामाची मारुतीला पृच्छा.

ह्याप्रमाणें हनुमानानें सांगितलें असतां लक्ष्मणासहवर्तमान असलेला दशरथपुत्र राम तो मणि हृदयावर ठेवून रडूं लागला. ह्याप्रमाणें तो श्रेष्ठ मणि अवलोकन केल्यावर शोकाकुल झालेला राम अश्रूंनीं नेत्र भरून आले असतांना सुग्रीवाला म्हणाला, "ज्याप्रमाणें वत्साच्या प्रेमामुळें प्रेमळ गायीला पान्हा फुटतो, त्याप्रमाणें ह्या श्रेष्ठ रत्नाच्या दर्शनानें माझ्या हृदयाला पाझर फुटूं लागले आहेत. माझ्या श्वशुरानें हा श्रेष्ठ मणि विवाहसमयीं वैदेहीला दिलेला आहे; आणि हा त्या वेळीं जेव्हां तिनें मस्तकीं धारण केला होता, तेव्हां तो फारच शोभत होता. उदकामध्यें उत्पन्न झालेला व देवांनाहि पूज्य असलेला हा मणि यज्ञामध्यें अतिशय संतुष्ट झालेल्या इंद्रानें दिला आहे. हा श्रेष्ठ मणि अवलोकन केल्यानें आज मला पित्याचें आणि त्याचप्रमाणें प्रभु विदेहाधिपति जनकाचेंहि स्मरण झालें. त्या माझ्या प्रियेच्या मस्तकीं हा मणि शोभत असतो, आणि ह्याचें आज दर्शन झाल्यामुळें ती प्रियाच प्राप्त झाल्यासारखें मला वाटत आहे."

इतकें बोलून तो हनुमंताला म्हणाला:—"हे सौम्य, हे वानरश्रेष्ठा, मृतप्राय झालेल्या मला संभाषणरूप उदकानें सिंचन करणारी विदेहराजकन्या पतिव्रता सीता काय म्हणाली, तें तूं मला फिरून फिरून सांग. लक्ष्मणा, सीतेवांचून हा उदकामध्यें उत्पन्न झालेला मणि आज माझ्या दृष्टीस पडत आहे. ह्यापेक्षां अधिक दुःस्सह तें काय असणार! सीता एक महिनाभर जिवंत राहील, तर ती चिरंजीविनीच आहे, असें मी समजतों. कारण हे वीरा, कृष्णवर्ण नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या सीतेवांचून एक क्षणभरहि जिवंत रहाण्यास मी समर्थ नाहीं. जेथें माझी प्रिया दृष्टीस पडली, त्या ठिकाणीं मला घेऊन जा. तिची वार्ता समजल्यावर एक क्षणभरहि मला तिच्यावांचून राहवणार नाहीं. भयावह आणि घोर अशा राक्षसांमध्यें भित्र्यांतली भित्री असलेली ती माझी सुंदरी कशी बरें राहिली आहे? अंधकारापासून मुक्त झालेला शरदृतूंतील चंद्र मेघांनीं व्याप्त झाला असतां ज्याप्रमाणें प्रकाशत नाहीं, त्याप्रमाणें सांप्रत तिचें मुख खरोखरच प्रकाशत नसेल. हनुमाना, सीता काय म्हणाली, हें तूं मला खरें खरें सांग. कारण रोगग्रस्त पुरुष ज्याप्रमाणें औषधाच्या योगानें जिवंत रहाण्याची इच्छा

धरीत असतो, त्याप्रमाणें ह्याच्याच योगानें खरोखर जगण्याची मला आशा आहे. हनुमाना, रूपानें मनोहर आणि मधुर भाषण करणारी ती माझा वियोग झालेली सुंदरी मला काय म्हणाली, हें तूं मला सांग. वनवासाच्या दुःखाहून अधिक दुःसह दुःख प्राप्त झालें असतां ती जानकी जिवंत तरी कशी राहिली आहे?"

## सर्ग सदुसष्टावा.

### सीतासंदेशनिवेदन.

ह्याप्रमाणें महात्मा राम हनुमानाला म्हणाला असतां, सीतेचें सर्व कांहीं भाषण हनुमानानें रामाला कथन केलें. तो म्हणाला, "हे पुरुषश्रेष्ठा, चित्रकूट पर्वतावर पूर्वी घडलेली ही एक गोष्ट खुणेकरितां देवी जानकीनें अगदीं हुबेहुब सांगितली आहे. पूर्वी तुझ्यासहवर्तमान गाढ झोपीं गेलेली ती जानकी उठून पाहूं लागली, तों काक पक्ष्यानें एकाएकीं झडप घालून तिचें वक्षःस्थल विदीर्ण केलें. नंतर तूंहि पाळीप्रमाणें सीता देवीच्या अंकावर निद्रिस्थ झालास. तेव्हां पुनरपि त्यानें झडप घालून देवीचें वक्षःस्थल अतिशय ओरखडिलें असतां, तिचें रक्त अंगावर पडल्यामुळें तूं जागा झालास. वक्षःस्थलाचे ठिकाणीं तिला ओरखडिलेली पाहून तूं सर्पाप्रमाणें क्रुद्ध झालास, आणि तिला म्हणालास कीं, 'हे भीरु, नखांच्या अग्रांनीं तुझ्या वक्षःस्थलावर ओरखडे कोणीं केले आहेत? क्रुद्ध झालेल्या पंचमुखी नागाबरोबर कोण अतिप्रसंग करीत आहे?' असें म्हणून तूं जेव्हां इकडे तिकडे पाहूं लागलास, तेव्हां रक्तानें तीक्ष्ण नखें भरलीं असतांना तिच्याच संमुख स्थित असलेला तो पक्षी एकाएकीं तुझ्या दृष्टीस पडला. इंद्राचा पुत्र असलेला तो पक्षिश्रेष्ठ वायस गतीमध्यें वायूची बरोबरी करणारा असल्यामुळें सत्वर पाताळांत गेला. तेव्हां रामा, त्या पक्ष्यासंबंधानें तुझ्या मनामध्यें क्रूर विचार आला असतां दर्भाच्या आस्तरणांतील एक दर्भ घेऊन तूं तो ब्रह्मास्त्रानें अभिमंत्रण केलास, व तो प्रलयकालच्या प्रदीप्त अग्नीप्रमाणें संमुख असलेल्या पक्ष्याला अनुलक्षून जळूं लागला. तूं तो प्रदीप्त दर्भ त्या पक्ष्याला उद्देशून टाकिलास, तेव्हां तो त्या पक्ष्याच्या मागोमाग जाऊं लागला. त्या वेळीं तो आश्रयार्थ फिरूं लागला असतां, सर्व देवांनींहि भयभीत होऊन त्याचा त्याग केला. अशा रीतीनें त्रैलोक्या-

मध्यें हिंडूनहि जेव्हां त्याला कोणी त्राता आढळेनासा झाला, तेव्हां पुनरपि तो तुझ्याजवळ आला, आणि त्यानें तुला लोटांगण घातलें. त्या वेळीं वधालाच योग्य असलेल्या त्या काक पक्ष्याचें तूं कृपेनें परिपालन केलेंस. हे राघवा, अस्त्र सोडिलेलें व्यर्थ होणें शक्य नाहीं, एवढ्याचकरितां त्या पक्ष्याचा उजवा डोळा त्या बाणानें नाहींसा केला. नंतर तो सोडून दिल्यावर तुला व दशरथ राजाला नमस्कार करून तो पक्षी आपल्या निवासस्थानाकडे निघून गेला."

हनुमान सांगतो:—"श्रीरामा, ही खुणेची गोष्ट सांगून ती देवी म्हणाली, 'ह्याप्रमाणें तूं अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ, धैर्यवान आणि सुशील असूनहि राक्षसांवर अस्त्रप्रयोग कां करीत नाहींस? दानव, गंधर्व, असुर आणि मरुद्गण ह्यांपैकीं कोणीहि संग्रामामध्यें तुझ्याशीं युद्ध करण्यास समर्थ नाहींत. ह्यास्तव, माझे-विषयीं जर तुज वीर्यवानाला कांहीं काळजी असेल, तर चांगल्या निश्चित बाणांनीं संग्रामामध्यें तूं रावणाचा सत्वर वध कर. भ्रात्याची आज्ञा आहे, असें समजून तो पुरुषश्रेष्ठ शत्रुतापन लक्ष्मण तरी कशाकरितां माझें रक्षण करीत नाहीं? तेजामध्यें वायु आणि अग्नि ह्यांची बरोबरी करणारे ते उभयतां पुरुष-श्रेष्ठ माझें रक्षण करण्यास समर्थ असून देवांनाहि अजिंक्य आहेत. मग कशा-करितां बरें माझी ते उपेक्षा करीत आहेत? ज्या अर्थीं ते दोघेहि शत्रुतापन भ्राते समर्थ असूनहि माझें रक्षण करीत नाहींत, त्या अर्थीं माझेंच कांहीं तरी पाप आड आलें आहे, ह्यांत संशय नाहीं."

हनुमान पुढें सांगतो:—"राघवा, दीनपणानें केलेलें हें उत्कृष्ठ भाषण ऐकून घेऊन मी त्या साध्वीला पुनरपि म्हणालों, 'हे देवि, तुझ्या शोकामुळें रामाला दुसरें कांहीं सुचेनासें झालें आहे, हें मी तुला शपथपूर्वक खरें खरें सांगतों. रामच नुसता दुःखाकुल होऊन राहिला आहे, असें नाहीं; परंतु राम दुःखाकुल झाल्यामुळें लक्ष्मणहि शोकग्रस्त झाला आहे. आतां शोक करण्याची वेळ राहिली नाहीं. कारण कसें तरी तुझें दर्शन झालें आहे. आतां हे भामिनि, ह्या घटके-लाच तुझी इच्छा असल्यास सर्व दुःखांचा अंत झाल्याचें तूं अवलोकन कर-शील. ते उभयतां शत्रुतापन व पुरुषश्रेष्ठ राजपुत्र तुझ्या दर्शनाविषयीं उत्सुक झाल्यामुळें लंका भस्म करून टाकतील. इतकेंच नव्हे, परंतु संग्रामामध्यें क्रूर रावणाचा बांधवांसहवर्तमान वध करून राघव निःसंशय तुला आपल्या राज-धानीला घेऊन जाईल. ह्यास्तव हे अनिंदिते, रामाला पटेल, अशी एकादी त्याला आनंद देणारी खूण तूं माझ्यापाशीं दे."

मारुती म्हणतोः—" असें मीं म्हटल्यावर, चोहोंकडे पाहून वेणीमध्येंच गुंफण्यास योग्य असा हा उत्कृष्ट मणि वस्त्रांतून सोडून तिनें मला दिला. हे रघुप्रिय, तुझ्याकरितां तो मणि हातांत घेऊन व तिला मस्तकानें प्रणाम करून मी इकडे येण्याविषयीं त्वरा करूं लागलों. तेव्हां जाण्याविषयीं उत्सुक होऊन वृद्धिंगत होऊं लागलेल्या माझ्याशीं ती सुंदरी दीन जनककन्या बोलूं लागली. तिचें मुख अश्रूंनीं भरून गेलें होतें, आणि कंठ दाटून आला असल्यामुळें तिच्या मुखांतून शब्दहि कंपयुक्तच निघत होते. असो. प्रचंड शोकामुळें व्याप्त झालेली आणि मी इतक्यांत उड्डाण करून जाईन कीं काय, म्हणून गोंधळून गेलेली ती सीता मला म्हणाली, ' हे महाकपे, तूं भाग्यवान आहेस. कारण, कमलनयन राम आणि माझा यशस्वी दीर महापराक्रमी लक्ष्मण तूं आतां अवलोकन करशील.' ह्याप्रमाणें सीता बोलली असतां मीं त्या मैथिलीला म्हटलें, ' हे देवि, हे जनकनंदिनि, तूं सत्वर माझ्या पाठीवर बैस कशी. म्हणजे मी आजच्या आजच सुग्रीव आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान तुला रामाचें दर्शन करवितों.' ह्यानंतर ती देवी मला म्हणाली, ' हे महावानरा, हे वानरश्रेष्ठा, मी स्वतंत्र होऊन तुझ्या पृष्ठभागावर आरोहण करणें हा धर्म नव्हे. पूर्वीं माझ्या शरिराला राक्षसाचा स्पर्श झाला आहे खरा; परंतु काळाच्या तावडींत सांपडल्यामुळें माझा तेथें काय उपाय आहे ! ह्यास्तव, हे वानरश्रेष्ठा जिकडे ते राजकुमार आहेत, तिकडे तूं जा."

" ह्याप्रमाणें मला सांगून ती पुनरपि निरोप सांगण्यास तयार झाली आणि म्हणाली, ' हे हनुमाना, ते सिंहतुल्य उभयतां राम-लक्ष्मण आणि अमात्यांसहवर्तमान सुग्रीव ह्या सर्वांना तूं माझ्या वतीनें कुशल प्रश्न कर; आणि ज्या रीतीनें तो महापराक्रमी रघुवंशज राम ह्या दुःखसागराच्या कचाट्यांतून मला तारील, त्या रीतीनें तूं त्याला माझा वृत्तांत निवेदन कर. हे वानरश्रेष्ठा, हा माझा अतितीव्र शोकवेग आणि ह्या राक्षसांकडून होत असलेली ही माझी निर्भर्त्सना तूं रामासमीप गेल्यावर त्याला सांग. तुझा मार्ग तुला सुखावह होवो."

वायुपुत्र पुढें सांगतोः—" हे राजा, शुद्ध आचरणानें असलेल्या त्या साध्वी सीतेनें खेदपूर्वक तुला हा निरोप सांगितला आहे. ह्यास्तव, तूं ह्याचा विचार कर, आणि मीं तुला सांगितल्याप्रमाणें सीता सर्वस्वी कुशल आहे, असा माझ्या बोलण्यावर तूं विश्वास ठेव."

---

# सर्ग अडुसष्टावा.

## सीतेशीं झालेला संवाद रामाला सांगणें.

हनुमान म्हणाला:—“ तदनंतर हे पुरुषश्रेष्ठा, मला इकडे येण्याला अनुज्ञा दिल्यावर तुझे ठिकाणीं प्रेम असल्यामुळें ती देवी पुनरपि घाईघाईनें मला म्हणाली, ‘ ह्याप्रमाणें दाशरथि रामाला पुष्कळ प्रकारानें तूं सांग; आणि संग्रामामध्यें रावणाचा वध करून ज्या रीतीनें तो सत्वर मला भेटेल अशी तजवीज कर. अथवा हे शत्रुदमन वीरा, येथें राहण्याचा तुझा मानस असेल, तर एक दिवस राहीनास का ! एखाद्या गुप्त प्रदेशामध्यें विश्रांती घेऊन उद्यां जा, म्हणजे झालें. हे वानरा, असें झालें असतां, तुझ्या सान्निध्यामुळें मज भाग्यहीन स्त्रीची एक घटकाभर तरी ह्या प्रचंड शोकापासून मुक्तता होईल. नाहीं तर आतां तूं एकदां येथून निघून गेलास म्हणजे फिरून येईतोंपर्यंत माझे प्राण रहाण्याचाहि संदेहच आहे. हे वीरा, तूं दृष्टीआड झालास, म्हणजे एका दुःखांतून सुटून दुसऱ्या दुःखांत पडल्यामुळें दुर्दशेस पोहोंचलेल्या मज दुःखभगिनीला फारच भीति वाटूं लागेल. हे वीरा, तूं जरी साहाय्यकर्ता आहेस, तरी वानर आणि ऋक्ष ह्यांविषयीं एक फारच मोठी शंका माझ्या डोळ्यांपुढें जशी कांहीं अगदीं दत्त म्हणून उभी आहे; आणि ती शंका निःसंशय मला खरीहि दिसत आहे. तीं ऋक्षवानरांचीं सैन्यें अथवा ते राजपुत्र खरोखर दुस्तर महासागर कसे तरून येतील ? हे निष्पापा, गरुड, वायु आणि तूं ह्या तीनच प्राण्यांचे ठिकाणीं ह्या जगतामध्यें समुद्र उल्लंघन करण्याचें सामर्थ्य आहे. तस्मात्, हे वीरा, पुढें येऊन पडलेल्या ह्या दुस्तर कार्यांतून पार पडण्याला तुला काय उपाय दिसत आहे, तो तूं मला सांग. हें कार्य पार पाडण्यास तूंच एकटा खरोखर समर्थ आहेस, व तुझें बल प्रशंसनीय आहे; परंतु संपूर्ण सैन्यांसहवर्तमान संग्रामामध्यें रावणाचा वध करून आणि म्हणूनच विजयी होऊन जर राम मला आपल्या राजधानीमध्यें घेऊन जाईल, तर तें करणें त्याला यशस्कर होईल. ज्याप्रमाणें राक्षसानें कपट करून त्या वीराच्या वनांतून मला हरण करून आणिलें, त्याप्रमाणें त्याच्या भीतीनें मला तशाच रीतीनें येथून परत नेणें रामाला योग्य नाहीं. शत्रुसैन्याचा नाश करणारा तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम सैन्यांच्या योगानें लंका ग्रस्त करून जर मला घेऊन जाईल, तर तें त्याच्या

योग्यतेला शोभेल. यास्तव त्या रणशूर महात्म्याला अनुरूप असा पराक्रम त्यांच्या हातून होईल, अशी तूं व्यवस्था कर."

"अर्थ आणि हेतु ह्यांनीं भरलेलें तें तिचें विनययुक्त भाषण श्रवण करून मीं शेवटचें उत्तर तिला सांगितलें कीं, 'हे देवी, वानर आणि ऋक्ष ह्यांच्या सैन्यांचा अधिपति वानरश्रेष्ठ सुग्रीव धैर्यवान असून तुला नेण्याकरितां त्याचा निश्चय झालेला आहे. पराक्रमी, धैर्यवान, महाबलाढ्य आणि मनोरथाप्रमाणें वेगवान असे वानर त्याच्या आज्ञेंत आहेत. ऊर्ध्वभागीं, अधोभागीं अथवा आजुबाजूंस त्यांची गति कुंठित होत नाहीं; आणि मोठमोठीं कार्यें पुढें येऊन पडलीं असतांनाहि त्या अतुल तेजस्वी वानरांचें धैर्य कधींच खचत नाहीं. आकाशमार्गानें गमन करणाऱ्या त्या बलाढ्य महाभाग्यवान वानरांनीं अनेक वेळां पृथ्वीला प्रदक्षिणा केली आहे. माझ्यापेक्षां अधिक आणि माझ्या बरोबरीचे असेच वानर तेथें आहेत. माझ्याहून कमी असा कोणीहि सुग्रीवाजवळ नाहीं. आतां यःकश्चित् मी सुद्धां जर येथें आलों आहें, तर त्या महाबलाढ्य वानरांची गोष्ट पाहिजे कशाला? हलक्यासलक्या कामाकरितां मोठमोठ्यांना पाठविणें योग्य नाहीं. साधारण सेवकच क्षुल्लक कामाला पाठवीत असतात. म्हणून मी यःकश्चित् येथें आलों आहें. तस्मात् हे देवी, तुला काळजी करण्याचें कारण नाहीं. तूं चिंता करूं नको. ते वानरसेनाधिपती एका उडीबरोबर लंकेमध्यें येतील. हे महाभाग्यवति, उदय पावलेल्या चंद्रसूर्यांप्रमाणें ते पुरुषश्रेष्ठ माझ्या पाठीवर बसून तुझ्या समीप येतील. शत्रुघातक सिंहतुल्य राम आणि धनुर्धारी लक्ष्मण लंकेच्या द्वाराशीं आल्याचें तूं सत्वर अवलोकन करशील. नखें आणि दांत हींच ज्यांचीं आयुधें आहेत, सिंह आणि व्याघ्र ह्यांप्रमाणें ज्यांचे पराक्रम आहेत, आणि गजेंद्राप्रमाणें जे धिप्पाड आहेत, असे वानरवीर एकत्र जुळलेले लवकरच तुझ्या दृष्टीस पडतील. पर्वताप्रमाणें आणि मेघांप्रमाणें असलेले वानरश्रेष्ठ लंकेंतील मलय पर्वताच्या शिखरांवर गर्जना करूं लागले असतां लवकरच त्याचा ध्वनि तुझ्या कानीं येईल. तुझ्यासहवर्तमान शत्रुदमन रघुवंशज रामाला वनवास संपून अयोध्येमध्यें राज्याभिषेक झाल्याचें तुझ्या सत्वरच दृष्टोत्पत्तीस येईल."

हनुमान पुढें सांगतो:—"रामचंद्रा, ह्याप्रमाणें शुभ व इष्ट अशा शब्दांनीं मीं तिचें सांत्वन केलें असतां, तुझ्या शोकामुळें अतिशय व्याकुल झालेली ती मिथिलराजकन्या सीता दैन्यरहित भाषण करूं लागली, आणि माझें भाषण ऐकून तिनें दुःख करण्याचें सोडून दिलें."

